ल्येव तल्स्तोय (१८२८-१९१०) ह्यांच्या प्रस्तुत कथासंग्रहात ह्या महान लेखकाच्या सृजनाच्या वाटचालीचे दर्शन घडते.

पुस्तकाच्या आरंभीची कथा 'दोन शिलेदार' ही तल्स्तोयनी वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी लिहिली. क्रिमियाच्या युद्धात (१८५३-१८५६) भाग घेऊन पीटरबुर्गला परतल्यानंतर त्यांनी ही कथा लिहिली. आणि संग्रहाच्या अखेरची 'बॉलनृत्यानंतर' ही वयोवृद्ध साहित्य-श्रेष्ठाची शेवटची कथा आहे. लेखकाच्या मृत्यूनंतरच केवळ ती प्रथम प्रकाशित झाली.

"तल्स्तोय यांचं स्वतःचं खास वैशिष्ट्य आहे. त्यांच्यासारखं मनोविश्लेषण कुणीही हाताळू शकत नाही, त्यांच्या-सारखं माणसाच्या अंतःकरणात डोकावून पाहणं कुणालाही जमत नाही..."

दमित्री पीसारेव

# ल्येव तल्स्तोय

# शापित संगीत

## कथासंग्रह



रादुगा प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

अनुवादक : अनिल हवालदार

सजावट : आनातोली मोइसेयेव

**Лев Толстой**

ПОВЕСТИ И РАССКАЗЫ

*на языке маратхи*

**Tolstoy L.**

STORIES

*in Marathi*



$T\frac{4702010100-510}{031(01)-83}302-83$

## अनुक्रमणिका

# तल्स्तोय यांच्यासंबंधी चार शब्द

...आमच्या सामाजिक विचारसरणीत तल्स्तोय यांनी बजावलेल्या कामगिरीवर रशियन लेखकांनी अनेकदा भर दिला आहे. तल्स्तोय यांच्या मृत्यूआधी दहा वर्षे चेखोव यांनी याल्टाहून लिहीले होते : "...तल्स्तोय यांच्या मृत्यूच्या नुसत्या विचाराने मनाचा थरकाप होतो. त्यांच्याविना माझ्या जीवनात फार मोठी पोकळी निर्माण होईल... त्यांच्याविना आमचे साहित्य म्हणजे मेंढपाळाविना कळप असे होईल..." याआधी वीस वर्षे इवान तुर्गेनेव यांनी असेच विचार व्यक्त केले होते व तल्स्तोय यांच्या मृत्यूआधी दोन वर्षे अलेक्सान्द्र ब्लोक यांनीही असेच मत प्रगट केले होते. तल्स्तोय यांच्या मृत्यूमुळे आपण अनाथ आणि नेताहीन बनू असे केवळ आघाडीच्या बुद्धिमंतांना वाटले होते असे नव्हे, तर रशियातील जनसामान्यांनाही ह्या हानीची अनुभूती जाणवली होती. त्या काळात अत्यंत प्रसिद्ध साहित्यिक कृतीसुद्धा खूप लांबच्या आणि वेटोळ्या रस्त्यांनी सर्वसामान्य लोकांपर्यंत जाऊन पोहोचत होत्या हे खरे. जिवंत लेखकाच्या सार्वजनिक जीवनाविषयी प्रसृत होणाऱ्या बातम्यांवरूनच सर्वसाधारण माणसे त्या लेखकाविषयी आपले मत बनवीत.

पण तल्स्तोय यांनी आपले संपूर्ण आयुष्य कोणतीही लपवालपवी न करता उघडपणे लोकांसमोर व्यतीत केले. कधी स्वतः-च्याच नांवाने, तर कधी ओलेनिन, लेविन अथवा नीखलूदोव ह्या टोपणनांवांद्वारे स्वतःच्या मनातील खोल विचारांना लोकां-समोर व्यक्त केले. ते नेहमीच प्रवाहाविरुद्ध पोहले, रूढीविरुद्ध वागले. अयोग्य मार्गाने केलेला संपत्तीसंचय, बळजबरी आणि अत्याचार, मरणोन्मुख संस्कृतीचे भयानक अवशेष, ह्यांच्या-विरुद्ध त्यांनी कडाडून संघर्ष केला. तल्स्तोयना दीर्घायुष्य लाभल्यामुळे जनसामान्यांमधील अग्रणी लोकांना स्वतःची समजूत घालण्याची सवय जडली होती की, कोणत्याही किंमतीला विकत घेणे शक्य नाही असे एक हृदय त्यांच्या निकट स्पंदत आहे; उघडे डोळे त्यांच्या खडतर श्रमांना आणि उणीवांना पहात आहेत; तीक्ष्ण कान त्यांचे उसासे-निःश्वास आणि गाणी ऐकत आहेत; आणि हे सर्व काही नजीकच्याच भविष्यकाळा-तील जगाच्या भांडारात अस्सल सोने बनून राहील.

युगाचे विचार आणि त्याच्या प्रेरणा, शंकांवरील विजय आणि आशा, ह्यांच्यामधूनच साहित्याचे सुवर्णभांडार बनत असते. तत्कालीन ऐतिहासिक अनुभवांचे त्यात कोणते स्थान असते, ह्यावर त्यांचे सर्व बळ अवलंबून असते...

थोडक्यात म्हणजे साहित्याचा कस काळाच्या कसोटीवरच लागतो.

काळाच्या काजळीची पुटे ज्यांच्यावर चढू शकत नाहीत अशा काही मोजक्या तेजस्वी साहित्यकृतींमध्ये तल्स्तोय यांचे लेखन समाविष्ट आहे. पुष्कीन यांनी आम्हाला रशियन भाषेच्या नादमयतेचा अनुभव दिला, तर तल्स्तोय यांनी भाषेच्या माध्यमातून रशियनांच्या मनोविचारांना, त्यांच्या सुख-दुःखांना

व्यक्त केले. एवढेच नव्हे तर नेपोलियनच्या वर्चस्वाबरोबर आलेल्या बहुभाषी युरोपविरुद्ध रशियनांनी केलेल्या अत्यंत शौर्यशाली लढाईला शब्दरूप दिले. न्याय्य ध्येयाच्या प्राप्तीसाठी लढताना त्यांच्या घडलेल्या शौर्यशाली कायाकल्पाला ऐतिहासिक उदाहरणांचा दाखला देऊन स्पष्ट केले. अनेकवेळा ज्याची कसोटी घेतली गेली आहे अशा राष्ट्रांमधील आणि वेगवेगळ्या शांतताप्रेमी व्यक्तींमधील त्या शौर्यशाली स्थित्यंतराला त्यांनी दाखविले. 'युद्ध आणि शांतता,' 'कझाक', 'आन्ना कारेनिना' आणि 'पुनर्जन्म'च्या लेखकाला सर्व काही स्पष्ट दिसते—भणाणते तुफान आणि मंद वायुलहरी; सर्वसामान्य मानवी दृष्टीच्या आवाक्यात न मावणाऱ्या महाविराट गोष्टी आणि सामान्यत: नजरेतून निसटणाऱ्या सूक्ष्म गोष्टीही; मानवी व्यक्तित्वाच्या माध्यान्हीचा तळपता सूर्य आणि त्याची संध्याकाळसुद्धा. तल्स्तोय यांच्या विसंगत आणि गुंतागुंतीच्या आयुष्यामुळे मानवी जीवनातील अनपेक्षित चढ-उतारांना दाखविण्यास त्यांना मदत झाली. रूस्सोनंतर, आपल्या वाचकांसमोर त्यांना एवढ्या उघड रीतीने दाखविणे तल्स्तोयविना इतर कुणाही लेखकाला शक्य झालेले नाही. तल्स्तोय यांच्या मृत्यूनंतर अर्ध्या शतकाहून अधिक काळ लोटला असूनही, अगदी आजसुद्धा, त्यांच्या सिद्धींचे केवळ विराट रूपच नव्हे तर त्यांचे विवरणसुद्धा, कोणत्याही प्रकाशाच्या मदतीविना आपण स्पष्ट पाहू शकतो. सत्याचा शोध घेणाऱ्या व्यक्तीच्या बाबतीत अटळपणे घडणारे अतिरेक आणि चुका त्यांच्या व्यक्तिमत्वातही सामावलेल्या पाहू शकतो, कारण पूर्ण शुद्ध स्वरूपात सत्याची प्राप्ती अद्याप कुणालाही घडलेली नाही.

अत्यंत श्रेष्ठ साहित्यिकांच्या यशांच्या चौकटीतही तल्स्तोय

यांचे व्यक्तित्व मावू शकत नाही. पूष्कीनबाबत बेलिन्स्कींनी म्हटले होते की, सामान्य गद्यात त्यांच्याविषयी चर्चा करायची लाज वाटते. तल्स्तोय यांचे नांव उत्सवी गौरवपूर्ण शब्दांच्या चौकटीत बसविणे आवश्यक आहे. आपल्या संस्कृतीच्या उषः-कालापासून आजपर्यंत निर्माण झालेल्या श्रेष्ठतम लेखकांच्या नांवांमध्ये – ज्यांची संख्या जेमतेम एक डझन असेल – ह्या नांवाचा समावेश आहे. तल्स्तोय यांचे कार्य खरोखरीच हर्क्युलसच्या पराक्रमाप्रमाणे होते. ज्याच्या शिखरावरून मानवी विचारांच्या शतकानुशतकांच्या जुन्या रस्त्यांचे आणि पायवाटांचे दर्शन घडू शकेल अशा प्रगतीच्या राजमार्गावरील पर्वताप्रमाणे ते आहेत ... *

लेओनिद लेओनोव

---

*१९ नोव्हेंबर १९६० रोजी, तल्स्तोय यांच्या ५० व्या पुण्यतिथीनिमित्त आयोजित केलेल्या मॉस्कोतील बल्शोय थिएटरमधील सभेतील लेओनिद लेओनोव यांच्या भाषणाचा काही भाग प्रस्तुत स्थळी उद्धृत केला आहे. – संपादक

# दोन शिलेदार

काऊंटेस मा. नि. तल्स्तोय
यांना अर्पण

जोमिनी हा जोमिनीच वोदकाबद्दल
अर्धा शब्दही उच्चारायचा नाही...
दे. दाविदोव

१९ व्या शतकाच्या आरंभीच्या वर्षांमध्ये, जेव्हा रेलमार्ग अथवा राष्ट्रीय मार्ग नव्हते, गॅस किंवा चरबीच्या तेलाचे दिवे नव्हते, स्प्रिंगच्या गादीचे सखल दिवाण अथवा बिनवॉर्निशचे फर्निचर नव्हते, जेव्हा आपल्या डोळ्यांवर चापाचा चष्मा लावणारे भ्रमनिरास झालेले युवक नव्हते, उदारमतवादी मनाच्या स्त्री-तत्त्वज्ञ नव्हत्या, आजच्या काळात बहुसंख्येने निर्माण झालेल्या सख्या नव्हत्या – त्या निष्पाप काळी जेव्हा मॉस्कोपासून सेंट पीटरबुर्गपर्यंत प्रवास करणारा माणूस आपल्या गाडीत अथवा बग्गीत घरी बनविलेल्या पदार्थांची भलीमोठी शिदोरी भरून घ्यायचा, धुळकट किंवा चिखलाच्या रस्त्यांवरून तब्बल आठ दिवस आणि रात्री प्रवास करायचा, तळलेल्या कटलेटांवर, गरम बूब्लीकींवर आणि वाल्दायच्या घंटांवर विश्वास ठेवायचा – त्या काळी जेव्हा प्रदीर्घ शारदीय संध्यासमयांना मेणबत्त्या धूर ओकीत रहायच्या, वीस किंवा तीस माणसांच्या कुटुंबांवर प्रकाशत रहायच्या, जेव्हा नृत्य दालनां-

मधील शमादानांमधून मेणाच्या आणि चरबीच्या बत्त्या तेवायच्या, फर्निचर सम्मिताकार मांडलेले असायचे, आमच्या वडील मंडळींचे तारुण्य केवळ सुरकुत्यांचा आणि पांढऱ्या केसांचा अभाव यावरूनच ठरत नसे, तर स्त्रियांसाठी त्यांनी खेळलेल्या द्वंद्वांवरून व सहजगत्या अथवा मुद्दामच पाडलेले हातरुमाल उचलून देण्यासाठी खोलीच्या एका कोपऱ्यातून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंत ज्या चपळतेने ते झेपावत त्यावरूनही ठरत असे ; जेव्हा आमच्या माता प्रचंड बाह्यांचे पायघोळ अंगरखे घालीत होत्या आणि चिठ्ठ्या टाकून सर्व घरगुती प्रश्न सोडवीत होत्या ; जेव्हा प्रेमपात्र सख्या दिवसाच्या उजेडापासून आपली तोंडे लपवीत होत्या — अशा त्या फ्रीमेसन संप्रदायाच्या, मार्तिनिस्तांच्या आणि तूगेंदबुंदांच्या भाबड्या दिवसांमध्ये, मिलोरादोविच, दाविदोव आणि पूष्कीन यांच्या दिवसांमध्ये — अशा त्या काळामध्ये गुबेर्नियाचे केंद्र असलेल्या क. शहरात श्रीमंत जमीनदारांची काँग्रेस होती आणि उमरावांच्या प्रतिनिधींच्या निवडणुका नुकत्याच पार पडल्या होत्या.

१

"काही हरकत नाही, गरज पडली तर मी हॉलमध्ये रहायला तयार आहे," घसरगाडीमधून नुकताच खाली उतरलेला आणि क. गावामध्ये सर्वोत्तम समजल्या जाणाऱ्या पथिकाश्रमात आता प्रवेश करणाऱ्या तरुण लष्करी अंमलदाराने म्हटले. त्याने मोठा कोट घातला होता व त्याच्या डोक्यावर शिलेदारी टोपी होती.

''काँग्रेस एवढी मोठी आहे महाराज, अगदी विलक्षणच !"

पथिकाश्रमाचा पोऱ्या म्हणाला. अंमलदाराच्या नोकराकडून त्याला आधीच समजले होते की, अंमलदार म्हणजे काऊंट तूर्बीन होता व म्हणून त्या पोऱ्याने "महाराज" असे संबोधिले होते. "आफ्रेमोवस्काया इस्टेटीच्या मालकीणबाईंनी सांगितलंय की आज संध्याकाळी त्या आपल्या मुलींबरोबर निघून जाणार आहेत. आपली जर इच्छा असेल तर अकरा नंबरच्या खोलीत मी आपल्याला जागा देतो," काऊंटपुढे हलक्या पावलांनी कॉरीडॉर ओलांडीत व सतत मागे कटाक्ष टाकीत पोऱ्या म्हणाला.

हॉलमध्ये, झार अलेक्सांदरच्या काळवंडलेल्या पूर्णाकृती चित्राखालील टेबलापाशी काही माणसे शँपेन पीत बसली होती. **स्थानिक** प्रतिष्ठितांमधली ती माणसे होती हे उघड होते. त्यांच्या शेजारीच, गडद निळ्या अंगरख्यांमधला प्रवासी व्यापाऱ्यांचा एक गट बसला होता.

काऊंटने खोलीत प्रवेश करताच आपल्या **ब्लूखेर** नामक प्रचंड राखाडी कुत्र्याला हाक मारली, आपल्या कॉलरवरील बर्फ वितळायच्या आतच त्याने कोट बाजूला भिरकाविला, वोदका मागविली, निळ्या सॅटिन सदऱ्यात तो टेबलाशी बसला आणि तेथील सद्गृहस्थांशी गप्पा मारायला त्याने आरंभ केला. त्याच्या देखण्या आकृतीमुळे आणि मोकळ्या स्वभावामुळे तात्काळ प्रभावित झालेल्या मंडळींनी त्याच्यापुढे शँपेनचा ग्लास ठेवला. काऊंटने प्रथम वोदकाचा ग्लास घशात ओतला आणि नंतर आपल्या नव्या ओळखीच्या लोकांसाठी दुसरी बाटली मागविली. नेमक्या ह्याच वेळी घसरगाडीचा गाडीवान दारू-साठी पैसे मागायला आला.

"साशा!" काऊंट ओरडला. "त्याला दे!"

गाडीवान साशाबरोबर गेला आणि आपल्या उघड्या पंजावर पैसे धरून ताबडतोब परतला.

"बघा महाराज! आपल्यासाठी एवढा खपलो, आपण मला अर्धा रूबल कबूल केला होता आणि त्यानं फक्त पाव रूबल दिला मला!"

"साशा! त्याला एक रूबल दे!"

साशाने तोंड वाकडे करीत गाडीवानाच्या बुटांकडे पाहिले.

"त्याला तेवढे पुरेसे आहेत," घनगंभीर आवाजात साशा म्हणाला. "शिवाय, माझ्यापाशी आणखी पैसे नाहीत."

काऊंटने आपल्या पैशाच्या पाकिटामधून शेवटच्या दोन पाच रूबलच्या नोटा काढल्या व त्यांपैकी एक नोट गाडीवानाला दिली. गाडीवानाने काऊंटच्या हाताचे चुंबन घेतले आणि तो बाहेर निघून गेला.

"बघा काय परिस्थिती आली!" काऊंट म्हणाला. "माझे शेवटचे पाच रूबल!"

"खरे शिलेदार आहात तुम्ही!" एक सद्गृहस्थ स्मित करीत म्हणाला. त्याच्या मिशा, त्याचा आवाज आणि त्याच्या पायांमधील विशिष्ट दमदार चपळपणा पाहता तो सेवानिवृत्त घोडदळ अधिकारी दिसत होता. "काऊंट, तुमचा इथं बराच काळ मुक्काम करायचा इरादा आहे?"

"मला जर पैशाची गरज नसती तर मी इथं मुळीच थांबलो नसतो. ह्या दळभद्री पथिकाश्रमात एकही खोली रिकामी नाही!"

"काऊंट, माझ्या खोलीत माझ्याबरोबर राहू शकाल?" घोडदळ अधिकाऱ्याने विचारले. "मी सात नंबरच्या खोलीत आहे. माझ्याबरोबर रहायला तुमची काही हरकत नसेल,

तर इथं निदान तीन दिवस मुक्काम करा. आज रात्री उमरावांच्या मार्शलनी बॉल-नृत्याचा कार्यक्रम ठेवलाय. तुमची त्याला हजेरी लागली तर त्यांना आनंदच वाटेल."

"खरंच काऊंट, रहाच तुम्ही!" त्या घोळक्यातील एक देखणा तरुण म्हणाला. "काय घाई आहे? ह्या निवडणुका तीन वर्षांतून एकदाच तर होतात. काऊंट, निदान आमच्या इथल्या तरुण उमरावणींवर नजर तरी टाका!"

"साशा! माझे आतले कपडे आण. मी बान्यात* जातो," उठता उठता काऊंट म्हणाला. "त्यानंतर बघू! कदाचित खरंच मी मार्शलच्या समारंभाला येईन!"

त्याने एका वेटरला बोलाविले आणि काहीतरी सांगितले. वेटर गालातल्या गालात हसत उत्तरला, "महाराज, सगळं काही शक्य आहे." मग तो निघून गेला.

"माझं सामान त्यांना मी तुमच्या खोलीत ठेवायला सांगतो," कॉरीडॉरमधून बाहेर जाताना काऊंट मागे वळून म्हणाला.

"माझा बहुमान समजेन मी तो," दाराकडे पळत घोडदळ अधिकारी म्हणाला. "खोली नंबर सात. विसरू नका."

काऊंटच्या पावलांचा आवाज विरतो न विरतो तोच घोडदळ अधिकारी टेबलाशी परतला. आपली खुर्ची कारकुनापाशी सरकवीत, त्याच्या थेट नजरेला नजर भिडवीत हसून तो म्हणाला:

"हाच तो माणूस!"

"काय म्हणता?"

---

*रशियन हमामखाना – अनु.

"होय, होय! मी तुला सांगतो—द्वंद्वयुद्धाकरता प्रसिद्ध असलेला हाच तो शिलेदार! तूर्बीन त्याचं नांव. प्रत्येकाला ठाऊक आहे. मी पैजेवर सांगतो, त्यानं मला ओळखलं. नक्की ओळखलं! त्यानं आणि मी लेबेद्यानमध्ये तीन आठवडे धमाल केली होती. तिथं मला घोडे बदली करायला धाडलेलं होतं. एक बारकासा प्रसंग घडला होता—आम्ही दोघंही त्याला जबाबदार होतो—म्हणून त्यानं मला न ओळखल्याचा बहाणा केला. छान माणूस आहे की नाही?"

"खरंच छान माणूस आहे. किती चांगले रिवाज! तशा प्रकारचा तो होता असं कुणाच्या कल्पनेतसुद्धा येणार नाही," देखणा तरुण म्हणाला. "आणि त्याच्याशी आपली मैत्री पटकन जुळली. तो पंचविशीपेक्षा जास्त नसावा? काय?"

"तसा तो दिसतो, पण प्रत्यक्षात वय जास्त आहे. पण त्याचे गुण जाणायला त्याची चांगली ओळख झाली पाहिजे. मादाम मीगूनोवाबरोबर कोण पळालं? तो पळाला. साब्लिनला कुणी ठार मारलं? पायांना धरून मात्नेवला खिडकीतून कुणी फेकून दिलं? ड्यूक नेस्तेरोवचे तीन लाख कुणी जिंकले? तो किती अविचारी माणूस आहे याची कल्पना नाही! जुगारी, द्वंद्वबाज, फूसलाव्या! पण त्याचं काळीज शिलेदाराचं आहे, अस्सल शिलेदाराचं! आम्हाला नांवं ठेवायला लोकांना आवडतं, पण खरा शिलेदार कुणी जाणून घेत नाही! छे:! काय दिवस होते ते!"

आणि घोडदळ अधिकाऱ्याने लेबेद्यान येथे काऊंटबरोबर घातलेल्या गोंधळाची रसभरीत वर्णने सुरू केली. खरे म्हणजे तसे काही घडले नव्हते आणि तसले काही घडण्याची कधी शक्यताही नव्हती. त्याचे पहिले कारण म्हणजे यापूर्वी त्याने

काऊंटला कधीही पाहिलेले नव्हते आणि काऊंट सैन्यात दाखल होण्याच्या आधीच दोन वर्षे तो सैन्यातून निवृत्त झाला होता. दुसरे कारण म्हणजे घोडदळ अधिकाऱ्याने कधीही, घोडदळात नोकरी केली नव्हती. बेलेवस्की रेजिमेंटमध्ये नम्र कॅडेट म्हणून चार वर्षे त्याने काढली होती आणि कनिष्ठ अधिकारी म्हणून नेमणूक होताच राजीनामा दिला होता. पण दहा वर्षांपूर्वी, वारसाहक्क लाभल्यानंतर, खरोखरीच तो लेबेद्यानला गेला होता. तेथे घोडे बदली करणाऱ्या काही अंमलदारांच्या संगतीत त्याने सातशे रूबल उधळले होते आणि भालाईतांच्या पलटणीत दाखल होण्याच्या इराद्याने नारिंगी बाह्यांचा उहलान गणवेष शिवून घेतला होता. घोडदळात नोकरी करण्याची त्याची तीव्र इच्छा होती आणि लेबेद्यानमध्ये त्या अंमलदारांच्या संगतीमधील तीन आठवड्यांचा काळ हा त्याच्या आयुष्यातील सर्वात सुखाचा काळ ठरला. मनातल्या मनातच त्याने आपल्या तीव्र इच्छेला वास्तवाचे रूप दिले, मग आठवणीचे रूप दिले. त्यामुळे आपल्या घोडदळाच्या कारकीर्दीवर त्याचा पक्का विश्वास बसला. अर्थात प्रामाणिकपणा आणि मनमिळाऊपणा या बाबतीत एक खराखुरा लायक सद्‌गृहस्थ म्हणून त्याच्या कीर्तीला मुळीच बाध आला नाही.

"खरंच, ज्यांनी घोडदळात काम केलंय त्यांनाच आमच्यासारख्यांची किंमत समजेल," खुर्चीच्या टोकाशी बसून पाय फेंगाडीत तो म्हणाला. नंतर खालचा जबडा पुढे काढीत खर्ज स्वरात तो पुढे बोलू लागला: "माझ्या स्क्वाड्रनच्या पुढं मी दौडत असायचा. माझ्या मांडीखालचा घोडा म्हणजे सैतानच होता आणि माझी स्वारी त्याच्यावर सैतानासारखीच बसलेली असायची. मग स्क्वाड्रन कमांडर आमची पाहणी करायला

यायचा. 'निशाणवाला,' मला तो म्हणायचा, 'तुमच्याशिवाय काही जमायचं नाही. कृपा करून स्क्वाड्रनचं कवायतीला नेतृत्व करा.' 'ठीक आहे, सर' मी म्हणायचा आणि तात्काळ कृती करायचा. मागं गिरकी घेऊन माझ्या मिशांवाल्या शूरांना हुकूम ठोकायचा! क्षणात आमची दौड सुरू व्हायची. छे:, गेले ते दिवस!"

तांबडालाल चेहरा आणि ओले केस घेऊन काऊंट बान्यामधून परतला व थेट सात नंबरच्या खोलीत गेला. तेथे घोडदळ अधिकारी ड्रेसिंग-गाऊन घालून, दातांमध्ये पाईप धरून आनंदाने विचार करीत बसला होता. सुप्रसिद्ध तूर्बीनबरोबर एका खोलीत राहण्याचे भाग्य आपल्याला अचानक लाभले ह्याचा त्याला आनंद झाला होता, पण थोडी धास्तीही वाटत होती. त्याच्या मनात आले: "पण अचानक त्याची लहर फिरली आणि मला नागडा करून शहराबाहेर नेऊन त्यानं बर्फात पुरलं, अथवा माझ्या सर्वांगाला डांबर फासलं किंवा नुसतंच... छे:, पण तो आपल्या साथीदाराला असं वागवणार नाही," त्याने स्वत:चे सांत्वन केले.

"साशा! ब्लूखेरला खाऊ घाल!" काऊंट ओरडला.

ग्लासभर वोदका झोकून बऱ्यांपैकी झिंगलेला साशा अवतरला.

"दम धरता आला नाही! गुंडा, एव्हाना झिंगलास! ब्लूखेरला खाऊ घाल!"

"तसा अन्नाविना तो मरणार नाही. बघा किती तुकतुकीत आहे," कुत्र्याला थोपटीत साशा म्हणाला.

"उगीच वटवट करू नको! त्याला खायला घाल!"

"आपल्याला फक्त आपल्या कुत्र्याची काळजी! पण माणसानं ग्लासभर प्यायली तर मात्र त्याच्यावर ओरडता!"

"आता एक हाणीन बघ!" काऊंट एवढ्या जोराने ओरडला की, खिडकीची काचेचीं तावदाने थरथरली आणि घोडदळ अधिकारीही थोडा घाबरला.

"आपल्या साशानं रात्रीपासून काही खाल्लंय का ते आधी विचारा. आपल्याला माणसापेक्षा कुत्र्याची पर्वा जास्त वाटत असेल तर खुशाल मारा मला," साशा म्हणाला. पण त्याचवेळी त्याच्या नाकावर असा सणसणीत गुद्दा बसला की, समोरच्या भिंतीवर डोके आपटून तो खाली कोसळला. दुसऱ्याच क्षणी नाकावर हात धरून तो चटकन उठला, दाराबाहेर पळाला आणि कॉरीडॉरमधील ट्रंकेवर त्याने स्वतःला झोकून दिले.

"माझे दातच पाडले त्यांनी," एका हाताने आपले रक्ताळलेले नाक पुशीत आणि दुसऱ्या हाताने ब्लूखेरची पाठ खाजवीत साशा पुटपुटला. ब्लूखेर स्वतःचे अंग चाटण्यात मग्न होता. "ब्लूखेर, त्यानं माझे दात पाडले, पण तरीही ते माझे धनी आहेत. त्याच्यासाठी मी आगीतूनसुद्धा चालत जाईन! असं आहे बाबा! कारण ते माझे काऊंट आहेत ब्लूखेर! तुला भूक लागली ब्लूखेर?"

थोडा वेळ तेथे पडून राहिल्यानंतर साशा उठला, त्याने कुत्र्याला खाऊ घातले आणि ताळ्यावर येऊन काऊंटची सेवा करण्यासाठी, त्याला चहा देण्यासाठी तो गेला.

पलंगाच्या पायावर आपल्या तंगड्या ठेवून अधिकाऱ्याच्या गादीवर काऊंट पडला होता. "मी माझा तो अपमान समजेन हं," घोडदळ अधिकारी दीनवाण्या आवाजात काऊंटला म्हणाला. "तसं म्हटलं तर मीही जुना सैनिक आणि साथी आहे. दुसऱ्या कुणाकडून तरी तुम्ही पैसे घेण्यापेक्षा मीच तुम्हाला

खुषीनं दोनशे रूबल देतो. सध्या माझ्यापाशी तेवढे नाहीत, फक्त शंभर आहेत, पण बाकीचे मी आजच पैदा करीन. काऊंट, तसं नाही झालं तर मी तो अपमान समजेन!"

"धन्यवाद मित्रा," त्याच्या पाठीवर थाप मारीत काऊंट म्हणाला. त्यांच्यामध्ये कोणत्या प्रकारचे नाते निर्माण व्हायला पाहिजे होते याचा काऊंटने तात्काळ अंदाज बांधला. "धन्यवाद. जर अशी परिस्थिती असेल तर आपण बॉल-नृत्याला जाऊ. पण आत्ता काय करायचं? शहरात काय काय आहे ते सांग. सुंदर पोरी आहेत इथं? जुगारी आहेत? पत्ते कोण खेळतं?"

घोडदळ अधिकाऱ्याने सांगितले की, बॉल-नृत्याला सुंदर पोरींचे तांडेच्या तांडे येतील; शहरातील सर्वात अट्टल जुगारी नव्याने निवडून आलेला पोलीस कप्तान कोल्कोव आहे; मात्र त्याच्यात शिलेदारी अविचारीपणा नाही, तर तो एक चांगला जुगारी आहे; निवडणुकांना आरंभ झाल्यापासून इल्यूश्काचा जिप्सी कोरस गात आहे, स्त्येशा मुख्य गायिका आहे आणि बॉल-नृत्यानंतर जिप्सींची गाणी ऐकायला जायचा प्रत्येकाचा इरादा आहे.

"शिवाय, पत्त्यांचे डाव खूप चालू आहेत," तो म्हणाला. "लूखनोव नांवाचा एक पाहुणा सारखा जिंकतोय आणि भालाईत रेजिमेंटमधला एक अंमलदार, आठ नंबरमध्ये राहिलेला इल्यिन, जबरदस्त हरतोय. त्यांनी एव्हाना खेळायला सुरुवात केलीय. रोज संध्याकाळी ते खेळतात. काऊंट, तुम्हाला कल्पना येणार नाही इतका तो इल्यिन चांगला आहे. त्याच्या वागण्यात क्षुद्रपणा नाही. अंगातला सदरा काढून देईल वेळ पडली तर!"

"चला तर त्याला भेटू या. इथं कोण कोण आहे ते एकदा नजरेखाली घालू," काऊंट म्हणाला.

"चला, चला. तुम्हाला भेटून त्यांना खूप खूप आनंद होईल."

## २

भालाईत घोडेस्वार पलटणीमधील अंमलदार इल्यिन नुकताच जागा झाला होता. आदल्या दिवशी संध्याकाळी आठ वाजता पत्त्यांच्या टेबलापाशी तो बसला होता आणि ओळीने पंधरा तास, सकाळी अकरा वाजेपर्यंत, हरत होता. खूप मोठी रक्कम तो हरला होता, पण नक्की किती मोठी ते त्याला स्वत:लाच सांगता आले नसते. कारण त्याचे स्वत:चे तीन हजार त्याच्यापाशी होते आणि शिवाय रेजिमेंटच्या खजिन्यातील पंधरा हजार होते. हे पैसे त्याने स्वत:च्या पैशांबरोबर केव्हाच मिसळले होते आणि पैसे मोजायला तो घाबरत होता, कारण त्याच्या तोटयामुळे खजिन्याच्या पैशांवर एव्हाना आक्रमण झाले होते असे त्याला वाटत होते. स्वप्नविहीन अशी गाढ यौवनसुलभ झोप दुपारी त्याला लागली होती. पत्त्यांमध्ये प्रचंड पैसे हरले म्हणजे तरुण माणसाला अशी झोप येते. संध्याकाळी सहा वाजता त्याला जाग आली होती. काऊंट तूर्बीन नेमक्या त्याच वेळी पथिकाश्रमात आला होता. तक्तपोशीवर पत्ते आणि खडू विखुरलेले पाहून व खोलीच्या मध्यभागी डागाळलेली टेबले पाहून इल्यिनला रात्रीच्या खेळाची आठवण झाली. तो भीतीने दचकला. विशेषत: त्याच्या शेवटच्या पत्त्याने, गुलामाने, त्याला पाचशे रूबलच्या तोटयात टाकले होते. पण आपल्या परिस्थितीची वास्तवता मान्य

करण्याची त्याची तयारी नव्हती. उशीखालून पैसे काढून त्याने ते मोजायला आरंभ केला. "कॉर्नेरां"मधून आणि "ट्रान्सपोर्टा"मधून हातोहाती फिरलेल्या काही विशिष्ट नोटा त्याने ओळखल्या. त्यामुळे त्याच्या खेळाचा संपूर्ण क्रम त्याला आठवला. त्याचे स्वतःचे तीन हजार गेले होते, तसेच रेजिमेंटच्या पैशामधील सुमारे अडीच हजार उडाले होते.

भालाईत अंमलदार ओळीने चार रात्री खेळत होता.

मॉस्कोहून त्याने प्रवासाला आरंभ केला होता. तेथे त्याच्यापाशी रेजिमेंटचे पैसे हवाली करण्यात आले होते. क. शहरात बदलीचे घोडे नाहीत ह्या सबबीखाली मुकादमाने त्याला अडवून ठेवले होते. पण प्रत्यक्षात पथिकाश्रमाच्या मालकाबरोबर गुप्त करार होता की, सर्व प्रवाशांना ह्या शहरात निदान एका रात्रीच्या मुक्कामासाठी अडवून ठेवायचे. भालाईत अंमलदार हा मौज-मजाप्रेमी तरुण होता. रेजिमेंटमध्ये त्याची नेमणूक झाल्याच्या निमित्ताने त्याच्या आई-वडिलांनी नुकतेच त्याला तीन हजार रूबल भेट म्हणून दिले होते. निवडणुकीचे उत्सव चालू असलेल्या क. शहरात काही दिवस घालवायला तो आनंदाने तयार झाला. कारण इथे मनसोक्त चैन करण्याचा त्याचा इरादा होता. ह्या प्रदेशात त्याचा ओळखीचा एक सधन, कुटुंबवत्सल गृहस्थ रहात होता. त्याला भेटायला आणि त्याच्या मुलींची मर्जी संपादन करायला म्हणून तो घोडागाडीतून जाण्याची तयारी करीत होता. तेवढ्यात घोडदळ अधिकारी तेथे उगवला होता आणि त्याने भालाईत अंमलदाराची ओळख करून घेतली होती. त्याच संध्याकाळी, मनात कोणताही वाईट हेतू न धरता, घोडदळ अधिकाऱ्याने आपला मित्र लूखनोव याच्याशी व हॉलमध्ये पत्त्याच्या टेबलाशी

बसलेल्या आणखी काही लोकांशी इल्यिनची ओळख करून दिली होती. तेव्हापासून भालाईत अंमलदार पत्त्याच्या टेबलाशी बसला होता. आपल्या ओळखीच्या त्या कुटुंबवत्सल गृहस्थाविषयी तो साफ विसरून गेला होता. घोड्यांची चौकशी करायचेही तो विसरून गेला होता. खरे म्हणजे ओळीने चार दिवस तो आपल्या खोलीमधून फारसा बाहेरच पडला नव्हता.

कपडे चढविल्यानंतर आणि चहा प्यायल्यानंतर तो खिडकीपाशी गेला. त्याच्या मनातील पत्त्यांविषयीचे सतत येणारे विचार दूर करायला थोडे फिरून येणे इष्ट ठरेल असे त्याला वाटले. त्याने मोठा कोट अंगात घातला व तो बाहेर गेला. लाल छपरांच्या पांढऱ्या घरांमागे सूर्य एव्हाना बुडाला होता. जमिनीवर संधीप्रकाश पसरला होता. हवा उबदार होती. घाणेरड्या रस्त्यांवर ओल्या बर्फाचे पातळ, रुंद तुकडे अलगद पडत होते. संपत येणारा तो दिवस त्याने झोपून काढला होता हा विचार त्याला खूप खिन्न करीत होता.

"हा हरवलेला दिवस कधीही परत येणार नाही," त्याच्या मनात विचार आला. "माझं तारुण्य मी उधळून टाकलं," तो स्वत:शी म्हणाला. खरे म्हणजे त्याने आपले तारुण्य उधळले होते असे त्याला वाटत नव्हते. वस्तुतः ह्या विषयावर तो मुळीच विचार करीत नव्हता. पण हे वाक्य अचानक त्याच्या मनात आले एवढेच!

"आता काय करावं बरं?" त्याने विचार केला. "कुणाकडून तरी पैसे उसने घ्यावे आणि निघून जावं?" एक तरुणी फूटपाथवरून त्याच्या जवळून गेली. "काय मूर्ख दिसत होती ही बाई!" उगीचच असा विचार त्याच्या डोक्यात येऊन गेला. "कुणाकडूनही पैसे उसने घेणं शक्य नाही. माझं

तारुण्य मी उधळून टाकलं!" दुकानांच्या रांगेकडे तो गेला. एका दुकानाच्या दाराशी एक व्यापारी गिऱ्हाईकांच्या शोधात उभा होता. त्याच्या कोटाला आतून कोल्ह्याच्या कातडीचे अस्तर लावलेले होते. "त्या अठ्ठीची ब्याद घालवली असती तर माझं नुकसान भरून निघालं असतं." एक म्हातारी भिकारीण त्याच्यापाठी चालता चालता केविलवाणी विव्हळत होती. "पैसे उसने घेता येतील असं कुणीही नाही!" अस्वलकातडी कोट घातलेला एक माणूस बग्गीमधून गेला. पहारेकरी पहारा देत उभा होता. "काहीतरी सनसनाटी निर्माण होण्यासाठी मी काय करावं बरं? ह्या लोकांवर पिस्तूल झाडू? नाही! अगदीच कंटाळवाणं! माझं तारुण्य मी उधळून टाकलं. किती सुंदर घोड्याची झूल दुकानाच्या खिडकीत टांगलीय! त्रोयका घसरगाडीतून सहल करायला काय मजा येईल! परत पथिकाश्रमात जावं! लूखनोव लौकरच येईल आणि आम्ही खेळायला सुरुवात करू."

तो परत गेला आणि त्याने आपले पैसे पुन्हा मोजले. पहिल्या मोजणीच्या वेळी त्याने चूक केलेली नव्हती. रेजिमेंट-च्या पैशात अडीच हजार रूबलची तूट येत होती. "पहिल्या पानावर मी पंचवीस लावीन, मग दुसऱ्यावर 'कॉर्नर', मग सात वेळा पैसे लावीन, मग पंधरा वेळा, तीस वेळा, साठ वेळा... तीन हजार रूबलपर्यंत. मग ती झूल मी विकत घेईन आणि निघून जाईन. पण तो बदमाश मला जिंकू देणार नाही! माझं तारुण्य मी उधळून टाकलं."

भालाईत अंमलदाराच्या मनामध्ये असे विचार चालू असतानाच लूखनोव त्याच्या खोलीत आला.

"मिखायलो वासिल्यिच, उठून बराच वेळ झाला का?"

लूखनोवने विचारले. आपल्या हाडयाळ नाकावरून सोनेरी चष्मा सावकाश उतरवून रेशमी लाल रुमालाने मुद्दामच तो काचा साफ करू लागला.

"नाही, आत्ताच उठलो. मस्त झोप लागली."

"एक शिलेदार नुकताच आलाय. झावाल्शेवस्कीबरोबर राहिलाय. ऐकलं नाही?"

"नाही, मी ऐकलं नाही. बाकीचे कुठं आहेत?"

"प्र्याखिनला भेटायले गेलेत असं वाटतं. ते थेट येतील."

आणि खरोखरीच, बाकीचे लोक लौकरच येऊन दाखल झाले. त्यांच्यात लूखनोवबरोबर नेहमी असणारा स्थानिक शिबंदीतील अंमलदार होता; प्रचंड बाकदार नाकाचा, तपकिरी कातडीचा, खोल काळ्या डोळ्यांचा एक ग्रीक व्यापारी होता. दिवसा दारूचा कारखाना चालविणारा आणि रात्री नेहमी अर्धा रूबल पॉईंट लावून खेळणारा लठ्ठ, सुजऱ्या शरीराचा जमीनदार होता.

खेळ सुरू करायला प्रत्येकजण उत्सुक होता, पण मुख्य खेळणारे लोक कसलीच सूचना देत नव्हते. विशेषत: लूखनोव खेळण्याबद्दल मुळीच उत्सुकता दाखवीत नव्हता. मॉस्कोमधील अंदाधुंदीवर तो धीरगंभीर स्वरात व्याख्यान देत होता.

"जरा विचार करा!" तो म्हणाला "मॉस्को हे आपलं एक सर्वात मोठ्या शहरांपैकी शहर, राजधानी. पण रात्री गुंड रस्त्यांमधून लोखंडी सळया घेऊन फिरतात, भुतांसारखा वेष करून मूर्ख बाजारबुणग्यांना घाबरवतात, प्रवाशांना लुटतात आणि त्याबद्दल काहीही बंदोबस्त करण्यात येत नाही. पोलीस काय बघतात? मला तेच जाणून घ्यायचंय."

भालाईत अंमलदाराने लूखनोवचे अंदाधुंदीवरील भाषण

लक्षपूर्वक ऐकले, पण शेवटी तो उठला आणि पत्ते आणण्याची त्याने शांतपणे आज्ञा केली. लठ्ठ जमीनदाराने सर्वांच्या इच्छेला प्रथम वाचा फोडली.

"सद्गृहस्थहो, सोन्यासारखा वेळ कशाला बरं वाया घालवायचा? उद्योगाला लागू या!"

"काल रात्री अर्धा अर्धा रूबल करीत तुम्ही बरेच पैसे घरी घेऊन गेलात, तेव्हा तुमची खेळण्याची उत्सुकता समजण्यासारखी आहे," ग्रीक म्हणाला.

"पण खरंच आता वेळ झालीय," शिबंदीचा अंमलदार म्हणाला.

इल्यिनने लूखनोवकडे कटाक्ष टाकला. लूखनोवने थेट त्याच्या नजरेला नजर भिडविली आणि लांब नख्यांच्या पिशाच्चांचा वेष घालून दरोडेखोरी करणाऱ्या बदमाषांबद्दल शांतपणे तो बोलत राहिला.

"पत्ते वाटायचे?" भालाईत अंमलदाराने विचारले.

"जरा लौकर होत नाही का?"

"बेलोव!" भालाईताने हाक मारली. त्याचा चेहरा एकदम लाल झाला. "मला जेवण आण. मंडळी, अजून माझ्या पोटात अन्नाचा एक कणही गेलेला नाही. शँपेन आण आणि आम्हाला पत्ते दे."

त्याच क्षणाला काऊंटने आणि झावाल्शेवस्कीने खोलीत प्रवेश केला. तूर्बीन आणि इल्यिन एकाच डिव्हिजनमध्ये असल्याचे आढळले. त्यांची तावडतोब मैत्री जमली. त्यांनी एकमेकांना हित चिंतून शँपेन प्राशन केली. अवघ्या पाच मिनिटात जिवलग मित्रांप्रमाणे त्यांच्या गप्पा सुरू झाल्या. इल्यिनबद्दल काऊंटचा अत्यंत उत्तम ग्रह झाला. काऊंट स्मित

करून इल्यिनला वयाने खूप तरुण असल्याबद्दल चिडवीत होता.

"वारे भालाईत अंमलदार!" काऊंट म्हणाला. "केवढ्या ह्या मिशा! भयंकर मोठ्ठ्या मिशा!"

इल्यिनच्या वरच्या ओठावरील लव पूर्ण पांढरी होती.

"तुम्ही पत्ते खेळायची तयारी केलेली दिसतेय?" काऊंट म्हणाला. "इल्यिन, तू जिंकशील अशा शुभेच्छा देतो! तू पट्टीचा खेळाडू आहेस म्हणे!" काऊंट पुढे हसत म्हणाला.

"आम्ही खेळ सुरू करतोय," पत्त्यांचा डाव उघडीत लूखनोव म्हणाला. "काऊंट, येता आमच्यात खेळायला?"

"नाही, आज नाही. जर मी आज खेळलो तर तुम्हाला अक्षरशः धुवून काढीन. मी खेळतो तेव्हा कुठलीही बँक सताड उघडी पडते. पण आत्ता खेळायला माझ्यापाशी काहीच नाही. वोलोचोकजवळच्या ठाण्यावर मी सर्व काही हरलो. बोटांमध्ये अंगठ्या घातलेल्या पायदळातल्या एका राक्षसानं मला साफ केला. पट्टीचा पत्तेबाज असावा!"

"ठाण्यावर खूप वेळ थांबावं लागलं?" इल्यिनने विचारले.

"बावीस तास! ते नतद्रष्ट ठाणं मी कधीही विसरणार नाही. आणि तिथला मुकादमही कधी विसरणार नाही."

"ते कसं काय?"

"मी ठाण्यापाशी पोचलो, तेवढ्यात धूर्त, कुरूप खोपडीचा मुकादम उडी मारून बाहेर आला. 'घोडे नाहीत,' मला तो म्हणतो. माझ्यापुरता मी एक नियम केलेला आहे तो आधी तुला सांगतो: जेव्हा जेव्हा घोडे नाहीत असं मला सांगतात, तेव्हा तेव्हा मुकादमाच्या खोलीत माझ्या अंगातला कोट न काढताच मी सरळ घुसतो आणि जणू काही कोळशाच्या धुरानं ती जागा

भरून गेली आहे अशा थाटात सर्व दारं-खिडक्या उघडी टाकायचा हुकूम देतो. आणि लक्षात ठेव, मी सार्वजनिक खोलीत जात नाही, तर मुकादमाच्या खाजगी खोलीत जातो. ह्यावेळी मी तसंच केलं. गेल्या महिन्यात आपल्याकडं किती कडाक्याचा गारठा पडला होता ते आठवतं? शून्याखाली वीस अंश. मुकादमानं युक्तिवाद करायचा प्रयत्न केला, पण मी त्याच्या नाकाडावर एक ठोसा हाणला. एक म्हातारी, काही कारटच्या आणि बायका किंचाळायला लागल्या. आपली भांडी-कुंडी उचलून गावात पळून जायचा त्यांचा इरादा होता. त्यांचा रस्ता अडवून मी ओरडलो: 'मला घोडे द्या आणि मी जातो. जर नाही दिलेत तर थंडीनं गारठून मरा! मी कुणालाही बाहेर सोडणार नाही!'"

"अस्संच वागलं पाहिजे त्यांच्याशी!" खदखदा हसत लठ्ठचा जमीनदार म्हणाला. "गोठलेल्या झुरळांसारखे झाले असतील!"

"पण मी त्यांच्यावर नजर ठेवली नाही. कुठंतरी बाहेर गेलो—तेवढ्यात मुकादमानं आणि त्याच्या बायकांनी मला गुंगारा दिला. एकटी म्हातारी तेवढी ओलीस राहिली. चुलाण्या-च्या फळीवर पडून सारखी शिंका देत होती आणि प्रार्थना म्हणत होती. त्यानंतर आमच्या वाटाघाटी सुरू झाल्या. मुकादम परत आला आणि लांब उभा राहून मला विनवू लागला: 'म्हातारीला सोडून दे!' मी त्याच्या अंगावर ब्लूखेरला सोडलं. ब्लूखेरचा मुकादमांवर राग आहे. तरीसुद्धा त्या हरामखोरानं दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत मला घोडे दिले नाही. तेव्हा त्या राक्षस पायदळ अधिकाऱ्याशी माझी ओळख झाली. दुसऱ्या खोलीत जाऊन मी त्याच्याशी खेळू लागलो. ब्लूखेरला तुम्ही पाहिलंत? ब्लूखेर! इकडं ये!"

ब्लूखेर पळत आला. जुगाऱ्यांनी त्याचे पुरेसे कौतुक केले. पण दुसऱ्या काही तरी गोष्टीसाठी ते उत्सुक असल्याचे स्पष्ट जाणवत होते.

"सद्‌गृहस्थहो, तुम्ही खेळत का नाही? माझ्यासाठी तुमच्या खेळाचा खोळंबा करू नका. मी फार बडबड्या आहे," तूर्बीन म्हणाला. "**आवडतं, नाही आवडत** – सारंच छान!"

३

लूखनोवने दोन मेणबत्त्या स्वतःपाशी ओढून घेतल्या, पैशाने गच्च भरलेला तपकिरी रंगाचा प्रचंड आकाराचा बटवा बाहेर काढला, जणू काही रहस्यमय विधी करीत असल्याप्रमाणे सावकाशपणे त्या बटव्याला उघडले व त्यातून शंभर रूबलच्या दोन नोटा बाहेर काढून त्यांना पत्त्यांखाली सरकविले.

"कालच्याप्रमाणंच, दोनशे रूबलची बँक," तो म्हणाला. त्याने आपला चष्मा सरळ केला आणि पत्त्यांचा नवाकोरा डाव उघडला.

"ठीक आहे," त्याच्याकडे न पाहता, तूर्बीनबरोबरचे आपले संभाषण पुढे चालू ठेवीत इल्यिन म्हणाला.

खेळ सुरू झाला. यांत्रिक अचूकतेने लूखनोव खेळत होता. आपले पॉइंट सावकाशपणे मांडण्यासाठी अधूनमधून थांबत होता, किंवा चष्म्याच्या काचांवरून कठोर कटाक्ष टाकीत क्षीण आवाजात म्हणत होता "तुमची पाळी!" गुबगुबीत जमीनदार इतर कुणाहीपेक्षा जास्त गोंगाट करीत होता, स्वतःशी मोठ्या आवाजात हिशेब बडबडत होता आणि आपल्या जाड्या बोटांचे पत्त्यांवर काळसर ठसे उमटवीत होता.

शिबंदीचा अंमलदार व्यवस्थितपणे आपले पॉईंट मांडीत होता आणि आपल्या पानांचे कोरे सुबकपणे टेबलाखाली वळवून धरीत होता. बँक राखणारा ग्रीक इसम लूखनोवशेजारी बसला होता. त्याचे खोल काळे डोळे पत्त्यांच्या डावावर खिळलेले होते. काहीतरी घडण्याची अपेक्षा त्याच्या नजरेतून व्यक्त होत होती. टेबलाशी उभ्या राहिलेल्या झावाल्शेवस्कीने अचानक हालचाल केली. आपल्या खिशामधून त्याने तांबडी अथवा निळी नोट काढून तिच्यावर एक पत्ता ठेवला, त्या पत्त्यावर आपला पंजा आपटला आणि डाव लागावा म्हणून जोरात तो ओरडला: "चल सत्त्या, ये!" तो आपली मिशी चावीत होता, पायांची चाळवाचाळव करीत होता, त्याचा चेहरा लालबुंद बनला होता. पत्ता मिळेपर्यंत त्याचा सर्व देह थरथरत राहिला. घोड्याच्या केसांचे आच्छादन घातलेल्या दिवाणावर ठेवलेल्या बशीमधील कोकराची सागुती व काकड्या इल्यिनने खाल्ल्या, घाईघाईने आपली बोटे आपल्या जाकीटाला पुसली आणि एकामागून एक पत्ते खाली टाकले. अगदी आरंभापासून दिवाणावर बसलेल्या तूर्बीनने काय घडत होते ते क्षणार्धात जाणले. लूखनोवने भालाईत अंमलदाराकडे साधा कटाक्षही टाकला नाही, किंवा त्याच्याशी एकही शब्द तो बोलला नाही. अधूनमधून आपल्या हातांकडे मात्र तो चष्म्यामधून कटाक्ष टाकीत होता. भालाईताची बहुतेक पाने हरणारी होती.

"ते पान मारायला मला आवडेल," अर्धा रूबल लावून खेळणाऱ्या लठ्ठ जमीनदाराच्या पत्त्याकडे बोट दाखवीत लूखनोव म्हणाला.

"तुम्ही इल्यिनची पानं मारा, माझी कशाला?" जमीनदार म्हणाला.

आणि खरेच, इल्यिनएवढी वाईट पाने कुणाचीच नव्हती. दरवेळी हरल्यानंतर तो मारला गेलेला पत्ता निराशपणे टेबलाखाली सरकवायचा आणि थरथरत्या हातांनी नवे पान उचलायचा. तूर्बीन दिवाणावरून उठला आणि बँक राखणाऱ्या खेळाडूशेजारी बसण्याची त्याने ग्रीकापाशी परवानगी मागितली. ग्रीक आपल्या जागेवरून उठला आणि काऊंट त्याच्या खुर्चीवर बसला. लूखनोवच्या हातांवर त्याने स्थिर नजर ठेवली.

"इल्यिन!" एकदम तो ओरडला. तो जरी त्याच्या नेहमीच्या साध्या आवाजात बोलला होता तरी इतर सर्व आवाज त्याच्या आवाजात बुडून गेले. "ते पान सुदैवी आहे असं तुला का वाटतं? कसं खेळायचं ते तुला माहीत नाही!"

"मी कसाही खेळलो तरी सारखं तसंच घडतंय!"

"तसं तुला वाटत असेल तर नक्कीच तू हरणार! चल, मी खेळतो तुझा डाव!"

"नको, माफ कर. माझ्यासाठी मी कुणालाही कधीही खेळू देत नाही. तुला स्वतःला खेळायचं असलं तर खेळ!"

"मला खेळायची इच्छा नाही हे आधीच मी तुला सांगितलंय. केवळ तुझ्यासाठी मी खेळायची तयारी दाखवली. तुला असं हरताना बघायला मला वाईट वाटतंय!"

"माझ्या नशीबी हरणंच दिसतंय!"

त्यावर काऊंट काहीही बोलला नाही. त्याने फक्त आपले हातांचे कोपर टेबलावर टेकविले आणि पुन्हा एकदा लूखनोवच्या हातांवर नजर खिळविली.

"छे:! फार वाईट!" अचानकपणे तो मोठ्या आवाजात ओरडला.

लूखनोवने त्याच्याकडे कटाक्ष फेकला.

"फार फार वाईट!" अधिक मोठ्यांदा काऊंट ओरडला आणि त्याने लूखनोवच्या नजरेला आपली नजर भिडविली.

पत्त्यांचा डाव पुढे चालू राहिला.

"हे ठी ऽ क ना ऽऽ ही!" इल्यिनचे आणखी एक पान लूखनोवने मारले तेव्हा तूर्बीन ओरडला.

"काऊंट, तुम्हाला काय आवडत नाही?" सौम्य बेफिकीर स्वरात लूखनोवने विचारले.

"इल्यिनची पानं तुम्ही ज्या पद्धतीनं मारता आहात ते! फार वाईट आहे!"

लूखनोवने आपल्या खांद्यांची आणि भुवयांची किंचित हालचाल केली. प्रत्येकाने आपले नशीब स्वीकारावे असा त्याचा अर्थ असावा. तो पुढे खेळत राहिला.

"ब्लूखेर! इकडं ये!" उठून उभे रहात काऊंट ओरडला. "धर त्याला ब्लूखेर!"

दिवाणाखालून झेपावून बाहेर येताना ब्लूखेरने शिबंदीच्या अंमलदाराला जवळ जवळ खाली पाडले व आपल्या मालकापाशी जाऊन गुरगुरत, शेपटी हालवीत तो उभा राहिला. सर्व मंडळींवर त्याची नजर फिरत होती. जणू तो विचारीत होता: "कोणत्या डांबीसाला धरायचं आहे?"

लूखनोवने पत्ते खाली ठेवले आणि आपली खुर्ची मागे सरकविली.

"अशा परिस्थितीत खेळणं अगदी अशक्य आहे," तो म्हणाला. "मला कुत्री आवडत नाहीत. खोलीत कुत्र्यांची पिल्लावळ भरली असताना कसे काय पत्ते खेळायचे?"

"विशेषत: असली कुत्री! मला वाटतं त्यांना जळवा म्हणतात," शिबंदी अंमलदाराने लूखनोवला दुजोरा दिला.

"मिखायलो वासिलियच, आपला खेळ पुढं खेळायचा की नाही?" लूखनोवने आपल्या यजमानाला विचारले.

"काऊंट, कृपा करून डावात अडथळा आणू नको," तूर्बीनला उद्देशून इल्यिन म्हणाला.

"जरा इकडं ये," इल्यिनच्या दंडाला धरून त्याला खोली-बाहेर नेत तूर्बीन म्हणाला.

काऊंटचे सर्व बोलणे स्पष्टपणे ऐकू येत होते, कारण आवाज खाली न करता तो बोलत होता. आणि त्याचा आवाजच असा होता की, नेहमी तीन खोल्यांपर्यंत तो सहज ऐकू जाई.

"तुझं टाळकं फिरलंय काय? तो चष्मेवाला माणूस पट्टीचा खेळणारा आहे ते तुला दिसत नाही काय?"

"पुरे! काय बोलतोस तू?"

"सोडून दे खेळणं, माझं ऐक. तसं माझं काय जातंय? दुसऱ्या एखाद्या वेळी तुझे पैसे जिंकून घ्यायला मलाच आनंद होईल, पण आज मात्र काही कारणानं तुझी ही फसवणूक मला पाहवत नाही. तू खेळतो आहेस ते सर्व पैसे नक्की तुझे स्वतःचेच आहेत ना?"

"हो! ... अं ... का? काय आहे तुझ्या मनात?"

"मित्रा, याच रस्त्यानं मीही पूर्वी प्रवास केलाय आणि ह्या अट्टल जुगाऱ्यांच्या सर्व युक्त्या मला माहीत आहेत. तो चष्मेवाला माणूस महालबाड आहे. सोडून दे खेळणं, मी तुला सांगतो. हा थोडा मित्रत्वाचा सल्ला मी तुला देतोय."

"मी आणखी एकच फेरी खेळेन."

"'आणखी एक' फेरी म्हणजे काय ते मला माहीत आहे. ठीक आहे. पाहू या."

ते परत आले. एका फेरीत इल्यिनने एवढी पाने टाकली

आणि त्यातील एवढी मारली गेली, की त्याचे खूप मोठे नुकसान झाले.

तूर्बीनने आपले हातांचे पंजे टेबलावर पसरले.

"बस्स!" तो ओरडला. "चल इथून!"

"आत्ता शक्य नाही. कृपा करून मला एकटचाला राहू दे," चिडून इल्यिन म्हणाला. तूर्बीनकडे न पाहता तो पत्ते पिसत राहिला.

"तर मग मर! तुला मजा वाटत असेल तर खुशाल घालव पैसे! पण मी निघालो. झावाल्शेवस्की! चल माझ्या-बरोबर मार्शलकडे!"

ते बाहेर गेले. कुणीही काहीही बोलले नाही. त्यांच्या पावलांचा आवाज आणि ब्लूखेरच्या नख्यांचा आवाज कॉरीडॉर-मधून ऐकू येईनासा होईपर्यंत लूखनोवने पाने वाटली नाही.

"काय माणूस आहे!" हसून जमीनदार म्हणाला.

"आता त्याचा आपल्याला अडथळा होणार नाही," अजूनही दबत्या आवाजात शिबंदी अधिकारी घाईघाईने म्हणाला.

आणि ते पुढे खेळत राहिले.

## ४

मार्शलच्या घरी बॉलनृत्यासाठी संगीत वाजविणारे लोक मार्शलचे भूदास होते. नृत्यसमारंभानिमित्त मोकळ्या केलेल्या कोठीच्या खोलीत हे सर्व वादक उभे होते. त्यांनी आपल्या कोटांच्या बाह्या आधीच वर सारल्या होत्या आणि इशारा मिळताच जुन्या धाटणीचे पोलिश "अलेक्सांदर-एलिझाबेथ"

वाजवायला त्यांनी आरंभ केला. मेणबत्त्यांच्या मंद तेजस्वी प्रकाशात मोठ्या हॉलमधील लाकडी तक्तपोशीवर जोडपी डौलदार पावले टाकीत उतरू लागली: सर्वात प्रथम गव्हर्नर, एकातेरीना सम्राज्ञीच्या दरबारामधील सेनापती, आपल्या छातीवर तारा लटकावून आणि मार्शलांच्या कृश पत्नीचा हात धरून नृत्यासाठी उतरले; नंतर गव्हर्नरांच्या पत्नीला बरोबर घेऊन मार्शल आले; नंतर गुबेर्नियाच्या सत्ताधारी कुटुंबांमधली इतर माणसे वेगवेगळ्या गटांमधून नृत्यदालनात आली. त्याचवेळी झावाल्शेवस्की आपल्यासमवेत देखण्या शिलेदाराला घेऊन तेथे प्रवेश करता झाला. झावाल्शेवस्कीने निळा फ्रॉक-कोट परिधान केला होता, त्याच्या खांद्यांवर झालरी होत्या व खूप मोठी कॉलर होती; त्याने तंग तुमान चढविली होती, नृत्याचे बूट घातले होते; आपल्या मिशांवर, गळपट्टीवर, हातरुमालावर जाईचे अत्तर त्याने भरपूर चोपडले होते. शिलेदाराने घट्ट निळी घोडदौडीची तुमान चढविली होती आणि सोनेरी कशीदाकाम केलेला लाल सदरा घातला होता. व्लादीमिर क्रूस आणि १८१२ चे पदक त्याने छातीवर लटकाविले होते. काऊंट सर्वसामान्य उंचीचा असला तरी त्याचा बांधा अत्यंत सुडौल होता. त्याचे नितळ, निळे, तेजस्वी डोळे आणि त्याच्या दाट तांबूस-पिंगट केसांची मोठी झुलुपे त्याच्या देखणेपणात विशेष भर घालीत होती. नृत्यदालनात त्याचे आगमन अनपेक्षित नव्हते. पथिकाश्रमात त्याला पाहिलेल्या देखण्या तरुणाने मार्शलना आधीच त्याच्या आगमनाची वर्दी दिली होती. ह्या बातमीचे वेगवेगळ्या पद्धतींनी स्वागत झाले होते, पण एकूण फारसा उत्साह दाखविण्यात आला नव्हता. "तो आपली थट्टा करील" असे पुरुष व वयस्क बायका

म्हणाल्या होत्या. "तो माझ्याबरोबर पळून गेला तर?" हा विचार बहुसंख्य मुलींच्या आणि तरुणींच्या मनात चमकून गेला होता.

पोलिश संगीत संपताच नृत्य करणाऱ्या जोडीदारांनी एकमेकांना लवून कुर्निसात करून निरोप घेतला. बायका बायकांना जाऊन मिळाल्या आणि पुरुष पुरुषांमध्ये मिसळले. अभिमानाने आणि आनंदाने फुललेल्या झावाल्शेवस्कीने काऊंटला यजमानीणीकडे नेले. सर्वांसमक्ष काऊंट आपली टर उडवील अशी अंतर्यामी भीती वाटणाऱ्या मार्शलच्या पत्नीने वरकरणी मात्र दिमाख आणून मान वेळावीत म्हटले: "खू ऽ प आनंद वाटला! तुम्ही नृत्य कराल अशी आशा आहे!" पण ह्या शब्दांनंतर तिने टाकलेल्या कटाक्षात सूचित होते: "एवढं झाल्यावर जर तू बाईचा अपमान केलास तर खरंच तू गुंड ठरशील!" पण काऊंटने आपल्या अदबशीर, लक्षपूर्वक वागण्याने, मजेदार स्वभावाने आणि डौलदार वावरण्याने स्वतः-विषयीचे सगळे दूषित पूर्वग्रह लौकरच पुसून टाकले. अवघ्या पाच मिनिटात मार्शलच्या पत्नीच्या चेहऱ्यावरील भाव सर्वांना सांगत होता: "अशा पुरुषांना कसं हाताळायचं ते मला माहीत आहे; तो कुणाशी बोलतोय हे त्याला ताबडतोब उमगलं. जरा थांबा आणि बघा, सारी संध्याकाळ फक्त माझ्या मागंच तो गोंडा घोळीत फिरेल!" पण त्याच वेळी, काऊंटच्या वडिलांना ओळखणारे गव्हर्नर काऊंटपाशी आले आणि काऊंटला संभाषणात गुंतविण्यासाठी त्यांनी त्याला जरा बाजूला नेले. त्यामुळे स्थानिक मंडळींची भीती आणखीच कमी झाली व काऊंट त्यांच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचा ठरला. थोड्या वेळानंतर झावाल्शेवस्कीने काऊंटची आपल्या बहिणीशी

ओळख करून दिली. गुबगुबीत अंगलटीच्या त्या तरुण विधवेने आपले विशाल काळेभोर डोळे काऊंटच्या आगमनापासून त्याच्यावर जे खिळविले होते ते क्षणभरही दुसरीकडे ढळविले नव्हते. त्यावेळी वाद्यवृंद वॉल्तझ् संगीत वाजवीत होता म्हणून काऊंटने तिला वॉल्तझ् नृत्याचे आमंत्रण दिले. त्याचे नृत्यातील कसब पाहून त्याच्याविषयीचे उरलेसुरले गैरसमजही विरून गेले.

"खरंच तो खूप सुंदर नाचतोय," एक लठ्ठ जमीनदारीण म्हणाली. नृत्यदालनात भिरभिरणाऱ्या निळया तंग तुमानीमधील पायांचा आपल्या डोळयांनी पाठलाग करीत ती स्वत:शीच आकडे मोजीत होती: "एक, दोन, तीन; एक, दोन, तीन — झकास!"

"किती सुंदर गिरक्या घेतोय! फार छान!" दुसरी एक स्त्री म्हणाली. ती गावात पाहुणी म्हणून आली होती आणि स्थानिक समाज तिला वाह्यात समजत होता. "त्याच्या टाचा [illegible]ला लागत नाहीत हे नवलच आहे! सुंदर! किती हलक्या [illegible]लांनी नाचतोय!"

काऊंटने आपल्या नृत्य प्रदर्शनामधून गुबेर्नियातील तीन [illegible]त्तम नर्तकांना झाकोळून टाकले. गव्हर्नरांचा उंच, तागा-[illegible]च्या केसांचा ॲडज्यूटंट सफाईदार नाचाबद्दल आणि आपल्या [illegible]दारणीला अगदी निकट धरून नृत्य करण्याबद्दल प्रसिद्ध [illegible] घोडदळातील एक अधिकारी वॉल्तझ नृत्य करताना [illegible] गिरक्या घेण्याबद्दल आणि टाचा हलकेपणाने, वेगाने [illegible]ण्याबद्दल प्रसिद्ध होता; आणखी एक बिगरलष्करी माणूस [illegible] — प्रत्येकजण त्याला उत्तम नर्तक म्हणायचा आणि तो [illegible] बुद्धिमान नव्हता तरी कोणत्याही नृत्यसमारंभाचा

तो प्राण मानला जाई. आणि खरोखरीच हा मद्गृहस्थ नृत्याच्या आरंभापासून ते अंतापर्यंत क्षणाचीही विश्रांती न घेता एका पाठोपाठ एक अशा सर्व स्त्रियांशी नृत्य करीत असे. आपला थकलेला, पण आनंदाने उजळलेला चेहरा ओलसर रुमालाने टिपण्यासाठी तो क्वचित थोडासा थांबत असे. काऊंटने ह्या तीनही सर्वोत्तम नर्तकांवर मात केली आणि नृत्यसमारंभातील तीन महत्त्वाच्या स्त्रियांशी नृत्ये केली: एका प्रचंड मोठ्या, श्रीमंत, देखण्या आणि मूर्ख बाईबरोबर; एका मध्यम आकाराच्या, सडपातळ बांध्याच्या, फारशा सुंदर नसलेल्या, पण सुंदर पोषाख केलेल्या बाईबरोबर; एका अगदी छोट्या, सामान्य रूपाच्या पण खूप चतुर स्त्रीबरोबर. इतर स्त्रियांबरोबरही त्याने नृत्य केले. ज्या सुंदर होत्या अशा सगळ्या स्त्रियांबरोबर तो नाचला आणि त्या समारंभात सुंदर स्त्रिया खूप होत्या. पण त्याला सगळ्यात आवडली झावाल्शेव-स्कीची बहीण–गुबगुबीत बांध्याची तरुण विधवा. तिच्या-बरोबर तो क्वाड्रिल नाचला, एकोसेस नाचला आणि माझूर्काही नाचला. क्वाड्रिल नाचत असताना त्याने तिची स्तुती सुरू केली. तिची व्हीनस, डायना अशा सुंदर देवतांशी तुलना केली; तिची गुलाबाशी आणि दुसऱ्या कुठल्यातरी फुलाशी तुलना केली. त्याच्या ह्या सर्व स्तुतीसुमनांचा त्या छोट्या चणीच्या विधवेने आपली शुभ्र मान किंचित झुकवून स्वीकार केला. आपल्या पांढऱ्या तलम मलमलीच्या फ्रॉकवर तिने आपली नजर खाली रोखली होती आणि आपल्या एका हाता-मधील पंखा दुसऱ्या हातामध्ये धरण्याचा तिचा चाळा चालला होता. जेव्हा ती म्हणाली, "बाई ग, काऊंट, पुरे आता! तुम्ही थट्टा करताय," आणि अशाच अर्थाचे आणखी काही

ती बोलली, तेव्हा तिच्या किंचित बसकट आवाजामधून असा काही निष्कपट आणि मजेशीर भाबडा भाव उमटला, की तो तिच्याकडे टक लावून पहातच राहिला. ती खरेच फुलासारखी दिसत होती अशी त्याची खात्री पटू लागली. आणि गुलाबासारखी नव्हे तर दूर प्रदेशात, बर्फात उगवणाऱ्या, मुळीच गंध नसलेल्या, पूर्ण उमललेल्या गुलाबी आणि शुभ्र रंगांच्या [illegible]नटी फुलासारखी ती दिसत होती, असे त्याला वाटले.

तिचे अकृत्रिम वागणे आणि ठराविक बायकी नखऱ्यांचा अभाव, यांचा तिच्या ताज्या सौंदर्याशी असा काही विलक्षण मिलाफ घडला होता की, त्यांच्या संभाषणादरम्यान अनेकदा तिच्या डोळ्यांमध्ये काऊंट नुसता मूकपणे पहात राहिला, किंवा तिच्या बाहूंची आणि मानेची सुरेख रेषा निरखीत राहिला. तिला स्वतःच्या मिठीत धरून तिचे चुंबन घेण्याची त्याला एवढी तीव्र इच्छा होत होती की, स्वतःला आवरून धरणे त्याला खूप कठीण जात होते. काऊंटवर आपला प्रभाव पडलेला पाहून ती छोटी विधवा खूष झाली होती, पण काऊंटच्या वागण्यात असे काहीतरी होते ज्याची तिला भीती वाटू लागली होती व जे तिला अस्वस्थ करीत होते. जरी तो तिच्या पुढ्यात सतत गोंडा घोळीत होता तरी प्रचलित रिवाजां[illegible] त्याचे वर्तन अगदी निर्दोष होते. तिला बदाम आणि [illegible] घातलेले दूध आणून देण्यासाठी तो धावला, तिचा [illegible] त्याने उचलून दिला, रोगट चेहऱ्याच्या तरुण [illegible]र्यांच्या हातून खुर्ची खेचून त्याने ती तिच्या पुढ्यात [illegible] आणि इतर असंख्य छोट्या सेवा केल्या.

[illegible] स्त्री-दाक्षिण्याच्या वागण्याचा तिच्यावर फारसा [illegible] [illegible] नाही असे त्याच्या लक्षात आले, तेव्हा त्याने

तिला गंमतीदार आठवणी सांगून तिचे मनोरंजन करण्याचा प्रयत्न केला. तिला त्याने आश्वासन दिले की, तिने नुसते त्याला सांगण्याचा अवकाश, तो चक्क आपल्या डोक्यावर उभे रहायला तयार होता, कोंबडचाप्रमाणे ओरडून दाखविण्याची त्याची तयारी होती, खिडकीमधून स्वतःला झोकून देण्याची किंवा नदीवरील बर्फाच्या भोकातून उडी मारण्याची त्याची सज्जता होती. ह्या वेळी तो पूर्ण यशस्वी झाला. छोटी विधवा आनंदी बनली. तिला हास्याच्या उकळ्या फुटू लागल्या व तिचे सुंदर शुभ्र दात चमकू लागले. आपल्या पाठीराख्यावर ती अत्यंत खूष झाली. आणि उलटणाऱ्या दर मिनिटागणिक काऊंट तिच्या जास्त जास्त प्रेमात पडत चालला व क्वाड्रिल-च्या अखेरी तर तो खरोखरीच तिच्या प्रेमात पडला.

त्या प्रदेशातील सर्वात श्रीमंत जमीनदाराचा रिकामटेकडा, अठरावर्षीय मुलगा—तोच रोगट चेहऱ्याचा तरुण, ज्याच्या हातून तूर्बीनने खुर्ची हिसकावून घेतली होती—फार पूर्वीपासून विधवेचा अनुनय करीत होता. क्वाड्रिल संपल्यानंतर तो विधवेपाशी आला तेव्हा तिने त्याचे अगदी थंडे स्वागत केले. काऊंटने तिच्यात निर्माण केलेल्या खळबळीचा एक-दशांश भागसुद्धा तिने व्यक्त केला नाही.

"भलेच आहात तुम्ही," ती त्या तरुणाला म्हणाली, पण तिचे डोळे मात्र तूर्बीनच्या पाठीवर खिळलेले होते. त्याच्या कोटाला बनविण्यात किती वार सोनेरी वेणी लागली असावी ह्याचा ती नकळतपणे हिशोब करीत होती. "भलेच आहात तुम्ही! माझ्याकडं येऊन मला घसरगाडीतून फिरायला घेऊन जाण्याचं आणि काही चॉकलेटं आणून देण्याचं तुम्ही कबूल केलं होतं."

"पण मी खरंच आलो होतो आन्ना फ्योदरोवना. तुम्ही घरात नव्हता आणि सगळयात उत्तम चॉकलेटांचा खोका मी तुमच्यासाठी ठेवून आलो," तो तरुण म्हणाला. त्याची उंची जरी खूप होती तरी त्याचा आवाज मात्र छोटा, किरटा होता.

"नेहमी काहीतरी सबबी शोधून काढता! नकोत मला तुमची चॉकलेटं! कृपा करून समजू नका की–"

"तुमचं माझ्याशी वागणं किती बदललंय ते मला दिसतंय आन्ना फ्योदरोवना आणि त्याचं कारणही मला ठाऊक आहे. तुमचं असं करणं अगदी चूक आहे," तो म्हणाला. त्याला आणखी काहीतरी बोलण्याची इच्छा असावी, पण त्याच्या मन:क्षोभमुळे त्याचे ओठ एवढे थरथरू लागले, की त्याला पुढे बोलताच येईना.

आन्ना फ्योदरोवनाने त्याच्याकडे दुर्लक्ष केले व ती तूर्बीनला टक लावून पहात राहिली.

त्या सायंकालीन समारंभाचे यजमान, धिप्पाड देहयष्टीचे, दंतविहीन, भव्य वृद्ध मार्शल काऊंटकडे गेले व त्याच्या दंडाला धरून त्यांनी त्याला इच्छा असेल तर त्यांच्या अभ्यासिकेत मद्यपानासाठी व धूम्रपानासाठी येण्याचे निमंत्रण दिले. तूर्बीन नृत्यदालनातून बाहेर जाताच आन्ना फ्योदरोवनाला एकदम सुने सुने वाटू लागले. एका कृश, प्रौढ कुमारी मैत्रिणीचा तिने हात धरला व तिला घेऊन ती प्रसाधन खोलीत गेली.

"काय? आवडला?" प्रौढ कुमारिकेने विचारले.

"पण त्याचं माझ्याशी वागणं मात्र चमत्कारिक आहे!" आन्ना फ्योदरोवना म्हणाली व आरशासमोर जाऊन स्वत:चे रूप न्याहाळू लागली.

तिची मुद्रा चमकत होती, तिचे डोळे हसत होते, ती

लाजतसुद्धा होती. निवडणुकांच्या वेळी पाहिलेल्या बॅले-नृत्याच्या एका मुद्रेची तिने एकदम नक्कल केली. आपल्या पायाच्या एका अंगठ्यावर तिने गिरकी घेतली, मग मोहकपणे खुदकन हसली आणि टाचा उडवीत ती हवेत झेपावली.

"ठाऊक आहे? त्यानं माझ्यापाशी स्मरणभेट मागितली!" आपल्या मैत्रिणीला तिने सांगितले. "पण त्याला का ऽ ही ऽ ही ऽऽ मिळणार नाही!" शब्दांना किंचित झोके देत, नरम कातड्याच्या हातमोजामधून एक बोट उंचावीत ती म्हणाली.

तूर्बीनला मार्शल ज्या अभ्यासिकेत घेऊन गेले तेथे वोदकाचे, मद्यार्कांचे आणि शँपेनचे अनेक प्रकार होते, तसेच खाद्यपदार्थांनी भरलेल्या बशा होत्या. तंबाखूच्या धुरामध्ये स्थानिक प्रतिष्ठित मंडळी बसली होती अथवा येरझाऱ्या घालीत होती व निवडणुकांविषयी चर्चा करीत होती.

"आपल्या ऊयेझ्दमधल्या सगळ्या उमरावांनी त्याला निवडून त्याचा बहुमान केला असताना, त्याला आपल्या कर्तव्यांमध्ये चुकारपणा करण्याचा मुळीच हक्क नाही..." नव्याने निवडून आलेला पोलिस कप्तान बोलत होता. एव्हाना तो चांगलाच झिंगला होता.

काऊंटच्या आगमनामुळे संभाषणात खंड पडला. प्रत्येकाची काऊंटशी ओळख करून देण्यात आली. पोलिस कप्तानाने विशेष स्नेहाने हस्तांदोलन केले आणि बॉल-नृत्यानंतर एका नव्या खानावळीत तो देणार असलेल्या प्रीती-भोजनाला हजर राहण्याचा त्याने काऊंटला वारंवार आग्रह केला. भोजनाप्रसंगी जिप्सींची गाणी होणार होती. काऊंटने त्याचे निमंत्रण स्वीकारले आणि त्याच्याबरोबर शँपेनचे अनेक प्याले तो प्यायला.

"सभ्य गृहस्थहो, तुम्ही नाचत का नाही?" अभ्यासिकेमधून बाहेर पडत असताना त्याने विचारले.

"नाचाच्या बाबतीत आमची फारशी गती नाही," पोलिस कप्तान हसून म्हणाला. "काऊंट, आमचं बाटलीशी बरं जमतं! शिवाय ह्या सगळ्या पोरी अगदी माझ्या डोळ्यांसमोर लहानाच्या मोठ्या झाल्यात काऊंट! तसा मी काहीवेळा एकोसेस नाचतो काऊंट–अजून नाचू शकतो काऊंट..."

"तर मग आता चला नाचायला," तूर्बीन म्हणाला. "जिप्सींची गाणी ऐकायला जाण्याआधी इथं मौज करू या!"

"चला! आपल्या यजमानाला खूष करू या!"

आणि तीन लाल चेहरे बनलेले श्रीमान, जे बॉल-नृत्याच्या अगदी आरंभापासून अभ्यासिकेत बसून मद्यपान करीत होते, त्यांनी आपल्या हातांवर मोजे चढविले. एकाचे नरम कातड्याचे काळे हातमोजे होते, तर बाकीच्यांचे रेशमाचे विणलेले होते. नृत्यदालनात ते पाऊल ठेवणार तेवढ्यात रोगट चेहऱ्याच्या तरुणाने त्यांना अडविले. त्या तरुणाचे ओठ पांढरेफटक पडले होते, आपले अश्रू आवरणे त्याला अशक्य ठरले होते. तो तूर्बीनपाशी जाऊन म्हणाला:

"तुम्ही काऊंट आहात म्हणून बाजारात फिरल्याप्रमाणं इथं कुणालाही धक्काबुक्की करण्याचा तुम्हाला अधिकार आहे असं वाटतं?" बोलताना त्याला श्वास घ्यायला त्रास होत होता. "हा उर्मटपणा आहे आणि..."

पुन्हा एकदा त्याच्या ओठांच्या थरथरीमुळे त्याला पुढे बोलणे अशक्य ठरले.

"काय?" अचानक कपाळाला आठ्या घालीत तूर्बीन

किंचाळला. "काय म्हणालास पोरट्या?" त्याने त्या तरुणाचे हात पकडून एवढ्या जोराने पिरगाळले की, अपमानापेक्षा भीतीपायी त्या तरुणाचा चेहरा एकदम लालबुंद झाला. "माझ्याशी तुला द्वंद्वयुद्ध खेळायचंय? तसं असेल तर तुमच्या सेवेला हजर आहे."

तूर्बीनने त्या तरुणाचे हात सोडून देताक्षणीच दुसऱ्या दोन गृहस्थांनी त्या तरुणाच्या दंडांना धरले व त्याला पाठीमागच्या दारी नेले.

"तुझं डोकं फिरलंय? फार दारू प्यायलेला दिसतोस. तुझ्या बापालाच सांगतो. काय झालंय काय तुला?" त्या गृहस्थांनी तरुणाला विचारले.

"मी झिंगलेला नाही, पण किमान माफीसुद्धा न मागता तो लोकांना ढकलून देतो. डुक्कर आहे साला," तरुण विव्हळला आणि आता उघडपणे रडू लागला.

पण त्याच्या तक्रारींकडे दुर्लक्ष करून त्याला घरी पाठविण्यात आले.

"त्याच्याकडं लक्ष देऊ नका काऊंट," तूर्बीनला शांत करायला उत्सुक असलेले झावाल्शेवस्की आणि पोलीस कप्तान म्हणाले. "तो अजून बच्चा आहे. अजून बापाकडून मार खातो. सोळा वर्षांचा तर आहे. त्याला काय झालं समजत नाही. वेडा आहे. आणि त्याचा बाप एवढा प्रतिष्ठित— आमचा उमेदवार आहे."

"मरूं दे त्याला जर त्याला समाधान नकोय!"

काऊंट नृत्यदालनात गेला आणि सुंदर छोटुकल्या विधवे-बरोबर मजेने एकोसेस नाचला, त्याच्या बरोबर अभ्यासिकेतून बाहेर आलेल्या मंडळींचे नाच पाहून मनसोक्त हसला आणि

–च–ाऱ्या जोडप्यांमध्ये पोलीस कप्तान घसरून पडला तेव्हा –– त्याच्या सात मजली हसण्याने नृत्यदालन दणाणून गेले.

५

काऊंट जेव्हा अभ्यासिकेत होता तेव्हा आन्ना फ्योदरोवनाला –मे वाटले की, तिने त्याच्याबद्दल खोटी अनास्था दाखविणे इ–ट होते. म्हणून ती आपल्या भावापाशी गेली व उदासीन –वगात तिने विचारले: "काय रे भाऊ, माझ्याबरोबर नाचला –ो शिलेदार कोण?" घोडदळ अधिकाऱ्याने आपल्या बाजूने –यत्नांची शर्थ करून तूर्बीन हा कसा मोठा शिलेदार होता – तिला समजावून सांगितले. त्याने आणखी पुढेही सांगितले –ी. तूर्बीन शहरात राहिला आणि नृत्याच्या समारंभाला –ाला ह्याचे एकमेव कारण म्हणजे प्रवासात त्याचे पैसे चोरीला –ले होते, त्याने स्वतः काऊंटला शंभर रूबल उसने दिले होते, –– ती रक्कम फार छोटी होती. आणखी दोनशे रूबल आन्ना –्योदरोवना काऊंटला उसने देऊ शकेल का, असेही त्याने –िचारले. मात्र ह्या गोष्टीचा तिने कुणापाशी उल्लेख करू –ये व काऊंटपाशी तर मुळीच हा विषय काढू नये, असेही –्याने सांगितले. त्याच संध्याकाळी आपल्या भावाकडे पैसे –ठवून देण्याचे व ही बाब गुप्त राखण्याचे आन्ना फ्योदरोवनाने –बूल केले. पण एकोसेस नाचत असताना काऊंटला हवी –तकी रक्कम देऊ करण्याची तिला अनावर इच्छा झाली. –े विचारण्याचे धाडस करायला तिला थोडा अवधी लागला. –ी लाजली, घुटमळली, पण शेवटी मोठ्या प्रयासाने तिने –िषय काढला.

"काऊंट, माझ्या भावानं मला सांगितलं की, प्रवासात तुमच्यावर आपत्ती कोसळली आणि आता तुमच्यापाशी पैसे नाहीत. जर तुम्हाला काही पैसे हवे असले तर माझ्याकडून घ्याल का? मला त्याचा अत्यंत आनंद होईल."

हे शब्द तिच्या तोंडातून बाहेर पडले न पडले तोच आन्ना फ्योदरोवना घाबरली आणि तिचा चेहरा लाल झाला. काऊंटच्या मुद्रेवरील सगळा आनंद मावळला.

"तुमचा भाऊ महामूर्ख आहे," तुटकपणे तो म्हणाला. "तुम्हाला माहीतच आहे की, पुरुष दुसऱ्या पुरुषाचा अपमान करतो तेव्हा त्याला द्वंद्वाचं आव्हान देण्यात येतं पण जेव्हा बाई पुरुषाचा अपमान करते तेव्हा काय होतं हे माहीत आहे?"

बिचाऱ्या आन्ना फ्योदरोवनाला आपली मान आणि कान शरमेने भाजत असल्याची जाणीव झाली. तिने नजर खाली झुकविली आणि तोंडातून एक अक्षर काढले नाही.

"त्या स्त्रीचं सर्वांसमक्ष चुंबन घेतलं जातं," तिच्या कानाशी झुकत काऊंट हळूच पुटपुटला. "तुमच्या हाताचं चुंबन घेण्याची मला परवानगी द्या," बराच वेळ थांबल्यानंतर, आपल्या समोरील स्त्रीच्या गोंधळलेल्या अवस्थेची कीव येऊन तो म्हणाला.

"बाई ग, मात्र आत्ता नाही," दीर्घ सुस्कारा टाकीत आन्ना फ्योदरोवना म्हणाली.

"मग केव्हा? मी उद्या सकाळी लौकरच जातोय. आणि तुम्ही मला चुंबन देणं लागता!"

"पण सध्याच्या परिस्थितीत मी तुमचं देणं चुकतं करू शकत नाही," स्मित करीत आन्ना फ्योदरोवना म्हणाली.

"आज रात्री तुमची भेट घ्यायची मला संधी द्या, म्हणजे

तुमच्या हाताचं मला चुंबन घेता येईल. पण ती संधी मीच शोधून काढीन."

"ती कशी काय?"

"तो माझा प्रश्न. तुम्हाला भेटण्यासाठी मी काय वाट्टेल ते करीन. चालेल?"

"चालेल!"

एकोसेस नाच संपला. ती दोघे आणखी एक माझूर्का नाचली. त्यावेळी काऊंटने तऱ्हेतऱ्हेच्या करामती करून दाखविल्या. त्याने हातरुमाल पकडले, एका गुडघ्यावर वाकून वॉर्सा पद्धतीने टाचा उडविल्या. म्हातारे पुरुष पत्ते खेळणे सोडून नाच पाहू लागले आणि सर्वोत्तम नर्तक म्हणून ख्याती पावलेल्या घोडदळ अंमलदाराने आपला पराभव स्वतःच मान्य केला. जेवणे झाली, अंतिम "ग्रँडफादर" नाचण्यात आला आणि पाहुणे हळू हळू निरोप घेऊ लागले. हा सर्व वेळ काऊंटने छोट्या विधवेवरील आपली रोखलेली नजर मुळीच ढळविली नव्हती. तिच्यासाठी बर्फातील भोकातून उडी मारण्याची त्याची तयारी होती असे तिला तो म्हणाला ती अतिशयोक्ती नव्हती. प्रेमासाठी म्हणा, लहर म्हणून म्हणा अथवा केवळ हट्टीपणा म्हणून म्हणा —त्या संध्याकाळी त्याचे सर्व गुण एकाच गोष्टीवर केंद्रित झाले होते: तिला भेटायचे आणि तिला पूर्णतः आपलीशी करायचे! आन्ना फ्योदरोवना यजमानीणबाईचा निरोप घेत असलेली जेव्हा त्याने पाहिले तेव्हा तो हुजऱ्याच्या खोलीत पळाला व तेथून अंगात कोट न घालताच जेथे बग्गी उभ्या होत्या त्या रस्त्याच्या कडेला धावला.

"आन्ना फ्योदरोवना झाईत्सेवाची बग्गी!" त्याने साद

घातली. कंदील लटकावलेली, चार माणसांची बग्गी प्रवेशद्वाराकडे हलली. "थांब!" गुडघाभर बर्फातून धावताना कोचमनला उद्देशून काऊंट ओरडला.

"काय पाहिजे?" कोचमनने विचारले.

"मला बग्गीत चढायचंय," बग्गीशेजारून धावताना दार उघडीत, आत चढण्याचा प्रयत्न करीत काऊंट उत्तरला. "थांब, सैतान! मूर्ख कुठला!"

"वास्का, थांब!" एका घोड्यावर बसलेल्या स्वाराला उद्देशून कोचमन ओरडला आणि त्याने स्वतःच्या घोड्यांचे लगाम खेचले. "परक्याच्या बग्गीत तुम्ही कशाला चढता? ही आन्ना फ्योदरोवनांची बग्गी आहे, तुमची नाही महाराज!"

"मूर्खा, तुझी जीभ आवर! हा रूबल घे, खाली उतर आणि दार बंद कर," काऊंट म्हणाला. पण कोचमन जागचा हलला नाही तेव्हा त्याने स्वतःच पायऱ्यांची शिडी खेचली, खिडकी उघडली व कसेतरी दार आपटले. सर्व जुन्या बग्गींप्रमाणे, विशेषतः आसनांच्या आवरणांना सोनेरी वेणीची कलाकुसर असलेल्या, ह्या बग्गीलाही धुळीचा आणि जळक्या केसांचा दर्प येत होता. काऊंट गुडघाभर ओल्या बर्फातून धावला होता, त्याचे बूट अगदी पातळ होते व पायांमध्ये केवळ तंग तुमान होती, त्यामुळे आता त्याचे पाय चांगलेच गारठले व त्याचे सर्वांग थंडीने थरथर कापू लागले. वरच्या खोक्यावर कोचमन कुरकुरत होता आणि खाली उतरण्याच्या बेतात होता. पण काऊंटला काहीही ऐकू येत नव्हते व जाणवत नव्हते. त्याचा चेहरा भाजत होता, त्याचे काळीज धडधडत होते. पिवळा पट्टा त्याने ताणलेल्या बोटांमध्ये पकडला व बाजूच्या खिडकीमधून डोके बाहेर काढले. ह्या अपेक्षित

क्षणावर त्याचे सर्वांग एकवटले होते. तो क्षण फार काळ टिकला नाही. प्रवेशद्वाराशी कुणीतरी ओरडले: "मादाम झाईत्सेवांची बग्गी!" कोचमनने लगाम उडविले, बग्गी आपल्या उंच स्प्रिंगांवर डोलू लागली आणि बग्गीच्या खिडक्यांसमोरून घराच्या प्रकाशित खिडक्या भराभरा सरकू लागल्या.

"हे डांबरटा, मी इथं आहे याबद्दल हुजऱ्याला अजिबात सांगू नको! याद राख!" कोचमनशी दळणवळण राखण्याच्या पुढील खिडकीतून मुंडी बाहेर काढीत काऊंटने दम भरला. "सांगितलंस तर चाबकानं फोडून काढीन; नाही बोललास तर – दहा रूबल!"

काऊंटने खिडकी खाडदिशी बंद केली न केली तोच हिसका देऊन बग्गी थांबली. काऊंट कोपऱ्यात मागे सरकला, त्याने आपला श्वास आवरून धरला. त्याच्या तीव्र अपेक्षा पूर्ण होण्यात कशाचा तरी अडथळा येईल ह्याची त्याला एवढी भीती वाटत होती की, त्याने आपले डोळेसुद्धा गच्च मिटून घेतले. दार उघडले गेले, एका पाठोपाठ एक पायऱ्या खाली झाल्या, स्त्रीच्या अंगरख्याची सळसळ ऐकू आली, कोंदट बग्गीत जाई-च्या अत्तराचा सुवास दरवळला, छोटी पावले पायऱ्यांवरून हलकेच वर आली आणि आपल्या अंगरख्याची किनार काऊंटच्या पायांना घाशीत आन्ना फ्योदरोवना शांतपणे त्याच्या शेजारीच बसली. तिचा ऊर धपापत होता.

तिने त्याला पाहिले होते अथवा नाही ते कुणीही सांगू शकले नसते. खुद्द आन्ना फ्योदरोवनालाही सांगता आले नसते. पण जेव्हा त्याने तिचा दंड धरला आणि तो कुजबुजला: "आता मात्र तुमच्या हाताचं नक्की चुंबन घेतो!" ती मुळीच बिचकली नाही आणि एकही शब्द तिने उच्चारला नाही.

तिने त्याच्या हवाली केलेल्या हातावर, हातमोजाच्या जरा वरच्या स्थळी, चुंबनांचा वर्षाव झाला. बग्गी निघाली.

"काहीतरी बोल ना! रागावली नाहीस ना?" त्याने तिला विचारले.

आपल्या कोपऱ्यात ती अधिकच रेलून बसली. पण अचानक, वरकरणी काही कारण घडले नसताना, तला रडू फुटले आणि तिचे डोके आपोआपच त्याच्या छातीवर टेकले.

## ६

नव्याने निवडलेला पोलीस कप्तान आणि त्याचे टोळके, घोडदळ अधिकारी व इतर मंडळी, नव्या खानावळीत मद्य पीत होती आणि जिप्सींची गाणी ऐकत होती. थोड्या वेळानंतर काऊंट तेथे आला. अस्वलाच्या कातड्याचे अस्तर लवलेला निळसर हिवाळी कोट त्याने अंगात घातला होता. तो कोट आन्ना पयोदरोवनाच्या नवऱ्याचा होता.

"महाराज, आम्ही तर तुमच्या येण्याची आशा सोडून दिली होती!" काळ्या केसांचा, चकण्या डोळ्यांचा जिप्सी म्हणाला. काऊंटच्या स्वागताप्रीत्यर्थ आपले शुभ्र दात चमकावीत काऊंटच्या अंगातील कोट उतरविण्याला मदत करण्यासाठी तो पुढे धावला. "लेबेद्याननंतर तुम्हाला पाहिलं नाही. स्त्येशा तुमच्यासाठी झुरतेय..."

स्त्येशासुद्धा काऊंटच्या स्वागताला धावून आली. कमनीय बांध्याच्या ह्या जिप्सी तरुणीच्या काळसर गालांवर लाली पसरली होती. तिच्या खोल काळ्या डोळ्यांचे तेज तिच्या लांब पापण्यांच्या सावलीने थोडेसे नरमले होते.

"ओहो छोटे सरदार! माझे लाडके काऊंट! कित्ती

आनंद झाला तुम्हाला पाहून!" आनंदाने स्मित करीत नी पुटपुटली.

खुद्द इल्युश्का काऊंटला भेटायला धावला. आपल्याला खूप आनंद झाल्याचे त्याने भासविले. म्हाताऱ्या बाया, मध्यमवयीन बायका, लहान पोरी उड्या मारू लागल्या आणि त्यांनी काऊंटला गराडा घातला. काहीच्या मुलांचा काऊंट हा धर्मपिता होता, त्यांनी त्याच्याशी नात्याचा हक्क मागितला, तर इतरांनी त्याच्याशी क्रूसांची अदलाबदल केली होती.

तूर्बीनने सर्व तरुण जिप्सी मुलींच्या ओठांची चुंबने घेतली. म्हाताऱ्या जिप्सी बायांनी आणि पुरुषांनी काऊंटच्या खांद्यांची आणि हातांची चुंबने घेतली. उच्चकुलीन मंडळीही काऊंटला पाहून आनंदित झाली. त्यांना विशेष आनंद वाटायचे कारण म्हणजे उत्सव-समारंभांनी कळस गाठला होता व आता उतार सुरू झाला होता. प्रत्येकाला आता वीट येऊ लागला होता. दारू आता उत्तेजित करू शकत नव्हती, तर फक्त पोटाला त्रास देत होती, शक्य ती सर्व गंमत करून झालेले पाहुणे आता एकमेकांकडे टकमका बघत बसले होते. सर्व गाणी गाऊन झाली होती आणि त्या गाण्यांचा त्यांच्या डोक्यांमध्ये एकच कल्लोळ माजला होता. कितीही अम्मल आणि धाडसी करामती दाखविल्या तरी कुणालाच मौज वाटत नव्हती. पोलीस कप्तान एका म्हाताऱ्या बाईच्या पायांशी किळसवाण्या अवस्थेत लोळत होता.

"शँपेन!" पाय झाडीत तो ओरडला. "काऊंट आले आहेत! शँपेन! ते आलेत! शँपेन आणा! मी आंघोळीचा टब शँपेननं भरीन आणि त्यात आंघोळ करीन! सभ्य

गृहस्थहो, अशा निवडक माणसात ऱ्हायला मला किती आवडतं म्हणून सांगू! स्त्येशा! म्हण गाणं 'खुल्या वाटेला'! "

घोडदळ अधिकारीही तसाच रंगात आलेला होता, पण त्याने आपल्या भावनांना वेगळ्या रीतीने वाट मोकळी करून दिली. एका दिवाणाच्या कोपऱ्यात तो अंगाचे मुटकुळे करून पडला होता. त्याच्या अगदी जवळच ल्यूबाशा नांवाची उंच आणि देखणी जिप्सी तरुणी होती. आपले झिंगलेपण नाहीसे व्हावे म्हणून तो सारखा डोळे मिचकावीत होता व डोक्याला झटके देत होता. आणि एकच एक वाक्य बडबडत ल्यूबाशाला आग्रह करीत होता की, तिने त्याच्या-बरोबर पळून जावे! ल्यूबाशा सस्मित चेहऱ्याने त्याचे बोलणे ऐकत होती. तिला ते मनोरंजक वाटत असावे आणि करुणास्पदही वाटत असावे. अधूनमधून ती आपल्या नवऱ्या-कडे, चकण्या साश्काकडे, कटाक्ष टाकीत होती. साश्का तिच्या समोरच्याच खुर्चीमागे उभा होता. घोडदळ अधिकाऱ्याच्या प्रेमालापांना उत्तर म्हणून ती खाली झुकली आणि दबल्या आवाजात तिने विनंती केली की, त्याने तिला रिबन आणि अत्तरे भेट म्हणून द्यावीत, मात्र ही गोष्ट कुणालाही समजू नये.

"हुर्रा ऽऽ!" काऊंटचे आगमन होताच घोडदळ अधिकारी ओरडला.

देखणा तरुण आता चिंतायुक्त मुद्रेने येरझाऱ्या घालीत होता. त्याची पावले कृत्रिमरीत्या ठाम पडत होती आणि 'सेरालच्या बंडा'चा सूर तो गुणगुणत होता.

म्हाताऱ्या कुटुंबप्रमुखाला उच्चभ्रू मंडळींच्या सतत

आग्रहास्तव जिप्सींकडे खेचून आणण्यात आले होते. तो जर त्यांच्याबरोबर गेला नाही तर गंमत येणार नाही आणि कुणीच गाण्या-बजावण्याला जाणार नाही असे सांगून त्या उच्चभ्रू लोकांनी म्हाताऱ्याला स्वतःबरोबर आणले होते. पण आल्यापासून एका दिवाणावर तो आडवा झाला होता आणि कुणीही त्याच्याकडे ढुंकूनसुद्धा लक्ष देत नव्हते. कुणा एका सरकारी अधिकाऱ्याने अंगातील फ्रॉक-कोट काढून एका टेबलावर चक्क मांडी ठोकून बैठक घातली होती आणि आपण किती पट्टीचे व्यसनी आहोत ते दाखविण्यासाठी स्वतःचे केस तो विस्कटत होता. काऊंट येताच त्याने आपल्या सदऱ्याची कॉलर सोडविली आणि टेबलावर आणखी मागे सरकून तो बसला. एकूण काऊंट येताच मेजवानीत अधिक रंग भरला. खोलीभर भटकणाऱ्या जिप्सी तरुणी परत कडे करून बसल्या. काऊंटने स्त्येशाला आपल्या मांडीवर बसविले आणि आणखी शँपेन आणायला सांगितले.

खुद्द इल्युश्का हाती गिटार घेऊन मुख्य गायिकेपुढे उभा राहिला आणि "**प्ल्यास्का**" सुरू करण्याची त्याने खूण केली. म्हणजे 'वाट चालते मी', 'अहो शिलेदारांनो!' आणि 'ऐकून घे—समजून घे'... ही जिप्सी गाणी त्यात समाविष्ट होती. स्त्येशाने ती सुरेख गायली. तिचा खोल उरामधून उमटणारा भरदार आणि लवचिक आवाज, तिचे मोहक स्मित, तिचा मदभरा खट्याळ कटाक्ष, गाण्याशी अभावितपणे ताल धरणारे तिचे छोटे पाऊल, प्रत्येक वृंदगानाआधी तिने काढलेले चीत्कार—ह्या सगळ्या गोष्टींनी वातावरणाला एक भराव आणला, पण तार मात्र छेडली गेली नाही. स्त्येशाने आपल्या गाण्यांमध्ये आपला जीव ओतला होता.

इल्युश्का तिला गिटारवर साथ देत होता. आपल्या पाठीच्या आणि पायांच्या छोट्या हालचालींमधून, आपल्या स्मिता-मधून, सर्वांगामधून तो गाण्याशी एकरूपता व्यक्त करीत होता. तालात डोके हलविताना त्याने आपले डोळे तिच्यावर स्थिर ठेवले होते आणि एवढ्या आतुरतेने व लक्षपूर्वक तो ऐकत होता, की जणू यापूर्वी त्याने ते गाणे कधी ऐकलेच नव्हते. शेवटचा सूर विरल्यानंतर अचानक तो ताठ उभा राहिला आणि जणू काही जगातील प्रत्येकापेक्षा स्वतःला उंच समजून त्याने मुद्दामच आपल्या गिटारला आपल्या गुडघ्याने हलकासा धक्का मारून हवेत फिरविले. फरशीवर टाचा नाचवीत, केसांना मागे झटका देत, कपाळाला आठ्या घालीत त्याने जिप्सी गायकवृंदावर दृष्टिक्षेप टाकला. आणि मग तो स्वतःच्या देहाच्या कणाकणासकट नाचू लागला. वीस भरदार आणि जोमदार आवाज घुमले. त्यातील प्रत्येक आवाज अपूर्वतेबाबत आणि अस्सलपणाबाबत दुसऱ्या आवाजाशी स्पर्धा करीत होता. म्हाताऱ्या बायका वर न उठताच छोट्या उड्या मारीत होत्या, आपले रुमाल उडवीत होत्या, हसत होत्या व गाण्याच्या ताल-सुरानुसार एकमेकींवर ओरडीत होत्या. खुर्च्यांमागे उभे राहिलेले, डोकी कलती केलेले, गळ्यांच्या शिरा ताणलेले पुरुष खोल खर्ज आवाजांमध्ये गात होते.

जेव्हा जेव्हा स्त्येशा उंच तान मारायची तेव्हा तेव्हा जणू तिला मदत करण्यासाठी इल्युश्का आपले गिटार जास्त जवळ आणायचा आणि तिचा उंच स्वर ऐकायला मिळणार ह्या अपेक्षेने देखणा तरुण बेभान किंचाळी ठोकायचा.

नाचाचा स्वर गायला गेला आणि खांदे व स्तन थरथर हलवीत दून्याशाने तालबद्ध पावले टाकली. काऊंटपुढे एक

गिरकी घेऊन ती खोलीच्या मध्यभागी तरंगत गेली. तूर्बीन उडी मारून उठला, त्याने अंगातील जाकीट काढून भिरकाविले आणि तिच्याबरोबर नाचात तो सामील झाला. आपल्या पायांच्या त्याने अशा काही करामती दाखविल्या की जिप्सींनी एकमेकांकडे कटाक्ष टाकले व कौतुकदर्शक स्मितांची देवघेव केली.

पोलीस कप्तान एखाद्या तुर्काप्रमाणे पाय आडवे टाकून बसला होता, आपल्या मुठीने छाती बडवीत होता आणि "शाब्बास" अशी आरोळी ठोकीत होता. नंतर काऊंटच्या पायाला धरून त्याने त्याला खाजगीत सांगितले की, तेथे तो दोन हजार रूबल घेऊन आला होता, पैकी फक्त पाचशे उरले होते आणि काऊंटने मान्यता दिली तर आपल्या मनाला येईल त्याप्रमाणे तो खर्च करणार होता. म्हातारा कुटुंब-प्रमुख जागा झाला होता आणि त्याला घरी जायचे होते, पण कुणीही त्याला जाऊ दिले नाही. त्याच्याबरोबर वॉल्तझ् नृत्य करण्याबद्दल एका जिप्सी मुलीची देखण्या तरुणाने मनधरणी केली. काऊंटबरोबर आपली मैत्री आहे ह्याचा देखावा करण्यास उत्सुक असलेला घोडदळ अधिकारी आपल्या कोपऱ्यामधून उठला आणि त्याने काऊंटच्या गळयात हात टाकले.

"अरे माझ्या लाडक्या," तो म्हणाला "कशाला आम्हाला सोडून गेलास?" काऊंटचे लक्ष दुसरीकडे कुठेतरी गुंतले होते, म्हणून तो काहीच बोलला नाही. "कुठं गेला होतास? काऊंट, ए धूर्ता! मला ठाऊक आहे कुठं गेला होतास ते!"

ह्या सलगीचा तूर्बीनला राग आला होता. स्मित न करता आणि एकही शब्द न बोलता त्याने त्या घोडदळ अधिकाऱ्याच्या चेहऱ्याकडे रोखून पाहिले व अचानक गलिच्छ शिव्यांचा एवढा जोरदार भडिमार केला की, तो घोडदळ

अधिकारी दचकून मागे सरला. हा प्रकार थट्टेवारी न्यावा अथवा नाही याचा त्याला एकदम निर्णय करता येईना. सरतेशेवटी त्याने स्मित केले आणि आपल्या जिप्सी पोरीकडे परत जाऊन तिच्याशी ईस्टरनंतर नक्की लग्न करण्याचे वचन दिले.

सगळयांनी मिळून एक गाणे गायले, आणखी एक गाणे गायले, आणखी नाच केले, एकमेकांच्या सन्मानार्थ गाणी म्हटली व सुरेख वेळ जात होता अशी कल्पना करून घेतली. शँपेन अखंड वाहात होती. काऊंट खूप प्यायला. त्याचे डोळे धुंद झाले, पण त्याचे पाय लटपटत नव्हते. एरवीपेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेने तो नाचला, खंबीर आवाजात बोलला, जिप्सींच्या कोरसबरोबर गायला आणि 'प्रेमाच्या पंखांची नाजुक फडफड' जेव्हा स्त्येशा गायली तेव्हा तिच्या सुरात त्याने आपला सूर मिसळला.

गाणे चालू असतानाच खानावळीचा मालक आला आणि पहाटेचे तीन वाजत आल्याने पाहुण्यांनी आता जावे असे त्याने सुचविले. काऊंटने त्याची मानगूट पकडली आणि बैठा नाच करायची आज्ञा केली. त्याने नकार दिला. काऊंटने शँपेनची बाटली उचलली, मालकाला उलटे धरले, त्याला तसेच धरून ठेवायला इतरांना सांगितले आणि एकूण जल्लोषात आख्खी बाटली त्याच्या अंगावर ओतली.

एव्हाना उजाडू लागले होते. काऊंटशिवाय इतर सर्वांचे चेहरे फिकुटलेले आणि दमलेले होते.

"अरेच्चा! मॉस्कोला जायची माझी वेळ झाली," एकदम उठत तो म्हणाला. "मंडळी, माझ्याबरोबर हॉटेलात चला आणि मला निरोप द्या. आपण चहा पिऊ."

झोपलेला कुटुंबप्रमुख सोडून प्रत्येकाने होकार दिला. कुटुंबप्रमुखाला मागे ठेवण्यात आले. दाराशी उभ्या असलेल्या तीन घसरगाड्यांमध्ये ते सगळेजण ठासून बसले व पथिकाश्रमाकडे निघाले.

७

"घोडे जुंपा!" आपल्या सर्व पाहुण्यांबरोबर आणि जिप्सींबरोबर पथिकाश्रमाच्या सार्वजनिक हॉलमध्ये प्रवेश करीत काऊंट ओरडला. "साशा! – जिप्सी साशा नव्हे, माझा साशा! मुकादमाला सांग, वाईट घोडे दिलेस तर चामडी सोलून काढीन म्हणावं! आणि चहा आण! झावाल्शेवस्की, तू चहाची व्यवस्था बघ! तोवर मी इल्यिनच्या खोलीत डोकावतो आणि त्याचं कसं काय चाललंय ते पाहतो," तूर्बीन म्हणाला आणि कॉरीडॉरमधून त्याने भालाईत अंमलदाराच्या खोलीची वाट धरली.

इल्यिनने खेळणे नुकतेच संपविले होते. अखेरच्या कोपेकपर्यंत सर्व पैसे तो हरला होता. घोड्याच्या शेपटीच्या केसांचे फाटके आवरण घातलेल्या दिवाणावर आता तो पहुडला होता, एकेक केस उपटून तोंडात घालीत होता व चावून थुंकून टाकीत होता. पत्ते विखुरलेल्या टेबलावर दोन मेणबत्त्या जळत होत्या. पैकी एक मेणबत्ती अगदी शेवटपर्यंत जळत आली होती. त्या मेणबत्त्यांचा उजेड खिडकीमधून डोकावणाऱ्या पहाटेच्या उजेडाशी दुबळा संघर्ष करीत होता. भालाईत अंमलदाराच्या डोक्यात कसलेही विचार नव्हते. त्याच्या सर्व मानसिक शक्ती त्याच्या जुगारी उन्मादाच्या

दाट धुक्यात गुरफटून गेल्या होत्या. त्याला पश्चात्तापसुद्धा वाटत नव्हता. एवढे मात्र खरे की, पुढे काय करायचे, जवळ एकही कोपेक नसताना हे ठिकाण सोडून कसे जायचे, रेजिमेंटचे पंधरा हजार परत कसे द्यायचे, रेजिमेंटचा कमांडर काय म्हणेल, स्वतःची आई काय म्हणेल, मित्र काय म्हणतील, ह्याबद्दल विचार करण्याचा एका टप्प्याला त्याने प्रयत्न केला होता. पण तात्काळ त्याला भीतीने आणि स्वतः-विषयीच्या तिरस्काराने एवढे झपाटले की, सर्व काही विसरून जावे म्हणून उडी मारून खोलीत येरझाऱ्या घालायला त्याने आरंभ केला होता. तक्तपोशीच्या फळयांमधील फटीं-वरूनच पावले टाकीत फिरायचा चाळा त्याने सुरू केला होता. पुन्हा एकदा खेळलेल्या सर्व खेळांची त्याने मनातल्या मनात उजळणी केली. डाव कसा जिंकायचा याबद्दल त्याने कल्पना केली – नव्वी आणि इस्पिकचा राजा उचलून त्यां-च्यावर दोन हजार रूबल लावायचे; उजवीकडे – राणी; डावीकडे – एक्का; उजवीकडे – चौकटचा राजा आणि... पण प्रत्यक्षात सगळे काही गमावले. जर उजवीकडे छक्की आणि डावीकडे चौकटचा राजा असता तर त्याने गमावलेले सर्व पैसे परत मिळविले असते, परत सर्व पैसे लावले असते आणि सरळ आणखी पंधरा हजार जिंकले असते. मग त्याने आपल्या रेजिमेंट कमांडरकडून खोगीरासकट घोडा खरीदला असता व त्याशिवाय दोन घोड्यांची उघडी चार चाकी गाडीही विकत घेतली असती! आणखी काय? मग सगळीच मजा आली असती!..

पुन्हा एकदा दिवाणावर पडून त्याने घोड्याचे केस चावायला सुरुवात केली.

"सात नंबरमध्ये गाणी का बरं गाताहेत?" त्याने विचार केला. "तूर्बीन सगळयांची सरबराई करीत असेल. तिथं जाऊन त्यांच्यात सामील व्हावं आणि मस्तपैकी प्यावं काय?"

तेवढ्यात काऊंट खोलीत आला.

"तर काय, पुरता साफ झालास?" त्याने विचारले.

"झोपण्याचं सोंग करावं," इल्यिनने विचार केला. "नाहीतर मला बोलावं लागेल आणि मी खूप थकलोय."

पण तूर्बीन त्याच्यापाशी आला आणि त्याने त्याच्या केसांमधून मायेने हात फिरविला.

"तर मित्रा, तू पुरता धुवून निघालास, अं? सगळं गमावलंस? बोल!"

इल्यिनने उत्तर दिले नाही.

काऊंटने त्याची बाही खेचली.

"होय, मी हरलो. तुला काय त्याचं?" झोपाळू आवाजात इल्यिन बरळला. त्याच्या आवाजात चिडका तिऱ्हाईतपणा होता. त्याने कूससुद्धा बदलली नाही.

"सगळं?"

"हो. त्याचं काय मग? सगळं. तुला काय त्याचं?"

"माझं ऐक. तुझा एक मित्र म्हणून मला खरं सांग," काऊंट म्हणाला. मद्यामुळे त्याच्यात नाजुक भावना जाग्या झाल्या होत्या. इल्यिनचे केस तो कुरवाळीत राहिला. "मला खरंच तू खूप आवडू लागला आहेस. खरं सांग मला: तू हरलेले पैसे जर रेजिमेंटचे असतील, तर मी तुझ्या मदतीला येईन; खूप उशीर होण्याच्या आधी मला सांग. ते रेजिमेंटचे पैसे आहेत का?"

इल्यिन दिवाणावरून ताडकन उठला.

"मी तुला सांगावं असं खरंच वाटत असेल तर माझ्याशी तसा बोलू नकोस... तसा... कृपया माझ्याशी बोलूच नकोस. कपाळात एक गोळी घालायची ...तेवढी एकच गोष्ट माझ्यासाठी उरलीय!" खरोखरीच्या निराशेपायी इल्यिन ओरडला. आपल्या हातांमध्ये डोके खुपसून तो हमसाहमशी रडू लागला. मात्र क्षणापूर्वीच त्याने खोगीरासकट सजलेला घोडा विकत घेण्याचे स्वप्न पाहिले होते.

"ए, तू अगदी पोरीसारखा वागतो आहेस! ह्यातून गेला नाही असा कोण आहे? विशेष नुकसान मुळीच झालेलं नाही. मला वाटतं, आपण सर्व काही ठाकठीक करू शकू. माझी इथं वाट पहा."

काऊंट खोलीतून बाहेर गेला.

"जमीनदार लूखनोव कोणत्या खोलीत राहतोय?" त्याने नोकराला विचारले.

नोकराने काऊंटला लूखनोवची खोली दाखविली. लूखनोवच्या हुजऱ्याने काऊंटला दाराशीच अडविले. आपले धनी नुकतेच खोलीत गेले आहेत आणि कपडे उतरविण्याचा बेतात आहेत असे तो म्हणाला. पण त्याच्या विरोधाकडे दुर्लक्ष करून काऊंट आत गेला. लूखनोव ड्रेसिंग-गाऊन घालून टेबलाशी बसला होता आणि पुढ्यातील नोटांचा ढिगारा मोजीत होता. टेबलावर त्याची अत्यंत आवडती ऱ्हाईनवाईनची बाटलीही होती. पत्त्यांच्या जुगारात जिंकल्यामुळे आता तो ही चैन करू शकत होता. लूखनोवने आपल्या चष्म्यामधून काऊंटकडे अशा काही कठोर आणि थंड नजरेने पाहिले, की जणू आपल्या समोरच्या व्यक्तीला तो ओळखतच नव्हता.

"तुम्ही मला ओळखलेलं दिसत नाही?" धीटपणे टेबलापाशी लांब लांब ढांगा टाकीत जात काऊंट म्हणाला.

"तुमच्यासाठी मी काय करू शकतो?" लूखनोवने विचारले.

"मला तुमच्याबरोबर पत्ते खेळायचे आहेत," दिवाणावर फतकल मारीत तूर्बीन म्हणाला.

"आत्ता?"

"हो."

"काऊंट, दुसऱ्या एखाद्या वेळी मला आनंद वाटेल, पण आत्ता मी दमलोय आणि झोपायच्या बेतात आहे. दारू पिणार का? फार सुंदर आहे."

"मला आत्ता खेळायचंय."

"आज रात्री आणखी खेळायचा माझा मुळीच इरादा नाही. कदाचित दुसरी काही मंडळी तुमच्याशी खेळतील; पण मी नाही. तुम्ही मला क्षमा कराल अशी आशा आहे."

"तर तुम्ही खेळणार नाही?"

काऊंटची इच्छा पूर्ण करण्यास आपण असमर्थ आहोत याचा खेद प्रदर्शित करण्यासाठी लूखनोवने आपले खांदे किंचित उडविले.

"कुठल्याही परिस्थितीत नाही?"

लूखनोवने आणखी एकदा खांदे झटकले.

"मी तुम्हाला कळकळीनं विचारतोय... खेळणार किंवा नाही?"

मौन.

"खेळणार की नाही?" काऊंटने परत विचारले. "आता विचार करा."

अजूनही लूखनोव गप्प होता. मग त्याने चष्म्याच्या काचांवरून काऊंटच्या चेहऱ्याकडे एक ओझरता कटाक्ष टाकला. काऊंटचा चेहरा वेगाने झाकोळत चालला होता.

"खेळणार की नाही?" काऊंट ओरडला आणि टेबलावर त्याने एवढ्या जोराने मूठ आपटली की दारूची बाटली पडली व दारूचे ओघळ सांडले. "तुम्ही फसवून जिंकला आहात हे तुम्हाला माहीत आहे. खेळणार की नाही? मी तिसऱ्यांदा विचारतोय."

"मी नाही म्हणून सांगितलंय तुम्हाला. काऊंट, तुमचं वागणं फार विचित्र आहे. प्रतिष्ठित माणसं अशी दुसऱ्याच्या खोलीत घुसून माणसाच्या नरडीशी सुरा धरीत नाहीत," नजर वर न उचलताच लूखनोव म्हणाला.

किंचित शांततेचा काळ गेला व त्या दरम्यान काऊंटचा चेहरा अधिकाधिक पांढराफटक पडत गेला. अचानक डोक्यावर जोरदार आघात झाल्यामुळे लूखनोव सुन्न झाला. आपल्या पैशांना हातांमध्ये पकडीत तो दिवाणावर कोसळला आणि एक हृदयभेदक किंकाळी त्याने फोडली. नेहमी शांत व धीरगंभीर राहणाऱ्या त्याच्यासारख्या माणसाच्या तोंडून अशी किंकाळी कुणी अपेक्षिली नसती. तूर्बीनने झटदिशी पैसे उचलले, आपल्या धन्याची किंकाळी ऐकून धावत आत आलेल्या लूखनोवच्या हुजऱ्याला वाटेतून बाजूला ढकलले आणि सरळ बाहेरची वाट धरली.

"तुम्हाला समाधान हवं असेल तर तुमच्या सेवेशी मी हजर आहे. आणखी अर्धा तास मी माझ्या खोलीत असेन," दाराशी पोहोचत काऊंट लूखनोवला म्हणाला.

"चोर! बदमाश!" खोलीतून आवाज आला. "मी तुला कोर्टात खेचीन!"

सगळा मामला ठाकठीक करता येईल ह्या काऊंटच्या सांत्वनाकडे इल्यिनने फारसे लक्ष पुरविले नव्हते. अजूनही

तो आपल्या दिवाणावर पडला होता आणि निराशेने हुंदके देत होता. काऊंटच्या सहानुभूतीमुळे त्याच्या मनात भावनांचा विचित्र कल्लोळ उमटला होता, आपल्या दु:खाची त्याला जाणीव झाली होती व त्याच मन:स्थितीत तो अद्याप होता. संपन्न आशांनी भरलेले त्याचे यौवन, त्याची प्रतिष्ठा, त्याच्या मित्रांचा आदर, प्रेमाविषयीची आणि मैत्रीविषयीची त्याची स्वप्ने – सगळे सगळे कायमचे गमावले होते. अश्रूंची कारंजी आता कोरडी पडू लागली होती. निराशेची जाणीव, भोवतालची अतीव शांतता, त्याच्या मनावर घट्ट घट्ट पकड बसवीत होती. त्याच्या मनात आत्महत्येचे विचार बळावू लागले होते व त्या विचारांची इत:पर त्याला भीती वाटेनाशी झाली होती, तिटकारा वाटेनासा झाला होता. नेमक्या ह्याच वेळी काऊंटच्या खंबीर पावलांचा आवाज ऐकू आला.

तूर्बीनच्या चेहऱ्यावर अद्यापही रागाची छटा उरली होती. त्याचे हात किंचित थरथरत होते, पण त्याचे डोळे मात्र प्रेमळ मिस्कीलतेने आणि समाधानाने चमकत होते.

"हे बघ मी परत जिंकून आणले!" टेबलावर नोटांचा ढीग फेकीत तो म्हणाला. "मोज आणि सगळे पैसे आहेत किंवा नाहीत ते पहा. आणि लौकर हॉलमध्ये ये. मी चाललोय," इल्यिनच्या चेहऱ्यावरील आनंद आणि कृतज्ञता न पाहिल्याचा बहाणा करीत तूर्बीन म्हणाला. शिळेवर जिप्सी सूर वाजवीत तो खोलीतून बाहेर गेला.

८

कमरेला पट्टा घट्ट आवळून आलेल्या साशाने घोडे तयार असल्याची वर्दी दिली. पण प्रथम काऊंटचा फर कॉलरचा

तीनशे रूबल किंमतीचा पायघोळ कोट परत आणावा आणि मार्शलकडे ज्या हरामखोर माणसाने आपल्या कळकट निळ्या डगल्याच्या बदली तो कोट घेतला होता, त्याला त्याचा डगला परत द्यावा, अशी त्याची मागणी होती. कोट परत आणण्याची गरज नाही असे काऊंट तूर्बीन म्हणाला आणि कपडे करण्यासाठी आपल्या खोलीत गेला.

जिप्सी पोरीशेजारी गप्प बसून राहिलेला घोडदळातील अधिकारी अखंड उचक्या देत होता. पोलीस कप्तानाने वोदका मागविली आणि सर्व लोकांना आपल्या घरी न्याहरीला येण्याचे आमंत्रण दिले. आपली बायको खाली येईल आणि जिप्सीं-बरोबर नाच करील असे त्याने आश्वासन दिले. देखणा तरुण प्रामाणिकपणे इल्युश्काची खात्री पटवू पहात होता की, गिटारपेक्षा पियानोमध्ये संगीताचा आत्मा जास्त जाणवत होता. सरकारी अंमलदार एका कोपऱ्यात बसून चहा पीत होता. आपल्या रंगेलपणाची आता दिवसाउजेडी त्याला लाज वाटू लागली होती असे भासत होते. जिप्सींचा स्वतःच्या भाषेत आपापसात वाद चालला होता. तेथील सद्‌गृहस्थांच्या सन्मानाखातर आणखी एक गाणे गावे असा त्यांच्यातील काहींचा आग्रह चालला होता. पण स्त्येशाने आक्षेप घेतला की, **बारोरायला** (म्हणजे जिप्सींच्या भाषेत "काऊंट" अगर "राजपुत्र", नेमका अर्थ "थोर उमराव") राग येईल. थोडक्यात म्हणजे जिवंतपणाची शेवटची ठिणगी विझत होती.

"अच्छा, आता निरोपाचं म्हणून एक शेवटचं गाणं आणि मग प्रत्येकजण आपापल्या घरी जाईल," प्रवासी पोषाखातील

काऊंट तेथे येत म्हणाला. तो आता मघापेक्षा जास्त ताजातवाना, देखणा आणि आनंदी दिसत होता.

शेवटचे गाणे गाण्यासाठी जिप्सींनी रिंगण धरले, एवढ्यात हातात नोटांचे पुडके घेऊन इल्यिन आला व त्याने काऊंटला बाजूला बोलावून नेले.

"माझ्याकडे रेजिमेंटचे फक्त पंधरा हजार रूबल होते आणि तू मला सोळा हजार तीनशे दिलेस," तो काऊंटला म्हणाला. "हे उरलेले जादा पैसे तुझे!"

"अरे वा! दे मला!"

पैसे देताना इल्यिनने काऊंटकडे एक लाजरा दृष्टिक्षेप टाकला आणि काहीतरी बोलण्यासाठी त्याने जणू तोंड उघडले, पण त्याऐवजी तो नुसता लाजला आणि त्याच्या डोळ्यांमध्ये पाणी तरारले. काऊंटचा हात पकडून त्याने जोरात दाबला.

"इथून जा आता! इल्युश्का! हे बघ, हे काही पैसे आहेत. गावाच्या वेशीपर्यंत गाणी म्हणत मला निरोप दे," असे म्हणून इल्यिनने दिलेले तेराशे रूबल काऊंटने जिप्सीच्या गिटारवर उधळले. पण आदल्या रात्री घोडदळ अंमलदाराकडून उसने घेतलेले शंभर रूबल परत द्यायला तो विसरला.

आता सकाळचे दहा वाजले होते. सूर्य एव्हाना घरांच्या छपरांवर आला होता. रस्ते लोकांनी गजबजले होते. दुकानदारांनी केव्हाच आपली दारे उघडली होती, उमराव आणि सरकारी अधिकारी घोडागाड्यांमधून जात-येत होते, दुतर्फा दुकानांमधून मोठ्या घरच्या महिला रेंगाळत होत्या. अशा वेळी पथिकाश्रमाच्या पायऱ्या उतरून जिप्सींचा घोळका, पोलिस कप्तान, घोडदळ अंमलदार, देखणा तरुण, इल्यिन

आणि अस्वलाच्या कातडीचे अस्तर लावलेल्या निळ्या डगल्यातील काऊंट बाहेर आले. ऊन पडले होते, बर्फ वितळत होता. तीन-तीन घोडे जुंपलेल्या तीन त्रोयका गाड्या पथिकाश्रमाच्या प्रवेशद्वाराशी येऊन थांबल्या आणि ही सर्व मंडळी त्यांच्यात चढून बसली. पहिल्या घसरगाडीत काऊंट, इल्यिन, स्त्येशा, इल्युश्का आणि काऊंटचा नोकर साशा एवढे लोक बसले. साशाजवळ बसलेल्या ब्लूखेरने उत्तेजित होऊन आपली शेपटी हलविली आणि दांड्याजवळच्या घोड्यावर तो भुंकला. बाकीचे लोक आणि जिप्सी दुसऱ्या दोन घसरगाड्यांमध्ये बसले. पथिकाश्रम सोडताच त्या घसरगाड्या एकमेकींच्या शेजारून धावू लागल्या आणि जिप्सींनी समूहगान सुरू केले.

अशा रीतीने गाणी गात आणि छोट्या घंटांचा खुळखुळ आवाज करीत, रस्त्यावरील वाटेत येणाऱ्या सर्व वाहनांना कडेला सारीत, ही मंडळी शहरभर फिरून वेशीपाशी पोहोचली.

दिवसाढवळ्या ही प्रतिष्ठित मंडळी शहरातील रस्त्यांवरून गाणी म्हणत, जिप्सी मुलींबरोबर आणि झिंगलेल्या जिप्सी पुरुषांबरोबर त्रोयकांमधून रपेट करताना पाहून दुकानदारांना आणि पादचाऱ्यांना – विशेषत: त्या प्रतिष्ठित लोकांना ओळखणाऱ्यांना – कमालीचे नवल वाटत होते.

गावाच्या वेशीबाहेर त्रोयका गाड्या थांबल्या आणि प्रत्येकाने काऊंटचा निरोप घेतला.

बाहेर पडण्याआधी इल्यिन खूप मद्य प्यायला होता आणि त्याने स्वत:चे त्रोयकाचे घोडे हाकले होते. आता अचानक तो खिन्न झाला आणि काऊंटने निदान आणखी एक दिवस मुक्काम वाढवावा म्हणून आग्रह करू लागला. पण त्याची

मागणी पूर्ण होणे अशक्य होते अशी जेव्हा त्याला खात्री पटली तेव्हा अश्रुभरल्या डोळ्यांनी त्याने आपल्या नव्या मित्राला मिठी मारली व शपथपूर्वक सांगितले की, आपल्या रेजिमेंटमध्ये परत जाता क्षणी अर्ज करून तो स्वतःची बदली तुर्बीनच्या शिलेदार पथकात करवून घेणार होता. काऊंट विशेष मजेत होता. सर्व सकाळभर त्याच्याशी विशेष सलगी करू पाहणाऱ्या घोडदळ अंमलदाराला त्याने बर्फात ढकलून दिले, पोलीस कप्तानाच्या अंगावर ब्लूखेरला छू: करून सोडले, स्त्येशाला त्याने आपल्या मिठीत पकडले आणि मॉस्कोला घेऊन जातो अशी तिला धमकी घातली. सरतेशेवटी त्याने घसरगाडीत उडी मारली व ब्लूखेरला स्वतःशेजारी बसवून घेतले. वस्तुतः ब्लूखेरने मात्र मध्यभागी उभे राहणे जास्त पसंत केले होते. साशाने पुन्हा एकदा काऊंटचा कोट शोधून पाठवून देण्याची घोडदळ अंमलदाराला विनंती केली आणि गाडीवानाच्या जागी तो उडी मारून बसला. काऊंट ओरडला, "आम्ही चाललो!" त्याने टोपी काढून हवेत हलविली, गाडीवानाप्रमाणे घोड्यांना शीळ घातली व तीन त्रोयका गाड्या तीन भिन्न दिशांना धावू लागल्या.

खूप दूरपर्यंत एकसुरी बर्फाळ मैदान पसरले होते. रस्त्याची कटकट पिवळी फीत त्यावरून नागमोडी वळणे घेत गेली होती. वितळणाऱ्या बर्फाच्या पातळ पापुद्र्यावर नाचणारे आणि चमकणारे सूर्यबिंब चेहऱ्याला व पाठीला आल्हादक शेक देत होते. घोड्यांच्या घामेजल्या पाठींमधून वाफ उमटत होती. त्रोयका गाडीच्या घंटा किणकिणत होत्या. भरपूर ओझे लादलेली एक घसरगाडी खेचत धावणाऱ्या एका

शेतकऱ्याने पटकन बाजूला होऊन काऊंटच्या त्रोयकाला वाट करून दिली. त्या गडबडीत शेतकऱ्याचे तागाच्या सालीचे बूट रस्त्याकडेच्या बर्फाळ पाण्यात भिजून चिप्प ओले झाले. दुसऱ्या एका घसरगाडीवर एक लठ्ठ, तांबड्या चेहऱ्याची शेतकरी बाई बसली होती. आपल्या मेंढकातडी कोटाआड आपल्या बाळाला तिने स्तनांशी धरले होते व गाडीच्या पांढऱ्या घोडीच्या पाठीवर लगामांचे फटके ती मारीत होती. अचानक काऊंटला आन्ना फ्योदरोवनाची आठवण झाली.

"मागं फिर!" तो ओरडला.

गाडीवानाला समजले नाही.

"मागं फिर! परत शहराकडं चल! लौकर!"

वेशीमधून त्रोयका परत आत आली आणि मादाम झाईत्सेवाच्या घराच्या लाकडी प्रवेशद्वाराशी वेगाने पोहोचली. काऊंट भराभरा पायऱ्या चढून गेला व प्रवेशदालन ओलांडून दिवाणखान्यात पोहोचला. छोटी विधवा अद्याप बिछान्यातच पहुडलेली त्याला आढळली. त्याने तिच्याभोवती आपल्या बाहूंचा विळखा घातला, तिला वर उचलले, तिच्या झोपाळल्या डोळ्यांची चुंबने घेतली आणि तो बाहेर पळाला. त्या पेंगल्या अवस्थेत आन्ना फ्योदरोवनाने केवळ आपले ओठ चाटले आणि ती पुटपुटली: "काय झालं?"

काऊंटने त्रोयकामध्ये उडी मारली, गाडीवानावर तो ओरडला आणि पुढे क्षणाचाही विलंब न करता, लूखनोवचा अथवा छोट्या विधवेचा अथवा स्त्येशाचा परत मनात विचार न आणता, पुढे मॉस्कोत आपल्यासमोर काय वाढून ठेवले होते याचाच केवळ विचार करीत त्याने क. शहर कायमचे सोडले.

वीस वर्षे उलटली आहेत. पुलाखालून बरेच पाणी वाहून गेले आहे. अनेक माणसे मेली आहेत, दुसरी अनेक जन्माला आली आहेत, तर बाकीची मोठी झाली आहेत अथवा म्हातारी बनली आहेत. माणसांपेक्षा जास्त कल्पना जन्माला आल्या आणि मरून गेल्या आहेत. जुन्या काळच्या खूप चांगल्या आणि खूप वाईट गोष्टी नाहीशा झाल्या आहेत. अनेक नव्या चांगल्या गोष्टी परिपक्व बनल्या आहेत, तर त्याहून जास्त वाईट गोष्टी उदयाला आल्या आहेत.

काऊंट फ्योदर तूर्बीनला ह्या काळात मरून बरीच वर्षे उलटली आहेत. एका परदेशी माणसाला त्याने आपल्या चाबकाने मारले व त्यापायी झालेल्या द्वंद्वयुद्धात तो ठार झाला. त्याचा मुलगा आपल्या बापाची हुबेहूब प्रतिमा आहे. हा तेवीस वर्षांचा उमदा तरुण घोडदळ रक्षकांमध्ये अधिकारी आहे. पण तरुण काऊंट तूर्बीनच्या मनाची ठेवण मात्र आपल्या बापासारखी मुळीच नाही. बेदरकार, भावनावेगी आणि स्पष्ट सांगायचे तर गेल्या पिढीचे वैशिष्टच असलेल्या दुराचारी नादांची किंचितही छटा त्याच्या वागण्यात नाही. वंशाने त्याला लाभलेल्या बुद्धिमत्तेच्या, चांगल्या संस्कारांच्या आणि प्रतिभाशाली स्वभावाच्या जोडीला प्रतिष्ठित-स्थानाविषयी व आरामाविषयी प्रेम, लोकांना आणि परिस्थितीला ओळखण्याची व्यावहारिक दृष्टी व जीवनाकडे सावधपणे आणि सुजाणपणे पाहण्याची प्रवृत्ती, अशा श्रेष्ठ गुणांचा त्याच्यात समावेश झाला आहे. तरुण काऊंट

नोकरीमध्ये खूप वेगाने पुढे गेला आहे. तेविसाव्या वर्षी तो एव्हाना लेफ्टनंट बनला आहे.

लष्करी कारवाया सुरू झाल्या तेव्हा जर आपण क्रियाशील सेवेत दाखल झालो तर बढतीचे योग अधिक येतील असा विचार करून त्याने स्वतःला शिलेदारांच्या रेजिमेंटमध्ये भरती करून घेतले. तेथे त्याने कप्तान म्हणून काम केले आणि लौकरच त्याच्या ताब्यात एक स्क्वाड्रन देण्यात आले.

१८४८ च्या मे महिन्यात शिलेदारांची स. रेजिमेंट क. गुबेर्नियामधून जाणार होती आणि तरुण काऊंट तूर्बीन याच्या आधिपत्याखालील स्क्वाड्रनला मोरोझोवका नामक खेड्यात रात्रीचा मुक्काम करावा लागणार होता. हे मोरोझोवका खेडे आन्ना फ्योदरोवनाच्या मालकीचे होते. आन्ना फ्योदरोवना अजून जिवंत होती, पण तिचे वय एवढे वाढले होते की स्वतःला तरुण मानायचे तिने आता सोडून दिले होते. बाई-च्या दृष्टीने हा फार मोठा पल्ला होता. ती खूप लठ्ठ बनली होती. त्यामुळे बाई अधिक तरुण दिसते असे म्हणतात. पण तिच्या मऊ शुभ्र गुबगुबीत चरबीत खोल रेषा उमटल्या होत्या. शहरामध्ये घोडागाडीतून फिरणे तिने आता बंद केले होते. खरे म्हणजे घोडागाडीत चढून बसणे तिला फार कष्टाचे जात होते. पण नेहमीप्रमाणे ती सुस्वभावी राहिली होती आणि वस्तुस्थिती झाकून टाकायला इतःपर तिचे सौंदर्य न उरल्यामुळे ती पूर्वीसारखीच मूर्खही राहिली होती हे आता आपण मान्य करू शकलो असतो. तिची मुलगी लिझा ही रशियन ग्रामीण सौंदर्याचा नमुना होती. तेवीस वर्षांची लिझा आपल्या आईपाशीच रहात होती. तसेच आन्ना फ्योदरोवनाचा

भाऊ, आपल्या परिचयाचा घोडदळ अंमलदार, तेथेच रहात होता. त्याने स्वतःच्या खुशालचेंडू वागण्यापायी वडलोपार्जित पैसा उधळून टाकला होता आणि आता म्हातारपणी तो आपल्या बहिणीवर अवलंबून राहिला होता. त्याचे केस संपूर्ण पांढरे बनले होते. त्याचा वरचा ओठ आत सरकला होता, पण त्याच्यावरील मिशी मात्र काळजीपूर्वक काळी रंगविलेली होती. त्याच्या गालांवर आणि कपाळावरच केवळ रेघांचे जाळे उमटले नव्हते तर त्याच्या नाकावर आणि मानेवरही रेषा पसरल्या होत्या. त्याच्या पाठीला पोक आले होते, पण तरीही त्याच्या दुबळ्या व फेंगड्या पायांमध्ये जुन्या घोडदळ अंमलदाराची काही खूण उरली होती.

संदर्भात संध्याकाळी आन्ना प्योदरोवना आपल्या सर्व कुटुंबियांसमवेत आणि नातेवाईकांसमवेत जुन्या घरातील छोट्या दिवाणखान्यात बसली होती. त्या घराच्या व्हरांड्याचे दार आणि खिडक्या ज्या दिशेला होत्या तेथे जुन्या पद्धतीची तारकेच्या आकाराची बाग होती व त्या बागेवर लिंबोणीच्या झाडांनी सावली धरली होती. पांढऱ्या केसांची, अंगात फिकट जांभळ्या रंगाचे दुलईदार जाकीट घातलेली आन्ना प्योदरोवना दिवाणावर बसली होती व पुढ्यातील गोल शिसवी टेबलावर पत्त्यांचा पेशन्सचा डाव तिने मांडला होता. स्वच्छ पांढऱ्या पाटलोणीमधील आणि [illegible] कोटातील तिचा म्हातारा भाऊ खिडकीशी बसून पांढऱ्या सुताच्या धाग्याने काहीतरी विणकाम करीत होता. हे विणकाम तो आपल्या भाचीकडून शिकला होता आणि हा उद्योग त्याला कमालीचा आवडला होता. दुसरे काही [illegible] काम करण्यास आता तो असमर्थ बनला होता

आणि आपल्या अत्यंत आवडत्या छंदात – वर्तमानपत्रे वाचण्यात – रमणे अधू दृष्टीमुळे त्याला अशक्य ठरले होते. आन्ना फ्योदरोवनाने दत्तक घेतलेली छोटी मुलगी पीमोचका त्याच्या शेजारी बसली होती व लिझाच्या देखरेखीखाली तिचा अभ्यास चालला होता. लिझा त्याच वेळी आपल्या मामासाठी बकऱ्याच्या लोकरीचे पायमोजे विणत होती. नेहमी-प्रमाणे दिवसाच्या त्या वेळेला, मावळत्या सूर्याची शेवटची तिरपी किरणे लिंबोणीच्या झाडांमधून प्रकाशत होती. घराची सर्वात शेवटची खिडकी आणि तिच्या शेजारचे पुस्तकांचे फडताळ त्या प्रकाशात उजळले होते. खोलीत आणि बागेत एवढी नीरवता होती की, खिडकीबाहेरील पाकोळीच्या पंखांची जलद फडफड त्यांना स्पष्टपणे ऐकू येत होती. आन्ना फ्योदरोवनाचे खोलीतील हलकेच सुस्कारणे आणि पायांची आढी घालताना म्हाताऱ्या अंमलदाराने घशात केलेला आवाजही ठळक ऐकू येत होता.

"हे पान कुठं बरं लावता येईल? लिझा, मला सांग पाहू. मी सारखी विसरतेय," आपला खेळ थांबवीत आन्ना फ्योदरोवना म्हणाली.

विणकाम न थांबविता लिझा आपल्या आईपाशी गेली आणि तिने पत्त्यांवर नजर टाकली.

"अग आई, तू सगळा घोटाळा करून ठेवला आहेस," पत्त्यांची परत जुळवाजुळव करीत लिझा म्हणाली. "हे पत्ते असे लावले पाहिजेत. तरीही जमेल, तुझा अंदाज बरोबर होता," आपल्या आईचे लक्ष नाही असे पाहून एक पत्ता हळूच सरकवीत ती पुढे म्हणाली.

"सगळं जमेल असं सांगून नेहमी तू मला फसवतेस!"

"पण खरंच जमेल. पाहिलंस? जमलं बघ!"

"ठीक, ठीक. कैदाशीण कुठली! आपली चहाची वेळ झाली ना?"

"समोवार तापवायला मी आधीच सांगितलंय. जाऊन पाहून येते. इथं आणायला सांगू का चहा? पीमोचका, तुझे धडे लौकर संपव पाहू. मग आपण फिरायला जाऊ या."

आणि लिझा दारामधून अदृश्य झाली.

"लिझा! लिझचका!" आपल्या विणकामावर डोळे ताणून बघत तिचा मामा ओरडला. "मी परत एक टाका विसरलो असं दिसतंय. तेवढा दुरुस्त करून दे, शहाणी बाळ तू माझी!"

"आत्ता एका मिनिटात आले! हा साखरेचा खडा त्यांना फोडायला देऊन येते."

आणि खरोखरीच तीन मिनिटांच्या अवधीत ती खोलीत परत धावत आली व आपल्या मामापाशी जाऊन तिने त्याचा कान धरला.

"टाके विसरल्याबद्दल ही तुम्हाला शिक्षा!" हसत ती म्हणाली. "आजचा धडा पूर्ण केला नाहीत."

"असू दे, असू दे; तेवढा टाका व्यवस्थित करून दे. कुठंतरी गाठ बसलीय."

लिझाने विणकामाचा आकडा घेतला, आपल्या रुमाला-मधून पिन उपसली, पिनमध्ये टाका धरला आणि त्याला दोन-तीन वेढे घालून परत आपल्या मामाच्या हवाली केला. पिन काढल्यामुळे तिच्या डोक्यावरील रुमाल खिडकीमधून येणाऱ्या झुळुकीमुळे किंचित मागे सरकला.

"माझ्या श्रमांबद्दल एक पापी द्या," तिने आपला गुलाबी गाल मामासमोर धरला व पिन परत रुमालात खुपसली. "आज चहाबरोबर रम घेणार ना? आज शुक्रवार आहे."

परत ती चहाच्या खोलीत गेली.

"मामा, इकडं येऊन पहा! शिलेदार येताहेत!" स्वच्छ, उंच स्वरात ती ओरडली.

आन्ना फ्योदरोवना आणि तिचा भाऊ शिलेदारांना पहायला चहाच्या खोलीत गेले, कारण त्या खोलीच्या खिडक्या खेड्याच्या दिशेला होत्या. खिडक्यांमधून अगदीच थोडे दिसत होते. धुळीच्या लोटामधून एक जमाव पुढे सरकत असलेला तेवढा त्यांना दिसला.

"ताई, किती दुःखाची बाब आहे," लिझाचा मामा आन्ना फ्योदरोवनाला म्हणाला, "की आपलं घर खूप लहान आहे आणि नवा भाग अजून बांधून पुरा झाला नाही. एरवी आपण काही अंमलदारांना बोलावलं असतं. शिलेदारीतले अंमलदार नेहमी छान मजेदार तरुण असतात. त्यांच्यावर एकदा नजर टाकून आलं पाहिजे."

"मलासुद्धा त्यांचा पाहुणचार करायला खूप आनंद वाटला असता. पण भाऊराया, तुम्हाला स्वतःलाच ठाऊक आहे की, त्यांना आपल्या घरात ठेवायला कुठंच जागा नाही. इथं फक्त माझी झोपायची खोली, लिझाची छोटी खोली, दिवाणखाना आणि तुमची खोली. त्यांना कुठं ठेवणार आपण? तुम्हीच ठरवा. मिखायलो मत्वेयेवनं गावप्रमुखाच्या झोपडीत त्यांची व्यवस्था लावलीय. तो म्हणाला की, झोपडी नीट स्वच्छ आहे."

"लिझचका, आपण त्यांच्यातून तुझ्यासाठी एक शूर शिलेदार नवरा शोधू या," लिझाचा मामा म्हणाला.

"मला शिलेदार नको, मला भालाईत हवा! मामा, तुम्ही भालाईतांमध्ये होता ना? त्या शिलेदारांशी मला काहीही कर्तव्य नाही. अगदी अविचारी वागतात म्हणे!"

लिझाच्या गालांवर अस्पष्ट लाली उमटली, पण परत तिने आपले मनमोकळे खळाळते हास्य केले. "ही पहा उस्त्यूश्का पळत आलीय. तिनं काय पाहिलं ते आपण तिला विचारायला हवं."

आन्ना फ्योदरोवनाने उस्त्यूश्काला बोलावणे केले.

"जणू तुला गुंतून रहायला काही कामच नव्हतं! पण नाही, त्या सैनिकांना पहायला धावत सुटलीस!" आन्ना फ्योदरोवना म्हणाली. "बरं, बरं, त्या अंमलदारांना कुठं ठेवलंय?"

"येरेमकिनच्या झोपडीत, बाईसाहेब. दोघे आहेत, किती देखणे म्हणून सांगू! त्यातला एक काऊंट आहे म्हणतात!"

"काय त्याचं नांव?"

"कझारोव किंवा तूर्बीनोव किंवा असंच काहीतरी. मला नीट आठवत नाही, माफ करा."

"अगदी बावळट आहेस! नीट काही सांगता येत नाही. निदान त्याचं नांव तरी माहीत करून घ्यायचं होतं!"

"तुम्हाला हवं असेल तर आत्ता पळत जाऊन विचारून येते."

"तर, तर, ह्यात तू अगदी पटाईत आहेस! चांगलं ठाऊक आहे मला! नको, दानीलो जाईल. भाऊ, त्याला जायला सांगा आणि अंमलदारांना काही हवं-नको असेल

तर विचारपूस करायला सांगा. आपण त्यांची रीतीनुसार सरबराई केली पाहिजे. आणि त्याला सांगा की, त्याच्या बाईसाहेबांनी मुद्दाम पाठवलंय म्हणावं."

म्हातारी माणसे परत चहाच्या खोलीत बसली आणि साखर ठेवून देण्यासाठी लिझा मोलकरणीच्या खोलीत गेली. तेथे उस्त्यूश्का शिलेदारांविषयी बोलत असलेली तिला आढळली.

"माझ्या लाडक्या ताईसाहेब, तो काऊंट किती देखणा आहे म्हणून सांगू!" उस्त्यूश्का म्हणाली. "अगदी यक्ष! काळ्या भुवया आणि काळे केस! तुम्हाला जर असा नवरा मिळाला तर किती देखणा जोडा दिसेल!"

इतर नोकरांनी संमतीदर्शक स्मित केले. खिडकीशी बसून पायमोजाला रफू करणाऱ्या म्हाताऱ्या दाईने एक दीर्घ सुस्कारा टाकला व श्वास रोधून ती प्रार्थना पुटपुटली.

"अस्सं, म्हणजे त्या शिलेदारांना पाहून तुला असं वाटलं!" लिझा म्हणाली. "असल्या गोष्टी बोलण्यात तू मोठी चतुर! उस्त्यूश्का, त्या शिलेदारांसाठी काहीतरी आंबटसर फळांचं पेय आण!"

आणि हसून लिझा साखरेच्या भांड्यासह बाहेर गेली.

"त्या शिलेदाराला पहायला मिळालं पाहिजे," तिच्या मनात विचार आला. "तो गोरा आहे की काळसर? आमची ओळख झाली तर त्याला आनंदच वाटेल यात काही संशय नाही. पण मी इथं होते आणि त्याच्याविषयी माझ्या मनात विचार आले होते हे न समजताच कदाचित तो इथून तसाच निघून जाईल. त्याच्यासारखे कितीकजण आजवर माझ्यापासून तसेच निघून गेलेत! मामा आणि उस्त्यूश्का सोडून

दुसरं कुणीही मला पहात नाही. माझी केशरचना कशी आहे आणि कोणत्या बाह्यांचा पोषाख मी घालते याला काय महत्त्व? माझं कौतुक करणारं कुणीही नाही," आपल्या गुबगुबीत शुभ्र दंडाकडे टक लावून पहात असताना तिच्या मनात हे विचार आले आणि तिने सुस्कारा सोडला. "मला वाटतं तो उंच आहे, त्याचे डोळे टपोरे आहेत आणि कदाचित त्यानं बारीक काळी मिशी राखलीय. माझं तेवीस वय झालं आणि तो देवीचे वण असलेला इवान इपातिच सोडून आजवर कुणीही माझ्या प्रेमात पडलं नाही म्हणजे कमालच झाली! शिवाय चार वर्षांपूर्वी मी आजच्यापेक्षा जास्त सुंदर होते. माझं बालिकेचं यौवन तर जवळ जवळ मरलं आणि त्याचा आनंद कुणीच उपभोगला नाही. किती अभागी मी! खेड्यातली गरीब बापडी मुलगी!"

ह्या खेड्यातील मुलीच्या विचारांची तंद्री तिच्या आईच्या हाकांमुळे भंगली. चहासाठी तिची आई तिला बोलावीत होती. मानेला किंचित हिसडा देऊन लिझा चहाच्या खोलीत गेली.

योगायोगाने ज्या गोष्टी घडतात त्या नेहमी उत्तम ठरतात. एखादा जेव्हा अतिप्रयत्न करतो तेव्हा नेमके उलटे घडते. खेड्यामध्ये मुलाच्या शिक्षणाकडे अगदी कमी लक्ष देण्यात येते आणि बव्हंश वेळा ते शिक्षण उत्तम ठरते. लिझाच्या बाबतीत असेच घडले होते. आन्ना प्योदरोवनाच्या मनाला अगदी संकुचित मर्यादा होत्या आणि लिझाला शिक्षण देण्याबाबत खास विचार करण्याइतपत तिची कुवत नव्हती. तिने लिझाला संगीताचे शिक्षण दिले नव्हते किंवा अटळ असणारी फ्रेंच भाषा शिकविली नव्हती. मात्र योगायोगाने तिने

आपल्या दिवंगत नवऱ्याला अत्यंत सुंदर आणि निकोप बाळाची – मुलीची – भेट दिली होती. ह्या मुलीला तिने ओल्या दाईच्या आणि मोलकरणीच्या हवाली केले होते. ह्या मुलीला तिने खाऊ-पिऊ घातले, सुती फ्रॉक आणि बकऱ्याच्या कातड्याचे बूट घातले, तिला बाहेर खेळायला व बेरी आणि अळंब्या गोळा करायला धाडले; तिला लिहा-वाचायला व गणित शिकवायला एक तरुण विद्यार्थी ठेवला आणि सोळा वर्षांच्या अवधीत अगदी योगायोगाने तिला आढळून आले की, लिझाच्या रूपाने तिला एका चांगल्या मैत्रिणीचा, एका आनंदी, उद्योगी, प्रेमळ कारभारणीचा लाभ झाला होता. आन्ना फ्योदरोवना स्वत: एवढी दयाळू मनाची होती की, ती नेहमी एखाद्या भूदासाचे मूल अथवा कुणी टाकून दिलेले मूल दत्तक घेत आली होती. लिझा वयाच्या दहाव्या वर्षा-पासून आपल्या आईच्या दत्तक बाळांची काळजी घेत आली होती. त्या मुलांना तिने मूळाक्षरे शिकविली होती, त्यांना कपडे केले होते, चर्चला नेले होते आणि त्यांनी फार वाह्यात-पणा केला तर तंबी देऊन नीट मार्गावर आणले होते. नंतर तिचा दुबळा, सुस्वभावी म्हातारा मामा आला. त्याची एखाद्या लहान बाळासारखी काळजी घ्यावी लागत होती. शिवाय घरच्या नोकरांची आणि खेड्यामधील भूदासांची दुखणी-खुपणी ह्याच छोट्या मालकीणबाईला निस्तरावी लागत होती. एल्डरच्या पांढऱ्या फुलांचा अर्क, बडीशोप आणि कापराच्या तेलांचे उपचार ती करायची. शिवाय, अशीच योगायोगाने घराची सर्व जबाबदारी तिच्यावर येऊन पडली होती. प्रेमाविषयीची तिची खुडून गेलेली आस तिच्या निसर्गप्रेमातून आणि धर्मपरायणतेमधून व्यक्त होत होती.

अशा रीतीने अगदी योगायोगाने लिझाचे एका सतत कामात गुंतलेल्या, आनंदी, प्रेमळ, स्वतंत्रपणे वागणाऱ्या, विशुद्ध आणि अत्यंत धर्मपरायण स्त्रीमध्ये रूपांतर घडले होते. एवढे खरे की, तिच्या शेजारणी जेव्हा जवळच्या क. शहरामधून विकत आणलेल्या आधुनिक धर्तीच्या टोप्या घालून चर्चमध्ये येत तेव्हा तिच्या मनात किंचित असूयेची ज्वाला पेटत असे; आपल्या विचित्र स्वभावाच्या म्हाताऱ्या आईच्या लहरींपायी अनेकदा तिला रडू कोसळत असे; प्रेमाविषयीची अत्यंत असंबद्ध आणि वेडीबागडी स्वप्ने तिला पडत. पण तिच्या दृष्टीने अपरिहार्य ठरलेल्या उपयुक्त कामात गुंतून पडले म्हणजे ह्या सगळ्या गोष्टी कुठच्या कुठे पळून जात. आणि तेविसाव्या वर्षी ह्या परिपक्व होणाऱ्या स्त्रीच्या तेजस्वी आणि पवित्र मनावर काळिमा आणणारा एकही ठिपका नव्हता. आत्मिक आणि शारीरिक अशा दोन्ही सौंदर्यांनी ती संपन्न होती. लिझाची उंची मध्यम होती आणि तिचा बांधा गोलाकार होता. तिचे डोळे बदामी रंगाचे होते आणि फारसे मोठे नव्हते. तिच्या खालच्या पापण्यांचे त्यांच्यावर किंचित सावट पडायचे. तिचे केस लांब आणि सोनेरी होते. अंगाला सहज झोका देऊन लांब पावले टाकीत ती चालायची. जेव्हा ती खूप कामात असे व चिंता करण्यासारखे काही नसे तेव्हा तिचा चेहरा पाहणाऱ्याला जणू जाणवायचे: ज्यांच्या सदसद्विवेकबुद्धीला काही टोचणी नाही आणि ज्यांना प्रेम करायला कुणी आहे त्यांना आयुष्य छान आहे, आयुष्य हा एक आनंद आहे. रागाच्या, संतापाच्या, भीतीच्या अगर दुःखाच्या क्षणांना तिची इच्छा नसतानाही जेव्हा तिच्या डोळ्यां-मध्ये अश्रू दाटत, तिचे ओठ करारी बनत, तिची डावी

भुवई वाकडी होई, अगदी तेव्हाही तिच्या प्रेमळ आणि निष्कपट, कृत्रिमतेचा स्पर्शही न झालेल्या अंतःकरणाची आभा तिच्या गालांवरील खळयांमधून, तिच्या ओठांच्या कोपऱ्यांमधून आणि तिच्या चकाकत्या डोळयांमधून प्रकाशायची.

१०

मोरोझोवका खेड्यात स्क्वाड्रनने प्रवेश केला तेव्हा सूर्य मावळता होता, तरीही खूप गरम होत होते. खेड्याच्या धुळकट रस्त्याच्या वरच्या अंगाला कळपापासून अलग राहिलेली एक ठिपकेदार गाय पळत होती. ती सारखी मागे वळून भेदरलेले कटाक्ष टाकीत होती, मधून मधून थांबत होती आणि हंबरत होती. घोड्यांच्या वाटेतून फक्त बाजूला झाले पाहिजे एवढा तर्क करणे काही तिला जमत नव्हते. धुळीच्या दाट लोटांमधून पुढे सरकणाऱ्या, आखूड लगाम लावलेल्या, फुरफुरणाऱ्या काळ्या घोड्यांवर स्वार झालेल्या शिलेदारांना पाहण्यासाठी रस्त्याच्या दोन्ही बाजूंना म्हातारे शेतकरी, खेड्यातील गृहिणी, मुले व घरगडी दाटीवाटीने उभे होते. स्क्वाड्रनच्या उजव्या अंगाने खोगीरावर ढिली मांड टाकून दोन अंमलदार चालले होते. त्यांपैकी एक होता काऊंट तूर्बीन, स्क्वाड्रनचा कमांडर; आणि दुसरा होता पोलोझोव, अगदी अलिकडेच कमिशन मिळालेला तरुण.

खेड्यातील सर्वोत्तम झोपडीमधून पांढऱ्या सदऱ्यामधील एक शिलेदार बाहेर आला व गवती टोपी डोक्यावरून उतरवून अंमलदारांकडे गेला.

"आमच्या राहण्याची व्यवस्था काय केलीय?" काऊंटने त्याला विचारले.

"महाराज, तुमच्यासाठी?" सर्वांग ताठरत क्वार्टरमास्टर उत्तरला. "गावप्रमुखाची ही झोपडी आम्ही तुमच्यासाठी स्वच्छ केलीय. जमीनदाराच्या वाड्यावरची एक खोली आम्ही मागितली होती, पण नकार मिळाला. तिथली मालकीण मोठी खट आहे."

"ठीक," घोड्यावरून खाली उतरीत काऊंट म्हणाला. गावप्रमुखाच्या झोपडीत जाता जाता त्याने आपले आखडलेले पाय ताणले. "माझी गाडी आली?"

"होय महाराज," फाटकाशी उभ्या असलेल्या गाडीकडे आपल्या टोपीने निर्देश करीत क्वार्टरमास्टर उत्तरला. नंतर झोपडीच्या प्रवेशद्वाराकडे तो धावला. तेथे अंमलदारांना बघायला एक शेतकरी कुटुंब घोळक्याने उभे होते. नुकत्याच धासून-पुसून लखलखीत केलेल्या झोपडीचे दार उघडण्याच्या गडबडीत क्वार्टरमास्टरने एका म्हाताऱ्या बाईला धक्का मारून जवळ जवळ पाडलेच. दार सताड उघडून काऊंटना वाट देण्यासाठी तो बाजूला उभा राहिला.

झोपडी मोठी आणि ऐसपैस होती, पण संपूर्ण स्वच्छ मात्र नव्हती. सभ्य माणसासारखा पोषाख केलेल्या एका जर्मन नोकराने लोखंडी कॉट घातली होती व आता तो प्रवासी पेटीमधून चादरी-पांघरूणे बाहेर काढीत होता.

"छी:, किती भयाण जागा आहे!" काऊंट संतापून म्हणाला. "द्यादेन्को! त्या जमीनदाराच्या वाड्यात कुठंतरी आम्हाला ठेवणं खरंच अशक्य आहे?"

"महाराज, तसा जर तुम्ही हुकूम करत असलात तर

कुणाला तरी तिकडं पाठवतो," द्यादेन्को उत्तरला. "पण वाडा अगदी वाईट अवस्थेतला आहे. ह्या झोपडीपेक्षा थोडासा बरा इतकंच!"

"आता खूप उशीर झालाय. तू जा."

आणि दोन्ही हात डोक्याखाली उशीसारखे धरून काऊंट बिछान्यावर आडवा झाला.

"योहान!" त्याने आपल्या हुजऱ्याला हाक मारली. "परत तू गादीच्या मध्यभागी टेंगूळ ठेवलंस! साधा बिछाना घालणंसुद्धा तुला कसं काय जमत नाही?"

योहान बिछाना सरळ करायला पुढे झाला.

"नको, आता खूप उशीर झालाय. माझा ड्रेसिंग-गाऊन कुठं आहे?" काऊंटने वैतागलेल्या सुरात विचारले.

हुजऱ्याने त्याला ड्रेसिंग-गाऊन दिला.

गाऊन अंगात घालण्यापूर्वी काऊंटने त्याची किनार न्याहाळली.

"मला वाटलंच. तो डाग तू काढला नाहीस. तुझ्याएवढी वाईट सेवा कुणी करू शकत असेल असं मला वाटत नाही," हुजऱ्याच्या हातून गाऊन खेचून आपल्या अंगावर चढवीत काऊंट खेकसला. "मुद्दाम असा वागतोस काय? चहा तयार झाला?"

"मला सवड मिळाली नाही," योहान म्हणाला.

"मूर्ख!"

प्रवासात वाचण्यासाठी म्हणून बरोबर घेतलेली फ्रेंच कादंबरी काऊंटने हातात उचलली व थोडा वेळपर्यंत तो मुकाट वाचत पडला. समोवार गरम करण्यासाठी योहान झोपडीच्या पुढच्या भागात गेला. थकव्यामुळे, घाणेरड्या

चेहऱ्यामुळे, घट्ट कपड्यांमुळे आणि उपाशी पोटामुळे काऊंटची मन:स्थिती बिघडली होती हे स्पष्ट होते.

"योहान!" काऊंट परत ओरडला. "मी तुला दिलेल्या दहा रूबलचा हिशेब दे. गावात काय विकत घेतलंस?"

योहानने सादर केलेल्या हिशेबाच्या चिटोऱ्यावरून काऊंटने नजर फिरविली आणि खरेदी केलेल्या वस्तूंच्या महागडेपणावर काही नापसंतीदर्शक शेरे मारले.

"चहाबरोबर मी रम घेईन."

"मी रम विकत घेतली नाही," योहान म्हणाला.

"छान! जवळ रम ठेवत जा असं किती वेळा मी तुला बजावलंय?"

"माझ्यापाशी पुरेसे पैसे नव्हते.

"पोलोझोवनं का विकत घेतली नाही? त्याच्या नोकराकडून तू घेतली असतीस!"

"कॉर्निट पोलोझोव? मला माहीत नाही. त्यांनी चहा आणि साखर विकत घेतली."

"हलकट! चालता हो! तुझ्याएवढा माझ्या सहनशीलतेचा अंत कुणीही पहात नाही! वाटचालीत मी चहाबरोबर नेहमी रम घेतो हे तुला ठाऊक आहे."

"अंमलदारांच्या मुख्य ठाण्याकडून तुमच्यासाठी ही दोन पत्रे आली आहेत," हुजऱ्या म्हणाला.

बिछान्यावर पडल्या पडल्या काऊंटने पत्रे फोडली व वाचायला आरंभ केला. तेवढ्यात, लोकांचा निरोप घेऊन आनंदी चेहऱ्याने कॉर्निट झोपडीत प्रवेशला.

"काय तूर्बीन? ही जागा काही तेवढी वाईट दिसत

नाही. पण मी पार थकलोय हे मात्र कबूल करतो. दिवसा खूप गरम होतं."

"म्हणे वाईट नाही! गलिच्छ, दुर्गंधी झोपडी आणि तुझ्यामुळं मला रम मिळाली नाही. तुझा मूर्ख नोकर विकत घ्यायला विसरला आणि माझाही. तुझ्या नोकराला निदान आधी सांगून ठेवायचंस!"

तो परत पत्रे वाचू लागला. जेव्हा त्याने पहिले पत्र वाचून संपविले तेव्हा ते चुरगळून जमिनीवर फेकून दिले.

दरम्यान बाहेरच्या व्हरांड्यात कॉर्निट आपल्या नोकराला दबत्या आवाजात विचारीत होता: "तू थोडी रम विकत का घेतली नाहीस? तुझ्यापाशी पैसे होते ना?"

"सगळ्या गोष्टी आपणच का म्हणून विकत घ्यायच्या? एरवी सगळा खर्च मीच करतोय. त्याचा तो जर्मन काही करत नाही. नुसता पाईप फुंकत बसतो."

दुसरे पत्र तेवढेसे अप्रिय नसावे, कारण ते वाचताना काऊंटच्या चेहऱ्यावर स्मित उमटले होते.

"कुणाचं पत्र आहे?" खोलीत परत येऊन चुलाण्यापाशी काही फळकुटांवर आपला बिछाना तयार करीत असलेल्या पोलोझोवने विचारले.

"मित्राचं!" हसत काऊंट म्हणाला व त्याने पत्र पोलोझोवपुढे धरले. "वाचायचंय तुला? किती मोहक बाई आहे! आपल्या पोरींपेक्षा कितीतरी जास्त चांगली. ह्या पत्रात किती चातुर्य आणि भावना भरल्या आहेत ते जरा बघ! एकच गोष्ट त्यात वाईट आहे—ती पैसे मागतेय."

"खरंच, हे वाईट आहे," कॉर्निट म्हणाला.

"खरं म्हणजे मी तिला कबूल केलं होतं. पण आपण

ह्या मोहिमेवर निघालो आणि... असो!.. पण आणखी तीन महिने मी स्क्वाड्रनचा कमांडर म्हणून राहिलो तर मी तिला काही पैसे पाठवीन. माझी तशी खासच तक्रार नाही. किती गोड आहे नाही ती?" पत्र वाचणाऱ्या पोल्होझोवचा चेहरा न्याहाळीत तूर्बीन स्मितपूर्वक म्हणाला.

"भयंकर अशुद्ध, पण गोड आहे आणि खरंच ती तुझ्या प्रेमात पडलेली दिसते," कॉर्निट म्हणाला.

"होय! ती माझ्या प्रेमात पडलीय! केवळ तिच्यासारख्या बायकाच खरं प्रेम करू शकतात."

"आणि ते दुसरं पत्र कुणाचं?" वाचून संपविलेले पत्र परत करीत कॉर्निटने विचारले.

"ते? हं! ज्याच्याशी पत्त्यांमध्ये मी पैसे हरलोय अशा एका गलिच्छ प्रकारच्या माणसाचं. त्यानं मला ही तिसऱ्यांदा आठवण करून दिलीय. सध्या त्याचे पैसे परत करणं मला शक्य नाही. मूर्ख पत्र आहे," आठवण करून दिल्यामुळे बेचैन झालेला काऊंट म्हणाला.

यानंतर काही वेळपर्यंत दोघे अंमलदार काहीही बोलले नाही. काऊंटची मन:स्थिती ध्यानात घेऊन कॉर्निट मुकाटपणे आपला चहा प्यायला. त्याला संभाषण सुरू करण्याची भीती वाटत होती. तूर्बीनच्या देखण्या चेहऱ्याकडे तो अधूनमधून कटाक्ष टाकीत होता. पण तूर्बीन मात्र खोल विचारात बुडून खिडकीबाहेर एकटक पहात होता.

"एखादेवेळी सगळंच चांगलं घडेल," पोलोझोवकडे वळून काऊंट अचानक म्हणाला आणि त्याने आपल्या मानेला किंचित झटका दिला. "यंदा आपल्या रेजिमेंटमध्ये सगळ्यांना जर ओळीनं बढत्या मिळत गेल्या आणि त्याशिवाय आपण

मोहिमेत उतरलो तर रक्षकांमध्ये कप्तान असलेल्या माझ्या मित्रांपेक्षा मी पुढं जाईन."

चहाच्या दुसऱ्या प्याल्यावर अशा प्रकारचे संभाषण चालू असताना आन्ना फ्योदरोव्हनाचा निरोप घेऊन म्हातारा दानीलो तेथे दाखल झाला.

"आणि बाईसाहेबांनी मला आपल्याला विचारायला सांगितलंय की, महाराज, आपण काऊंट फ्योदर इवानोविच तूर्बीन यांचे पुत्र तर नाही ना?" अंमलदाराचे नांव आधी ऐकल्यामुळे आणि क. शहरात दिवंगत काऊंटने दिलेल्या भेटीची आठवण झाल्यामुळे दानीलो स्वतःच्या पदरची भर घालीत पुढे म्हणाला: "आमच्या बाईसाहेब आन्ना फ्योदरोवना त्यांना चांगलं ओळखत होत्या."

"ते माझे वडील. तुझ्या बाईसाहेबांना सांग, आम्ही त्यांचे खूप आभारी आहोत आणि खरंच आम्हाला कसलीही गरज नाही. पण वाड्यावर अगर दुसरीकडं कुठंतरी जर याहून स्वच्छ खोलीची व्यवस्था झाली तर फार फार उपकार होतील."

"कशाला बोललास तसं?" दानीलो निघून गेल्यानंतर पोलोझोवने विचारले. "काय फरक पडतो? आपण इथं फक्त एक रात्र काढणार. मग त्यांची कशाला गैरसोय करायची?"

"हे आणखी वर तुझं शहाणपण! कोंबड्यांच्या खुराड्यांमध्ये झोपून झोपून हौस भागली नाही का तुझी? तू अगदी व्यवहारशून्य आहेस. एक रात्र का होईना, पण आरामात झोपण्याची संधी आपण कशाला दवडायची? उलट त्यांना खूप बरं वाटेल. एकच गोष्ट मला आवडली नाही; ह्या

बाईची माझ्या वडिलांशी ओळख होती," मंद स्मित करताना आपले तेजस्वी शुभ्र दात दाखवीत काऊंट म्हणाला. "माझ्या त्या **बापाच्या** आठवणीनं मी नेहमी लाजतो... सदासर्वदा काही भानगड किंवा कर्ज! म्हणून त्याच्या जुन्या ओळखीच्या लोकांना भेटणं मला आवडत नाही. पण तो काळच वेगळा होता," गंभीरपणे काऊंट पुढे म्हणाला.

"अरे मी तुला सांगायला विसरलो," पोलोझोव म्हणाला. "एकदा माझी भालाईत ब्रिगेडच्या इल्यिन नांवाच्या कमांडर-शी गाठ पडली होती. तुला भेटायला तो खूप उत्सुक होता आणि तुझ्या वडलांविषयी खूप आदरानं बोलत होता."

"तो इल्यिन कुचकामी माणूस असावा. आणि माझ्याशी ओळख करून घेण्यासाठी जे लोक माझ्या वडिलांचा संदर्भ देतात ते माझ्या वडिलांविषयी अशा काही गोष्टी सांगतात, की त्या ऐकून मी शरमतो. पण ते मात्र रम्य विनोद सांगितल्याप्रमाणे त्यांचं कथन करतात. मी नेहमी सगळ्या गोष्टींकडं थंडपणानं, वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून पहायचा प्रयत्न करतो. मी नाकबूल करत नाही की, माझे वडील खूप नापट स्वभावाचे होते आणि काही वेळा नको त्या गोष्टी त्यांनी केल्या. पण ते सर्व त्या काळच्या परिस्थितीपायी घडलं. आपल्या आजच्या दिवसात ते खूप यशस्वी ठरले असते, कारण त्यांना न्याय द्यायचा म्हटलं तर ते अत्यंत गुणी होते."

पंधरा मिनिटांनंतर दानीलो परत आला आणि रात्रीचा मुक्काम आपल्या घरी करावा असा मालकिणीने अंमलदारांना धाडलेला निरोप त्याने सांगितला.

शिलेदारांचा तरुण अंमलदार हा काऊंट फ्योदर तूर्बीनचा मुलगा आहे हे समजताच आन्ना फ्योदरोवनाची एकच धांदल उडाली.

"अगबाई! तुझं कल्याण होवो दानीलो! तिथं लौकर जा आणि बाईसाहेबांनी त्यांना इकडं यायचं निमंत्रण दिलंय म्हणून सांग," उडी मारून उठत आणि मुलींच्या खोलीकडे तुरूतुरू जात ती म्हणाली. "लिझचका! उस्त्यूश्का! लिझा, आपल्याला तुझी खोली तयार केली पाहिजे. तू तुझ्या मामाच्या खोलीत रहा आणि भाऊ तुम्ही... तुम्हाला आजची रात्र दिवाणखान्यात काढली पाहिजे. एका रात्रीनं तुमचं काही फार बिघडायचं नाही."

"छे: छे: मुळीच बिघडायचं नाही. मी खाली जमिनीवर झोपेन."

"जर तो आपल्या बापासारखा दिसत असेल तर खूप देखणा असला पाहिजे. लाडक्याला निदान डोळे भरून पाहीन! लिझा, जरा थांब आणि बघशीलच! त्याचा बाप किती देखणा होता म्हणून सांगू! ते टेबल कुठं घेऊन चाललीस? ठेव तिथं," धावपळ करीत आन्ना फ्योदरोवना ओरडली. "दोन बिछाने आण—एक बेलिफाकडून मागून आण. आणि माझ्या वाढदिवसाला भाऊरायानं मला भेट दिलेलं बिलोरी काचेचं शमादान घे आणि त्यात मेणबत्ती लाव."

सरतेशेवटी सर्व तयारी झाली. आपल्या आईच्या लुड-बुडीकडे लक्ष न देता लिझाने स्वतःच्या आवडीनुसार खोली

नजविली. मंद सुवासाच्या स्वच्छ चादरी आणून तिने स्वतः बिछाने तयार केले. बिछान्याशेजारी टेबलावर पाण्याचा जुजा आणि मेणबत्ती ह्या वस्तू ठेवल्या. मुलींच्या खोलीत तिने काही सुवासिक कागद जाळले आणि आपल्या मामाच्या खोलीत स्वतःचा बिछाना तयार केला. आन्ना पयोदरोवना जेव्हा सावरली तेव्हा परत ती आपल्या नेहमीच्या जागी बसली व आपल्या हाती तिने पत्ते घेतले. पण डाव मांडण्या-पूर्वीच तिने आपला गुबगुबीत कोपर टेबलावर टेकविला आणि ती स्वप्नात रंगून गेली. "वेळ कसा भुर्रकन उडून जातो! खरंच!" ती स्वतःशीच पुटपुटली. "अगदी काल घडल्यासारखं वाटतं... आत्ता तो मला नजरेसमोर दिसतो... किती बेफिकीर माणूस होता!" तिच्या डोळ्यांमध्ये आसवे भरून आली. "आता लिझान्काची पाळी आहे. पण तिच्या वयाला मी जशी होते तशी ती नाही—गोड सुरेख पोर आहे... पण मी जशी होते तशी नाही..."

"लिझचका, आज संध्याकाळी तुझा तलम मलमलीचा पोशाख घाल."

"आई, तू त्यांची सरबराई करणार? मला वाटतं, त्याची काही गरज नाही," लिझा म्हणाली. त्या अंमलदारांच्या भेटीच्या विचारापायी मनात उडालेली खळबळ दाबून ठेवणे तिला अशक्य झाले. "खरंच तसं काही करू नको आई!"

प्रत्यक्षात, अंमलदारांच्या भेटीच्या इच्छेपेक्षा तिला भीतीच जास्त वाटत होती. कुठेतरी फार मोठे आणि खळबळजनक सुख तिची वाट पहात होते ह्याची तिला जाणीव झाली होती.

"कदाचित त्यांना स्वतःलाच आपली ओळख करून घ्यायची इच्छा असेल लिझचका," आपल्या मुलीच्या केसां-

वरून हात फिरवीत आणि स्वतःशीच विचार करीत आन्ना पयोदरोवना म्हणाली. "हिच्या वयाला माझे केस असे नव्हते... लिझचका... तुझ्यासाठी किती वाटतं..." आणि तिने खरेच मनातल्या मनात लिझासाठी एक इच्छा व्यक्त केली. पण तरुण काऊंटबरोबर लिझाचे कधी लग्न होऊ शकेल असे मात्र तिला वाटले नाही आणि तिचे मोठ्या काऊंटशी जसे संबंध होते तसे संबंध लिझा आणि तरुण काऊंट यांच्यात निर्माण व्हावेत अशी इच्छा धरणे तिला शक्य नव्हते. तरीही तिने काहीतरी इच्छा अत्यंत प्रामाणिक-पणे मनी धरली. कदाचित तिला दिवंगत काऊंटबद्दल ज्या भावना वाटत होत्या त्या आपल्या मुलीमार्फत पुनरुज्जीवित करण्याची तिला आशा वाटली होती.

म्हातारा घोडदळ अंमलदारही काऊंटच्या आगमनामुळे काहीसा उत्तेजित बनला होता. तो आपल्या खोलीत गेला व दाराला त्याने कडी लावली. सुमारे पंधरा मिनिटांनंतर तो बाहेर आला तेव्हा त्याच्या अंगात लष्करी आखूड कोट आणि निळी तुमान होती. एखादी तरुण मुलगी आपल्या पहिल्या बॉल-नृत्याच्या वेळी पोषाख केल्यावर जशी प्रसन्न आणि बुजरी दिसते तसा भाव चेहऱ्यावर आणून तो पाहुण्यांसाठी सजविलेल्या खोलीत गेला.

"ताई, आता शिलेदारांची नवी पिढी कशी आहे ते आपल्याला बघायला मिळेल. दिवंगत काऊंट अगदी अस्सल शिलेदार होता. आता बघू नवा कसा आहे!"

दोघे अंमलदार मागील दारामधून त्यांच्यासाठी तयार केलेल्या खोलीत गेले.

"काय सांगितलं होतं मी तुला?" ताज्या, स्वच्छ

बिछान्यावर अंग झोकून देत काऊंट म्हणाला. त्याच्या पायात धूळकट बूट तसेच होते. "त्या झुरळांनी भरलेल्या झोपडी-पेक्षा इथं कितीतरी पटीनं चांगलं आहे की नाही?"

"अर्थात चांगलं आहे, पण आपण स्वतःला यजमानांच्या उपकाराच्या ओझ्याखाली वाकवून घेतलं..."

"च् च्! माणसानं गोष्टींकडं नेहमी व्यावहारिक दृष्टि-कोनातून बघावं. ते स्वतः खूप खूष झाले असणार असं मी तुला खात्रीनं सांगतो. अरेच्चा!" तो ओरडला. "ह्या खिडकीवर त्यांना काहीतरी टांगायला सांग, म्हणजे रात्री जाग लागायचा नाही!"

ह्याच क्षणाला अंमलदारांची ओळख करून घेण्यासाठी म्हातारा आत आला. आपण दिवंगत काऊंटचे मित्र होतो हे त्याने अर्थातच थोडे लाजत न राहवून सांगितले. दिवंगत काऊंटबद्दल आपल्याला खूप आदर वाटत होता आणि त्याने त्याची काही सेवाही बजाविली असे त्याने सांगितले. त्या "मित्र"चा निर्देश करताना काऊंटने उसने घेतलेले व परत न केलेले शंभर रूबल म्हाताऱ्याच्या मनात होते अथवा त्याला काऊंटने बर्फात ढकलून दिले होते तो प्रसंग त्याच्या मनात होता, अथवा त्याच्यावर काऊंटने शिव्यांचा भडिमार केला होता त्याची त्याला आठवण झाली होती, हे सांगणे कठीण होते. म्हाताऱ्याने काही खुलासे केले नाही. तरुण काऊंट म्हाताऱ्या घोडदळ अंमलदाराबरोबर अत्यंत आदरपूर्वक वागला आणि राहण्याची व्यवस्था केल्याबद्दल त्याने त्याचे आभार मानले.

"माफ करा काऊंट, (तो जवळ जवळ "महाराज" असे म्हणाला, कारण लोकांना त्यांच्या दर्जानुसार संबोधण्याची

त्याची सवय गेली होती) इथं फारशा सुखसोयी नाहीत. माझ्या बहिणीचं घर खूप लहान आहे. त्या खिडकीवर काहीतरी लावायची मी व्यवस्था करतो आणि सगळं काही ठीक होईल," असे म्हणून पडदा लावायला सांगण्याच्या मिषाने तो तेथून निघाला, पण प्रत्यक्षात मात्र अंमलदारांचे वर्णन आपल्या बहिणीपाशी करायला तो अधीर झाला होता.

छोटया चणीची सुरेख उस्त्यूश्का खिडकीवर लावण्यासाठी आपल्या मालकिणीची शाल घेऊन आत आली. पाहुण्यांना चहा पाहिजे असल्यास विचार असेही तिच्या मालकिणीने तिला सांगितले होते.

रहायला चांगली जागा मिळाल्यामुळे काऊंटची मन:स्थिती एकदम प्रसन्न बनली होती. उस्त्यूश्काबरोबर हसून-खेळून त्याने तिची एवढी थट्टा केली की, ती त्याला चावटसुद्धा म्हणाली. तिची छोटी मालकीण सुंदर आहे का असे त्याने तिला विचारले आणि तिने जेव्हा चहा पाहिजे का अशी विचारणा केली तेव्हा तो म्हणाला की, खुशाल चहा आणा, पण अजून त्याच्या नोकराने त्याचे जेवण बनविले नव्हते म्हणून त्याआधी जर थोडी वोदका मिळाली, काहीतरी खायला मिळाले व थोडी शेरी मिळाली तर फार बरे होईल.

तरुण काऊंटचे वागणे पाहून लिझाचा मामा अतिशय खूष झाला होता. अंमलदारांच्या नव्या पिढीची त्याने तोंड फाटे-पर्यंत स्तुती केली. आपल्या बापांपेक्षा हे नवे अंमलदार अतुलनीय श्रेष्ठ होते असे तो म्हणाला.

आन्ना फ्योदरोवना त्याच्याशी सहमत नव्हती. काऊंट फ्योदर इवानोविचपेक्षा कुणीही अधिक श्रेष्ठ असणे शक्य नव्हते. सरतेशेवटी ती चिडून थंडपणे म्हणाली: "भाऊराया, तुमच्या

दृष्टीनं जो शेवटचा माणूस चांगला वागला तो सर्वात उत्तम. अर्थात माणसं जास्त शहाणी बनलीत हे प्रत्येकाला माहीत आहे. पण काऊंट फ्योदर इवानोविच एवढे अदबशीर होते आणि एकोसेस एवढे सुरेख नाचले की, सगळ्यांना त्यांनी चकरावून टाकलं होतं. तरीही त्यांनी फक्त माझ्याचकडं लक्ष दिलं. जुन्या काळीसुद्धा चांगली माणसं होती."

नेवढ्यात वोदका, खाद्यपदार्थ आणि शेरी पाहिजे असल्याचा निरोप आला.

"पाहिलंत भाऊराया! तुम्ही कधीही योग्य गोष्ट करत नाही! जेवणाची तयारी करायला तुम्ही सांगायला पाहिजे होतं." आन्ना फ्योदरोवना म्हणाली. "लिझा, तूच सगळी व्यवस्था आपल्या हाती घे बाई!"

अळंब्या आणि ताजे लोणी आणण्यासाठी लिझा कोठी-घरातून धावली व स्वयंपाक्याला थोडे मांसाचे तुकडे भाजायला तिने सांगितले.

"भाऊ, तुमच्यापाशी शेरी शिल्लक आहे?"

"नाही, माझ्यापाशी कधीच नव्हती."

"असं कसं? चहाबरोबर तुम्ही काय घेता?"

"मी रम घेतो आन्ना फ्योदरोवना."

"काय फरक पडतो? द्या त्यांना ती... रम! काही हरकत नाही. पण त्यांना इथं बोलावणं अधिक बरं दिसेल नाही भाऊ? तुम्हाला योग्य काय ते माहीत आहे. त्यांना त्याचा अपमान वाटणार नाही ना?"

घोडदळ अंमलदार म्हणाला की, काऊंट खूप उदार मनाचा असल्यामुळे असले निमंत्रण नाकारणार नाही आणि तो त्यांना नक्की तेथे घेऊन येईल. आन्ना फ्योदरोवना

आपला ठेवणीतील पोषाख करायला गेली. पण लिझा कामात गुंतली असल्यामुळे अंगामधील रुंद बाह्यांचा गुलाबी सुती पोषाख बदलायला तिला वेळ मिळाला नाही. ती मनातून कमालीची भेदरली होती. काहीतरी अफाट घडणार होते असे तिला वाटत होते. देखणा शिलेदार काऊंट हा कुणी एक भव्य, नवा आणि अनाकलनीय प्राणी होता. त्याचे वागणे, बोलणे, त्याच्या चालीरीती–त्याच्या सर्व गोष्टी अशा असणार होत्या ज्या तिला पूर्वी कधीही ठाऊक नव्हत्या. त्याचे सर्व विचार आणि बोलणे खूप चतुर व खरे असावे. त्याचे सर्व वागणे नेक असणार. त्याच्या दिसण्यातील प्रत्येक तपशील सुंदर असणार. त्याबद्दल तिला शंका वाटत नव्हती. केवळ खाद्यपदार्थ आणि मद्य न मागता त्याने सुगंधित स्नानाची मागणी केली असती तरी त्याचे तिला आश्चर्य वाटले नसते व त्याला तिने दोष दिला नसता; उलट तिची ठाम खात्री पटली असती की, तेच अगदी योग्य आणि बरोबर होते.

घोडदळ अंमलदाराने आन्ना फ्योदरोवनाचे निमंत्रण सांगताक्षणी काऊंटने ते तात्काळ स्वीकारले. त्याने आपले केस विंचरले, अंगात कोट घातला व सिगारची पेटी बरोबर घेतली.

"चल," तो पोलोझ्नोवला म्हणाला.

"आपण जावं असं मला वाटत नाही," कॉर्निट उत्तरला. "ils feront des frais pour nous recevoir."*

"भलतंच! उलट त्यांना आनंद वाटेल. मी आधीच

---

*आपल्या पाहुणचारासाठी त्यांना बराच भुर्दंड बसेल.

चौकशी केलीय. त्या बाईला एक सुंदर मुलगी आहे म्हणे. चल," काऊंट फ्रेंचमध्ये पोलोझोवला म्हणाला.

"Je vous en prie, messieurs!"* आपल्याला फ्रेंच समजते आणि ते काय बोलले ते कळले हे दाखविण्यासाठी घोडदळ अंमलदार म्हणाला.

## १२

लाजऱ्या मुद्रेने आणि नजर खाली लावून लिझा चहा आणण्यात पूर्ण गढल्याचा बहाणा करीत होती, कारण अंमलदार खोलीत आले तेव्हा त्यांना पहायची तिला भीती वाटत होती. याउलट आन्ना फ्योदरोवना टुणकन उडी मारून उठली, तिने किंचित अभिवादन केले आणि काऊंटच्या चेहऱ्यावरून आपली नजर मुळीच न ढळविता ती अखंड बोलत राहिली. काऊंट आपल्या वडिलांसारखा दिसतो असे ती म्हणाली, आपल्या मुलीची तिने ओळख करून दिली, त्याला चहा, मुरंबा आणि रानमेवा देऊ केला. कॉर्निट इतका नम्र वावरत होता की, कुणीही त्याच्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. हे त्याच्या पथ्यावरच पडले होते, कारण लिझाच्या सौंदर्याचा प्रत्येक तपशील सभ्यपणे न्याहाळायला त्याला अवसर मिळत होता व लिझाच्या सौंदर्याने तो चांगलाच मोहित झाला होता. आपल्या बहिणीचे काऊंटबरोबरचे बोलणे केव्हा संपते याची वाट पहात मामा अधीरपणे बसला होता. घोडदळातील आपल्या आठवणी सांगायला तो अगदी

---

*चला मंडळी !

आतुर बनला होता. काऊंटने शिलगावलेली सिगार एवढी कडक होती की, लिझाला चांगलाच ठसका लागला. तो चांगलाच बडबड्या आणि आदबशीर होता. आन्ना फ्योदरोवना बोलत होती तेव्हा आरंभी तो एखाद-दुसरा शब्द मधून मधून उच्चारीत होता, पण नंतर मात्र त्याने संभाषणाचा कबजा घेतला. त्याच्या श्रोत्यांना एक गोष्ट मात्र खटकली. ज्या शब्दांचा तो वापर करीत होता ते त्याच्या वावरातील समाजात जरी अपमानास्पद मानले जात नसले तरी येथे मात्र धक्कादायक वाटत होते. आन्ना फ्योदरोवना तर थोडीशी हबकलीच आणि लिझा शरमेने लालेलाल झाली. पण काऊंटच्या ते ध्यानात आले नाही व तो शांत आणि आदबशीर राहिला. लिझाने मुकाटपणे ग्लास भरले व पाहुण्यांच्या हाती न देता त्यांच्या आटोक्यात राहतील अशा रीतीने टेबलावर ठेवले. तरीही खूप उत्तेजित मनाने ती काऊंटचा प्रत्येक शब्द लक्षपूर्वक ऐकत होती. त्याच्या कथना-मधील क्षुल्लकपणामुळे आणि अडखळत बोलण्याच्या त्याच्या सवयीमुळे तिला स्वत:चा तोल सावरायला मदत झाली. तिच्या अपेक्षेप्रमाणे तो चतुर शहाणपणाच्या गोष्टी बोलत नव्हता, किंवा सर्व गोष्टींमध्ये तो एक ऐटदारपणा दाखवील अशी तिच्या मनातील अंधुक आशाही त्याने पुरी केली नव्हती. चहाच्या तिसऱ्या ग्लासाच्या वेळी तिने हळूच आपली नजर वर करून त्याच्या नजरेला भिडविली. त्यानेही आपले डोळे स्थिर राखले आणि मुळीच विचलित न होता सस्मित वदनाने तो पुढे बोलत राहिला. तेव्हा मात्र तिला जाणवले की, त्याच्याबद्दल एक प्रकारची तिडीक तिच्या मनात निर्माण होऊ लागली होती. लौकरच तिच्या लक्षात आले

की, त्याच्यामध्ये खास असे काहीच नव्हते, तिच्या ओळखीच्या इतर माणसांपेक्षा तो अजिबात वेगळा नव्हता आणि म्हणून त्याला तिने भिण्याचे काहीच कारण नव्हते. एवढे मात्र खरे की, त्याची नखे लांब होती आणि त्याने काळजीपूर्वक त्यांची राखण केली होती. पण तो विशेष देखणासुद्धा नव्हता. अचानक खेद तीव्र वेदनेबरोबर तिला आढळले की, तिच्या स्वप्नांना काहीच आधार नव्हता. लिझा एकदम शांत झाली. आता फक्त एकच गोष्ट तिला अस्वस्थ करीत होती: गप्प राहिलेल्या कॉर्निटची तिच्यावर रोखलेली नजर. "कदाचित हा तो नव्हे, तो असावा!" तिच्या मनात आले.

१३

चहानंतर आन्ना फ्योदरोवनाने पाहुण्यांना दुसऱ्या खोलीत बोलाविले. तेथे ती आपल्या नेहमीच्या जागी बसली.

"काऊंट, तुम्हाला विश्रांती घ्यायची आहे का?" तिने विचारले. "लाडक्या पाहुण्यांनो, तुमचं मनोरंजन मी कसं करू?" तिच्या प्रश्नाला नकारार्थी उत्तर मिळाले तेव्हा ती पुढे म्हणाली. "काऊंट, तुम्ही पत्ते खेळता? भाऊ, तुम्ही पत्त्याच्या खेळाची काही व्यवस्था करा."

"पण तुम्ही स्वत:च 'प्रेफरन्स' खेळता," तिचा भाऊ उत्तरला. "आपण डाव खेळू या? खेळणार का काऊंट? आणि तुम्ही?"

आपल्या यजमानांना जे योग्य वाटेल ते काहीही करण्याची तयारी अंमलदारांनी दर्शविली.

लिझाने पत्त्यांचा जुना डाव आणला. एरवी ह्या पत्त्यांच्या साह्याने ती भविष्य सांगायची; आन्ना फ्योदरोवनाची दातदुखी केव्हा थांबेल, तिचे मामा शहराच्या प्रवासाहून परत केव्हा येतील, शेजारीण त्यांच्याकडे येईल किंवा नाही, असले अंदाज ती सांगायची. हे पत्ते जरी दोन महिने वापरलेले होते तरी आन्ना फ्योदरोवना ज्या पत्त्यांच्या साह्याने भविष्यकथन करायची त्या पत्त्यांपेक्षा अधिक स्वच्छ होते.

"पण खेळताना थोडे पैसे लावून खेळणार का?" मामाने विचारले. "आन्ना फ्योदरोवना आणि मी एका पॉइंटला अर्धा कोपेक लावून खेळतो. तरीही ती आम्हा सर्वांचे दिवाळं वाजवते."

"जशी तुमची इच्छा! उलट पैसे लावून खेळायला मला आनंदच वाटेल," काऊंट म्हणाला.

"तर मग एक कोपेकनं खेळू, कागदी चलनात. अशा खास पाहुण्यांसाठी काहीही करायला तयार आहे. माझ्यासारख्या म्हाताऱ्या बाईला खुशाल गरीबखान्यात पाठवू देत," आपल्या आरामखुर्चीत ऐसपैस बसत आणि आपल्या लेसच्या शालीवर थापट्या मारीत आन्ना फ्योदरोवना म्हणाली. पण तिच्या मनात मात्र विचार आला: "कदाचित मी त्यांच्याकडून एक रूबल जिंकून घेईन." तिच्या म्हातारपणात तिला थोडासा जुगाराचा नाद लागला होता.

"तुमची इच्छा असेल तर मी तुम्हाला 'ऑनर्स' आणि 'मिझरी' बरोबर खेळायला शिकवतो. खूप मजा येते," काऊंट म्हणाला.

सेंट पीटरबुर्गच्या नव्या पद्धतीने खेळायला प्रत्येकाला आनंद वाटला. मामा म्हणाला की, एकेकाळी त्याला हा खेळ ठाऊक

होता, 'बोस्टन' सारखाच तो होता, पण आता तो थोडासा विसरून गेला होता. आन्ना फ्योदरोवनाला हा नवा खेळ मुळीच समजला नाही आणि इतक्या वेळपर्यंत समजला नाही की, शेवटी स्मित करून, मान हलवून आणि आता सर्व काही समजले व स्पष्ट झाले असे सांगणे तिला इष्ट वाटले. डावाच्या मध्यभागी, हाती एक्का आणि राजा असताना आन्ना फ्योदरोवना जेव्हा 'मिझरी' म्हणाली तेव्हा एकच हशा पिकला व तिच्यापाशी सहा राहिले. ती स्तंभित झाली. आणि हसून तिने लगबगीने खुलासा केला की, नव्या पद्धतीने खेळायचा तिला अजून सराव झाला नव्हता. पण तरीही ती खूप हरली आणि मोठ्या रकमा लावून खेळायची सवय असल्यामुळे सावधपणे अचूक हिशेब मांडून ठेवणाऱ्या काऊंटला टेबलाखालून कॉर्निटच्या लाथा का बसत होत्या ह्याचा उलगडा झाला नाही व कॉर्निट खेळात एवढा मूर्खा-सारख्या चुका का करीत होता हेही उमगले नाही.

लिझाने आणखी थोडा रानमेवा आणला, तीन प्रकारचे मुरंबे आणले आणि खास प्रकारची मुरवलेली सफरचंदे आणली. आपल्या आईच्या खुर्चीमागे उभी राहून ती खेळ पहात होती, अंमलदारांकडे अधूनमधून कटाक्ष टाकीत होती. विशेषत: काऊंट जेव्हा पत्ते खाली टाकायचा आणि कुशलतेने, आत्मविश्वासपूर्वक उचलायचा तेव्हा त्याच्या गुलाबी नखांकडे व पांढऱ्या हातांकडे टक लावून पहायची.

पुन्हा एकदा आन्ना फ्योदरोवनाने गोंधळ केला. इतरांवर मात करण्याच्या ईर्ष्येपायी तिने आपली सर्व विचारशक्ती पणाला लावली. आपल्या भावाच्या आग्रहास्तव तिने कागदावर काहीतरी आकडे खरडले.

"आई, घाबरू नको. गमावलेलं सगळं परत मिळवशील!" आपल्या आईची अवघड परिस्थितीमधून सुटका करण्याचा प्रयत्न करीत लिझा हसून म्हणाली. "तू मामांचे पत्ते घे, म्हणजे ते चांगले अडकतील."

"लिझचका, माझ्या मदतीला ये बाई," आन्ना फ्योदरोवना तिच्याकडे घाबरट कटाक्ष टाकीत म्हणाली. "मला समजत नाही कसं..."

"ह्या नियमांप्रमाणे कसं खेळायचं ते मलाही माहीत नाही," आपल्या आईच्या नुकसानीचा मनातल्या मनात भराभरा हिशेब करीत लिझा म्हणाली. "पण ह्या वेगानं तुम्ही सर्व काही गमावून बसाल आईसाहेब! पीमोचकाला फ्रॉक घ्यायलासुद्धा पैसे उरणार नाहीत," ती गंमतीने म्हणाली.

"खरंच, अशा रीतीनं तुम्ही निदान चांदीचे दहा रूबल सहज हराल," लिझाकडे टक लावून पहात आणि तिच्याशी संभाषण सुरू करण्याची मनीषा बाळगीत कॉर्नेट म्हणाला.

"पण आपण कागदी चलनात खेळतोय ना?" खेळाडूंकडे नजर फेकीत आन्ना फ्योदरोवनाने विचारले.

"कदाचित," काऊंट म्हणाला, "पण मला स्वत:ला मात्र कागदी चलनामधला हिशेब समजत नाही. हे कागदी चलन म्हणजे काय?"

"आजकाल कुणीही कागदी चलनात खेळत नाही," डाव जिंकणारा मामा म्हणाला.

म्हातारीने काही फळांची सरबते मागविली. ती स्वत: दोन ग्लास घटाघटा प्यायली. तिचा चेहरा लालबुंद झाला. निराशेने तिने हात झटकल्याचा भास झाला. तिच्या टोपी-

खालून बाहेर डोकावणारी पांढऱ्या केसांची बट आत खोचण्याचे भानही तिला राहिले नव्हते. आपण लक्षावधी गमावले आणि भिकारी बनलो अशीच जणू तिची धारणा बनली होती. कॉर्निट पुन:पुन्हा काऊंटला टेबलाखालून लाथा मारीत होता. काऊंट मात्र चोखपणे म्हातारीचे हरणारे आकडे मांडून ठेवीत होता.

अखेर खेळ संपला. आन्ना फ्योदरोवनाने आपली सदसद्विवेकबुद्धी गहाण टाकून सर्व प्रयत्न केले, आपल्या आकडेमोडीत चुका केल्याचा बहाणा केला, आपल्याला मुळी हिशेबच येत नाही असे सांगून पाहिले, आपल्या नुकसानीचा आकडा ऐकून प्रचंड धक्का बसल्याचे दाखविले; तरीही सरतेशेवटी असे आढळून आले की, नऊशे वीस पॉइंट ती हरली होती. "म्हणजे कागदी चलनात नऊ रूबल ना?" तिने अनेकदा विचारले. आपले नक्की नुकसान किती झाले याचा तिला अंदाजच लावता येईना. जेव्हा तिच्या भावाने तिला समजावून सांगितले की, ती कागदी चलनात साडेबत्तीस रूबल हरली होती आणि ही सर्व रक्कम तिने न चुकता द्यायला पाहिजे होती, तेव्हा ती हादरलीच.

खेळ संपला तेव्हा आपण किती पैसे जिंकलो त्याचा अंदाज करण्याचीही तसदी न घेता काऊंट उठला व खिडकीपाशी लिझाजवळ गेला. लिझा बशीमध्ये खाण्याचे पदार्थ आणि फळांच्या ठेवीत होती. कॉर्निटला सबंध संध्याकाळभर जे करावेसे वाटत होते आणि जे करणे जमले नव्हते ते काऊंटने पटपणे व अगदी सहजतेने केले: त्याने लिझाबरोबर हवेविषयी संभाषण सुरू केले.

त्या क्षणाला आपण अत्यंत अप्रिय परिस्थितीत सापडल्याचे

कॉर्निटला जाणवले. जेव्हा काऊंट आणि विशेषत: आन्ना फ्योदरोवनाला उल्हसित ठेवणारी लिझा बाहेर गेली, तेव्हा म्हातारीला आपल्या भावना दाबून धरणे अशक्य झाले.

"आम्ही तुमचे पैसे जिंकले ह्याचं मला फार वाईट वाटतं," काहीतरी बोलायचे म्हणून पोलोझोव म्हणाला. "आमचं ते वागणं सभ्यपणाचं झालं नाही."

"आणि तुमचे ते 'ऑनर्स' आणि 'मिझरी'! त्या रीतीनं कसं खेळायचं मला माहीत नाही. कागदी चलनात किती झाले म्हणालात?" तिने विचारले.

"बत्तीस रूबल; साडेबत्तीस रूबल," म्हातारा घोडदळ अंमलदार म्हणाला. पैसे जिंकल्यामुळे तो खुषीत आला होता. "ताई, मला पैसे दे पाहू. चल, लौकर दे पैसे."

"देते मी सगळे. पण ही शेवटचीच वेळ! छे:! एवढी रक्कम मला जन्मात परत जिंकता येणार नाही."

आन्ना फ्योदरोवना डुलत्या चालीने घाईघाईने बाहेर गेली व कागदी चलनातील नऊ रूबल घेऊन परतली. म्हाताऱ्याच्या हट्टापायीच केवळ तिने सगळे पैसे दिले.

आपण आन्ना फ्योदरोवनाशी काही बोललो तर ती आपल्याविरुद्ध भडिमार सुरू करील अशी पोलोझोवला मनातून भीती वाटत होती. म्हणून तो तेथून हळूच निसटला आणि उघड्या खिडकीपाशी उभे राहून गप्पा मारणाऱ्या काऊंट आणि लिझाला जाऊन मिळाला.

जेवण मांडून ठेवलेल्या टेबलावर दोन मेणबत्त्या उभ्या होत्या. मे महिन्यातील रात्रीची ताजी, उबदार झुळूक त्यांच्या ज्योतींना मधून मधून थरथरवत होती. बागेच्या दिशेने उघडणाऱ्या खिडकीपाशी उजेड होता, पण खोलीमधील

ड्रजेडापेक्षा तो अगदी वेगळा होता. एव्हाना सोनेरी छटा न्हीशी झालेला पौर्णिमेचा पूर्णचंद्र लिंबोणीच्या झाडांच्या ेंड्यांवरून तरंगत जात होता. त्याच्यावरून वाहात जाणाऱ्या पारदर्शी शुभ्र ढगांना अधिक उजळीत होता. तळयाजवळ बेडकांचे वृंदगान चालू होते. झाडांमधून तळयाचे पाणी अंझरते दिसत होते. चांदण्यात ते रुपेरी चमचमत होते. सुगंधी फिकट जांभळया फुलांचे झुबके खिडकीबाहेर डोलत होते आणि त्या झुडुपांमध्ये काही छोटे पक्षी बागडत असल्याचे व पिसे स्वच्छ करीत असल्याचे अस्पष्ट ऐकू येत होते.

"किती अप्रतीम हवा आहे!" लिझापाशी जात आणि खिडकीच्या सखल चौकटीत बसत काउंट म्हणाला. "मला वाटतं, तुम्ही खूप फिरत असाल."

"हो," लिझा म्हणाली. काही कारणाने तिला काउंट-बरोबर बोलणे मुळीच अवघड वाटत नव्हते. "सकाळी सात वाजता माझ्या घरगुती कामांना उरकायला मी चालत जाते. नंतर, आईनं दत्तक घेतलेल्या पीमोचका नांवाच्या छोटया मुलीबरोबरही मी फिरते."

"खेडयात राहणं किती छान आहे!" आपला चापाचा चष्मा डोळयाला लावीत, एकदा बागेकडे तर एकदा लिझाकडे दृष्टिक्षेप टाकीत काउंट म्हणाला. "तुम्ही कधी चांदण्यात फिरायला जाता?"

"नाही. तीन वर्षांपूर्वी प्रत्येक चांदण्या रात्री मामा आणि मी फिरायला जात असू. तेव्हा त्यांना विचित्र आजार जडला. त्यांना झोप लागेना. आणि पौर्णिमेच्या रात्री तर त्या मुळीच झोपू शकेनात. त्यांची खोली–पलिकडं दिसते

ती–थेट बागेच्या दिशेला आहे आणि तिची खिडकी सखल आहे. तिथं त्यांच्यावर चांदण्याचं शिंपण होतं."

"कमाल आहे," काऊंट म्हणाला. "मला वाटलं ती तुमची खोली!"

"मी फक्त आजची रात्र तिथं झोपणार आहे. तुम्ही जिथं झोपताय ती माझी खोली."

"खरंच? अरे अरे! तुमच्या गैरसोयीला कारणीभूत झाल्याबद्दल मी स्वतःला कधीही क्षमा करणार नाही!" आपल्या भावनेचा प्रामाणिकपणा दाखविण्यासाठी काऊंटने आपल्या डोळ्यावरील चापाचा चष्मा खाली सोडला. "आमच्या अस्तित्वामुळं तुम्हाला एवढी गैरसोय सोसावी लागणार आहे हे जर मला ठाऊक असतं–"

"मुळीच गैरसोय नाही. उलट मला खूप आनंद झालाय. मामांची खोली सुंदर आहे. तिथं खूप उल्हसित वाटतं आणि सखल खिडकी आहे. झोप लागेपर्यंत मी खिडकीत बसून राहीन, किंवा बागेत उतरून झोपण्यापूर्वी एक सहल करीन."

"किती गोड पोरगी!" लिझाला अधिक चांगले न्याहाळून पाहता यावे म्हणून चापाचा चष्मा परत डोळ्यावर ठेवीत आणि खिडकीच्या चौकटीत बसलेल्या अवस्थेत आपल्या पावलाने तिच्या पायाला स्पर्श करण्याचा प्रयत्न करीत काऊंट मनाशी म्हणाला. "आणि माझी इच्छा असली तर खिडकीपाशी मी तिला कसा भेटू शकेन हे किती धूर्त-पणानं तिनं मला सांगितलं!" खरे म्हणजे त्याने इतक्या सहजपणे तिला जिंकल्याचे त्याला भासले, की त्याच्या मनातील तिच्याविषयीचे बरेचसे आकर्षण लोप पावल्या-सारखे वाटले.

अंधाऱ्या वाटेकडे विचारमग्नपणे टक लावून पहात तो म्हणाला: "अशा बागेत तुमच्या आवडत्या प्राण्याबरोबर रात्र घालविण्यात किती आनंद असला पाहिजे."

त्याच्या ह्या शब्दांनी आणि तिच्या पायाला त्याच्या पायाच्या जणू कहीही सहज घडलेल्या आणखी एका स्पर्शाने लिझा काहीशी शरमली. आपला शरमिंदेपणा लपविण्यासाठी कसलाही विचार न करता ती घाईघाईने म्हणाली: "होय. चांदण्यात फिरण्यात खूप आनंद आहे." अवघडल्यासारखे वाटून तिने झटकन अळंब्यांच्या बरणीचे झाकण लावले आणि तेथून ती काढता पाय घेणार तोच कॉर्निट तेथे आला. तो कशा प्रकारचा माणूस आहे हे जाणून घेण्याची तिला अचानक इच्छा झाली.

"किती सुंदर रात्र आहे!" तो म्हणाला.

"हवा सोडून दुसऱ्या कसल्याच विषयावर हे बोलत नाहीत," लिझाच्या मनात विचार आला.

"आणि देखावा किती मोहक!" कॉर्निट बोलत होता. "पण मला वाटतं की, ह्याचा तुम्हाला एव्हाना वीट आला असावा," त्याला खूप आवडणाऱ्या लोकांना काहीतरी अप्रिय बोलून दाखविण्याच्या आपल्या नेहमीच्या विचित्र सवयीनुसार तो पुढे म्हणाला.

"असं का वाटतं तुम्हाला? एखाद्याला त्याच त्या वस्तू खाण्याचा किंवा तोच तो फ्रॉक घालण्याचा वीट येऊ शकतो. पण सुंदर बागेचा, विशेषत: चंद्र आकाशात आणखी वर चढल्यानंतर, कधीच कंटाळा येणार नाही. मामांच्या खोलीतून संपूर्ण तळ्याचा देखावा दिसतो. आज रात्री मला तो पहायला मिळेल."

"मला वाटतं, इथं बुलबुल पक्षी नाहीत. आहेत का?" काऊंटने विचारले. नेमक्या अशा क्षणी पोलोझोवने तेथे येऊन लुडबूड केल्याचा त्याला मनस्वी राग आला होता. लिझाशी संकेतभेटीची निश्चिती करण्यात त्याला आता अडथळा आला होता.

"नाहीत. पूर्वी इथं होते, पण गेल्या वर्षी शिकाऱ्यांनी एक धरला आणि यंदा—खरं म्हणजे गेल्या आठवड्यातच—एका बुलबुलाचं सुंदर गाणं मी ऐकलं. पण कॉन्स्टेबल घंटा खुळखुळवीत घसरगाडीतून आला आणि बुलबुल त्याला घाबरून उडाला. गेल्याच्या गेल्या वर्षी मामा आणि मी झाडां-खाली बसत असू आणि तासन् तास बुलबुलांची गाणी ऐकत असू."

"ही बडबडी पोरगी तुम्हाला काय सांगत्येय?" मामांनी तेथे येत विचारले. "मंडळी, काही खाणार की नाही?"

चवीने भरपूर खाऊन काऊंटने जेवणाची खूप स्तुती केल्या-मुळे आन्ना फ्योदरोवनाची मन:स्थिती थोडी ताळ्यावर आली होती. अंमलदारांनी सर्वांचा निरोप घेतला व ते आपल्या खोलीकडे गेले. काऊंटने मामाशी हस्तांदोलन केले आणि आन्ना फ्योदरोवनाच्या हाताचे चुंबन न घेता नुसतेच त्याने हस्तांदोलन केल्यामुळे ती चकित झाली. त्याने लिझाशीही हस्तांदोलन केले. त्यावेळी तो सरळ तिच्या डोळ्यांमध्ये टक लावून पहात होता आणि ठेवणीतील अंधुक, पण प्रसन्न स्मित करीत होता. त्याच्या टक लावून पाहण्यामुळे परत ती शरमली.

"खूप छान आहे," तिच्या मनात आले, "पण स्वत:-विषयी फार मोठ्या कल्पना करतो"

"तुला लाज नाही वाटत?" अंमलदार आपल्या खोली-पर्यंत पोहोचल्यानंतर पोलोझोव म्हणाला. "आपण हरावं म्हणून मी शर्थ केली आणि टेबलाखालून तुला लाथा मारत राहिलो. तुला सदसद्विवेकबुद्धी मुळीच नाही. म्हातारी फार खचली होती."

काऊंट खो खो हसत सुटला.

"तिची कमाल आहे! फारच मनाला लावून घेतलं तिनं!"

आणि त्याने आणखी एक हास्याचा फवारा उडविला. त्याचा परिणाम म्हणून त्यांच्यासमोर उभ्या असलेल्या योहानने आपली नजर खाली झुकविली आणि एक भित्रे स्मित केले.

"कुटुंबाच्या जुन्या मित्राचा मुलगा! हा, हा, हा!" काऊंट आणखी हसत सुटला.

"पण खरंच ते बरं दिसलं नाही. मला तर तिची कीव आली," कॉर्निट म्हणाला.

"छट्! अजून तू खूप लहान आहेस! मी हरावा अशी तुझी अपेक्षा होती? का म्हणून मी हरायचं? कसं खेळायचं हे शिकण्यापूर्वी मीसुद्धा हरलोय. मित्रा, त्या दहा रूबलचा मी सदुपयोग करीन. मूर्खांच्या रांगेत दाखल व्हायची इच्छा नसेल तर माणसानं आयुष्याकडं व्यावहारिक दृष्टिकोनातून पाहिलं पाहिजे."

पोलोझोव गप्प झाला. त्याला स्वत:मध्येच गुरफटून जायचे होते आणि लिझाविषयी विचार करायचा होता. लिझा त्याला

विलक्षण विशुद्ध आणि सुंदर वाटली होती. त्याने कपडे उतरविले आणि त्याच्यासाठी बनविलेल्या मऊ, नरम बिछान्यावर अंग टाकले.

"जीवनाचा मान आणि कीर्ती सैन्यात असते हा कसला मूर्खपणा!" खिडकीकडे नजर लावीत तो मनाशी म्हणाला. खिडकीवर टांगलेल्या शालीमधून चंद्राचा फिकट प्रकाश पाझरत होता. "हे खरं सुख! एखाद्या निवांत आडगावी साध्या, हुषार, मोहक बायकोबरोबर रहावं! हे खरं आणि चिरंतन सुख आहे."

का कुणास ठाऊक, पण त्याने आपले हे विचार आपल्या मित्रापाशी बोलून दाखविले नाहीत. एवढेच नव्हे तर लिझाचा त्याने त्याच्यापाशी उल्लेखच केला नाही. मात्र त्याची खात्री होती की, काऊंटसुद्धा तिचाच विचार करीत होता.

"कपडे का उतरवत नाहीस?" येरझाऱ्या घालणाऱ्या काऊंटला त्याने विचारले.

"का कोण जाणे, मला झोपायची इच्छा नाही. तुला हवा तर दिवा मालव. मला त्याची गरज नाही."

आणि तो परत येरझाऱ्या घालू लागला.

"झोपायची इच्छा नाही," पोलोझोवने पुनरुच्चार केला. सायंकाळभरच्या घटनांनी त्याला काऊंटविषयी कधी नव्हे एवढा जास्त तिटकारा वाटू लागला होता. स्वतःवरील काऊंटच्या प्रभावाला तीव्र विरोध करावा असे त्याला वाटू लागले होते. "तर्क करणं काही अवघड नाही," तूर्बीनला उद्देशून तो मनातल्या मनात म्हणाला, "तुझ्या तुकतुकीत टाळक्यात कोणते विचार शिजताहेत ते मला समजतं!

निच्या मोहात तू किती पडलास ते मी पाहिलंय! पण अशा साध्याभोळ्या आणि प्रामाणिक जीवनाला समजून घ्यायला तू असमर्थ आहेस. तुला हव्या आहेत मिन्नासारख्या बायका आणि कर्नलच्या खांदफिती! त्याला ती किती आवडली ते मी विचारतोच?"

पोलोझोव कुशीवर वळून काऊंटला उद्देशून बोलणार होता, पण तेवढ्यात त्याने विचार बदलला. त्याला वाटले की, त्याच्या अपेक्षेप्रमाणेच जर काऊंटने लिझाविषयीचे आपले मत व्यक्त केले तर, कदाचित तोसुद्धा त्याच्याशी सहमत होईल, कारण काऊंटपुढे मान तुकवायची त्याला फार सवय लागली होती. मात्र उलटणाऱ्या दिवसागणिक त्याला हे अधिकाधिक अन्याय्य आणि असह्य वाटत होते.

"कुठं निघालास?" जेव्हा काऊंट टोपी चढवून दारापाशी गेला तेव्हा पोलोझोवने विचारले.

"बाहेर तबेल्यात. सगळं काही टीक असल्याची मला खात्री करून घ्यायचीय."

"आश्चर्य आहे," कॉर्निटच्या मनात आले. पण त्याने मेणबत्ती विझविली व कूस बदलली. त्याच्या माजी मित्राने त्याच्या मनात निर्माण केलेल्या वेडगळ मत्सरी आणि वैरभावनेच्या विचारांना दूर लोटायचा प्रयत्न तो करू लागला.

दरम्यान, आन्ना फ्योदरोवनाने आपल्या रिवाजाप्रमाणे आपल्या भावाचे, मुलीचे आणि छोट्या पीमोचकाचे प्रेमाने चुंबन घेऊन क्रूसचिन्ह केले होते व ती आपल्या खोलीत निघून गेली होती. एकाच दिवसात एवढ्या तीव्र संवेदना

अनुभवण्याचा योग तिला अनेक वर्षांत लाभला नव्हता. दिवंगत काऊंटविषयीच्या दुःखद आणि ठळक आठवणींमुळे व ह्या तरुण डांबरटाने निर्लज्जपणे तिचे पैसै लुबाडल्यामुळे ती एवढी बेचैन बनली होती की, आपली प्रार्थना शांतपणे म्हणणे तिला अशक्य झाले होते. तरीही, कपडे उतरविल्या-नंतर आणि तिच्या बिछान्याशेजारच्या छोटचा टेबलावर ठेवलेल्या क्वासचा अर्धा ग्लास नेहमीप्रमाणे प्यायल्यावर ती बिछान्यात आडवी झाली. तिचे आवडते मांजर हळूच खोलीत शिरले. आन्ना फ्योदरोवनाने मांजराला स्वतःपाशी बोलाविले आणि त्याला ती गोंजारू लागली, त्याची हलकी घुर्रर्र घुर्रर्र ऐकू लागली. आन्ना फ्योदरोवनाला झोप येत नव्हती.

"ह्या मांजरामुळं मला झोप येत नाही," असा विचार करून तिने मांजराला दूर लोटले. मांजराने अलगद खाली उडी मारली आणि नंतर आपली गोंडेदार शेपूट वळवून चुलाण्याच्या फळीवर झोप घेतली. ह्याच वेळेला, नेहमी आपल्या मालकिणीच्या खोलीत जमिनीवर निजणारी मोलकरीण नमदी चटई घेऊन आत आली. तिने चटई पसरली, मेणबत्ती विझविली आणि पुतळीसमोरील दिवा लावला. लौकरच ती घोरू लागली, पण आन्ना फ्योदरोवनाचा तळमळणारा आत्मा काही केल्या शांत होईना. तिने डोळे मिटले रे मिटले की, शिलेदाराचा चेहरा तिच्यासमोर उभा रहायचा. आणि तिने डोळे उघडले म्हणजे खोलीतील सर्व वस्तू – कमोड, टेबल, टांगलेले पांढरे झगे – पुतळीसमोरील दिव्याच्या मंद प्रकाशात शिलेदाराला विचित्र आकारांमध्ये दाखवायच्या. क्षणात तिला पिसांच्या गोधडीत घुसमटल्या-

मजेचे वाटायचे, तर क्षणात तिला घड्याळाच्या टोलाची किंवा मोलकरणीच्या घोरण्याची चीड यायची. तिने मोलकरणीला जागे केले. आणि न घोरण्याचा हुकूम केला. आपली मुलगी, जुना काऊंट आणि हा तरुण काऊंट, 'प्रेम'चा खेळ – ह्यांच्याविषयीचे विचार चमत्कारिकरीत्या तिच्या मनात रेंगाळत राहिले. क्षणात ती पहायची की, दिवंगत काऊंटबरोबर ती वॉल्तझ नाचतेय, तिच्या मांसल शुभ्र खांद्यांवर कुणाचेतरी ओठ टेकले आहेत; तर क्षणात तिला आपली मुलगी तरुण काऊंटच्या बाहुपाशात दिसायची. पुन्हा एकदा उस्त्यूश्काने घोरायला आरंभ केला होता...

"छे: छे:! पूर्वी माणसं जशी होती तशी आता राहिली नाहीत. माझ्यासाठी काय वाट्टेल त्या दिव्यातून जायला तो तयार होता. त्याला कारणही तसंच होतं. पण हा लेकाचा बायकांच्या जिंकण्याची फुशारकी मारत घोरत पडलाय. प्रेमा-साठी खळबळून उठायची ह्याच्यात जिद्दच नाही. ह्याच्या बापानं माझ्यासमोर गुडघे टेकून काय काय प्रस्ताव मांडले होते. 'काय करू मी तुझ्यासाठी? स्वत:ला ठार मारू? तुझ्यासाठी मी हे आनंदानं करीन!' आणि मला हवं असतं तर ते त्यानं खरंच केलं असतं."

अचानक हॉलमध्ये अनवाणी पावलांचा आवाज ऐकू आला व अंगावर केवळ शाल पांघरलेली पांढऱ्याफटक चेहऱ्याची लिझा धावत खोलीत आली आणि आपल्या आईच्या पायांपाशी कोसळली. तिचे सर्वांग थरथरत होते...

आपल्या आईचा निरोप घेतल्यानंतर लिझा एकटीच

आपल्या मामाच्या खोलीकडे गेली होती. पांढरा पोलका अंगात घालून व आपले लांब केस रुमालात बांधून तिने मेणबत्ती विझविली आणि खिडकी उघडून खुर्चीवर पाय मुडपून ती बसली. रुपेरी प्रकाशात चमचमणाऱ्या तळयाच्या पाण्याकडे टक लावून पहात ती विचारमग्न अवस्थेत बसली होती.

तिचे नेहमीचे सर्व उद्योग आणि तिच्या आवडीनिवडी अचानक तिला एका नव्या दृष्टिकोनातून दिसू लागल्या होत्या: तिची म्हातारी, लहरी आई – तिच्याबद्दल लिझाला वाटणारे निर्विवाद प्रेम हा लिझाच्या अस्तित्वाचा एक भाग बनला होता; तिचा प्रेमळ, पण दुबळा मामा; छोटया मालकिणीचा आदर करणारी घरातील नोकरमंडळी, दुभत्या गायी आणि वासरे – हे सर्वजण आणि तिच्याभोवतालचा अनेकदा नष्ट झालेला व पुनरुज्जीवित झालेला नैसर्गिक परिसर, अशा वातावरणात दुसऱ्यांवर प्रेम करीत आणि दुसऱ्यांच्या प्रेमाचा लाभ घेत झालेली तिची जोपासना – हे सारे सारे एकदम तिला **शून्यवत** वाटू लागले; **कंटाळवाणे** आणि **नकोसे** वाटू लागले. जणू कुणीतरी तिच्या कानांमध्ये कुजबुजले होते: "ए मूर्ख पोरी! ए मूर्ख पोरी! खरं आयुष्य आणि सुख म्हणजे काय असतं हे जाणून न घेता वीस वर्षं दुसऱ्यांची सेवा करीत मूर्खासारखी वाया घालवलीस!" आता त्या प्रकाशित, स्तब्ध बागेच्या गहिराईमध्ये टक लावून पाहताना हे विचार कधी नव्हे एवढ्या जोराने तिच्या मनात उसळून आले. त्याला कारण काय घडले होते? एखाद्याला वाटेल की, काऊंटबद्दल अचानक निर्माण झालेले प्रेम! पण तसे नव्हते. उलट, तिला तो आवडला नव्हता.

त्यापेक्षा कॉर्निटच्या प्रेमात ती अधिक सहजपणे पडली असती. पण तो अगदीच सपक आणि अबोल होता. त्याला तर ती एव्हाना बिसरूनही गेली होती. पण काऊंटची आठवण येताच मात्र तिला राग आला होता, तिटकारा वाटला होता. "नाही, हा तो नव्हे," ती स्वत:शीच म्हणाली. तिचा आदर्श पुरुष हा पूर्णतया सुंदर होता, अशा रात्री, अशा स्थळी, भोवतालच्या सौंदर्याचा भंग न करता प्रेम करू शकेल असा कुणीतरी होता. ओबडधोबड वास्तवाशी जुळेल असा तिचा पुरुषोत्तम नव्हता!

आरंभी तिचे जीवन एकले असल्यामुळे आणि तिला ज्यांच्यात रस वाटेल अशी माणसे तिला न भेटल्यामुळे, आपल्यापैकी प्रत्येकाच्या अंत:करणात प्रारब्धाने रुजविलेली प्रेमाची प्रचंड शक्ती तिच्या हृदयात अखंड आणि न ढवळता तशीच राहिली होती. पण आता ह्या अज्ञात भावनेची हुर-हुर मनाशी बाळगून ती प्रदीर्घ काळ जगली होती (काही-वेळा तिच्या हृदयामधील रहस्यमय कप्प्यात ही संवेदना हळूच डोकावून पहात होती आणि त्या खजिन्याविषयी उन्मादक विचार करीत होती) आणि आता संधी मिळेल त्या पहिल्या पुरुषावर विचार न करता प्रेमाचे शिंपण करायला ती उत्सुक होती. परमेश्वराची कृपा झाली तर हे तोटके सुख ती आपल्या जीवनाच्या अखेरीपर्यंत उपभोगू शकली असती! तेच सर्वोत्तम आणि परमसुख होते हे कुणाला ठाऊक? तोच खरा आणि शक्य आनंद हे कुणाला ठाऊक?

"देवा रे देवा!" ती पुटपुटली. "यौवन आणि सुख मला टाळून गेलीत हे शक्य आहे काय... त्यांची ओळख मला कधीच घडणार नाही? हे खरं असू शकेल?" तिने

आपली नजर उंच, तेजस्वी आकाशाकडे वळविली. मऊ मऊ शुभ्र ढग चंद्राच्या दिशेने जात असताना तारकांना झाकून टाकीत होते. "तो सर्वांत वरचा ढग चंद्राला टेकला तर ते खरं," ती स्वतःशी म्हणाली. तेजस्वी थाळीच्या खालच्या अर्ध्या भागावरून धुकट, धुरकट पट्टा सरकत गेला आणि गवतावर, लिंबोणीच्या झाडांच्या शेंड्यांवर, तळयावर चमकणारा प्रकाश हळू हळू मंद होत गेला व झाडांच्या काळया सावल्या अस्पष्ट बनल्या. आणि जणू निसर्गाला काळवंडणाऱ्या उदास सावल्यांच्या पाठोपाठ, पानांवरून एक हलकी झुळूक वाहात गेली. तिच्याबरोबर खिडकीपाशी दंवमाखल्या पानांचा, ओलसर मातीचा आणि फिकट जांभळया फुलांचा सुगंध आला.

"नाही, हे खरे नाही," तिने स्वतःचे सांत्वन केले. "आणि जर आज रात्री बुलबुल गायला, तर हे सगळे दुःखी विचार मूर्खपणाचे आहेत आणि निराश वाटून घ्यायचं काही कारण नाही," तिच्या मनात विचार आला. मग कुणाची तरी वाट पहात खूप वेळपर्यंत ती स्तब्ध बसून राहिली. दरम्यान, क्षणात चंद्र ढगांमधून बाहेर यायचा आणि सारा परिसर चांदण्यात उजळून टाकायचा, तर क्षणात ढगांआड जायचा आणि पृथ्वीवर सावल्यांचे साम्राज्य पसरायचा. तिला झोप लागायच्या बेतात होती, तेवढ्यात तळयापाशी बुलबुल गात असलेला तिने स्पष्टपणे ऐकले. त्या ग्रामकन्येने डोळे उघडले. पुन्हा एकदा, तिच्या भोवताली पसरलेल्या तेजस्वी आणि शांत निसर्गाशी गूढ मीलन घडल्याने तिचे अंतःकरण नव्या आनंदाने उचंबळून आले. आपल्या हातांच्या दोन्ही कोपरांवर ती ओणवी झाली. एक सुखद

खिन्नता तिच्या हृदयात दाटून आली आणि पूर्णत्वासाठी आसुसलेल्या अफाट व विशुद्ध प्रेमाचे अश्रू—चांगले आणि सांत्वनपर अश्रू—तिच्या डोळयांमध्ये भरून आले. खिडकीच्या चौकटीत तिने हातांची घडी घातली व तिच्यावर आपले डोके टेकले. तिची आवडती प्रार्थना आपोआप तिच्या मनात उमटली आणि तशाच अश्रुमाखल्या ओल्या डोळयांनी तिला झोपेची गुंगी आली.

एका हाताच्या स्पर्शाने ती जागी झाली. तो स्पर्श हलका आणि प्रसन्न होता. तिच्या दंडावरची पकड घट्ट झाली. आपण कुठे आहोत याची तिला एकदम जाणीव झाली व एक अस्फुट किंकाळी मारून ती ताडकन उठली आणि चांदण्यात उजळलेल्या खिडकीशी उभी असलेली व्यक्ती काऊंट नसावी असे स्वतःला बजावीत ती खोलीबाहेर पळाली.

## १५

पण खरेच काऊंट तेथे उभा होता. लिझाची किंकाळी उमटली, त्याचवेळी तिला प्रतिसाद म्हणून कुंपणाच्या दुसऱ्या बाजूने रात्रीच्या पहारेकऱ्याचे खोकणे ऐकू आले आणि दवाने ओल्या बनलेल्या गवतावरून काऊंट तात्काळ बागेत पळाला. चोरी करताना पकडल्या जाणाऱ्या चोरासारखी त्याची अवस्था झाली होती. "किती मूर्ख मी!" तो स्वतःशी म्हणाला. "मी तिला घाबरवलं. मी अधिक सावध वागायला पाहिजे होतं आणि तिच्याशी बोलून तिला जागं करायला पाहिजे होतं. कसला गबाळा पशू मी!" तो थांबला

आणि त्याने कान टवकारले. पहारेकरी फाटकामधून बागेत शिरला होता व वाळूच्या वाटेवरून काठी फरफटत चालत होता. त्याला लपणे भाग होते. तो तळयाकडे पळाला. त्याच्या पायांखालीच असलेल्या बेडकांनी घाबरून धबाधब पाण्यात उड्या घेतल्या व त्यामुळे तो दचकला. पाय ओले झाले होते तरी तसाच तो खाली बसला व त्याने केलेल्या सर्व कृत्यांची त्याने मनातल्या मनात परत एकदा उजळणी केली: कुंपणावरून तो कसा चढला होता, तिच्या खिडकी-पाशी कसा पोहोचला होता आणि सरतेशेवटी तिची पांढरी सावली त्याला कशी दिसली होती; किती वेळा तो तिच्या नजीक पोहोचला, पण किंचितशा सळसळीला घाबरून परत माघारी आला होता; एका क्षणी त्याला खात्रीपूर्वक वाटले होते की, ती त्याची वाट पहात होती, एवढेच नव्हे तर तिला दीर्घ प्रतीक्षा करायला लावल्याबद्दल ती त्याच्यावर चिडली होती; आणि दुसऱ्या क्षणी तेवढयाच खात्रीपूर्वक त्याला वाटले होते की, ह्या संकेतभेटीला तिने एवढ्या सहजी संमती देणे शक्य नव्हते. सरतेशेवटी त्याने स्वत:ची समजूत करून घेतली होती की, खेडवळ मुलीच्या लाजरे-पणापायी तिने झोपेचे सोंग घेतले होते, म्हणून तो तिच्या-पाशी गेला होता आणि ती खरेच गाढ झोपल्याचे त्याने स्पष्ट पाहिले होते. काही कारणाने तो ताबडतोब तेथून दूर पळाला होता, पण आपल्या भित्रेपणाची लाज वाटून तो परतला होता व धीटपणे त्याने आपला हात तिच्या दंडावर ठेवला होता. रात्रीचा पहारेकरी परत खोकला आणि तो बागेतून बाहेर गेला तेव्हा फाटक करकरले. लिझाच्या खोलीची खिडकी धाडकन बंद झाली आणि आतील

झडपा घट्ट लावण्यात आल्या. काऊंटला हे सर्व संतापजनक वाटले. पुन्हा एकदा आरंभ करायला संधी मिळावी म्हणून काय वाट्टेल ते द्यायला तो तयार झाला असता. दुसऱ्या वेळी तो नक्कीच असा मूर्खासारखा वागला नसता! "मोहक पोरगी! किती ताजी! फारच सुरेख! आणि मी तिला माझ्या बोटांमधून निसटू दिलं! काय मठ्ठ आहे मी!" एव्हाना त्याची झोपण्याची सर्व इच्छा मावळली होती. अत्यंत व्यथित अंत:करणाच्या माणसाप्रमाणे तो लिंबोणीच्या झाडांच्या वाटेकडे खंबीर पावलांनी चालू लागला.

पण त्यालासुद्धा ह्या रात्रीने एक देणगी दिली होती. मनाला शांत करणारी खेदाची भावना त्याच्या काळजात दाटली होती व प्रेमाची आस निर्माण झाली होती. लिंबोणीच्या दाट पालवीमधून थेट झिरपणाऱ्या फिकट चंद्रकिरणांनी मातीच्या वाटेवर ठिपकेदार नक्षी उमटवली होती. त्या वाटेवर काही ठिकाणी गवताचे पुंजके उगवले होते, तर काही जागी वाळके देठ उभे होते. एकाच बाजूने प्रकाशित झालेली एखादी वाकलेली फांदी पांढऱ्या शेवाळ्याचा दाट थर बसल्याचा भास काहीवेळा करून देत होती. रुपेरी मुलामा चढलेली पाने अधूनमधून एकत्र कुजबुजत होती. घरातील सर्व दिवे मालविण्यात आले होते. सगळे आवाज विरले होते. ही तेजस्वी, स्तब्ध, कवेत घेण्यास अशक्य असलेली मोकळी जागा फक्त बुलबुलाच्या गाण्याने भरून गेली होती.

"किती सुंदर रात्र! किती तेजस्वी रात्र!" बागेमधील ताज्या आणि गंधित हवेला खूप दीर्घ श्वासाने फुफ्फुसांमध्ये भरून घेत असताना काऊंटच्या मनात विचार आला. "पण काहीतरी अयोग्य घडलंय. स्वत:विषयी आणि इतरांविषयी

मी असमाधानी आहे असं वाटतं. खुद्द आयुष्याबद्दलचं असमाधान वाटतंय. किती छान गोड मुलगी आहे ती! कदाचित खरंच तिचा अपमान झाला..." येथे त्याच्या कल्पनाशक्तीला एक नवे वळण मिळाले. आता तो स्वतःला त्या ग्रामकन्ये-समवेत अत्यंत विचित्र आणि विविध परिस्थितींमध्ये त्या बागेत पाहू लागला. नंतर ग्रामकन्येच्या जागी मिन्ना दिसू लागली. "किती मूर्ख मी! सरळ तिच्या कमरेला विळखा घालून तिचं चुंबन घ्यायला पाहिजे होतं!" आणि हा विषाद मनात बाळगून काऊंट आपल्या खोलीकडे परतला.

कॉर्निट अजूनही झोपलेला नव्हता. त्याने चटकन काऊंटच्या दिशेने कूस वळविली.

"तू झोपला नाहीस?" काऊंटने विचारले.

"नाही."

"काय घडलं ते सांगू?"

"काय झालं?"

"मला वाटतं न सांगणंच कदाचित बरं... पण तरीही सांगतो. सरक पलिकडं."

आणि गमावलेल्या संधीबद्दलचे मनातील विचार झटकून टाकून तो सस्मित मुद्रेने आपल्या मित्राच्या बिछान्यावर बसला.

"तुझा विश्वास बसेल? त्या तरुण पोरीनं माझ्याशी संकेत-स्थळी भेटायला संमती दिली होती."

"काय म्हणतोस?" उडी मारून उठत पोलोझोव ओरडला.

"ऐक."

"कसं? केव्हा? माझा विश्वासच बसत नाही."

"जेव्हा तू 'प्रेफरन्स'मध्ये जिंकलेल्या पैशांचा हिशेब करत होतास तेव्हा तिनं मला सांगितलं की, खिडकीपाशी ती माझी वाट पाहील आणि मी त्या खिडकीतून चढून तिच्या खोलीत जायचं. व्यवहारी वृत्तीचा हाच फायदा असतो! म्हातारीबरोबर तू हिशेबाचा घोळ घालत बसला होतास तेव्हा मी माझ्या तरतुदी करत होतो. अरे हो, तू स्वतःच तिचं बोलणं ऐकलं होतंस – खिडकीशी बसून आज रात्री तळ्याचा देखावा पाहण्याचा इरादा तिनं सांगितला होता."

"पण त्यावरून तिला काहीच सुचवायचं नव्हतं."

"तेच तर! ती सहजपणं तसं म्हणाली अथवा हेतूपूर्वक म्हणाली याचा निर्णय माझ्या मनाशी होईना. कदाचित तिच्या मनात काहीच नसेल, पण वरकरणी पुरावा मात्र तिच्या विरुद्ध जातो. एकूण प्रकाराची अखेर फार विचित्र झाली. मी अगदी मूर्खासारखा वागलो," तुच्छ स्मित करीत तो म्हणाला.

"पण कसा? कुठं होतास तू?"

काऊंटने त्याला घडलेली सर्व हकीकत सांगितली. फक्त खिडकीपाशी त्याच्या मनामध्ये उठलेले हेलकावे मात्र त्याने सांगायचे टाळले.

"मीच सगळा विचका केला. मी जास्त धीट वागायला हवं होतं. ती किंचाळली आणि पळून गेली."

"म्हणजे ती किंचाळली आणि पळून गेली," कॉर्निटने ते शब्द परत उच्चारले. काऊंटच्या स्मिताला त्याने ओघळल्या स्मिताने प्रतिसाद दिला, कारण त्याच्यावर

काऊंटचा फार प्रभाव होता व तो खूप काळ टिकला होता.

"हो. आता झोपलं पाहिजे."

कॉर्निटने दाराकडे पाठ फिरविली आणि सुमारे दहा मिनिटेपर्यंत तो गप्प पडून राहिला. त्या काळात त्याच्या अंतर्मनात काय चालले होते ते सांगणे कठीण आहे, पण जेव्हा त्याने कूस बदलली तेव्हा त्याच्या मुद्रेवर दुःखाचा आणि निर्धाराचा भाव उमटला होता.

"काऊंट तूर्बीन," तो एकदम उद्गारला.

"तुला भ्रम झालाय का?" काऊंटने शांतपणे विचारले. "कॉर्निट पोलोझोव, काय झालं?"

"काऊंट तूर्बीन, तू हलकट आहेस!" बिछान्यामधून ताडकन उठत पोलोझोव ओरडला.

## १६

दुसऱ्या दिवशी स्क्वाड्रन निघून गेले. अंमलदारांनी आपल्या यजमानांची भेट घेतली नाही, अथवा त्यांचा निरोप घेण्याचा प्रयत्न केला नाही. त्यांनी एकमेकांशीसुद्धा संभाषण केले नाही. पहिल्याच मुक्कामी द्वंद्वयुद्ध खेळण्याचे त्यांनी ठरविले होते, पण त्यांचा चांगला मित्र असलेल्या, उत्तम घोडेस्वार म्हणून ख्याती पावलेल्या आणि शिलेदारांमध्ये प्रिय असलेल्या व काऊंटने आपल्या बदली म्हणून निवडलेल्या कप्तान शूल्झ याने ही सर्व बाब अशा काही रीतीने हाताळली की, द्वंद्व तर टाळले गेलेच, पण रेजिमेंटमध्ये कुणालाही ह्या

भानगडीचा वास लागला नाही. तूर्बीन आणि पोलोझोव यांची पूर्वी जशी जिव्हाळ्याची मैत्री होती तशी ती पुन्हा कधीच जमली नाही. पण तरीही ते एकमेकांना अरे-तुरेच्या जवळिकीने संबोधत राहिले, काहीवेळा भोजनसमारंभांना आणि मेजवान्यांनी भेटत राहिले.

१८५६

# सुखी वैवाहिक जीवन

## भाग पहिला

### १

शरदामध्ये आमची आई वारली आणि सारा हिवाळा आमच्या खेड्यात आम्ही सुतकात काढला. आम्ही एकटयाच रहात होतो – कात्या, सोन्या आणि मी.

कात्या आमच्या कुटुंबाची जुनी स्नेही होती. ती आमची गव्हर्नेस होती आणि आम्हा सर्वांना तिने लहानाचे मोठे केले होते. मला आठवते तेव्हापासून मी तिच्यावर प्रेम करीत होते. सोन्या माझी धाकटी वहीण होती. पक्रोवस्कोयेमधील आमच्या जुन्या घरात तो हिवाळा आम्ही अत्यंत दुःखात आणि उदासवाणा काढला. हवा थंड आणि वादळी होती, बर्फाचे ढीग खिडकीपेक्षा उंच साठले होते. बहुतेक वेळ खिडक्या गोठलेल्या आणि धूसर दिसत. सबंध हिवाळ्यात आम्ही क्वचितच घराबाहेर पडलो. कुणाच्याही घरी आम्ही भेटीला गेलो नाही. आमच्याही भेटीला चुकूनच कुणी येत असे आणि जे कुणी भेटायला आले, त्यांच्यामुळे आम्हाला आनंद लाभला नाही. चेहरे दुःखी करून हळू आवाजात ते बोलत. जणू त्यांच्या बोलण्याच्या आवाजाने कुणी जागे होईल अशी त्यांना भीती वाटत असावी. ते कधीही हसत नसत. जेव्हा ते माझ्याकडे पहात तेव्हा फक्त उसासे टाकत

आणि अनेकदा रडत. आणि काळ्या फ्रॉकमधील छोटचा मोन्याला पाहिले म्हणजे त्यांना जास्तच दुःखाचे उमाळे येत. घरात मृत्यू रेंगाळल्याचा भास होई. वातावरणात दुःख आणि मृत्यूचे भूत ओठंगून राहिले होते. आईची खोली थंडगार आणि रिकामी होती. माझ्या झोपण्याच्या खोलीकडे जाताना तिचे बंद दार माझ्या मनात अनावर आकर्षण निर्माण करी.

मी सतरा वर्षांची होते आणि आई वारली त्याच वर्षी तिने माझ्यासाठी शहरात रहायला जायचे ठरविले होते. तिच्या मृत्यूचे मला खूप दुःख झाले होते, पण मला कबूल केले पाहिजे की, माझ्या अंतर्मनात माझ्या यौवनाची मला जाणीव होत होती, लोकांच्या म्हणण्यानुसार मी सुरेख होते आणि इथे खेड्यात मी एकाकीपणे दुसरा हिवाळा वाया घालवीत होते. ह्या एकाकीपणामधून आणि निव्वळ कंटाळ्या-मधून निर्माण झालेले दुःख हिवाळ्याच्या अखेरी एवढे शिगेला पोहोचले की, माझ्या खोलीमधून मी बाहेर पडेनाशी झाले. मी कधीही पियानो उघडला नाही वा पुस्तक उचलले नाही. मी कशा ना कशात मन गुंतवावे म्हणून जेव्हा जेव्हा कात्या माझी मनधरणी करायची, तेव्हा तेव्हा मी तिला उत्तर द्यायची की, माझी इच्छा नव्हती, किंवा मला जमत नव्हते. मनःअंतःकरणात मी स्वतःला विचारायची: "का म्हणून मी करू? माझ्या जीवनाचा सर्वोत्तम काळ असा वाया जात असताना कशाला काही करायचं? कशाला?" आणि ह्या प्रश्नांना एकमेव उत्तर म्हणजे अश्रू.

मी कृश झाले होते आणि चांगली दिसत नव्हते असे लोक म्हणत होते. पण तरीही मला लक्ष द्यावेसे वाटत नव्हते. काय फरक पडणार होता? कुणाला पर्वा? ह्या अतिदूरच्या

खेड्यात आणि भिकार रिकामपणात माझे सर्व जीवन संपून जाणार असे मला भासू लागले होते. ते रिकामपण झुगारून देण्याची माझ्यात ना ताकद होती ना इच्छा. हिवाळ्याच्या अखेरी कात्याला माझ्या प्रकृतीची काळजी वाटू लागली आणि कसेही करून मला परदेशपर्यटनाला नेण्याचा तिने निश्चय केला. पण त्यासाठी पैसे आवश्यक होते आणि आईच्या मृत्यूनंतर आमच्यासाठी काय उरले याची आम्हाला काहीच माहिती नव्हती. आमचे पालक केव्हा येतील आणि सगळी सुरळीत व्यवस्था केव्हा लावतील याची आम्ही दररोज उत्कंठेने वाट पहात होतो.

आमचे पालक मार्च महिन्यात आले.

"बरं झालं बाई!" एके दिवशी कात्या मला म्हणाली. त्यावेळी मी घरभर एखाद्या छायेसारखी फिरत होते, काहीही करीत नव्हते आणि काही करण्याचा मनात विचार नव्हता अथवा इच्छाही नव्हती. "सेर्गेई मिखाइलिच परत आलेत. त्यांनी आपली चौकशी केलीय आणि आपल्याकडं जेवायला यायची त्यांची इच्छा आहे. माशा [मारीया ह्या नांवाचे लाडके रूप – अनु.] आता तुझा हा अवतार बदल बाई! काय वाटेल त्यांना तुला अशी बघितली तर? नेहमी किती लाडकी होतीस त्यांची!"

सेर्गेई मिखाइलिच आमचे जवळचे शेजारी होते आणि माझ्या वडिलांचे मित्र होते. मात्र माझ्या वडिलांपेक्षा वयाने ते बरेच लहान होते. त्यांच्या आगमनाचा मला आनंद झाला होता, कारण त्यामुळे आमचे नवे बेत होणार होते, खेड्यातून बाहेर पडणे आम्हाला शक्य होणार होते. पण त्याशिवाय, लहानपणापासून मला ते आवडत होते आणि त्यांच्याबद्दल

मला खूप आदर होता. मी स्वत:ला सावरावे असे जेव्हा कात्याने मला सांगितले तेव्हा तिचा अंदाज अगदी बरोबर होता की, सेर्गेई मिखाइलिचसमोर दुर्मुखल्या अवतारात सामोरे जायला मला कधीही आवडले नसते. आमच्या सर्व स्नेह्यांमध्ये त्यांचे स्थान वेगळे होते.

मी त्यांच्यावर प्रेम करू लागले होते. आमच्या घरातील सगळेच – कात्या आणि सोन्यापासून थेट गाडीवानापर्यंत – त्यांच्या प्रेमात होते. सोन्या त्यांची धर्मकन्या होती. पण माझ्या हृदयात त्यांना वेगळे स्थान होते, कारण एकदा माझ्या सान्निध्यात माझ्या आईने एक शब्द उच्चारला होता. ती म्हणाली होती की, असा पुरुष माझा नवरा झालेला तिला आवडला असता. त्यावेळी मला तिच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले होते आणि खरे म्हणजे तिचे बोलणे आवडलेही नव्हते. माझ्या मनातील नायक अगदी वेगळा होता. माझा स्वप्नातील पुरुष सडपातळ आणि बेतशीर अंगाचा, फिकट आणि दु:खी चेहऱ्याचा होता. याउलट सेर्गेई मिखाइलिच इत:पर तरुण नव्हते. ते उंच, दणकट बांध्याचे होते व मला ते नेहमी तजेल असल्याचे भासत. काहीही असले तरी आई जे बोलली होती ते माझ्या मनात घर करून बसले होते. सहा वर्षांपूर्वी, ज्यावेळी मी अवघी अकरा वर्षांची होते आणि ते माझ्याशी खेळत, मला त्यांची **छोटी नीलपुष्पी** म्हणत, त्यावेळी माझ्या मनात धडकी भरविणारा एक प्रश्न काहीवेळा उमटायचा: त्यांना माझ्याशी लग्न करायची इच्छा झाली तर मी काय करीन?

जेवणापूर्वी सेर्गेई मिखाइलिच आले. कात्याने पाल्याची चटणी आणि क्रीम-केक खास बनविल्या होत्या. छोटचा घसर-

गाडीतून ते येत असलेले मी खिडकीमधून पाहिले. ज्या क्षणी ते घराच्या कोपऱ्यापाशी आले त्या क्षणी मी दिवाणखान्यात धावले. मी त्यांची मुळीच वाट पहात नव्हते असा बहाणा करण्याचा विचार माझ्या मनात आला. पण बाहेरच्या खोलीत जेव्हा त्यांची दणदणीत पावले वाजली, त्यांचा प्रेमळ आवाज कानी पडला व कात्या त्यांना भेटायला धावली, तेव्हा मलाही राहवेना आणि मीही हॉलमध्ये पळत गेले. त्यांनी कात्याला एका हाताने धरले होते आणि आपल्या मोठ्या, प्रेमळ आवाजात ते बोलत होते, हसत होते. मला पाहताच ते एकदम थांबले आणि लवून अभिवादन न करता अनेक क्षण माझ्याकडे टक लावून पहात राहिले. मला फार अवघडल्यासारखे झाले. माझी कानशिले तापत असल्याचे मला जाणवले.

"अरेच्चा! तुम्ही?" आपल्या ठाम आणि साध्या रीतीने ते म्हणाले व दोन्ही हात पसरून माझ्यापाशी आले. "इतकं बदलून जायचं? किती मोठ्या झालात तुम्ही! आता छोटी नीलपुष्पी राहिला नाहीत! मोठं गुलाबाचं फूल बनलात!"

माझा छोटा हात त्यांनी आपल्या मोठ्या पंजात पकडला आणि दुखणार नाही अशा बेताने मनापासून घट्ट आवळला. मला वाटले, ते माझ्या हाताचे चुंबन घेतील, म्हणून मी त्यांच्या दिशेने किंचित झुकणार होते, पण त्यांनी परत एकदा फक्त हात दाबला व त्यांची हसरी नजर माझ्या डोळ्यांना थेट भिडली.

गेल्या सहा वर्षांत मी त्यांना पाहिले नव्हते आणि त्यांच्यात खूप बदल झाला होता. ते अधिक वयस्क झाले होते, त्यांचा वर्ण काळपट झाला होता आणि त्यांनी वाढविलेले

कपडे त्यांना मुळीच शोभत नव्हते. पण त्यांचे साधे वागणे अजून तसेच होते. त्यांची ठसठशीत, मोकळी, प्रामाणिक मुद्रा. त्यांचे बुद्धिमान, चकाकणारे डोळे आणि प्रेमळ, बाल-सदृश स्मित तसेच होते.

पाच मिनिटांत त्यांचे परकेपण संपले आणि आम्हा सर्वांबरोबर, नोकरांबरोबरसुद्धा, अगदी घरच्यासारखे वागायला त्यांनी सुरुवात केली. नोकरमाणसे त्यांना पाहून विशेष आनंदित झालेली होती. ते खूष व्हावेत म्हणून नोकरांनी चालविलेल्या प्रयत्नांवरून हे स्पष्ट दिसत होते.

आईच्या मृत्यूनंतर आमचे बाकीचे शेजारी आम्हाला भेटायला आले तेव्हा गप्प राहणे आणि रडणे ह्या आवश्यक बाबी होत्या अशी त्यांची समजूत असावी. पण सेर्गेई मिखाइलिच मात्र तसे मुळीच वागले नाही. उलट त्यांची खूप बडबड चालू होती, ते खूप मजेत होते आणि आमच्या दुःखाबद्दल चकार शब्दाने त्यांनी उच्चार केला नाही. आरंभी त्यांचा बेफिकीरपणा मला विचित्र भासला आणि अयोग्यही वाटला, कारण ते आमचे खूप जवळचे स्नेही होते. पण नंतर मला उमजले की, ती बेफिकीरी नव्हती, तर प्रामाणिकता होती. मी त्याबद्दल कृतज्ञ राहिले.

त्या संध्याकाळी आम्ही बैठकीच्या खोलीत चहा घेतला. कात्या चहा ओतत होती. आई असतानाही चहा देण्याचे काम कात्याच करायची. सोन्या आणि मी तिच्याशेजारी बसलो होतो. म्हाताऱ्या ग्रिगोरीने माझ्या वडिलांचा पाईप शोधून काढला होता व सेर्गेई मिखाइलिचना दिला होता. पूर्वीप्रमाणेच ते मागे-पुढे फेऱ्या मारीत धूम्रपान करीत होते.

"विचार केला म्हणजे लक्षात येतं, किती दुःखी बदल ह्या घरात घडले," क्षणभर थांबत ते म्हणाले.

"होय ना," उसासा टाकीत कात्या म्हणाली. तिने समोवारचे झाकण लावले आणि सेर्गेई मिखाइलिचकडे पाहिले. तिच्या डोळ्यांमध्ये अश्रू तरारले होते.

"मला वाटतं, तुमचे वडील तुम्हाला आठवतात ना?" त्यांनी मला विचारले.

"फारच थोडे," मी कबुली दिली.

"आत्ता जर ते तुमच्यापाशी असते तर किती छान झालं असतं," माझ्या कपाळावर नजर लावीत ते हळूच म्हणाले. "तुमचे वडील मला फार आवडायचे!" आणखीच अस्फुट-पणे ते उद्गारले. त्यांचे डोळे विशेष चमकत असल्याचा मला भास झाला.

"आता देव तिलाही घेऊन गेला," कात्या पुटपुटली. तिने घाईघाईने चहादाणीवर नॅपकिन टाकला व आपले अश्रू टिपायला हातरुमाल उचलला.

"खरंच, ह्या घरात फार दुःखी बदल घडून आले," आपली मान फिरवीत ते परत म्हणाले. "सोन्या, इकडं ये आणि तुझी खेळणी मला दाखव पाहू," काही क्षणांनंतर ते म्हणाले आणि हॉलमध्ये गेले. मी अश्रुभरल्या नजरेने कात्याकडे पाहिले.

"किती चांगला मित्र!" ती उद्गारली.

आमच्याशी रक्ताचे नाते नसलेल्या ह्या भल्या माणसाच्या सहानुभूतीमुळे मला खरोखरीच दिलासा लाभला.

दिवाणखान्यामध्ये सेर्गेई मिखाइलिच सोन्याबरोबर हुंदडत असल्याचे आणि सोन्याला खळखळून हसवत असल्याचे

आम्हाला ऐकू येत होते. मी त्यांच्यासाठी चहा पाठवला. नंतर ते पियानोपाशी बसल्याचे व सोन्याची छोटी बोटे पट्ट्यांवरून फिरवीत असल्याचे मी ऐकले.

"मार्या अलेक्सान्द्रोवना!" त्यांनी हाक मारली. "इकडं या आणि आम्हाला काहीतरी वाजवून दाखवा."

ज्या घरगुती, मित्रत्वाच्या नात्याने त्यांनी मला सांगितले होते ते मला आवडले होते. मी उठले आणि त्याच्याकडे गेले.

"हे वाजवा," बीथोवनच्या Quasi Una Fantasia सोनाटामधील Adagio माझ्यापुढे उघडून धरीत ते म्हणाले. "बघू या, कसं वाजवता ते," त्यांनी पुस्ती जोडली. आपला चहाचा प्याला उचलून पियानोपासून दूर एका कोपऱ्यात जाऊन ते बसले.

नकार देणे किंवा मी वाईट वाजविते असे आरंभी सांगून क्षमायाचना करणे, या दोन्ही गोष्टी मला का कुणास ठाऊक, पण जमल्या नाही. म्हणून काहीही न बोलता मी माझ्या परीने चांगले वाजविले. त्यांना संगीताची चांगली जाण होती आणि आवड होती हे मला माहीत होते व त्यांच्या टीकेची मला भीती वाटत होती. आमच्या चहा-पानावेळच्या जुन्या आठवणींच्या संभाषणाशी Adagio चा सूर जुळता होता आणि मी तो चांगला वाजविला असे मला वाटले. पण त्यांनी मला Scherzo पुरा करू दिला नाही. "नको, तेवढी तुमची तयारी नाही," माझ्यापाशी येत ते म्हणाले. "ते नका वाजवू, पण पहिला भाग वाईट नव्हता. तुम्हाला संगीत कळतंय असं दिसतंय." त्यांची बेताची माफक स्तुतीसुद्धा मला लाजेने लाल व्हायला पुरेशी

ठरली. माझ्या वडिलांचे स्नेही असलेल्या आणि माझ्या वडिलांच्या बरोबरीने असलेल्या त्यांच्यासारख्या माणसाने, मला लहान मुलीप्रमाणे न मानता मोठ्या व्यक्तीप्रमाणे समजून गंभीरपणे बोलावे, ही गोष्ट मला नवीन होती, आणि मला ती आवडली. सोन्याला झोपविण्यासाठी कात्या वरच्या मजल्यावर गेली आणि आम्ही दोघेच दिवाणखान्यात राहिलो.

माझ्या वडिलांविषयीच्या आठवणी ते मला सांगू लागले – त्यांची ओळख कशी झाली होती, मी जेव्हा फक्त पुस्तकांमध्ये आणि खेळण्यांमध्ये रमत होते त्या काळात पूर्वी त्यांचा एकत्र किती छान वेळ जात होता, वगैरे. माझे वडील एक साधे, प्रेम करण्यायोग्य माणूस होते असे चित्र त्यांच्या निवेदनामधून प्रथमच माझ्या नजरेसमोर स्पष्ट उभे राहिले. त्याआधी माझ्या वडिलांविषयी माझी अगदी वेगळी कल्पना होती. मग त्यांनी विचारणा केली की, कशा पद्धतीने मला वेळ घालवायला आवडते, मी काय वाचते, माझा काय करण्याचा इरादा आहे आणि मग मला सल्ला दिला. मला चिडविणारे आणि खेळणी बनवून देणारे पूर्वीचे अल्लड गृहस्थ आता ते राहिले नव्हते. तर गंभीर, प्रेमळ आणि स्पष्टवक्ते गृहस्थ बनले होते. त्यांच्या ह्या वागण्यामुळे नकळत माझ्या मनात त्यांच्याविषयी आदर निर्माण झाला व ते मला आवडू लागले. त्यांच्याशी बोलण्यात आनंद होता, पण तरीही मला ताणल्यासारखे वाटत होते, भीती वाटत होती. प्रत्येक शब्द मी काळजीपूर्वक तोलूनमापून बोलत होते, कारण त्यांचे प्रेम प्राप्त करण्याची मला उत्कट इच्छा होती. आजवर मी त्यांना आवडत होते, कारण मी माझ्या वडिलांची मुलगी होते.

मोन्याला झोपविल्यानंतर कात्या परत आमच्यापाशी आली. माझ्या खिन्न मन:स्थितीबद्दल तिने त्यांच्यापाशी तक्रार केली. तो विषय मी त्यांच्याशी टाळला होता.

"अरेच्चा! सर्वांत महत्त्वाचं त्या माझ्यापाशी बोलल्या नाहीत," स्मित करीत आणि नापसंतीदर्शक मान हलवीत सेर्गेई मिखाइलिच म्हणाले.

"सांगण्यासारखं काय आहे त्यात?" मी म्हणाले. "हे फार खूप नीरस आहे आणि लौकरच नाहीसं होईल." (त्या क्षणाला मला खरेच असे भासले की, माझी खिन्नता एव्हाना नाहीशी झाली होती, जणू ती कधी अस्तित्वातच नव्हती.)

"एकटेपण सोसता न येणं हे फार वाईट आहे," ते म्हणाले. "एवढ्या का तुम्ही सामान्य आहात?"

"अर्थातच आहे," हसत मी उत्तरले.

"कदाचित लाडावलेली तरुणी आहे. जेव्हा तिचं कौतुक करतात तेव्हा फुलते आणि जराशी एकटी पडली की कोमेजते, तिला आयुष्यात रस वाटेनासा होतो. सगळं देखाव्या-पुरतं, स्वत:साठी काही नाही!"

"चांगलं मत बनवलंत माझ्याविषयी," काहीतरी बोलायचे म्हणून मी म्हणाले.

"होय, आहेच मुळी!" ते उद्गारले आणि थोडे थांबून पुढे म्हणाले: "तुम्ही आपल्या बापाची मुलगी म्हणून नाही उगीच—खरंच तुमच्यात **काहीतरी आहे**." त्यांच्या प्रेमळ, आदरपूर्वक नजरेने पुन्हा मी सुखावले आणि माझ्या मनात गोड गोंधळ निर्माण झाला.

केवळ आत्ता कुठे माझ्या ध्यानात आले की, त्यांच्या चेहऱ्यावरील खेळकरपणाखाली त्यांचा स्वत:चा एक खास

भाव होता; प्रथम स्पष्ट, कळकळीचा आणि नंतर हळूहळू तो जास्त केंद्रित व किंचित कष्टी बनला.

"कंटाळ्याची सबब सांगण्याचा तुम्हाला अधिकार नाही आणि तसं कंटाळून चालणार नाही," ते म्हणाले. "तुम्हाला संगीताची जाण आहे, तुमच्यापाशी पुस्तकं आहेत, तुमचा अभ्यास आहे. सारं आयुष्य तुमच्यापुढं उभं आहे आणि त्याची पूर्वतयारी करण्याची हीच वेळ आहे, म्हणजे नंतर पश्चात्ताप करत बसण्याची पाळी येणार नाही. पुढच्या वर्षी खूप उशीर होईल."

वडिलांप्रमाणे किंवा काकांप्रमाणे माझ्याशी ते बोलत होते, पण स्वत:ला माझ्या पातळीवर ठेवण्याचा त्यांचा सतत प्रयत्न चालला होता असे मला जाणवले. स्वत:पेक्षा मला कमी समजून ते बोलत होते ही कल्पना मला अपमानास्पद वाटली, पण तरीही केवळ माझ्यासाठी ते वेगळे वागण्याचा प्रयत्न करीत होते हे आढळल्यामुळे सुख होत होते.

उरलेला वेळ ते कात्याबरोबर इस्टेटीच्या कारभाराविषयी बोलत राहिले.

"अच्छा, येतो मित्रमंडळी," उठून उभे रहात ते म्हणाले. माझ्यापाशी येऊन त्यांनी माझा हात धरला.

"पुन्हा केव्हा भेटणार?" कात्याने विचारले.

"वसंतामध्ये," माझा हात अजून तसाच धरून ठेवीत ते उत्तरले.

"आता मी दानिलोवकाला जातोय" (आमचे दुसरे खेडे). "तिथली परिस्थिती कशी आहे ते पाहतो, जमेल तेवढी व्यवस्था लावतो आणि मग माझ्या स्वत:च्या उद्योगासाठी मॉस्कोला जातो. पण ह्या उन्हाळ्यात आपण खूपदा भेटू."

"एवढे दिवस दूर का राहणार?" खूप निराश होत मी विचारले. त्यांची दररोज भेट होईल अशी मला आशा वाटली होती. माझी खिन्नता परत येईल याचे मला दु:ख वाटत होते आणि भीतीही वाटत होती. माझ्या नजरेतून आणि आवाजातून हे स्पष्ट झाले असावे.

"स्वत:ला कामात गुंतवून घ्या आणि दु:ख करत बसू नका." त्यांचा स्वर मला थंड आणि अलिप्त वाटला. "वसंतामध्ये मी तुमची परीक्षा घेईन," माझा हात सोडीत आणि माझ्याकडे बघण्याचे टाळीत ते म्हणाले.

पुढील दालनात आम्ही त्यांना निरोप द्यायला गेलो तेव्हा गडबडीने त्यांनी अंगात कोट चढविला आणि माझ्याकडे साधा कटाक्षही टाकला नाही.

"एवढं कठोर वागायचं काही कारण नव्हतं त्यांना," माझ्या मनात आले. "त्यांनी माझ्याकडं लक्ष दिलं तर मला खूप आनंद होतो असं त्यांना खरंच वाटतं? ते चांगले आहेत, खूप छान आहेत, पण तेवढंच!"

तरीही, त्या रात्री, कात्याला आणि मला खूप वेळपर्यंत झोप आली नाही. आम्ही गप्पा मारीत होतो. पण त्यांच्याविषयी नव्हे, तर उन्हाळा आणि पुढचा हिवाळा कसा घालवायचा त्याबद्दल. "कशाला?" हा भयानक प्रश्न इत:पर मला सतावत नव्हता. सुखी होण्यासाठी माणसाने जगले पाहिजे हे स्पष्ट होते आणि भविष्यकाळात खूप सुखाची मी अपेक्षा करीत होते. जणू आमच्या पक्रोवस्कोयेमधील उदास जुन्या घरात अचानक चैतन्य आणि प्रकाश भरला होता.

## २

वसंत आला. माझ्या जुन्या खिन्नतेच्या जागी वसंतामध्ये नेहमी येणारी, गोंधळलेल्या आशा-आकांक्षांनी भरलेली स्वप्नाळू खिन्नता दाटली. हिवाळ्याच्या आरंभी जशी मी रहात होते तशी आता रहात नव्हते. सोन्याकडे लक्ष देण्यात, संगीतात आणि वाचनात मी स्वतःला गुंतवून घेतले होते. अनेकदा मी बागेत जायची आणि तेथील पाऊल-वाटांवरून तासन्तास भटकत रहायची. किंवा एखाद्या बाकावर बसून विचारात गढून जायची. मला काय हवे होते अथवा कशाची आस लागली होती ते केवळ परमेश्वरालाच ठाऊक. काहीवेळा तर मी रात्र रात्र खिडकीपाशी बसून रहायची, विशेषतः चांदणे असताना. कधीमधी, कात्याच्या नकळत, अंगात कोट न घालताच मी हळूच बागेत सटकायची आणि दंवमाखल्या गवतावरून पळत पळत तळ्यापाशी जायची. एकदा तर मी शेतांमध्ये गेले आणि दुसऱ्या एका वेळी ऐन मध्यरात्रीला आमच्या बागेच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चालत गेले.

त्या दिवसांमध्ये ज्या स्वप्नांनी माझे मन भारलेले होते ती स्वप्ने आठवणे अथवा समजून घेणे आता मला अवघड आहे. आणि जेव्हा मला त्यांची आठवण होते तेव्हा ती इतकी विचित्र, इतकी परकी होती, की ती खरोखरीच माझी स्वप्ने होती यावर माझा विश्वासच बसत नाही.

मे महिन्याच्या अखेरीस सेर्गेई मिखाइलिच कबूल केल्या-प्रमाणे आपल्या सफरीहून परत आले. पहिल्याप्रथम आम्हाला ते भेटायला आले तेव्हा संध्याकाळ होती आणि त्यांचे आगमन आम्हाला अगदी अनपेक्षित होते. आम्ही व्हरांड्यात बसलो

होतो आणि चहा पिण्याच्या बेतात होतो. बागेतल्या झाडांना एव्हाना पूर्ण पालवी फुटली होती, न छाटलेल्या झुडुपांमधून बुलबुल पक्षी बागडत होते. आता सर्व उन्हाळाभर बुलबुलांचा मुक्काम बागेत पडणार होता. अधूनमधून जांभळ्या किंवा फिकट ढऱ्या छटांच्या कळ्या उमललेली फुलझाडे दिसत होती. पाऊलवाटेच्या दुतर्फा उभ्या असलेल्या भोजांची पाने संध्याकाळच्या उन्हात पारदर्शी भासत होती. सावलीतील व्हरांड्यात ताजा गारवा पसरला होता. नंतर तेथे गवतावर दाट दंव पडणार होते. बागेपलिकडील आवारामधून दिवस-भराच्या कामाच्या धांदलीचे अखेरचे आवाज येत होते आणि घरी परतणाऱ्या गुरांचे हंबरणे ऐकू येत होते. घरासमोरच्या पाऊलवाटेवरून वेडा नीकोन पाण्याचे पिंप घेऊन येत होता. तो फुलझाडांना पाणी घालत होता. झुडुपांच्या बुंध्यांशी भुरपलेल्या मातीवर थंड पाण्याच्या धारेची काळी वर्तुळे उमटत होती.

व्हरांड्यात ज्या टेबलापाशी आम्ही बसलो होतो त्या टेबलावर हिमशुभ्र आच्छादन पसरलेले होते. त्यावर नुकताच चकचकीत केलेला समोवार वाफाळत होता. बिस्कीटांनी भरलेल्या बशा होत्या. सायीने भरलेला एक वाडगा होता. आपल्या गुबगुबीत हातांनी कात्या झटपट कप साफ करीत होती. आंघोळ करून आल्यानंतर मला सपाटून भूक लागली होती आणि चहाची वाट न पाहता, दाट सायीमध्ये पाव बुडवून खायला मी सुरुवात केली होती. मोकळ्या बाह्यांचे, लिनखळीचे पोलके मी अंगात घातले होते आणि माझे ओले केस मी रुमालात बांधले होते. कात्याने त्यांना खिडकीतून उघम पाहिले.

"सेर्गेई मिखाइलिच," ती उद्‌गारली. "आम्ही आत्ता तुमच्याबद्दलच बोलत होतो."

कपडे बदलण्यासाठी मी आत जायला निघाले, पण त्यांनी मला दारातच पकडले.

"इथं खेड्यात एवढा औपचारिकपणा कशाला?" रुमालात बांधलेल्या माझ्या डोक्याकडे दृष्टिक्षेप टाकीत स्मितपूर्वक मुद्रेने ते म्हणाले. "म्हाताऱ्या ग्रिगोरीसमोर असं वावरायला तुम्हाला लाज वाटत नाही आणि तुमच्या दृष्टीनं मी ग्रिगोरी-सारखाच आहे."

पण ग्रिगोरीपेक्षा वेगळ्या नजरेने ते माझ्याकडे पहात असल्याचे मला जाणवले आणि मी शरमले.

"मी एका मिनिटात परत येते," त्यांना सोडून जात मी म्हणाले.

"हे पोलके काय वाईट आहे?" माझ्या पाठी त्यांनी विचारले. "उलट त्याच्यात तुम्ही छान तरुण किसानकन्या दिसता!"

"किती विचित्र नजरेनं माझ्याकडं बघत होते," वरच्या मजल्यावर कपडे बदलताना माझ्या मनात विचार आला. "बरं झालं बाई ते आले म्हणून! आता तेवढं कंटाळवाणं वाटायचं नाही." आरशात एकवार डोकावून मी उत्साहाने खाली धावले आणि माझी धांदल न लपविता अक्षरशः धापा टाकीत बाहेर व्हरांड्यात गेले. टेबलाशी बसून ते कात्याला आमच्या इस्टेटीच्या कारभाराची माहिती सांगत होते. त्यांनी माझ्याकडे कटाक्ष टाकला, स्मित केले व आपले बोलणे पुढे चालू ठेवले. त्यांच्या मते आमच्या इस्टेटीची परिस्थिती उत्तम होती. फक्त त्या उन्हाळ्यापुरते आम्हाला खेड्यात

ऱ्हावे लागणार होते. नंतर सोन्याच्या शिक्षणासाठी आम्ही सेंट पीटरबुर्गला मुक्काम हलवू अथवा परदेशी जाऊ.

"तुम्ही आमच्याबरोबर परदेशी आलात तर ठीक!" कात्या म्हणाली. "तुमच्याविना जंगलात हरवलेल्या मुलीं-सारखी आमची अवस्था होईल!"

"मला तर तुमच्याबरोबर जगाची सफर करायला आवडेल!" किंचित गंभीरपणे आणि किंचित थट्टेने ते म्हणाले.

''खरंच आपण एकत्र मिळून जगाची सफर करू या!" मी म्हणाले. त्यांनी स्मित केले आणि मान हलविली.

"माझ्या आईचं आणि माझ्या स्वतःच्या कामांचं काय करायचं?" त्यांनी विचारले. "पण जाऊ दे, आत्ता तो महत्त्वाचा मुद्दा नाही. तुमचं कसं काय चाललंय ते मला सांगा पाहू. तुम्ही परत झुरत बसत नाही ना?"

ते गेल्यापासून मी स्वतःला वेगवेगळ्या कामांमध्ये गुंतवून घेतले होते आणि उदासपणे बसून रहायचे सोडून दिले होते असे जेव्हा मी त्यांना सांगितले व कात्याने माझ्या म्हणण्याला पुष्टी दिली, तेव्हा त्यांनी माझे लहान बाळाप्रमाणे कौतुक केले; त्यांच्या शब्दांमधून आणि नजरेमधून प्रेमळपणा पाझरत होता. जणू तसे वागण्याचा त्यांचा खास हक्क होता. आणि मला वाटले की, त्यांच्याबरोबर मी खूप स्पष्टवक्ते-पणाने आणि प्रामाणिकपणे वागले पाहिजे होते; मी केलेली प्रत्येक चांगली गोष्ट सांगायला हवे होते व त्यांना कदाचित नाराज करणारी प्रत्येक गोष्ट कबूल करायला पाहिजे होते. जणू ते माझे कबुलीजबाब ऐकणारे धर्मगुरू होते.

संध्याकाळ सुरेख होती म्हणून चहाचे सामान टेबला-

वरून हलविल्यानंतरही आम्ही व्हरांड्यातच बसून राहिलो. संभाषण इतके रंगले होते की, घरातील व आवारातील सर्व मानवी ध्वनी हळूहळू थांबत गेले हे माझ्या ध्यानातच आले नाही. फुलांचा दर्प अधिक उग्र येऊ लागला आणि गवत दवामध्ये न्हाऊन निघाले. जवळच्याच एका फुलझाडामधून बुलबुलाच्या लकेरी ऐकू येऊ लागल्या. पण आमचे आवाज ऐकताच त्या गाण्याच्या लकेरी थांबल्या. तारकांनी भरलेले आकाश आमच्यावर जणू खाली झुकल्यासारखे भासत होते. मुळीच आवाज न करता एक पाकोळी जेव्हा उडत आली आणि माझ्या केसांवर बांधलेल्या पांढऱ्या रुमालाभोवती फडफडू लागली, तेव्हा कुठे अंधार पडल्याचे माझ्या लक्षात आले. मी झटकन भिंतीशी मागे सरले आणि माझ्या तोंडून जवळ जवळ किंकाळी फुटली, पण तेवढ्यात ती पाकोळी जशी आली होती तशीच भर्रदिशी व गुपचूप उडून गेली आणि फळबागेतील संधिप्रकाशात अदृश्य झाली.

"तुमचं पक्रोवस्कोये मला खूप आवडतं," संभाषणामधील स्तब्ध काळात सेर्गेई मिखाइलिच उद्‌गारले. "उरलेलं सगळं आयुष्य इथं तुमच्या व्हरांड्यात बसून घालवायला मला आवडेल."

"मग करा तसं," कात्या म्हणाली.

"तसं घडलं तर छान होईल," ते पुटपुटले, "पण आयुष्य असं बसून रहात नाही."

"तुम्ही लग्न का करत नाही?" कात्याने विचारले. "नवरा म्हणून तुम्ही उत्तम ठराल!"

"कारण मला बसून रहायला आवडतं," हसून ते म्हणाले. "छे:! कातेरिना कार्लोवना, तुमचं आणि माझं

आता लग्नाचं वय राहिलं नाही. संभाव्य नवरा म्हणून माझ्याकडं पहायचं लोकांनी केव्हाच बंद केलंय. मीही तो विचार मनातून काढून टाकला आणि तेव्हापासून खरंच मला छान वाटू लागलं."

त्यांच्या स्वरातील आनंदीपणा खोटा होता असे मला भासले.

"भले! अवघं छत्तीस वय आणि आयुष्य संपलं म्हणे!" कात्या उद्गारली.

"सगळं संपलं," त्यांनी मान्य केले. "मला फक्त बसून ऱ्हायची इच्छा आहे आणि लग्न करायचं म्हटलं तर त्याहून जास्त काही करावं लागतं. ह्यांना तुम्ही विचारायला हवं होतं," माझ्याकडे मानेने निर्देश करीत ते पुढे म्हणाले. "यांच्यासारख्या लोकांनी लग्न केलं पाहिजे. तुम्हाला आणि मला त्यांच्याकडं बघण्यातच सुख लाभेल."

त्यांच्या आवाजात खेदाची आणि ताणाची छटा उमटलेली मला जाणवली. क्षणभर ते गप्प बसले. कात्याने अथवा मी एकही शब्द उच्चारला नाही.

"समजा," खुर्चीत वळत ते पुढे म्हणाले, "एखाद्या सतरा वर्षांच्या मुलीशी लग्न करण्याची माझी इच्छा आहे, ह्या माशाशी म्हणू या, माफ करा–मार्या अलेक्सान्द्रोवनाशी. हे अगदी ठळक उदाहरण आहे. अशा रीतीनं ते पुढं आलं ह्याचा मला आनंद झाला... हे उत्तम उदाहरण आहे."

मी हसू लागले. त्यांना आनंद का झाला होता अथवा "त्या रीतीनं" काय पुढे आले होते हे मला समजले नव्हते.

"तर तुमच्या छातीवर हात ठेवून मला खरं खरं सांगा," चेष्टेच्या सुरात ते मला म्हणाले, "ज्या माणसाचं आयुष्य

सरलं आहे आणि ज्याला नुसतं स्वस्थ बसून रहावंसं वाटतं, अशा म्हाताऱ्याशी स्वतःला बांधून घेणं तुमच्या दृष्टीनं दुर्दैवी ठरणार नाही का? तुमच्या त्या छोट्या डोक्यात असंख्य इच्छा-आकांक्षा दडून बसलेल्या असताना?"

मला शरमल्यासारखे झाले. काय उत्तर द्यावे ते मला सुचेना.

"अर्थात, मी काही तुम्हाला मागणी घालत नाही," हसून ते म्हणाले. "पण संध्याकाळच्या वेळांना तुम्ही बागेतून भटकता तेव्हा माझ्यासारखा नवरा मिळण्याचं स्वप्न तुम्ही नक्कीच पहात नाही. होय की नाही? आणि तसं झालं... तर ते दुर्दैव म्हणावं लागेल. खरं ना?"

"दुर्दैव काही नाही..." मी बोलायला आरंभ केला.

"पण चांगली गोष्टही नव्हे," त्यांनी माझे वाक्य पूर्ण केले.

"नाही, पण माझी कदाचित चूक..."

त्यांनी परत माझे वाक्य अर्ध्यात तोडले.

"पाहिलंत! ह्यांचं अगदी बरोबर आहे आणि यांच्या स्पष्टवक्तेपणाबद्दल, आपल्या ह्या चर्चेबद्दल मी खूप आभारी आहे. माझ्या दृष्टीनंसुद्धा तसं घडणं म्हणजे प्रचंड कमनशीब ठरेल," ते म्हणाले.

"किती विचित्र माणूस आहात तुम्ही! अगदी नेहमी होता तस्सेच अजून आहात," कात्या म्हणाली आणि रात्रीच्या जेवणाची मांडामांड करून घ्यायला घरात गेली.

कात्या निघून गेल्यानंतर आम्ही दोघेही गप्प झालो. भोवतीसुद्धा पूर्ण स्तब्धता पसरली होती. बुलबुल गाऊ लागला. यावेळी त्याचे गाणे अचानक, तुटक नव्हते. संध्याकाळचे गाणे

नव्हते. तर संथ, निवांत असे रात्रीचे गाणे होते. त्या गाण्याचा आवाज सबंध बागेत भरून गेला आणि मग घळी-पलिकडील दुसऱ्या बुलबुलाने प्रतिसाद दिला. त्या संध्याकाळी प्रथम जो गायला होता त्या बुलबुलाने. बागेमधील बुलबुल क्षणभर गाण्याचे थांबला, जणू तो ऐकत होता. आणि मग त्याच्या लकेरी अधिक मोठ्यांदा, तीव्रतेने उमटू लागल्या. आम्हाला अज्ञात असलेल्या त्यांच्या निशाजगतामध्ये त्यांची गाणी ऐटबाज घुमू लागली. रोपट्यांची पैदास करणाऱ्या काचेच्या घराकडे माळी झोपायला गेला. त्याच्या अवजड बुटांचा धपधप आवाज पायवाटेवरून मंद विरत गेला. टेकडीच्या पायथ्याकडून दोनदा कर्कश्य शीळ वाजली आणि पुन्हा सारे स्तब्ध झाले. पाने किंचित सळसळली व सुगंधभरल्या वाऱ्याची झुळूक आमच्या अंगावर आली तेव्हा व्हरांड्याचे छत थरथरले.

जे काही बोलले गेले होते त्यानंतर गप्प बसून राहणे मला अवघड ठरले होते, पण परत संभाषणाला सुरुवात कशी करायची ते मला समजत नव्हते. मी त्यांच्याकडे एक कटाक्ष टाकला. अर्धवट प्रकाशात चमकणारे त्यांचे डोळे माझ्यावरच खिळले होते.

"जगात जगणं किती छान आहे," ते पुटपुटले.

काही कारणाने मी उसासा टाकला.

"काय झालं?" त्यांनी विचारले.

"होय, जगात जगणं छान आहे," त्यांच्याच शब्दांची मी पुनरुक्ती केली.

परत आम्ही गप्प झालो आणि परत मला अवघडल्यासारखे वाटले. ते म्हातारे आहेत असे मान्य करून मी त्यांना दुखावले

असे मला वाटले. त्यांचे सांत्वन करण्याची मला इच्छा होती, पण काय बोलावे तेच मला समजेना.

"बराय्, चलतो मी," उठत ते म्हणाले. "आई जेवणासाठी माझी वाट पहात असेल. आज मी तिला जवळ जवळ भेटलोच नाही."

"पण मी तुम्हाला नवीन सोनाटा वाजवून दाखवणार होते," त्यांच्या जाण्याला मी हरकत घेतली.

"आणखी कधीतरी." त्यांचे उत्तर थंड भासले. "अच्छा!"

मी त्यांचा अपमान केला होता अशी आता माझी खात्री पटली आणि मला खूप वाईट वाटले. कात्या आणि मी त्यांच्याबरोबर फाटकापर्यंत चालत गेलो. त्यांच्या पाठमोऱ्या घोडागाडीकडे आम्ही बराच वेळ टक लावून पहात राहिलो. घोड्याच्या टापा जेव्हा ऐकू येईनाशा झाल्या तेव्हा मी व्हरांड्यात परतले आणि बागेकडे पहात बसले. ओलसर पांढुरक्या धुक्यात रात्रीचे आवाज भरले होते. मी बराच वेळ तेथे बसून स्वप्नरंजनात दंग झाले होते आणि माझे स्वप्न मला खरे भासत होते.

ते दुसऱ्यांदा आले, तिसऱ्यांदा आले व आमच्या विचित्र संभाषणामधून निर्माण झालेले अवघडलेपण संपूर्ण अदृश्य झाले. उन्हाळ्याच्या सगळ्या मोसमात दर आठवड्याला दोन-तीन वेळा ते आम्हाला भेटायला येत राहिले. त्यांच्या भेटींची मला इतकी सवय जडली की, काही काळ जर ते आले नाही तर मला त्यांची फार फार आठवण येत रहायची. मला एकटीला टाकून माझ्याशी ते वाईट वागतात असे मला वाटायचे आणि त्यांचा राग यायचा. जणू काही लाडक्या तरुण साथीदारा-प्रमाणे ते माझ्याशी वागत. मला ते प्रश्न विचारीत, त्यांच्यावर

विश्वास ठेवायला लावीत, मला सल्ला देत, प्रोत्साहन देत, काही वेळा माझी खरडपट्टी काढत आणि माझ्या चुकीच्या भावनिक उमाळ्यांना आवर घालत. पण मला त्यांनी कितीही आपल्या बरोबरीने वागविण्याचे प्रयत्न केले, तरी मला सतत वाटत रहायचे की, त्यांच्याबद्दल जे काही मला ठाऊक होते, त्यापेक्षा खूप काही ठाऊक नव्हते. मला अज्ञात अशा त्यांच्या जगात मला प्रवेश देण्याची आवश्यकता त्यांना भासत नव्हती. त्यांच्या ह्या वागण्यामुळे त्यांच्याकडे मी विशेषरीत्या आकर्षित झाले आणि त्यामुळे त्यांच्याविषयी मला आदर वाटू लागला. कात्याकडून आणि शेजाऱ्यांकडून मला माहिती मिळाली की, त्यांच्याबरोबर राहणाऱ्या त्यांच्या म्हाताऱ्या आईची काळजी घेण्याव्यतिरिक्त, त्यांच्या स्वतःच्या आणि आमच्या इस्टेटीचा कारभार पाहण्याव्यतिरिक्त, आणखी काही सार्वजनिक कार्यांमध्ये ते गुरफटलेले होते व त्यांचा त्यांना बराच त्रास पडत होता. तरीही, ह्या सर्व गोष्टींबद्दल त्यांना काय वाटत होते, किंवा त्यांची मते, त्यांच्या योजना आणि आशा-आकांक्षा काय होत्या, याबद्दल त्यांच्या तोंडून काही वदवून घेण्यात मला मुळीच यश आले नव्हते. त्यांच्या कामांविषयी मी संभाषणाचा ओघ वळविला रे वळविला, की तात्काळ त्यांच्या कपाळाला आठ्या पडत. जणू त्यांना म्हणायचे असे: "तुम्हाला काय करायच्यात त्या भानगडी?" आणि परत एकदा विषय बदलत. प्रथम प्रथम मला अपमान वाटला, पण नंतर केवळ माझ्याशी संबंधित गोष्टींची चर्चा करायची मला एवढी सवय झाली, की मला ते स्वाभाविक वाटू लागले.

आणखी एका गोष्टीचा आरंभी मला राग आला होता, पण तीच गोष्ट नंतर मला आवडू लागली होती: ती म्हणजे

माझ्या दिसण्याविषयी त्यांचे पूर्ण दुर्लक्ष, एवढेच नव्हे तर त्याबद्दल भासणारा तिटकारा. मी सुंदर होते असे शब्दाने वा कटाक्षाने त्यांनी कधीही सूचित केले नाही. उलट, त्यांच्या उपस्थितीत मला जेव्हा सुंदर म्हणण्यात आले तेव्हा त्यांनी आपले नाक मुरडले व ते हसले. उलट माझ्या दिसण्यातील दोष हुडकून मला त्यावरून चिडवायला त्यांना आवडत होते. खास प्रसंगी कात्या जेव्हा मला नवनव्या फॅशनचे फ्रॉक घालून सजवायची आणि तऱ्हेतऱ्हेच्या माझ्या केशरचना करून नटवायची, तेव्हा त्यांच्याकडून मला केवळ माझी कुचेष्टा ऐकायला मिळायची. बिचारी कात्या त्यामुळे दुखावत असे व आरंभी मी खूप शरमिंदी होत असे. त्यांना माझ्याविषयी आकर्षण वाटत होते अशी कात्याची समजूत झाली होती व आपल्या आवडीची स्त्री सजलेली आणि नटलेली पहायला एखाद्या पुरुषाला का आवडत नाही, याचा बिचारीला उलगडा होत नसे. पण मला मात्र लौकरच त्यांना काय हवे होते ते समजले. मी छचोर, नखरेबाज असू नये अशी त्यांची इच्छा होती. जेव्हा मला ही जाणीव झाली तेव्हा माझ्या कपड्यांमधील, केशरचनांमधील, वागण्यामधील छचोरपणाच्या सर्व खुणा तात्काळ नाहीशा झाल्या. त्याऐवजी साधेपणाचा पारदर्शी नखरा अवतरला. कारण अजून मी खरीखुरी साधी वागू शकत नव्हते. त्यांचे माझ्यावर प्रेम होते हे मला ठाऊक होते. पण एक मूल म्हणून अथवा एक स्त्री म्हणून ते माझ्यावर प्रेम करत होते, याबद्दल मी स्वतःला प्रश्न केला नव्हता. फक्त त्यांच्या प्रेमाची कदर करीत होते. जगातील मी सर्वोत्तम तरुणी होते असे त्यांचे मत असल्याचे मला ठाऊक होते आणि त्यांची त्याबाबत फसगत व्हावी असे मला वाटत नव्हते.

म्हणून अनिच्छेने मी त्यांना प्रोत्साहन देत राहिले. मात्र त्यांची फसवणूक करण्याच्या नादात माझ्या स्वतःमध्ये सुधारणा घडली. माझ्या देहापेक्षा माझ्या मनाच्या सौंदर्यांना त्यांच्या-समोर उघडे करण्यात मला अधिक चांगले वाटत होते, अधिक लायक वाटत होते. शारीरिक बाजू – माझे केस, माझे हात आणि तोंड, माझे बरे-वाईट वागणे, ह्या गोष्टी त्यांना माहीत होत्या, एका कटाक्षात जाणून घेता येत होत्या आणि त्यांच्या ह्या जाणीवेत भर घालण्यासाठी मी आणखी काहीच करू शकत नव्हते. पण माझे मन त्यांना माहीत नव्हते, कारण त्यावर ते प्रेम करीत होते, कारण माझे मन अद्याप वाढत आणि विकसत होते; आणि इथेच मी त्यांची फसवणूक करू शकत होते व तशी फसवणूक मी केली. सरतेशेवटी मला हे समजले तेव्हा त्यांच्याबरोबर राहणे किती सोपे ठरले! माझी निराधार शरमिंदी वागणूक आणि अवघडल्या हालचाली पार नाहीशा झाल्या. मला त्यांनी कसेही पाहिले, समोरून अथवा तिरपे, बसलेल्या अगर उभ्या अवस्थेत, उंच वा सखल केशरचनेत, तरी मला ते संपूर्ण पहात असत आणि जशी मी होते तशी पाहण्यात त्यांना समाधान वाटे, असे मला जाणवू लागले. आपल्या सवयीपासून त्यांनी जर फारकत घेतली असती आणि अचानक इतरांप्रमाणे मला सांगितले असते की माझा चेहरा सुंदर होता, तर मला त्याचा मुळीच आनंद झाला नसता. पण माझ्या एखाद्या मतप्रदर्शनानंतर जेव्हा ते माझ्याकडे टक लावून पहात आणि आपल्या मूळ कळकळीच्या आवाजाला सौम्य उपहासाची छटा देऊन "खरंच, तुमच्यात काहीतरी विशेष आहे, तुम्ही फार छान मुलगी आहात हे मला मान्य

केलं पाहिजे," असे म्हणत तेव्हा मला अपार आनंद होई व खूप हलके हलके वाटे.

माझे अंतःकरण अभिमानाने आणि आनंदाने भरून टाकणारी ही बक्षिसे मला कशामुळे मिळाली? म्हाताऱ्या ग्रिगोरीचे त्याच्या नातीवरील प्रेम पाहून माझे मन गलबलून गेले असे मी सांगितले म्हणून? किंवा मी वाचत असलेल्या एखाद्या कवितेने अथवा कादंबरीने माझ्या डोळयांमध्ये पाणी तरारले म्हणून? अथवा श्चूलहॉफपेक्षा मला मोझार्ट जास्त आवडत होता म्हणून? जे चांगले आणि प्रेम करण्यायोग्य होते ते सर्व पटकन ओळखण्याचे कसब माझ्या अंगी होते, पण चांगले काय होते आणि कशावर प्रेम करावे याची मला अजिबात कल्पना नव्हती हे मात्र मला विलक्षण वाटत होते.

माझ्या अनेक आवडी-निवडी आणि सवयी सेर्गेई मिखाइलिचना आवडत नव्हत्या. त्यांच्या केवळ एका कटाक्षाने अथवा भुवईच्या किंचित हालचालीने त्यांची नापसंती मला समजायची. त्यांचा चेहरा जरासा खिन्न दिसला, त्यांच्या चेहऱ्यावर किंचित तिरसट भाव उमटला, की माझी आवड बदलायला मला वेळ लागायचा नाही. काही वेळा त्यांनी मला सल्ला द्यायला आरंभ करण्याआधीच त्यांचे बोलणे मी तर्काने जाणायची. किंवा माझ्या डोळयांमध्ये एकटक पाहून माझ्या तोंडून त्यांना हवा तो विचार ते वदवून घेत. अशा वेळी कोणतेही माझे विचार, कोणत्याही माझ्या भावना, माझ्या स्वतःच्या नसत. ते विचार, त्या भावना त्यांच्या असत, पण एकाएकी त्या माझ्या बनत. माझ्या आयुष्यात प्रवेश करून त्यांनी त्याला उजळून टाकले होते. नकळत मी सर्व गोष्टींकडे वेगळ्या डोळयांनी पाहू लागले — कात्याकडे, सोन्याकडे, आमच्या

नोकरांकडे, माझ्या स्वतःकडे आणि माझ्या उद्योगांकडे. यापूर्वी मी वाचायची ते केवळ कंटाळा घालविण्यासाठी. पण आता पुस्तके माझ्या जीवनातील सर्वोत्तम आनंद बनली. याचे कारण आम्ही एकत्रपणे पुस्तके वाचत होतो, त्यांच्यावर चर्चा करीत होतो व ते मला नवनवी पुस्तके आणून देत होते.

पूर्वी सोन्याच्या धड्यांकडे लक्ष देणे आणि तिला शिकविणे मी केवळ कर्तव्यभावनेमधून करीत होते. मला ते फार कठीण जायचे. पण एक दिवस धड्याच्या वेळी ते हजर राहिले आणि सोन्याची प्रगती पाहण्यात मला आनंद वाटू लागला. यापूर्वी संगीताचा संपूर्ण तुकडा पियानोवर वाजवायला शिकणे मला अशक्य भासायचे, पण आता मात्र माझे पियानोवादन ते ऐकतील आणि कदाचित त्याची स्तुती करतील ह्या विचाराने एकच एक तुकडा मी चाळीस चाळीस वेळा घोटू लागले. बिचाऱ्या कात्याला आपल्या कानांमध्ये कापसाचे बोळे कोंबावे लागले, पण तरीही माझा पियानोवादनाचा सराव चालूच राहिला. जुने सोनाटा आता वेगळे भासू लागले. माझ्या बोटांमधून अधिक चांगले उमटू लागले. मला माहीत असलेली आणि स्वतःप्रमाणे जिच्यावर मी प्रेम करीत होते ती कात्या-सुद्धा माझ्या नजरेला वेगळी दिसू लागली. तिने आमची माता, मैत्रीण आणि गुलाम म्हणून आमच्यासाठी राबायचे काही कारण नव्हते याची आत्ता कोठे मला जाणीव झाली. ती किती निःस्वार्थी, निष्ठावंत आणि प्रेमळ होती याची कल्पना आली. मी तिची किती ऋणी होते हे मला समजले आणि तिच्यावर मी अधिकच प्रेम करू लागले. आमच्या शेतकऱ्यांकडे, घरामधील भूदासांकडे, घरातील नोकरांकडे आणि मुलींकडे पूर्वीपेक्षा अगदी वेगळ्या दृष्टीमधून

पहायला त्यांनी मला शिकविले. ऐकायला विचित्र वाटेल, पण मी सतरा वर्षांची होईपर्यंत, ज्या लोकांमध्ये रहात होते ते मला परके भासत. मी पुस्तकांमध्ये वाचलेल्या लोकांपेक्षाही ते दूरचे भासत. माझ्याप्रमाणे त्यांनाही प्रेम, इच्छा, खेद इत्यादी भावना होत्या असा साधा विचारही माझ्या मनाला कधी शिवला नव्हता. खूप पूर्वीपासून मला ठाऊक असलेल्या रायांना आणि शेतांना माझ्या दृष्टीने एकदम नवेपण व सुंदरता प्राप्त झाली. दुसऱ्यांसाठी जगण्यात आयुष्यातील एकमेव खरे सुख सामावले आहे असे सेर्गेई मिखाइलिच म्हणाले ते अगदी खरे होते. त्यावेळी मला त्यांचे बोलणे विचित्र वाटले होते. मला त्याचा आशय समजला नव्हता. पण जाणीव न होताही ही धारणा माझ्या अंतःकरणात मूळ धरून गेली होती. माझ्या जीवनाचा क्रम न बदलता आणि प्रत्येक ठशावर स्वतःचा ठसा उमटवण्याशिवाय दुसरी कसलीही भर न घालता, माझ्या-भोवतालचे संपूर्ण आनंदी जग त्यांनी माझ्यापुढे उघडले होते. ह्या गोष्टी माझ्या बालपणापासून माझ्या भोवताली होत्या, पण त्या मुक्या होत्या. पण त्यांचे माझ्या जीवनात आगमन झाले व त्या सर्व गोष्टी बोलू लागल्या, माझ्या अंतःकरणात प्रवेश शोधू लागल्या, माझ्या मनाला आनंदी करू लागल्या.

त्या उन्हाळ्यात अनेकदा मी माझ्या वरच्या खोलीत जाऊन पडून रहायची. वसंताच्या मोसमामुळे भविष्याबद्दल मनात उमटणाऱ्या पूर्वीच्या आशा-आकांक्षांऐवजी माझे मन वर्तमाना-तील आनंदाच्या उत्साहाने भरून जायचे. मला झोप लागत नसे. मग उठून कात्याच्या बिछान्यापाशी जायची आणि मी खूप सुखात असल्याचे तिला सांगायची. आता जेव्हा मी मागे वळून त्या घटनांकडे पाहते तेव्हा जाणवते की, तिला मी

तसे सांगायची गरज नव्हती. तिचे तिलाच सर्व स्पष्ट दिसत होते. ती मला सांगायची की, तिच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या होत्या, ती खूप आनंदात होती आणि मग ती माझे चुंबन घ्यायची. माझा तिच्यावर विश्वास बसायचा. प्रत्येकाने सुखी असणे योग्य आणि न्याय्य होते असे मला वाटायचे. पण कात्या झोपूही शकत होती. काहीवेळा तर ती रागाचा बहाणा करून मला दूर घालवून द्यायची, स्वत:ला झोप मिळावी म्हणून! मग खूप वेळपर्यंत मला आनंदी करणाऱ्या गोष्टींवर मी विचार करीत बसायची. काहीवेळा उठून माझ्या प्रार्थना मी दुसऱ्यांदा म्हणायची... माझ्या स्वत:च्या शब्दांमध्ये मी प्रार्थना करायची. देवाने मला देऊ केलेल्या सर्व सुखांबद्दल मी त्याचे आभार मानायची. कात्याच्या संथ श्वासोच्छ्वासाविना आणि तिच्याजवळच्या घड्याळाच्या टिकटिकीविना आमच्या छोट्या खोलीत दुसरा कसलाही आवाज ऐकू येत नसे. पण तरीही मला झोप यायची नाही. मी तळमळत रहायची, प्रार्थना पुटपुटायची, क्रूस-चिन्हे करायची, माझ्या गळयातील क्रूसाची चुंबने घ्यायची. दारे बंद असत, खिडक्यांवर झडपा ओढलेल्या असत आणि एखादा डास अथवा माशी एकाच जागी गुणगुणत रहात. ती खोली सोडून कुठेही कधीही जाऊ नये, सकाळ कधीही होऊ नये, माझ्याभोवतालचे ते आत्मिक एकांतवासाचे वातावरण कधीही नष्ट होऊ नये, असे मला वाटत रहायचे. त्या अंधारात माझी स्वप्ने, माझे विचार, माझ्या प्रार्थना माझ्याबरोबर सजीव प्राण्यांप्रमाणे अस्तित्वात होत्या अशी कल्पना मी करायची. माझ्या बिछान्याभोवती त्या फडफडत होत्या, माझ्यावर त्या घिरट्या घालत होत्या असे मला वाटायचे. आणि प्रत्येक विचार त्यांचा विचार होता, प्रत्येक

भावना त्यांची भावना होती. ह्यालाच प्रेम म्हणतात हे तेव्हा मला उमजले नाही. ही कुठल्याही वेळी आपोआप उमटणारी केवळ एक भावना होती असे मला वाटले.

३

कापणीच्या हंगामात एके दिवशी कात्या आणि मी दुपारच्या जेवणानंतर सोन्याला सांगाती घेऊन बागेत गेलो. घळीच्या टोकाला उभ्या असलेल्या लिंबोणीच्या झाडांच्या सावलीत आमच्या आवडत्या बाकावर आम्ही बसलो. तेथून पलिकडच्या जंगलाचा आणि शेतांचा देखावा दिसत होता. गेले तीन दिवस सेर्गेई मिखाइलिच आमच्या भेटीला आले नव्हते आणि आम्ही त्यांची विशेष उत्कंठेने वाट पहात होतो, कारण आमच्या शेतांची पाहणी करायला येण्याचा आपला इरादा त्यांनी आमच्या बेलिफापाशी बोलून दाखविला होता. एक वाजून गेल्यानंतर थोड्याच वेळात रायच्या पिकामधून घोड्यावर स्वार झालेली त्यांची आकृती आमच्या नजरेला पडली. त्यांची आवडती नासपातीची आणि चेरीची फळे कात्या बरोबर घेऊन आली होती. मग तिने माझ्याकडे पाहून स्मित केले आणि बाकावर आडवे होऊन ती झोपी गेली. रसदार पानांची लिंबोणीची एक डहाळी मी मोडून घेतली. तिच्या सालीचा ओलसरपणा हाताला जाणवत होता. त्या डहाळीने कात्याला वारा घालीत मी वाचन पुढे चालू केले, पण शेतांमधून ज्या वाटेने ते येणार होते त्या वाटेकडे अधूनमधून मी उत्कंठेने कटाक्ष फेकीत होते. एका जुन्या लिंबोणीच्या मुळांपाशी आपल्या बाहुल्यांसाठी घर बांधण्यात सोन्या रमली होती.

हवेत उष्मा आणि दमटपणा होता. वारा अजिबात पडला होता. सकाळपासून काळ्या मेघांची दाटी वाढत होती आणि पाऊस कोसळण्याची शक्यता होती. वादळी पावसाआधी मी नेहमीच घाबरीघुबरी होते त्याप्रमाणे भेदरलेली होते. पण माध्यान्हानंतर काळे मेघ क्षितिजाकडे माघारी गेले आणि स्वच्छ आकाशात सूर्य तळपू लागला. आता एका दिशेने मेघांचा गडगडाट ऐकू येत होता आणि क्षितिजावर शेतांच्या धुळीत जेथे अवजड मेघ मिसळून गेले होते तेथे फिकट विद्युल्लेखा मधून मधून चमकत होत्या. निदान आमच्या परिसरात त्या दिवशी वादळी पाऊस पडणार नव्हता हे स्पष्ट झाले होते. बागेपलिकडे दिसणाऱ्या रस्त्याच्या पट्ट्यांना न्याहाळत मी बसले होते. धान्याच्या पेंढ्यांनी शिगोशीग लादलेल्या गाड्या मंद गतीने करकर आवाज करीत घराच्या दिशेने जात होत्या, तर उलट दिशेने रिकाम्या गाड्या खडखडाट करीत धावत येत होत्या. त्या धावणाऱ्या गाड्यांमध्ये बसलेल्या लोकांना हादरे बसत होते, त्यांचे पाय लोंबकळत होते व त्यांचे सदरे फडफडत होते. दाट धूळ उडून जात नव्हती आणि खाली जमिनीवरही बसत नव्हती. काठ्यांच्या कुंपणावर आणि फळबागेतील पानांवर ती धूळ ओठंगून राहिली होती. आणखी थोड्या अंतरापलिकडे गंजींच्या आवारामधून त्याच लोकांचे आवाज ऐकू येत होते, तीच चाकांची करकर ऐकू येत होती, त्याच पिवळट पेंढ्या दिसत होत्या. प्रथम कुंपणासरशी मंद गतीने सरकताना त्या दिसत, मग अंडाकृती घरांचे ढिगारे नजरेला पडत. त्या ढिगांच्या टोकदार छपरांवर शेतगड्यांची गर्दी बसलेली असे. आणि माझ्यासमोरच्या धुळकट शेतात गाड्यांची हालचाल दिसत असे. पुन्हा माझ्या दृष्टीला पिवळ्या

पेंढ्या दिसत, गाड्यांचे आवाज मला ऐकू येत, माणसांचे आवाज कानी पडत, त्यांची गाणी ऐकायला येत. एका बाजूला कापणी झालेल्या, खुंट उरलेल्या जमिनीचा भाग विस्तारत चालला होता. शेतांच्या सीमा दाखविणारे कडू दवण्याचे पट्टे त्या भुंड्या जमिनीवर उठून दिसत होते. खाली उजव्या अंगाला, कापलेल्या, विस्कटलेल्या शेतात पेंढ्या बांधणाऱ्या रंगीबेरंगी कपड्यांमधल्या किसान महिला मला दिसत होत्या. त्या ओणव्या झाल्या होत्या, त्यांचे हात सतत पुढे-मागे हालचाल करीत होते. जशा त्या पुढे सरकत होत्या तसे शेत नीटस दिसत होते, व्यवस्थित बांधलेल्या पेंढ्यांच्या रांगा उभ्या झालेल्या दिसत होत्या. माझ्या डोळ्यांदेखत उन्हाळ्याच्या मोसमाचे शरदामध्ये रूपांतर घडत होते. फळबागेतील आमच्या ह्या आवडत्या जागेव्यतिरिक्त सगळीकडे उष्मा आणि धुळकट वातावरण जाणवत होते. आमच्या भोवताली सर्व दिशांना पसरलेल्या ह्या धुळीच्या आणि उष्णतेच्या वातावरणात, तळपणाऱ्या उन्हात राबणाऱ्या शेतकऱ्यांचा गलका ऐकू येत होता.

पांढरास्वच्छ सुती रुमाल तोंडावर पांघरून आमच्या थंडगार बाकड्यावर कात्या सुखाने घोरत होती! बशीमधील चेरीची फळे रसाळ आणि काळी चकचकीत दिसत होती! आमचे फ्रॉक ताजे आणि स्वच्छ होते! सूर्यप्रकाशात खुज्यामधील ताजे स्वच्छ पाणी चमचमत होते! मला खूप छान वाटत होते! "काय करावं बरं याला?" मी विचार केला. "मी एवढी सुखात आहे हा माझा दोष आहे काय? पण माझं सुख मी कसं वाटू? कुणाला मी माझं सर्वस्व वाहू? माझं सगळं सुख देऊ?"

वाटेवरील दुतर्फा उभ्या असलेल्या भोजांच्या शेंड्यांखाली सूर्य एव्हाना झुकला होता. त्याच्या तिरप्या किरणांमध्ये दूरवरच्या गोष्टी अधिक तेजस्वी आणि स्पष्ट दिसत होत्या. शेतांवर धूळ खाली बसत होती. काळे मेघ पार विरळ झाले होते. खेड्यापलिकडील गंजींच्या आवारात तीन नवे ढीग माझ्या दृष्टीला पडत होते. त्यांच्यावरून शेतगडी केव्हाच खाली उतरले होते. गाड्या दौडत निघून गेल्या होत्या. बहुधा त्यांची ती शेवटली खेप होती. त्यांच्यामध्ये बसलेले लोक गोंगाट करीत होते. दांताळी खांद्यांवर टाकून आणि कमरपट्ट्यांमध्ये खुरपी खोवून उंच स्वरात गाणी गात बायका घरी गेल्या. पण तरीही सेर्गेई मिखाइलिच यांचा अजून पत्ता नव्हता. खरे म्हणजे खूप वेळापूर्वी घोड्यावरून टेकडी उतरताना ते मला दिसले होते. मग अचानक, मला अगदी अनपेक्षित अशा दिशेने, त्यांची आकृती अवतरली (घळीच्या बाजूने वळसा घालून ते आले होते). आनंदी, स्मितभरल्या मुद्रेने, हाती टोपी धरून ते माझ्याकडे वेगाने ढांगा टाकीत येत होते. कात्या झोपलेली होती हे जेव्हा त्यांनी पाहिले, तेव्हा त्यांनी आपला ओठ चावला, डोळे किलकिले केले आणि चोरपावलांनी चालायला आरंभ केला. ते मनस्वी उत्साही मन:स्थितीत होते याची मला जाणीव झाली. त्यांची ही मन:स्थिती मला खूप आवडायची. तिला आम्ही "बेबंद उन्माद" म्हणत असू. शाळा चुकवून आलेल्या मुलासारखे ते वागत होते. त्यांच्या रोमरोमामधून आनंद, सुख आणि बालसुलभ उत्साह उमटत होता.

"माझ्या लाडक्या छोटुकल्या फुला, कसं काय? छान वाटतंय?" माझा हात दाबीत अस्फुट आवाजात त्यांनी विचारले. "मी झकास आहे" माझ्या प्रश्नाला त्यांनी उत्तर

दिले. "आज मला तेरा वर्षं पुरी झाली... लपंडाव खेळावासा वाटतोय आणि झाडांवर चढायची इच्छा होतेय!"

"बेबंद उन्माद?" त्यांच्या हसऱ्या डोळ्यांमध्ये पहात मी विचारले. त्यांच्या ह्या **बेबंद उन्मादाची बाधा** मलाही होऊ लागल्याचे मला जाणवले.

"हो" डोळा मारीत आणि न हसण्याचा प्रयत्न करीत ते उत्तरले. "पण कातेरिना कार्लोवनाच्या नाकावर मारायचं काय कारण?"

त्यांच्याकडे पहात असताना एका हाताने डहाळी हलविण्याचा माझा उद्योग चालूच होता व नकळत मी कात्याच्या तोंडावरचा रुमाल उडवला होता आणि डहाळीची पाने तिच्या तोंडाला स्पर्शत होती इकडे माझे लक्षच नव्हते. मी हसले.

"ती म्हणेल की ती झोपलीच नव्हती," जणू कात्या जागी होऊ नये म्हणून मी दबत्या आवाजात म्हणाले. पण खरे ते कारण नव्हते. त्यांच्याबरोबर दबत्या आवाजात बोलण्यात मला सुख वाटत होते.

त्यांनी नुसतेच ओठ हलवून मला चिडविले. जणू मी एवढ्या अस्पष्ट आवाजात बोलत होते, की त्यांना काहीच ऐकू येत नव्हते. मग चेरींनी भरलेली बशी पाहताच त्यांनी ती चोरल्याचा बहाणा केला व लिंबोणीखाली खेळणाऱ्या सोन्याजवळ जाऊन तिच्या बाहुल्यांपाशी त्यांनी बैटक मारली. प्रथम सोन्या चिडली, पण लौकरच त्यांनी तिला स्वतःबरोबर खेळायला लावून आपलीशी केली. सर्वांत वेगाने चेरी कोण मटकावतो हा त्यांचा खेळ होता.

"मी आणखी चेरी आणायला सांगत्ये," मी म्हणाले, "किंवा तुम्हाला हवं असेल तर आपण स्वतःच जाऊन घेऊन येऊ."

त्यांनी रिकाम्या बशीत बाहुल्या ठेवल्या आणि आम्ही फळबागेकडे गेलो. सोन्या आमच्या पाठी धावत येत होती. आपल्या बाहुल्या परत मिळाव्या म्हणून त्यांच्या कोटाला धरून खेचत होती. त्यांनी तिच्या बाहुल्या परत केल्या आणि माझ्याकडे वळून गंभीरपणे ते म्हणाले :

"तुम्ही खरंच छोटचा जांभळया फुलासारख्या आहात!" अजूनही ते अस्फुट आवाजात बोलत होते. खरे म्हणजे तेथे कुणाला जागे करण्याची भीती नव्हती. "त्या सगळया धुळी-तून, उन्हातून, कामाच्या घाईगर्दीतून जेव्हा मी तुमच्यापाशी आलो, तेव्हा मला जणू जांभळया फुलांचा गंध जाणवला— बागेतल्या सुगंधासारखा नव्हे! तर पहिल्या छोटचा गडद कळयांचा! वितळत्या बर्फाचा आणि वासंतिक गवताचा वास देणाऱ्या!"

"कापणीचं काम कसं चाललंय?" त्यांच्या शब्दांनी माझ्या मनात उमटलेला गोड गोंधळ लपविण्यासाठी मी विचारले.

"उत्तम! ही माणसं सर्व काही उत्तम पार पाडतात. त्यांची ओळख जेवढी जास्त होते, तेवढी ती जास्त आवडू लागतात."

"खरंच," मी म्हणाले. "तुम्ही येण्यापूर्वी मी बागेत बसून त्यांचं काम पहात होते आणि अचानक शरम वाटली की, ती माणसं राबत होती, पण मी—"

"थांबा, हा फुका अभिमान बाळगू नका," मला एकदम अडवीत गंभीरपणे ते म्हणाले. पण त्यांच्या नजरेत मात्र प्रेमळ भाव होता. "ही पवित्र बाब आहे. कुठल्याही परिस्थि-तीत तुम्ही अशा भावनांचा डौल दाखवू नका."

"पण फक्त **तुमच्यापाशीच** मी असं बोलले!"

"ते मला माहीत आहे. बरं, त्या चेरींचं काय झालं?"

फळबागेच्या फाटकाला कुलूप होते व एकही माळी आसपास दिसत नव्हता (कापणीच्या कामात मदत करायला त्यांनी सर्वांना शेतावर धाडले होते). किल्ली आणण्यासाठी सोन्या धावली, पण ती परतण्याची वाट पाहण्याऐवजी ते भिंतीवर चढले, त्यांनी जाळी वर उचलली आणि दुसऱ्या बाजूस उडी मारली.

"तुम्हाला चेरी हव्यात?" त्यांनी ओरडून विचारले. "बशी द्या माझ्यापाशी."

"नाही, मी स्वतःच तोडणार आहे. मी किल्ली आणायला जाते. सोन्याला ती कधीच सापडणार नाही."

पण त्याचवेळी ते काय करतात हे पाहण्याची माझी इच्छा होती. आपल्याला कुणी पहात नाही अशी समजूत असताना ते कसे वागतात, कसे दिसतात हे मला पहायचे होते. खरे म्हणजे त्यांना क्षणभरही दृष्टीआड करायला मी तयार नव्हते. जाळींमधून भिंतीभोवती धावत मी वळसा घातला आणि दुसऱ्या बाजूला सखल भिंत होती तेथे गेले. एका रिकाम्या टबावर मी उभी राहिले तेव्हा भिंतीची वरची कडा माझ्या छातीपर्यंत पोहचत होती. तिच्यावरून वाकून मी आत डोकावले. जुन्या गाठाळलेल्या झाडांमधून माझी चौकस नजर भिरभिरली. झाडांच्या रुंद, टोकदार पानांखाली रसाळ काळ्या चेरी लगडल्या होत्या. जाळीमधून मी डोके खुपसले आणि एका गाठाळ झाडाखालून सेर्गेई मिखाइलिचना मी पाहिले. मी निघून गेले होते व कुणीही त्यांना पहात नव्हते अशी त्यांची समजूत झाली असावी. त्यांनी आपली टोपी डोक्यावरून काढली होती, एका जुन्या झाडाच्या छायेत ते विसावले होते, त्यांनी आपले

डोळे मिटून घेतले होते आणि चेरीच्या चिकाचा चेंडू बनविण्याचा त्यांचा चाळा चालला होता. एकदम त्यांनी खांद्यांना झटका दिला, आपले डोळे उघडले, स्मित केले आणि ते काहीतरी पुटपुटले. तो शब्द आणि ते स्मित नेहमीपेक्षा अगदी वेगळे होते. म्हणून त्यांच्यावर चोरून पाळत ठेवल्याची मला लाज वाटली. "माशा" असा शब्द त्यांनी उच्चारल्याचे मला भासले. "असं शक्य नाही," मी मनाशी विचार केला. मग त्यांनी पुन्हा म्हटले, "लाडके माशा!" अधिक हळुवारपणे आणि अधिक नाजुकपणे. यावेळी हे दोन शब्द मला स्पष्ट ऐकू आले. माझे काळीज जोरजोराने धडधडू लागले आणि अंतःकरणात एवढी जबरदस्त आनंदाची ऊर्मी उसळली की, खाली पडू नये म्हणून दोन्ही हातांनी भिंत गच्च धरून ठेवणे मला भाग पडले.

पण त्यांना माझी चाहूल लागलीच आणि दचकून त्यांनी मान फिरवून मागे पाहिले. त्यांची नजर खाली झुकली आणि मुलीप्रमाणे त्यांचा चेहरा लाजेने लालबुंद झाला. मला उद्देशून त्यांना काहीतरी बोलायचे होते, पण ते त्यांना जमले नाही. फक्त लालबुंद चेहऱ्याने ते तसेच उभे राहिले. तशाही अवस्थेत माझ्याकडे पहात त्यांनी स्मित केले. मीही स्मित केले. त्यांची सारी मुद्रा आनंदाने चमकत होती. माझ्या दृष्टीने इतःपर ते माझ्याहून वडील आणि मला शिकविणारे वयस्क, कौटुंबिक स्नेही राहिले नव्हते. आता ते माझ्या बरोबरीचे होते. माझ्यावर प्रेम करणारा आणि मला घाबरणारा माणूस. ज्याच्यावर मी प्रेम करीत होते आणि ज्याला मी घाबरत होते असा माणूस. काहीही न बोलता केवळ एकमेकांकडे टक लावून पहात आम्ही उभे राहिलो. पण अचानक त्यांच्या कपाळाला

आठ्या पडल्या, त्यांच्या डोळयांमधील स्मित आणि तेज अदृश्य झाले. पुन्हा एकदा वडीलधाऱ्या जुन्या स्वरात थंडपणे ते माझ्याशी बोलले. जणू आम्ही काहीतरी अयोग्य करीत होतो आणि आता स्वत:ला सावरून घेऊन मलाही त्याप्रमाणे वागायला सांगत होते.

"तुम्ही पडाल, खाली उतरा बघू," ते म्हणाले. "आणि केस व्यवस्थित करा. काय अवतार झालाय!"

"असा का बहाणा करतात? का मला दुखावतात?" माझ्या मनात चिडीने विचार आला. त्यांना पुन्हा एकदा शरमिंदे करण्याची आणि त्यांच्यावरील माझा प्रभाव अजमावून पाहण्याची त्या क्षणी मला अनिवार इच्छा झाली.

"नाही, मला स्वत:ला काही चेरी तोडायच्या आहेत," मी म्हणाले आणि जवळच्या एका फांदीचा आधार पकडून मी भिंतीवर उडी मारली. त्यांनी मला हात देण्याआधीच मी फळबागेत उडी घेतली होती.

"काय हा मूर्खपणा!" पुन्हा लाजत आणि रागाच्या बहाण्याखाली स्वत:चा गोंधळ लपविण्याचा प्रयत्न करीत ते उद्गारले. "तुम्ही स्वत:ला दुखापत करून घेतली असतीत. आणि आता इथून बाहेर कसं पडणार?"

पूर्वीपेक्षाही जास्त ते शरमिंदे झाले होते, पण आता त्यांचा शरमिंदेपणा पाहून मला आनंद झाला नाही. उलट भीतीच वाटली. आता शरमिंदे होण्याची माझी पाळी होती. लाजून मी त्यांची नजर टाळली. गोंधळल्या मन:स्थितीत मी चेरीची फळे तोडू लागले, पण फळे ठेवायला माझ्यापाशी काहीच नव्हते. मी स्वत:वरच चडफडले आणि माझ्या कृत्याचा मला पश्चात्ताप झाला. अशी खोडी करून मी त्यांच्या नजरेतून

कायमची उतरले होते अशी मला भीती वाटत होती. आम्ही दोघेही गप्प होतो. तेवढ्यात किल्ली घेऊन सोन्या धावत आली आणि आम्हा दोघांची त्या अवघड परिस्थितीमधून सुटका झाली. खूप वेळपर्यंत आम्ही एकमेकांना काहीच सांगितले नाही. फक्त सोन्याशी आम्ही बोलत राहिलो. जेव्हा आम्ही कात्यापाशी गेलो तेव्हा तिने खात्रीपूर्वक आम्हाला सांगितले की, ती मुळीच झोपली नव्हती आणि तिने सर्व काही ऐकले होते. मी तात्काळ गांभिर्य धारण केले आणि त्यांनी आपली रक्षक, पितृसदृश भूमिका घेण्याचा आव आणला. पण तसे करणे त्यांना अवघड ठरले आणि माझी फसवणूक झाली नाही.

काही दिवसांपूर्वी आमच्यात झालेला संवाद मला एकदम ठळकपणे आठवला. कात्या म्हणाली होती की, प्रेम करणे आणि आपल्या प्रेमाला व्यक्त करणे स्त्रीपेक्षा पुरुषाला अधिक सोपे जाते.

"आपण प्रेम करतो असं पुरुष म्हणू शकतो, पण स्त्रीला तसं जमत नाही," ती म्हणाली होती.

"पण मला वाटतं की, आपण प्रेम करतो असं पुरुषही सांगू शकत नाही आणि तसं त्यानं सांगू नये," ते उत्तरले होते.

"का म्हणून?" मी विचारले होते.

"कारण ते नेहमीच खोटं असेल. आपण प्रेमात आहोत असं सांगणं हा पुरुषाला साक्षात्कार होतो का? जणू काही तो असं म्हणताच, काहीतरी 'खट्ट' होतं आणि तो प्रेम करतो. जणू काही तसं म्हटल्यामुळं प्रचंड उलथापालथ घडते, किंवा हजार तोफांमधून बत्ती शिलगावल्याचा परिणाम घडतो." ते पुढे म्हणाले होते: "मला असं वाटतं की, 'मी तुमच्यावर

प्रेम करतो' असं गंभीरपणं घोषित करणारी माणसं स्वतःची फसवणूक करतात, अथवा सर्वांत वाईट म्हणजे दुसऱ्यांना फसवतात."

"पण पुरुषानं सांगितल्याशिवाय स्त्रीला त्याचं तिच्यावरचं प्रेम कळायचं कसं?" कात्याने विचारले.

"ते मला सांगता येत नाही," ते उत्तरले. "प्रत्येक व्यक्तीचे स्वतःचे शब्द असतात. जर भावना असेल, तर ती व्यक्त होईल. जेव्हा मी कादंबऱ्या वाचतो तेव्हा नेहमी डोळ्यांसमोर दृश्य आणतो की, 'एलेनोरा, माझं तुझ्यावर प्रेम आहे!' असं म्हणताना लेफ्टनंट स्त्रेल्स्की अथवा आल्फ्रेडच्या मुद्रेवर केवढा गोंधळलेला भाव असेल. काहीतरी अघटित घडावे असा विचार त्यावेळी मनात येतो, पण त्याला किंवा तिला काहीच होत नाही. त्यांचे नाक-डोळे आणि इतर सर्व गोष्टी जिथल्या तिथंच राहतात."

त्यांच्या विनोदामागे काहीतरी गंभीर लपले होते, माझ्या-संबंधात त्यांना काहीतरी अभिप्रेत होते, असे मला तेव्हा जाणवले होते. पण कादंबऱ्यांच्या नायकांविषयी अशी थट्टा कात्या खपवून घेणार नव्हती.

"नेहमी परस्परविरोधी बोलता!" ती म्हणाली. "आता कबूल करा—तुमचं प्रेम होतं असं एखाद्या स्त्रीला तुम्ही कधीही सांगितलं नाही?"

"कधीही नाही आणि मी कधीही एक गुडघा टेकवून खाली झुकलो नाही," हसत ते उत्तरले, "आणि कधीही झुकणार नाही."

"ते माझ्यावर प्रेम करतात हे त्यांनी मला सांगायचं कारण नाही," ते संभाषण आठवून आता माझ्या मनात विचार

आला. "त्यांचं माझ्यावर प्रेम आहे—मला ठाऊक आहे. आणि बेफिकीर राहण्याचा त्यांचा प्रयत्न माझी दिशाभूल करू शकणार नाही."

त्या सबंध संध्याकाळच्या दरम्यान ते माझ्याशी अगदी कमी बोलले. पण कात्याशी आणि सोन्याशी बोललेल्या त्यांच्या प्रत्येक शब्दामधून, त्यांच्या प्रत्येक कटाक्षामधून आणि हालचाली-मधून, मी प्रेम वाचत होते, निःसंशयपणे वाचत होते. मात्र, सर्व काही स्पष्ट असताना, सर्व काही अत्यंत सोपे आणि कमालीचे आनंददायक घडण्याची शक्यता असताना, आपल्या भावना लपवून थंडपणाचा आव त्यांनी आणावा, याचा मला खूप राग आला होता व त्याबद्दल त्यांची कीवही आली होती. पण फळबागेत मी मारलेली उडी माझ्या मनाला खात होती. जणू माझ्या हातून फार मोठा गुन्हा घडल्यासारखे वाटत होते. माझ्याविषयीचा त्यांच्या मनातील आदर नष्ट झाला होता आणि माझ्यावर ते रागावले होते असे भासत होते.

जेवणानंतर मी पियानोपाशी गेले. ते माझ्या पाठोपाठ आले.

"काहीतरी वाजवा," दिवाणखान्यात मला गाठत ते म्हणाले. "फारा दिवसात तुमचं वाजवणं मी ऐकलं नाही."

"माझी इच्छा होती... सेर्गेई मिखाइलिच!" त्यांच्या डोळ्यांमध्ये थेट पहात एकदम मी म्हणाले. "माझ्यावर रागावला तर नाहीत?"

"कशाबद्दल?"

"जेवणानंतर मी तुमचं ऐकलं नाही म्हणून," लाजत मी म्हणाले.

त्यांना माझ्या बोलण्यातील आशय उमगला आणि स्मितपूर्वक त्यांनी मान हलविली. त्यांची नजर म्हणत होती की, त्यांनी माझी चांगली खरडपट्टी घ्यायला पाहिजे होती, पण तसे वागण्यास त्यांचे अंतःकरण धजावले नव्हते.

"तर मग सगळं ठीक आहे आणि आपली परत मैत्री झाली?" पियानोपाशी बसत मी म्हणाले.

"तसं वाटतं मला!" ते म्हणाले.

उंच छताच्या त्या मोठ्या दिवाणखान्यात पियानोवर ठेवलेल्या फक्त दोन मेणबत्त्या जळत होत्या. बाकीची खोली अर्धवट अंधारी होती. उघड्या खिडक्यांमधून नितळ, तेजस्वी उन्हाळी रात्र दिसत होती. सर्व काही शांत शांत होते. फक्त बैठकीच्या अंधाऱ्या खोलीत कात्याच्या पायांखाली तक्तपोशीच्या फळ्या करकरत होत्या व खिडकीखाली बांधलेला सेर्गेई मिखाइलिच यांचा घोडा अधूनमधून खिंकाळत होता व पाय आपटीत होता.

मी त्यांना पाहू शकत नव्हते, कारण ते माझ्या पाठीशी बसले होते. पण त्या सावटभरल्या खोलीत त्यांचे अस्तित्व मला सर्वत्र जाणवत होते. माझ्या संगीतात आणि खुद्द माझ्या स्वतःमध्येही मला त्यांचे अस्तित्व जाणवत होते. त्यांच्या प्रत्येक कटाक्षाला, त्यांच्या प्रत्येक हालचालीला माझे हृदय प्रतिसाद देत होते. जरी मला त्यांचा कटाक्ष, त्यांची हालचाल दिसत नव्हती तरीही. त्यांनी आणलेला मोझार्टचा सोनाटा-फॅन्टासिया मी वाजविला. त्यांच्या परतीनंतर त्यांच्यासाठी मी तो शिकले होते. मी कशी वाजवीत होते याबद्दल मुळीच विचार करीत नव्हते. पण मी चांगली वाजवीत असावे आणि ते खूष झाल्याचे मला जाणवले. त्यांच्या अनुभवाला

येणारे सुख मला जाणवत होते आणि त्यांच्याकडे न पाहताही त्यांची माझ्यावर रोखलेली नजर मला जाणवत होती. अगदी अनिच्छेने आणि नकळतपणे माझी बोटे हलविणे चालू असताना मी वळून त्यांच्याकडे पाहिले. चांदण्या रात्रीच्या प्रकाशाच्या पार्श्वभूमीवर त्यांचे डोके ठळकपणे उठून दिसत होते. आपल्या हातांचा हनुवटीला आधार देऊन ते माझ्याकडे चमकत्या डोळ्यांनी पहात होते. मी त्यांना पाहून स्मित केले आणि पियानो वाजवायची थांबले. त्यांनीसुद्धा स्मित केले आणि मी पुढे वाजविणे चालू ठेवावे अशी मानेनेच दटावणी दिली.

संगीताचा तुकडा वाजवून मी पूर्ण केला तेव्हा चंद्र आकाशात चांगलाच वर चढला होता. मेणबत्तींच्या क्षीण प्रकाशाला आता खिडकीमधून आत येऊन जमिनीवर पसरलेल्या वेगळ्या, रुपेरी प्रकाशाची जोड मिळाली होती. अत्यंत उत्तम स्थळी मी वाजवायची थांबले हे मला शोभण्यासारखे नव्हते आणि मी अत्यंत वाईट वाजविले असे कात्या म्हणाली. पण ते म्हणाले की, एवढे चांगले वादन यापूर्वी मी कधीही केले नव्हते. बैठकीची अंधारी खोली आणि दिवाणखाना यांच्या दरम्यान येरझाऱ्या घालण्यास त्यांनी आरंभ केला. दर फेरीच्या वेळी ते थांबत आणि माझ्याकडे कटाक्ष फेकून स्मित करीत. मीही उलट स्मित करीत होते. मला खूप हसावेसे वाटत होते. केवळ आज, केवळ आत्ता, अगदी ह्या क्षणाला काहीतरी घडले होते आणि त्या घडण्याचा मला खूप खूप आनंद झाला होता. ज्या क्षणी ते बाहेर जात त्या क्षणी मी कात्याच्या शरीराभोवती माझ्या हातांची मिठी घालायची (आम्ही दोघी पियानोपाशी उभ्या होतो) आणि तिच्या मऊ हनुवटीच्या खाली, माझ्या आवडत्या जागी, मी तिची

चुंबने घेऊ लागायची. आणि ज्या क्षणी ते खोलीत परत येत त्या क्षणी मी गंभीर चेहरा करायची आणि मोठ्या कष्टाने हसू दाबून ठेवायची.

"आज हिला काय झालंय?" कात्याने त्यांना विचारले.

त्यांनी उत्तर दिले नाही. फक्त माझ्याकडे पाहून ते हसले. काय घडले होते ते त्यांना माहीत होते.

"रात्र किती सुंदर आहे!" बैठकीच्या खोलीतून ते म्हणाले. बागेच्या दिशेला असलेल्या सज्जाच्या उघड्या दारापाशी ते थांबले होते.

आम्ही त्यांच्यापाशी गेलो. खरोखरीच अशी रात्र मी कधी पाहिली नव्हती. पौर्णिमेचा पूर्णचंद्र आमच्यामागील घरावर ओठंगला होता. तो आमच्या दृष्टीआड होता. वाळूच्या वाटेवर आणि फुलझाडांवर छपराच्या व व्हरांड्याच्या खांबांच्या आणि छताच्या तिरप्या सावल्या पडल्या होत्या. बाकी सारा परिसर प्रकाशाने उजळला होता. दंवामुळे आणि चंद्रकिरणांमुळे रुपेरी मुलामा चढला होता. फुलझाडांमधून गेलेल्या रुंद वाटेच्या एका बाजूला डेलियाच्या फुलांच्या व त्यांच्या देठांच्या तिरप्या सावल्या पडल्या होत्या. दूरवरच्या धुकट अंतरापर्यंत वाट पसरत गेली होती. तिचा खडबडीत खडीचा पृष्ठभाग चांदण्यात चमचमत होता. झाडांमधून काचेच्या घराचे चमकते छप्पर डोकावीत होते आणि घळीमधून दाट धुके वर चढत होते. एव्हाना पाने झडलेल्या फुलझाडांची प्रत्येक डहाळी तेजस्वी दिसत होती आणि बागेतील प्रत्येक दंवमाखले फूल ठळकपणे उठून दिसत होते. पाऊलवाटांमध्ये प्रकाश आणि सावल्या परस्परांमध्ये अशा काही मिसळून गेल्या होत्या की, झुलणारी आणि पारदर्शी दिसणारी झाडे प्रचंड घरांसारखी

भासत होती. उजव्या अंगाला घराची सावली मागे सरली होती व भयप्रद भासत होती. ह्या सावलीमधून वर घुसलेल्या चिनाराचा झुपकेदार शेंडा अधिकच तेजस्वी दिसत होता आणि काही विचित्र कारणापायी खोल निळ्या आकाशात तरंगत निघून जाण्याऐवजी घराच्या थेट वर तेजस्वी प्रकाशात लोंबकळत राहिला होता.

"चला, फिरायला जाऊ या," मी म्हणाले.

कात्याने संमती दिली, पण मी पायात पावसाळी रबरी बूट घालावेत अशी तिने अट घातली.

"मला त्यांची गरज नाही," मी म्हणाले. "सेर्गेई मिखाइलिच मला त्यांच्या हाताचा आधार देतील."

जणू काही त्यामुळे माझे पाय ओले होणार नव्हते! पण त्यांना समजायचे ते समजले आणि माझ्या बोलण्यात विचित्र-पणा आढळला नाही. यापूर्वी त्यांनी कधीही आपल्या हाताचा आधार मला दिला नव्हता, पण आज मीच त्यांचा हात मागून घेतला होता आणि त्यात त्यांना चमत्कारिक वाटले नव्हते. आम्ही तिघे व्हरांड्यातून खाली उतरलो आणि सारे जग — आकाश, बाग, हवा — आजवर कधी नव्हते असे वेगळे मला भासले.

दुतर्फा झाडे असलेल्या पाऊलवाटेवरून चालत असताना जेव्हा मी समोर नजर टाकली तेव्हा त्या दिशेने आणखी पुढे जाणे अशक्य होते असे मला वाटले. शक्यतेचे जग तेथेच संपले होते आणि त्यापुढील जग चिरंतन सौंदर्यात गुरफटून गेलेले असावे असे मला भासले. पण जसजसे आम्ही पुढे जात राहिलो, तसतशा सौंदर्याच्या जादुभऱ्या भिंती आम्हाला प्रवेश देत गेल्या. तेथेही झाडे, पाऊलवाटा आणि वाळल्या पानांनी

भरलेले आमच्या परिचयाचे उद्यान होते असे भासले. तेथे आम्ही खरोखरीच पाऊलवाटांवरून चाललो, प्रकाश आणि सावलीच्या वर्तुळांना ओलांडीत, पायांखाली वाळक्या पानांना खरोखरी तुडवीत गेलो व माझ्या चेहऱ्याला खरोखरीच एक थंड फांदी घासून गेली. आणि खरोखरीच ते माझ्या शेजारून हलकी, मोजकी पावले टाकीत चालत होते, माझ्या दंडाला काळजीपूर्वक आधार देत होते आणि माझ्या शेजारून खरो-खरीच कात्या चालत होती, तिच्या पावलांखाली चुरडणाऱ्या वाळूचा आवाज होत होता. आणि त्या निःस्तब्ध फांद्यांमधून आमच्यावर चांदण्याची वृष्टी करणारा चंद्रच केवळ आकाशात असावा.

पण आमच्या दर पावलागणिक आमच्या मागे आणि पुढे जादूच्या भिंती मिटत होत्या. आम्ही पुढे जाऊ शकू यावर माझा विश्वास बसेनासा झाला. जे काही भोवताली होते त्या सर्वांवर माझा विश्वास बसेनासा झाला.

"ई ऽऽ! बेडकी!" कात्या किंचाळली.

"कोण बोललं आणि का?" मी नवल करीत राहिले. पण मग आठवण झाली की, ती कात्या होती आणि बेडकांची तिला खूप भीती वाटायची. मी पायांखाली नजर टाकली. माझ्यासमोर एक छोटा बेडूक उडी मारून बसला होता. पाऊल-वाटेवरच्या चकाकणाऱ्या वाळूवर त्याची काळी सावली दिसत होती.

"तुम्हाला भीती वाटत नाही?" त्यांनी विचारले.

मी त्यांच्याकडे कटाक्ष टाकला. ह्या स्थळी झाडांच्या रांगेत खंड पडला होता आणि मला त्यांचा चेहरा स्पष्ट दिसत होता. किती देखणा आणि किती आनंदी होता त्यांचा चेहरा!

ते म्हणाले होते : "तुम्हाला भीती नाही वाटत ?" पण मला ऐकू आले होते : "लाडके, माझं प्रेम आहे तुझ्यावर !" त्यांचा कटाक्ष, त्यांचा स्पर्श पुनःपुन्हा म्हणत होता : "माझं प्रेम आहे तुझ्यावर !" आणि प्रकाश, सावली, हवा हेच शब्द वारंवार म्हणत होते.

सबंध बागेला आम्ही फेरी घातली. आमच्यामागून धापा टाकीत कात्या चालत होती. ती दमली होती. तिने परत जाण्याचा लकडा लावला. मला तिची दया येत होती. "आम्हाला जे वाटते ते तिला का जाणवत नाही ?" मी मनाशी नवल करीत होते. "ह्या रात्रीप्रमाणं आणि त्यांच्या-माझ्याप्रमाणं आम्ही सगळीजणं का तरुण नाही आणि का आनंदी नाही ?"

आम्ही घराकडे परतलो. पण जरी कोंबडे आरवले आणि सगळे नोकर झोपी गेले होते, खिडकीखाली बांधलेला त्यांचा घोडा जमीन उकरीत होता आणि चिडून फुरफुरत होता, तरी बराच वेळपर्यंत ते थांबून राहिले. कात्याने आम्हाला वेळेची आठवण करून दिली नाही आणि वेगवेगळ्या किरकोळ गोष्टींवर गप्पा मारीत आम्ही बसून राहिलो. शेवटी दोन वाजून गेल्यानंतर आम्हाला वेळेचे भान आले. जेव्हा ते निघून गेले तेव्हा कोंबड्यांनी तिसरी बांग दिली होती व पहाट फुटायचा सुमार झाला होता. त्यांनी नेहमीप्रमाणे निरोप घेतला होता आणि त्यांच्या शब्दांमध्ये काही विशेष सूचक अर्थ सामावलेला नव्हता, तरीही मला ठाऊक होते की, त्या दिवसा-पासून ते माझे होते आणि मी त्यांना कधीही गमावणार नव्हते. माझे त्यांच्यावर प्रेम होते हे ज्या क्षणी मी स्वतःशी कबूल केले त्या क्षणी कात्याला मी सर्व काही सांगितले. तिच्यावर

मी टाकलेल्या विश्वासामुळे तिला आनंद झाला आणि ती गहिवरली. पण ती बिचारी त्या रात्री जरी झोपू शकली, तरी मी मात्र बराच वेळपर्यंत व्हरांड्यात येरझाऱ्या घालीत राहिले. मग बागेत गेले आणि ज्या वाटांवरून आम्ही फिरलो होतो त्या वाटांवरून फिरत त्यांचा प्रत्येक शब्द आणि त्यांची प्रत्येक हालचाल आठवत राहिले. सबंध रात्रभर मी आयुष्यात प्रथमच झोपले नाही आणि लौकरचा सूर्योदय पाहिला. तेव्हापासून अशी रात्र आणि अशी सकाळ मी कधीही पाहिली नाही. "पण त्यांचं माझ्यावर प्रेम आहे असं सरळ सांगत का नाहीत ते?" मी विचार करीत राहिले. "सर्व काही सोपं आणि सुंदर घडू शकत असताना ते अडचणींचा विचार का करतात आणि स्वतःला म्हातारा का म्हणवून घेतात? ही सोन्यासारखी घडी कदाचित पुन्हा कधीही यायची नाही, तरीसुद्धा तिला ते का दवडताहेत? त्यांनी फक्त एवढं बोलावं: 'माझं प्रेम आहे.' शब्दांनी सांगावं: 'माझं प्रेम आहे.' माझा हात आपल्या हाती घ्यावा आणि त्यावर आपलं डोकं टेकवून म्हणावं 'माझं प्रेम आहे.' माझ्यासमोर लाजावं आणि नजर खाली झुकवावी, मग मी त्यांना सारं काही सांगीन. किंवा काहीच बोलणार नाही. त्यांच्याभोवती माझ्या बाहूंची मिठी घालीन, त्यांना स्वतःशी घट्ट धरीन आणि अश्रू ढाळीन." पण नंतर अचानक एक विचार डोक्यात चमकला: "माझा गैरसमज झाला असला आणि त्यांचं माझ्यावर प्रेम नसलं तर?"

ह्या विचाराने मी भेदरले. नको नको ते विचार मनात येऊ लागले. फळबागेमधील भिंतीवरून मी उडी मारली होती तेव्हाची त्यांची आणि माझी विचित्र मनःस्थिती मला आठवली.

माझे अंतःकरण जडावले, डोळे अश्रूंनी डबडबून आले आणि मी प्रार्थना करू लागले. मग एक विलक्षण, शांत करणारा विचार मनात आला. दुसऱ्या दिवसापासून उपास करण्याचा, माझ्या वाढदिवशी देवाचा प्रसाद ग्रहण करण्याचा आणि त्याच दिवशी त्यांची वाग्दत्त वधू बनण्याचा मी निश्चय केला.

असे का करायचे ते मला ठाऊक नव्हते, पण तसे केले पाहिजे असे त्या क्षणापासून मला ठाम वाटू लागले. मी माझ्या खोलीत परत गेले तेव्हा दिवस उजाडला होता आणि नोकर-माणसे उठू लागली होती.

## ४

मेरी मातेच्या महानिर्वाणाच्या सणाचे ते दिवस होते, त्यामुळे माझ्या उपवासाच्या निर्णयाचे कुणाला फारसे आश्चर्य वाटले नाही.

सबंध आठवडाभरात ते एकदाही आम्हाला भेटायला आले नाही, पण मला त्याचे आश्चर्य वाटले नाही, किंवा मी चिंतातुर बनले नाही, अथवा त्यांचा मला रागही आला नाही. उलट ते आले नाही याचा मला आनंदच झाला होता व केवळ माझ्या वाढदिवशी त्यांच्या आगमनाची मी अपेक्षा करीत होते. त्या सबंध आठवड्यात मी रोज सकाळी लौकर उठत होते आणि त्यांनी घोडे जोडीपर्यंत एकटीच बागेत फिरत होते, आदल्या दिवशी माझ्या हातून घडलेल्या पापांची उजळणी करीत होते व एकही पाप न करता नवा दिवस कसा घालवावा आणि त्याचे समाधान पदरात कसे पाडून घ्यावे याचा

विचार करीत होते. अजिबात पाप न करता राहणे त्यावेळी मला सोपे भासत होते. माणसाने थोडा प्रयत्न केला तर ते शक्य होते असे मला वाटायचे.

कात्याला अथवा एखाद्या मुलीला सांगाती घेऊन तीन वेर्स्ता अंतरावरील चर्चमध्ये मी घोडागाडीतून जायची. चर्चमध्ये प्रवेश करताना दरवेळी मी स्वतःशी म्हणायची: "आपल्या अंतःकरणात देवाबद्दलची भीती घेऊन जे प्रवेश करतात ते धन्य होत!" आणि केवळ हीच भावना उरी घेऊन चर्चच्या दर्शनी भागामधील गवत वाढलेल्या दोन पायऱ्या मी चढायची. त्यावेळी चर्चमध्ये किसानांच्या आणि भूदासांच्या दहा-बारापेक्षा जास्त धर्मश्रद्ध बायका नसत. त्यांनी वाकून केलेल्या नमस्कारांना मी तेवढ्याच लीनतेने प्रतिनमस्कार करायची. मी स्वतः मेणबत्त्यांच्या पेटीपाशी जायची, मला तो माझा मोठाच पराक्रम वाटायचा, गावचा वडीलधारा माणूस म्हणून समजल्या जाणाऱ्या म्हाताऱ्या सैनिकापासून मेणबत्त्या घ्यायची आणि तसबिरीं-समोर त्या लावायची. पवित्र द्वारांमधून वेदीवरील कापड मला दिसायचे. त्या कपड्यावरील कशिदाकाम माझ्या आईने केलेले होते. तसबिरींच्या भिंतीवर दोन लाकडी देवदूत होते आणि त्यांच्या डोक्यांवर तारे होते. मी लहान मुलगी होते तेव्हा ते मला खूप मोठे भासायचे आणि पिवळ्या तेजोवलयाचे कबूतर नेहमी माझे लक्ष वेधून घ्यायचे. चर्चमधील पूर्वेकडील भागाचा जीर्ण कठडा मला दिसायचा. आमच्या घरच्या भूदासां-च्या किती मुलांना बाप्तिस्मा देण्यासाठी मी तेथे आले होते व खुद्द मलाही तेथेच बाप्तिस्मा देण्यात आला होता. माझ्या वडिलांच्या शवपेटीला आच्छादलेल्या वस्त्राचा झगा घालून म्हातारे पाद्रीबाबा येत आणि आमच्या घरी धर्मविधी पार

पाडताना ज्या आवाजात पूजा म्हणत त्याच आवाजात पूजा वाचत. आमच्या घरात सोन्याचा नामकरण विधी त्यांनीच केला होता. माझ्या वडिलांच्या आत्म्याच्या शांतीसाठी तेच गायले होते आणि माझ्या आईची दफनक्रिया त्यांनीच पार पाडली होती. धर्माधिकाऱ्याचा तोच कापरा आवाज पूर्वेच्या गाभाऱ्यातून यायचा. मला आठवते की, चर्चमध्ये प्रत्येक पूजेच्या वेळी तीच ती वाकलेली म्हातारी नेहमी भिंतीशी उभी असायची. अश्रूंनी डबडबलेले तिचे डोळे देवाच्या तसबिरीवर एकटक रोखलेले असत. क्रूसचिन्हे करताना तिच्या विणलेल्या हातरुमालावर तिची तीन बोटे दाबलेली असत. तिचे दात नसलेले तोंडाचे बोळके सतत हलत असे.

ह्या सर्व गोष्टींविषयी इतःपर मला कुतूहल राहिले नव्हते, अथवा त्या आठवणी आणतात म्हणून मला त्यांच्याबद्दल ममत्व वाटत होते, असेही नव्हते. ह्या सर्वांना माझ्या दृष्टीने काहीतरी प्रचंड मोठेपण आणि पावित्र्य लाभले होते, त्याला अत्यंत गहन अर्थ प्राप्त झाला होता. प्रार्थनांमधील प्रत्येक शब्द मी लक्षपूर्वक ऐकत होते, त्यांना मनोमन प्रतिसाद देण्याचा प्रयत्न करीत होते. जेव्हा मला समजत नसे तेव्हा मला प्रबोधित करण्याची देवापाशी मी मागणी करायची आणि जेव्हा मला प्रार्थना ऐकू येत नसे तेव्हा मी स्वतःच्या प्रार्थना रचायची. पश्चात्तापाच्या प्रार्थना जेव्हा म्हटल्या जात तेव्हा मी भूतकाळाची आठवण करायची आणि माझ्या चालू स्थितीमधील चांगुलपणा-समोर माझा बालिश, निष्पाप भूतकाळ एवढा काळाकुट्ट भासायचा, की माझी मीच घाबरून जायची. मात्र त्याच वेळी मला असे जाणवायचे की, सर्व काही माफ होईल आणि मी जर आणखी पापे केली, तर पश्चात्तापसुद्धा तेवढाच अधिक

मधुर असेल. पूजेच्या अखेरी पाद्रीबाबा जेव्हा म्हणत : "देव तुमचं कल्याण करो," तेव्हा मला शारीरिकदृष्टचा एकदम छान वाटू लागायचे. जणू प्रकाश आणि ऊब यांनी माझ्या अंत:करणात प्रवेश केला होता असे भासायचे. पूजेनंतर पाद्री-बाबा माझ्याकडे आले आणि आमच्या घरी संध्याकाळच्या प्रार्थना म्हणायला यायचे का व कोणत्या वेळी यायचे, याबद्दल त्यांनी विचारणा केली. त्यांच्या ह्या खास अनुग्रहाबद्दल मी त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले, पण मी स्वत:च त्यांच्या-पाशी येईन असे सांगितले.

"इथं येण्याची स्वत:च तसदी घेणार म्हणता?" त्यांनी विचारले. गर्वापायी पाप न करता कसे उत्तर द्यायचे ते मला माहीत नव्हते.

धर्मविधींनंतर, माझ्याबरोबर जर कात्या नसली तर घोड्यांना मी नेहमी घरी पाठवून द्यायची आणि एकटीच चालत जायची. वाटेत भेटणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला झुकून नम्रपणे अभिवादन करायची. कुणा दुसऱ्यासाठी मदत करण्याच्या, सल्ला देण्याच्या, त्याग करण्याच्या उत्सुकतेपायी सामानाचा बोजा उचलायला, लहान बाळाला डोलवायला मदत करायची. इतरांना वाट करून देण्यासाठी स्वत: चिखलात पाय टाकायची.

एके संध्याकाळी बेलीफ कात्याला सांगत असलेला मी ऐकले की, सेम्योन नांवाचा आमचा एक शेतमजूर आपल्या मुलीच्या दफनपेटीसाठी लाकडाच्या काही फळ्या मागायला व दफनक्रियेसाठी एक रूबल मागायला आला होता. त्याच्या मागण्या पुऱ्या केल्या होत्या असे बेलिफाने सांगितले. "ते एवढे गरीब आहेत?" मी विचारले. "होय बाईसाहेब, फार गरीब आहेत ते लोक. मीठ विकत घ्यायलासुद्धा त्यांच्यापाशी

पैसे नसतात," बेलिफ उत्तरला. माझ्या काळजात कळ उमटली, पण एका परीने त्याचा मला आनंद झाला. मी फिरायला जाते असे कात्याला खोटेच सांगितले व वरच्या मजल्यावर पळत जाऊन माझे सर्व पैसे बरोबर घेतले (तसे माझ्यापाशी फारसे पैसे नव्हते, पण जेवढे होते तेवढे सगळे घेतले). क्रूसचिन्ह करून मी व्हरांड्यातून बागेत निसटले व तेथून थेट खेड्याची वाट धरली. सेम्योनची झोपडी खेड्याच्या वेशीपाशी होती. मी खिडकीपाशी गेले, चौकटीत पैसे ठेवले आणि तावदानावर टिचक्या मारल्या. हे मी करीत होते तेव्हा कुणीही मला पाहिले नव्हते. झोपडीतून तेवढ्यात कुणीतरी बाहेर आले तेव्हा दाराचा करकर आवाज झाला व कुणाचीतरी हाक ऐकू आली. थंडीने व भीतीने थरथर कापत एखाद्या गुन्हेगाराप्रमाणे मी घरी धूम ठोकली.

मी कुठे गेले होते आणि मला काय झाले होते, अशी कात्याने माझ्यापाशी चौकशी केली. पण ती काय बोलत होती ते धड मला समजलेही नाही आणि मी काहीच उत्तर दिले नाही. अचानकपणे इतर प्रत्येक गोष्ट क्षुल्लक आणि क्षुद्र भासू लागली. मी स्वतःला माझ्या खोलीत कोंडून घेतले आणि खूप वेळपर्यंत येरझाऱ्या घालीत राहिले. काहीही करणे मला शक्य होईना. स्वतःच्या विचारांना सावरणे किंवा जी अनुभूती मला येत होती तिला उमजून घेणेही शक्य होईना. सेम्योनच्या कुटुंबाला किती आनंद होईल आणि पैसे ठेवून जाणाऱ्या व्यक्तीबद्दल त्यांना किती कृतज्ञता वाटेल, असा विचार माझ्या मनात आला. मी स्वतःच्या हातांनी त्यांना पैसे दिले नाहीत याचे मला वाईट वाटले. जे काही मी केले होते ते सेर्गेई मिखाइलिचना समजले असते तर त्यावर ते काय बोलले असते,

असाही एक विचार मनात तरळून गेला व कुणालाच माझे कृत्य कधीही माहीत होणार नाही याचा आनंदही झाला. मला विलक्षण हर्ष झाला होता आणि माझ्यासकट प्रत्येकजण मला दुष्ट वाटत होता. स्वतःकडे आणि इतरांकडे मी एवढ्या लीनपणे पाहिले की, मृत्यूचा विचार हा मला सुखस्वप्नासारखा भासला. मी स्मित केले, प्रार्थना केली आणि रडले. त्या क्षणाला जगातील प्रत्येकावर, अगदी स्वतःसह, किती उत्कटतेने, किती आवेगाने मी प्रेम करीत होते!

धर्मविधींच्या दरम्यान मी ख्रिस्त चरित्राचे निरूपण वाचायची. त्यांचे मला अधिक चांगले आकलन होऊ लागले. त्या दैवी जीवनाची कहाणी अधिक साधी व अधिक हृदयस्पर्शी वाटू लागली. ख्रिस्ताच्या शिकवणींमधील विचारांची आणि प्रेमाची गहिराई पाहून त्यांच्याविषयीचा भीतीयुक्त आदर जास्तच दुणावला व ते अधिक अगाध वाटू लागले. पण पुस्तक बाजूला ठेवून माझ्या भोवतालच्या आयुष्याकडे परत चिकित्सकपणे पाहिले आणि त्यावर विचार केला, म्हणजे प्रत्येक गोष्ट किती सोपी व साधी भासायची! अप्रामाणिकपणे जगणे खूप कठीण वाटायचे, पण प्रत्येकावर प्रेम करणे व प्रत्येकाच्या प्रेमाला पात्र ठरणे खूप सोपे भासायचे! माझ्याशी प्रत्येकजण चांगुलपणाने आणि दयाळूपणाने वागत होता. सोन्याला धडे देण्याचे काम मी चालू ठेवले होते. तीसुद्धा मला वेगळी भासत होती. ती समजून घेण्याचा प्रयत्न करीत होती, माझ्या इच्छेप्रमाणे वागत होती आणि मला संताप आणत नव्हती. मी जशी प्रत्येकाबरोबर वागत होते, त्याचप्रमाणे प्रत्येकजण माझ्याशी वागत होता.

कबुलीजबाब देण्यापूर्वी माझ्या कोणत्या शत्रूंची मी क्षमा

मागितली पाहिजे होती याचा विचार केला तेव्हा आमच्या घराबाहेरच्या फक्त एका व्यक्तीची मला आठवण झाली. ती आमच्या शेजारी राहणारी एक तरुण महिला होती. एक वर्षापूर्वी इतर पाहुण्यांच्या उपस्थितीत मी तिला कुचेष्टेने हसले होते आणि त्या कारणापायी तिने आमच्या घरी येणे बंद केले होते. माझ्या चुकीची कबुली देणारे एक पत्र मी तिला लिहिले आणि तिची माफी मागितली. तिने माझ्या पत्राला उत्तर दिले; तिने मला क्षमा केली होती व तिने स्वत: क्षमायाचना केली होती. त्या साध्या ओळी वाचून आनंदाने मी रडले. त्यावेळी त्या मला खूप हृदयस्पर्शी वाटल्या होत्या.

माझ्या म्हाताऱ्या दाईपाशी मी क्षमायाचना केली तेव्हा तिच्या डोळ्यांना पाणी आले. "हे सगळे माझ्याशी एवढं चांगलं का वागतात?" मी स्वत:ला विचारले. "अशा प्रेमाला पात्र होण्यासाठी मी काय केलंय?"

मग मला सेर्गेई मिखाइलिचची आठवण व्हायची आणि एकेका वेळी तासचे तास त्यांच्याबद्दल विचार करीत मी बसून रहायची. तसे केल्यावाचून मला राहवत नव्हते आणि त्यात पाप होते असे मला वाटत नव्हते. पण मी त्यांच्या प्रेमात पडले होते हे मला आढळले त्या रात्रीप्रमाणे मी त्यांचा विचार करीत नव्हते. मी स्वत:विषयी विचार करायची तसा त्यांच्याविषयी विचार करायची. माझ्या भविष्याशी निगडित प्रत्येक विचाराशी त्यांना नकळतपणे जोडून टाकायची. त्यांच्या उपस्थितीत माझ्यावर त्यांचा जबरदस्त प्रभाव असायचा. पण अशा वेळांना तो प्रभाव संपूर्ण अदृश्य व्हायचा. मी त्यांच्या बरोबरीची होते असे मला भासायचे आणि माझ्या

आत्मिक उन्नयनाच्या उंचीवरून मी त्यांना पूर्णपणे जाणून घ्यायची. जे पूर्वी विचित्र वाटलेले असे ते अशा क्षणी स्पष्ट उमजून जायचे. दुसऱ्यांसाठी जगणे हाच एकमेव आनंद आहे, असे ते का म्हणाले होते हे मला समजले आणि मी त्यांच्याशी पूर्ण सहमत होते. आम्ही दोघे एकत्र निखळ सुखात राहू अशी मला खात्री होती. परदेश प्रवासाची, मौजमजा आणि झगझगाट, यांची स्वप्ने मला पडत नव्हती. अगदी वेगळ्या प्रकारच्या जीवनाचे स्वप्न मी पहात होते: खेड्यातील शांत कौटुंबिक जीवन; सतत स्वार्थत्यागाचे आणि एकमेकांवर प्रेम करण्याचे जीवन; प्रत्येक गोष्टीत स्निग्ध आणि उपकारक नशीबाचा वरदहस्त आहे याची नेहमी जाणीव राखणारे जीवन.

माझ्या बेतानुसार, माझ्या वाढदिवशी मी देवाचा प्रसाद घेऊन माझे शुद्धीकरण करून घेतले. त्या दिवशी चर्चमधून मी परतले तेव्हा माझ्या अंतःकरणात एवढा आनंद उचंबळला होता, की माझ्या आनंदाला दृष्ट लावणाऱ्या कोणत्याही विचाराची मला भीती वाटत होती. आमच्या घरासमोर आम्ही घोडागाडीतून उतरलो न उतरलो तोच पुलावरून परिचित बग्गी खडखडत आली व सेर्गेई मिखाइलिचना मी पाहिले. त्यांनी मला वाढदिवसाचे शुभचिंतन केले आणि आम्ही बरोबरच बैठकीच्या खोलीत गेलो. त्या सकाळी त्यांच्या सहवासात मी कधी नव्हते एवढी शांत आणि विश्वासपूर्वक वावरत होते. त्यांना न उमजलेले एक पूर्ण नवे जग माझ्या अंतरात वास करीत होते आणि ते त्यांच्या जगाहून अधिक वरचे होते, असे मला वाटत होते. अवघडलेपणाची भावना मला मुळीच स्पर्शत नव्हती. ह्याचे कारण त्यांना जाणवले असावे, कारण ते

नेहमीपेक्षा जास्त स्नेहाने आणि आदराने माझ्याबरोबर वागत होते. मी पियानोपाशी गेले, पण त्यांनी त्याला कुलूप घातले व किल्ली स्वतःच्या खिशात टाकली.

"कशाला तुमची मनःस्थिती बिघडवता?" ते म्हणाले. "या क्षणी जगातल्या इतर कुठल्याही संगीतापेक्षा तुमच्या आत्म्याचं संगीत श्रेष्ठ आहे."

मला कृतज्ञ वाटले, पण थोडासा रागही आला की, प्रत्येकापासून जे लपून रहायला हवे होते ते माझ्या आत्म्यातील सर्व काही त्यांना एवढ्या सहजपणे आणि योग्यपणे समजून चुकले होते. जेवणाच्या वेळी ते म्हणाले की, माझ्या वाढदिवसाच्या शुभेच्छा द्यायला आणि आमचा निरोप घ्यायला ते आले होते, कारण दुसऱ्या दिवशी ते मॉस्कोला जाणार होते. हे बोलताना त्यांनी आपली दृष्टी कात्याकडे स्थिर ठेवली होती. नंतर त्यांनी माझ्याकडे कटाक्ष टाकला. माझ्या चेहऱ्यावर अस्वस्थतेची खळबळ माजलेली दिसणार अशी त्यांना भीती वाटली असावी. पण मला ना आश्चर्य वाटले ना खेद. दीर्घ काळासाठी ते चालले होते का, अशी पृच्छासुद्धा मी केली नाही. असे ते म्हणणार हे मला माहीत होते आणि ते जाणार नव्हते हेही ठाऊक होते. कसे जाणले होते मी? स्वतःलासुद्धा याचा खुलासा मी करू शकत नाही, पण घडलेल्या प्रत्येक गोष्टीचे अथवा पुढे घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीचे मला ज्ञान होते, अशी एक भावना माझ्या मनात त्या दिवशी रमत होती. जणू एका अद्भुत स्वप्नात मी वावरत होते. त्यात घडलेली प्रत्येक गोष्ट फार पूर्वीच घडून गेली होती आणि फार पूर्वीच ती मला ठाऊक होती. ते सर्व काही परत घडणार होते आणि ते कसे घडणार हे मला ठाऊक होते.

जेवणानंतर ताबडतोब ते थेट निघणार होते. पण धार्मिक विधींनंतर कात्या दमली होती व थोडा वेळ विश्रांतीसाठी झोपायला गेली होती. तिचा निरोप घेता यावा म्हणून ती जागी होईपर्यंत थांबणे त्यांना भाग पडले.

दिवाणखान्यात झगझगीत सूर्यप्रकाश होता, म्हणून आम्ही व्हरांड्यात गेलो. आम्ही बसताक्षणी अत्यंत शांतपणे मी बोलायला आरंभ केला. माझ्या प्रेमाचे भवितव्य ठरविणाऱ्या गोष्टींवर मी बोलू लागले. अक्षरशः आम्ही बसताक्षणी, ना आधी ना नंतर, मी बोलू लागले होते. त्याआधी काहीही उच्चार झाला नव्हता, कोणताही सूर लावण्यात आला नव्हता. मला जे काही त्यांना सांगायचे होते त्यात अडथळा आणू शकेल अशा कोणत्याही विषयाला तोंड फोडलेले नव्हते. असा समतोल आणि असा निर्धार कोठून माझ्याठायी आला, असे नेमके शब्द कसे मला सापडत गेले, ते मात्र मला ठाऊक नाही. जणू मी बोलतच नव्हते, तर माझ्या इच्छेपासून स्वतंत्र असलेला माझ्या अंतरातील कुणी आवाज बोलत होता. कठड्याला रेलून ते माझ्यासमोर बसले होते. फुलझाडाची एक फांदी ओढून तिची पाने तोडण्याचा त्यांचा चाळा चालला होता. जेव्हा मी बोलायला आरंभ केला तेव्हा त्यांनी फांदी सोडून दिली आणि एका हातावर आपले डोके टेकविले. अत्यंत समतोल राखलेला अथवा खूप अस्वस्थ अशा कोणत्याही मनःस्थितीत असलेल्या व्यक्तीप्रमाणे ते बसले होते.

"तुम्ही इथून दूर का चालला आहात?" अगदी मुद्दाम, सावकाशपणे मी विचारले आणि थेट त्यांच्या नजरेला नजर भिडविली.

त्यांनी तात्काळ उत्तर दिले नाही. नंतर नजर खाली पाडून ते पुटपुटले : "काम आहे."

माझ्यासमोर खोटे बोलणे, विशेषत: मी असा परखड प्रश्न विचारला असताना खोटे बोलणे त्यांना किती अवघड होते याची मला जाणीव झाली.

"आजचा दिवस माझ्या दृष्टीनं काय आहे हे तुम्हाला ठाऊक आहे," मी म्हणाले. "अनेक कारणांसाठी तो महत्त्वाचा आहे. जेव्हा मी तुम्हाला विचारते की तुम्ही का इथून जात आहात, तेव्हा त्यामागं केवळ पोकळ कुतूहल नाही. मी न सांगताही तुम्हाला ठाऊक आहे की, माझा तुमच्यावर जीव जडलाय. मी विचारतेय, कारण मला ठाऊक असायला हवं. का तुम्ही जाता आहात?"

"माझ्या जाण्याचं खरं कारण तुम्हाला सांगणं मला फार अवघड आहे," ते उत्तरले. "तुमच्याबद्दल आणि माझ्याबद्दल या आठवडाभरात मी खूप विचार केला आणि मी इथून निघून जाणं आवश्यक आहे असा निर्णय घेतला. कारण तुम्हाला ठाऊक आहे आणि तुम्हाला माझ्याबद्दल काही वाटत असेल, तर आणखी काही बोलायला भाग पाडण्याची तुम्ही माझ्यावर सक्ती करणार नाही." त्यांनी आपले कपाळ चोळले व डोळे मिटले. "मला खूप कठीण जातंय... पण तुम्ही समजू शकता!"

माझ्या हृदयाचे ठोके वाढले.

"मला समजत नाही," मी म्हणाले. "मला **समजू शकत नाही** आणि म्हणून **तुम्ही** मला सांगितलं पाहिजे... माझ्यासाठी! माझ्या दृष्टीनं खूप खूप महत्त्वाच्या असलेल्या आजच्या दिवसासाठी! सांगा! काय वाट्टेल ते ऐकायची माझी तयारी आहे."

त्यांनी आपली बैठक बदलली, माझ्याकडे एक कटाक्ष टाकला आणि परत फांदी ओढली.

"ठीक आहे," ते म्हणाले. मग आपल्या आवाजात ठामपणा आणण्याच्या व्यर्थ प्रयत्नात ते क्षणभर घुटमळले. "शब्दांमध्ये मांडणं जरी मूर्खपणाचं आणि अशक्य असलं, मला जरी पीडादायी असलं, तरीही खुलासा करण्याचा मी प्रयत्न करीन." जणू काही शारीरिक वेदनेच्या विचाराने त्यांचा चेहरा वाकडा झाला.

"सांगा," मी म्हणाले.

"असं गृहीत धरू या," ते म्हणाले, "की एक माणूस आहे–आपण त्याला अ म्हणू–तो वयस्क आहे आणि त्याचं जगून झालंय. आणि एक स्त्री आहे–आपण तिला ब म्हणू–ती खूप तरुण आहे, सुखी आहे आणि लोकांविषयी किंवा आयुष्याविषयी तिला काहीही माहीत नाही. कौटुंबिक परिस्थितीमुळं त्यानं तिच्यावर मुलीप्रमाणं प्रेम केलं आणि दुसऱ्या एखाद्या तऱ्हेनं तो तिच्यावर कधी प्रेम करील अशी त्याला मुळीच धास्ती वाटत नव्हती."

ते थांबले. त्यांनी पुढे बोलावे म्हणून मी वाट पहात राहिले.

"पण ब एवढी लहान होती, आयुष्य हे तिला खेळण्यासारखं वाटत होतं, याचा अ ला विसर पडला." आता मात्र माझ्याकडे न पाहता ते घाईघाईने आणि नेटाने बोलू लागले: "तिच्यावर दुसऱ्या रीतीनं प्रेम करणं सोपं होतं, पण तिला तो निव्वळ खेळ ठरला असता हे तो विसरला. त्यानं चूक केली आणि अचानक त्याला पश्चात्तापासारखी वेदनादायी अशी दुसरी भावना जाणवली, तिचं त्याला भय वाटलं. त्यांच्या पूर्वीच्या मैत्रीत वितुष्ट येईल याचं त्याला भय वाटलं आणि

नसं काही घडण्याच्या आत तेथून दूर जाण्याचा त्यानं निर्णय घेतला." हे बोलताना त्यांनी सहजपणे डोळे चोळले आणि ऊन त्यांना मिटून घेतले.

"वेगळ्या रीतीनं तिच्यावर प्रेम करण्याची त्याला भीती का वाटली?" माझ्या मनातील खळबळीला दाबून आणि माझा आवाज स्थिर राखण्याचा बळेच प्रयत्न करीत मी हळूच विचारले.

माझे विचारणे उपहासाचे वाटले असावे, कारण त्यांच्या उत्तरात दुखावल्याची छटा जाणवली: "तुम्ही तरुण आहात, मी नाही. तुम्हाला खेळ हवाय, पण मला दुसऱ्या कशाची तरी गरज आहे. तुम्ही जरूर खेळा, पण माझ्याशी नका. कारण तुम्ही फार प्रामाणिक आहात असं मला वाटेल. त्यामुळं मी दुखावीन आणि तुम्हाला शरमिंदं वाटेल... असं अ म्हणाला," ते पुढे म्हणाले. "अर्थात हा सगळा मूर्खपणा आहे, पण मी का जातोय हे तुम्हाला समजलं. आता कृपा करून या विषयावर आणखी बोलणं नको!"

"छे:! छे:! त्याबद्दल आपण आणखी बोलू," मी उद्गारले. अश्रूंमुळे माझा आवाज कापरा बनला. "त्याचं तिच्यावर प्रेम होतं अथवा नव्हतं?"

ते गप्प राहिले.

"जर त्याचं तिच्यावर प्रेम नव्हतं, तर जणू काही ती लहान बाळ समजून तिच्याशी तो का खेळला?"

"होय, होय, अ ची चूक होती," त्यांनी घाईघाईने माझे बोलणे तोडले. "पण तिथंच सारं संपलं आणि मित्र म्हणून त्यांनी निरोप घेतला!"

पण हे भयानक आहे! दुसरा शेवट होऊच शकत

नाही?" मी कशीबशी पुटपुटले. माझ्या बोलण्याची मलाच भीती वाटत होती.

"हो, दुसरा शेवट होऊ शकतो," आपल्या थकल्या चेहऱ्यावरून हात बाजूला करीत, माझ्याकडे सरळ नजर भिडवीत ते म्हणाले. "दोन भिन्न शेवट आहेत. मात्र कृपा करून माझ्या बोलण्यात अडथळा आणू नका. शांतपणं ऐका. काही म्हणतात," उभे रहात आणि क्लेश व्यक्त करणारे स्मित मुद्रेवर धारण करून त्यांनी आरंभ केला, "काही म्हणतात, अ चं डोकं फिरलं, तो ब च्या आकंठ प्रेमात पडला आणि त्यानं तसं तिला सांगितलं... तिनं केवळ त्याची थट्टा केली. तिच्या दृष्टीनं तो विनोद होता, पण त्याच्या दृष्टीनं ती जीवन-मरणाची बाब होती."

मी दचकले. माझ्या वतीने बोलण्याचे धाडस करू नका असे सांगण्याच्या अगदी बेतात होते, पण त्यांनी माझ्या हातावर आपला हात ठेवून मला थोपविले.

"थांबा," कापऱ्या आवाजात ते म्हणाले. "दुसरे म्हणतात की तिला त्याची दया आली. त्या बापडीला काही पूर्वानुभव नव्हता, म्हणून तिला वाटलं की, खरंच ती त्याच्यावर प्रेम करू शकेल, म्हणून तिनं त्याची पत्नी व्हायला होकार दिला. आणि तोसुद्धा एवढा मूर्ख, की त्याला विश्वास वाटला—खरंच त्याला विश्वास वाटला—की त्याच्या आयुष्याला पुन्हा नव्यानं आरंभ होईल. पण लौकरच तिला आढळलं की, तिनं त्याला फसवलं होतं आणि त्यानं तिला फसवलं होतं... पण आपण आता त्याबाबत आणखी बोलायला नको," त्यांनी समारोप केला. अधिक काही बोलणे त्यांना अशक्य ठरले होते. माझ्या पुढ्यात मुकाटपणे फेऱ्या मारायला त्यांनी सुरुवात केली.

"आपण त्याबाबत आणखी बोलायला नको," असे ते म्हणाले खरे, पण मी केव्हा बोलू लागते याची ते अधीरपणे वाट पहात असल्याचे मला दिसले. मला काहीतरी म्हणायचे होते. पण घशात आवंढा अडकल्याने बोलताच येईना. मी त्यांच्याकडे कटाक्ष टाकला. त्यांची मुद्रा फिकटली होती आणि त्यांचा खालचा ओठ थरथरत होता. त्यांची मला करुणा येऊ लागली. मला बांधून ठेवणाऱ्या शांततेचा मोठ्या प्रयत्नांती मी भंग केला आणि अत्यंत प्रामाणिक आवाजात हळू बोलायला आरंभ केला. माझा आवाज कोणत्याही क्षणी चिरकेल अशी मला भीती वाटत होती.

"आणि तिसरा शेवट–" मी म्हणाले व थांबले. पण ते गप्पच राहिले. "तिसरा शेवट असा की, त्याचं तिच्यावर प्रेम नव्हतं, त्यानं तिला फार फार दुखावलं आणि आपण योग्य तेच केलं असं समजून, आपल्या वागण्याचा अभिमान बाळगून तो दूर निघून गेला. तुमच्या दृष्टीनं तो विनोद होता, पण माझ्या दृष्टीनं नव्हता. अगदी पहिल्यापासून मी तुमच्यावर प्रेम केलं, खरंच, मी तुमच्यावर प्रेम केलं," मी पुन्हा म्हणाले आणि असे म्हणताना माझ्या खालच्या आवाजाचे एकदम कर्कश्य किंकाळीत रूपांतर झाले व माझी मीच घाबरले.

माझ्यासमोर ते थांबले. त्यांची मुद्रा पांढरीफटक पडली होती. त्यांच्या ओठांची थरथर अधिकाधिक वाढत होती आणि दोन अश्रू त्यांच्या गालांवरून ओघळले.

"अत्यंत वाईट वागलात!" मी ओरडले. रागाच्या, डोळ्यांमधून खाली न सांडणाऱ्या अश्रूंमुळे मी घुसमटले.

"कशाबद्दल वागलात तसं?" मी विचारले आणि त्यांना सोडून जाण्यासाठी उठणार होते.

पण त्यांनी मला थोपविले. त्यांचे मस्तक माझ्या गुडघ्यांवर झुकले. माझ्या थरथरणाऱ्या हातांचे त्यांच्या ओठांनी चुंबन घेतले. माझे हात त्यांच्या आसवांनी भिजून गेले. "अरे देवा! मला हे माहीत असतं तर!" ते पुटपुटले.

"कशाबद्दल? का?" मी सारखी विचारीत होते, पण माझ्या अंतःकरणात मात्र सुख दाटले होते. कधीही न परतण्यासाठी कायमचे निघून गेलेले सुख.

पाच मिनिटांनंतर सोन्या धावत धावत वरच्या मजल्यावर कात्याकडे गेली. सबंध घराला ऐकू जाईल एवढ्या मोठ्या आवाजात ओरडून ती सांगत होती: आपली माशा सेर्गेई मिखाइलिचबरोबर लग्न करतेय!

५

आमचा विवाह लांबणीवर टाकण्याचे काही कारण नव्हते आणि तसे करण्याची त्यांची किंवा माझी इच्छाही नव्हती. एवढे खरे की, विवाहसमयीचा पोषाख मॉस्कोहून आणावा अशी कात्याची इच्छा होती व सेर्गेई मिखाइलिचनी विवाहबद्ध होण्यापूर्वी नवी बग्गी घ्यावी, नवे फर्निचर घ्यावे आणि घराच्या भिंतींना नवा कागद लावावा असे त्यांच्या आईला वाटत होते. पण आम्ही दोघांनीही आग्रह धरला की, ह्या सर्व गोष्टी जर अपरिहार्य असतील तर नंतर कराव्यात, पण माझ्या वाढदिवसानंतर दोन आठवड्यांनी विवाहबद्ध व्हावे. कोणताही बडेजाव न करता, विवाहसमयीच्या पोषाखाविना, करवल्या अथवा करवले न घेता, जेवणांचा गोंधळ न घालता अथवा शँपेनच्या बाटल्या न फोडता, विवाहाचा

कोणताही पारंपारिक घोळ न घालता शांतपणे लग्न करावे. बँडबाजा न वाजता, ट्रंका भरभरून सामान न घेता, घराची उलथापालथ न करता लग्न होणार म्हणून आपली आई किती नाराज होती हे त्यांनी मला सांगितले. तिच्या लग्नाला तीस हजार रूबल खर्च झाला होता, त्याप्रमाणे हे लग्न घडणार नाही म्हणून ती दुःखी होती. तरीही अडगळीच्या खोलीतील ट्रंका ती उपशीत होती व आमच्या सुखासाठी आवश्यक असलेल्या गालिचांबाबत, पडद्यांबाबत आणि तबकांबाबत नायिकाबरोबर तिची सतत सल्ला-मसलत चालू होती असे त्यांनी मला सांगितले.

आमच्या घरातही कात्यायचा तोच उद्योग चालू होता. आमची म्हातारी दाई कूझ्मीनिश्ना हिच्याशी तिची खलबते चालू होती. त्या विषयावर तिच्याशी थट्टेने बोलणे अशक्य झाले होते. तिची ठाम खात्री होती की, जेव्हा आम्ही आमच्या भावी जीवनाविषयी एकत्र बोलत होतो तेव्हा केवळ प्रेमालापात आणि फालतू विषयांमध्ये वेळ घालवीत होतो. आमच्या परिस्थितीमधील लोकांकडून केवळ तीच अपेक्षा धरली जात होती. पण आमचे भावी खरे सुख अवलंबून होते योग्य मापाची पोलकी शिवण्यात, टेबलक्लॉथ आणि रुमाल यांना किनारी लावण्यात!

कोणकोणत्या तयाऱ्या चालल्या होत्या यासंबंधी दिवसभरात अनेक गुप्त संदेशांची देवघेव चालू होती. बाह्यतः कात्या आणि तात्याना सेम्योनोवना – त्यांची आई – यांच्यामधील संबंध स्नेहाचे होते, पण काहीशी शत्रुभावना व सूक्ष्म मुत्सद्देगिरी त्यांना जाणवत होती.

तात्याना सेम्योनोवना यांना मी आता अधिक ओळखू

लागले होते. ती नीटनेटकी, कडक गृहिणी होती. तिच्या आवडीनिवडी जुन्या काळच्या होत्या. सेर्गेई मिखाइलिचचे तिच्यावर खूप प्रेम होते. केवळ पुत्रकर्तव्य म्हणून ते प्रेम करीत असे नव्हे, तर जगामधील ती अत्यंत उत्तम, अत्यंत दयाळू, सर्वांत बुद्धिमान व प्रेमळ स्त्री होती असे त्यांचे मत होते. त्या आमच्याशी, विशेषतः माझ्याशी, नेहमी प्रेमळपणे वागत. आपला मुलगा लग्न करतोय याचा त्यांना आनंद झाला होता. तरीही, त्यांच्या मुलाची वाग्दत्त वधू म्हणून मी त्यांना जेव्हा जेव्हा भेटायला जायची, तेव्हा तेव्हा त्या मला मुद्दाम जाणवून द्यायच्या की, त्यांच्या मुलाला माझ्याहून चांगली जोडीदारीण मिळणे शक्य होते व ही गोष्ट मी नेहमी लक्षात ठेवावी. मी त्यांना पूर्ण समजून घेतले होते व त्यांच्याशी सहमत होते.

ते शेवटचे दोन आठवडे सेर्गेई मिखाइलिच आणि मी एकमेकांना रोज भेटत होतो. दुपारच्या जेवणाला म्हणून ते यायचे आणि मध्यरात्रीपर्यंत थांबायचे. माझ्याविना ते राहू शकत नव्हते असे जरी म्हणत होते (आणि ते खरे बोलत होते हे मला माहीत होते), तरी माझ्या संगतीत पूर्ण दिवस ते कधीही घालवीत नव्हते आणि पूर्वीप्रमाणेच स्वतःच्या उद्योगांमध्ये मग्न राहण्याचा प्रयत्न करीत होते. बाह्यतः आमच्यामधील नाते बदलले नव्हते. अजूनही ते मला **तुम्ही** म्हणत, माझ्या हाताचेदेखील चुंबन घेत नसत आणि माझ्या-बरोबर एकांतात राहण्याच्या संधी घेण्याचे तर सोडाच, पण उलट तशा प्रसंगांना टाळू पहात. प्रेमाचा अतिरेक दिसू नये म्हणून जणू त्यांना भीती वाटत होती. आपल्या प्रेमाचे अतिरेकी प्रदर्शन अपायकारक ठरेल असे त्यांना वाटत होते. ते बदलले होते अथवा मी बदलले होते हे मला माहीत नाही,

पण आता मला स्वत:ला मात्र मी त्यांच्या पूर्णत: बरोबरीची समजत होते. त्यांच्यात आता कृत्रिम साधेपणा मला जाणवत नव्हता. आनंदात मग्न असलेले लाडके बाळ माझ्यासमोर उभे राहून अनेकदा मला सुख होई. आदर आणि भीती मनात उत्पन्न करणारा पुरुष नाहीसा झाला होता.

"म्हणजे हा माणूस खरा असा आहे तर!" माझ्या मनात आले. "तो अगदी माझ्यासारखाच आहे—जास्त काही नाही." त्यांना मी पुरेपूर जाणले होते, त्यांना पूर्ण समजून घेतले होते असे आता मला जाणवले. आणि त्यांच्याविषयी जे काही मला माहीत झाले होते ते कमालीचे साधे होते व मला रुचणारे होते. आम्ही एकत्र कसे जगायचे त्याबद्दलच्या त्यांच्या योजनासुद्धा माझ्या बेतांशी तंतोतंत जुळत होत्या. फक्त त्या अधिक स्पष्ट आणि जास्त चांगल्या रीतीने व्यक्त केलेल्या होत्या.

हवा वाईट होती व बहुतेक वेळ आम्ही घरातच घालवीत होतो. आमच्या सर्वोत्तम, हितगुजगोष्टी दिवाणखान्यात पियानो व खिडकी यांच्या दरम्यानच्या कोपऱ्यात घडत होत्या. खिडकीच्या काळ्या तावदानावर मेणबत्तीचा प्रकाश परावर्तित होई आणि अधूनमधून चकाकत्या काचेवर पावसाचे थेंब आपटायचे व खाली घरंगळायचे. छपरावर पावसाची तडतड चालू होती, पन्हाळीतून पाऊस खळखळत होता, खिडकीमधून पावसाची ओल जाणवत होती आणि ह्या सर्व गोष्टींमुळे आमचा कोपरा अधिकच उबदार, तेजस्वी आणि आनंदी भासत होता.

"केव्हापासून तुम्हाला एक गोष्ट सांगायची म्हणतोय," एके दिवशी संध्याकाळी उशीरावेळी त्यांनी बोलायला आरंभ केला. आम्ही दोघेचजण आमच्या कोपऱ्यात बसलो होतो.

"तुम्ही पियानो वाजवत होतात तेव्हा सारा वेळ मी त्यासंबंधी विचार करत होतो."

"काहीही सांगू नका—तुम्ही न सांगताही मला सारं ठाऊक आहे," मी म्हणाले.

त्यांनी स्मित केले. "हो, ते खरं आहे—नको बोलायला त्याबद्दल!"

"नाही, सांगा मला. कशाबद्दल?"

"ठीक आहे, सांगतो. अ आणि ब ची गोष्ट मी सांगितली होती ते आठवतं?"

"एवढा मूर्खपणा मी कसा काय विसरेन? सारं काही ठीक घडलं पुढं म्हणून बरं—"

"हो, आणखी थोडा वाहवलो असतो, तर माझ्या सुखावर घाव घालायला मीच कारणीभूत ठरलो असतो. पण प्रत्यक्षात मी खरं सांगत नव्हतो आणि ती टोचणी मनाला लागून राहिलीय. तेव्हा मी जे सुरू केलं होतं ते आता संपवायची इच्छा आहे."

"कृपा करा! नको ना!"

"घाबरू नका," स्मित करीत ते म्हणाले. "मला केवळ खुलासा करायचाय. जेव्हा मी बोलायला आरंभ केला तेव्हा गोष्टींचं प्रयोजन मला हुडकून काढायचं होतं."

"कशाला करायचं तसं?" मी विचारले. "त्याचा कधीही उपयोग होत नाही."

"खरंच, तसं करण्यात काही अर्थ नाही. माझा तर्क अगदी चुकीचा होता. ह्या उन्हाळ्यात जेव्हा मी इथं आलो तेव्हा मी स्वतःला पूर्णपणं पटवून दिलं होतं की, आयुष्यात एवढ्या निराशा भोगल्यानंतर आणि चुका केल्यानंतर, प्रेम माझ्या

दृष्टीनं अशक्य होतं आणि केवळ जगून आयुष्य संपविण्या-
[illegible] माझ्यापाशी काहीही उरलं नव्हतं. तुमच्याविषयी [illegible] भावना कोणत्या प्रकारच्या होत्या आणि त्यातून काय [illegible] होतं हे दीर्घ काळपर्यंत मला समजू शकलं [illegible] मनात आशा-निराशेचा खेळ चालू होता. एके दिवशी वाटायचं, तुम्ही नखरा करत होतात; पण दुसऱ्या दिवशी तुम्ही प्रामाणिक वाटत. काय करावं ते समजत नव्हतं. [illegible] रात्रीनंतर, आपण बागेत फिरलो तेव्हा, तुम्हाला [illegible]. त्यावेळी माझं सध्याचं सुख मला फार [illegible] —नशी अपेक्षा धरणं चूक वाटत होतं. [illegible] आणि ती व्यर्थ ठरली असती [illegible] स्वतःचाच विचार करत होतो, कारण [illegible] केविलवाणा अहंकारी आहे."

[illegible] थांबले आणि बसून माझ्याकडे पाहू लागले.

[illegible]. तेव्हा मी जे काही बोललो तो सगळाच मूर्खपणा [illegible] घ्यायला मला कारण होतं—भिणं मला भाग होतं. [illegible] मी खूप काही घेतोय आणि त्याच्या बदल्यात [illegible] कमी देतोय. तुम्ही अजून लहान आहात, नुकती [illegible] कळी आहात. प्रेमात प्रथमच गुंतला आहात, [illegible]—

[illegible] प्रामाणिकपणं सांगा की..." मी बोलू लागले, [illegible] उत्तराची भीती वाटून पटकन म्हणाले: "नको. [illegible] नका."

[illegible] कधी प्रेमात होतो किंवा नाही? हेच विचारायचं [illegible] माझा विचार तात्काळ हेरून त्यांनी विचारले.

"मी सांगू शकतो त्याबद्दल! आत्ता मला वाटतंय तसं कधीही मला वाटलं नव्हतं..." पण येथे एक दु:खद आठवण त्यांच्या मनात उमटून गेली. "पण तरीही, मी तुमच्यावर प्रेम करायचं असेल तर तुमचं अंत:करण माझं आहे अशी माझी खात्री झाली पाहिजे," खेदाने ते म्हणाले. "तेव्हा माझं तुमच्यावर प्रेम आहे असं म्हणण्यापूर्वी खूप विचार करणं मला आवश्यक नव्हतं का? मी तुम्हाला काय देऊ शकतो? प्रेम! होय ना?"

"हे कमी आहे का?" त्यांच्या डोळयांमध्ये पहात मी विचारले.

"लाडके, हे खूप कमी आहे–तुमच्या दृष्टीनं खूप कमी आहे," ते उत्तरले. "तुमच्यापाशी सौंदर्य आणि तारुण्य आहे. अनेकदा मला रात्री झोप लागत नाही. मला खूप आनंद झालाय. आपल्या सहजीवनाचा विचार करत बसतो. मी बरंच जीवन जगलोय आणि सुखासाठी काय आवश्यक असतं ते मला समजलंय–इथं खेड्यात निवांत, अलिप्त राहणं, दुसऱ्यांचं भलं करण्याची संधी लाभणं! ज्यांना भल्याची माहिती नसते त्यांचं भलं करणं खूप सोपं आहे. मग ज्यात अर्थ वाटेल असं काम करावं. शिवाय विश्रांती, निसर्गसान्निध्य, पुस्तकं, संगीत, आपल्या सग्यासोयऱ्यांवर प्रेम... सुखाची माझी ही कल्पना आहे आणि याहून चांगली माझ्या डोक्यात येत नाही. आणि ह्या सर्वांवर कळस म्हणजे तुमच्यासारखी सहचरी; कुटुंब, कदाचित–माणूस याहून अधिकाची अपेक्षा धरू शकत नाही."

"हो," मी म्हणाले.

"विशेषत: माझ्यासारखा माणूस, इत:पर तरुण नसलेला,"

ते पुढे बोलत राहिले. "पण तुमचं तसं नाही. तुम्ही अजून [illegible] जीवन अनुभवलेलं नाही. दुसऱ्या कशामध्ये तरी सुखाचा [illegible] तुम्ही प्रयत्न कराल आणि दुसऱ्या कशात तरी तुम्हाला ते लाभेलही. आत्ता तुम्हाला हे सुख वाटतंय, कारण तुम्ही माझ्यावर प्रेम करता आहात!"

"नाही, मला नेहमीच निवांत कौटुंबिक जीवन आवडत [illegible] आणि त्याचीच मला सदैव इच्छा होती," मी म्हणाले. "ज्याचा मी नेहमी विचार करत आले आहे तेच तुम्ही केवळ [illegible] दाखवलंत."

त्यांनी स्मित केलं. "लाडके, केवळ तसा भास होतोय तुम्हाला. ते तुम्हाला पुरेसं नाही. तुमच्यापाशी तारुण्य आणि सौंदर्य आहे," विचारमग्न होत ते परत म्हणाले.

माझ्यावर त्यांचा विश्वास बसत नाही आणि माझ्या सौंदर्याचा व तारुण्याचा त्यांना खेद वाटत आहे, हे पाहून मला चीड आली.

"मग कशाला माझ्यावर प्रेम करता?" मी रागाने विचारले. "माझ्या तारुण्यासाठी, किंवा खुद्द माझ्यासाठी?"

"मला माहीत नाही, पण मी तुमच्यावर प्रेम करतो," [illegible] अवधानी, आर्जवी डोळ्यांनी माझ्याकडे पहात ते म्हणाले.

मी उत्तर केले नाही, पण माझी दृष्टी त्यांच्याकडे सरळ [illegible] गेली. एका विचित्र भावनेने मला एकाएकी झपाटले. [illegible] माझ्या भोवतालच्या गोष्टी मला दिसेनाशा झाल्या, [illegible] त्यांचा चेहरा अदृश्य झाला आणि फक्त त्यांचे डोळे [illegible] लागले... अगदी माझ्या स्वतःच्या डोळ्यांलगत! मग [illegible] डोळे माझ्यात सामावले आणि पूर्ण अंधार झाला...

त्यांच्या नजरेने निर्माण केलेली आनंदाची आणि भीतीची भावना झटकून टाकण्यासाठी मला माझे डोळे घट्ट मिटून घ्यावे लागले . . .

आमच्या विवाहाच्या आदल्या दिवशी हवा स्वच्छ झाली. उन्हाळी पावसाच्या जागी नितळ आणि थंडगार पहिली शारदीय संध्याकाळ आली. सर्व काही ओले, थंड आणि सूर्यप्रकाशित होते. प्रथमच बागेला शरदाचा स्पर्श जाणवत होता... प्रशस्त, तेजस्वी, पण पर्णहीन. आकाश नितळ, थंड आणि फिकट दिसत होते. उद्या, आमच्या लग्नाच्या दिवशी, हवा सुंदर असणार हा सुखद विचार मनाशी धरून मी झोपी गेले. सूर्योदयाबरोबरच मला जाग आली. आपल्यापुढे काय वाढून ठेवलेय ह्या विचारासरशी थोडी घाबरले आणि चकितही झाले. मी बाहेर बागेत गेले. सूर्य नुकताच उगवला होता आणि लिंबोणीच्या पातळ होत चाललेल्या पिवळट फांद्यांमधून तुरळक प्रकाश ओतीत होता. सळसळणाऱ्या पानांनी पाऊलवाट आच्छादली होती. ॲशच्या झाडावरील सुरकुतलेली फळे लालभडक भासत होती आणि फांद्यांवर उरलेली थोडी पाने थंडीने गोठून वाळून मेली होती. डेलिया कोमेजले होते आणि काळपट पडले होते. फिकट हिरव्या गवतावर आणि घराजवळच्या पायदळी तुडविल्या गेलेल्या काटेरी झुडुपांवर प्रथमच गोठलेल्या दंवाचा रुपेरी मुलामा चढला होता. स्वच्छ, थंडचा आकाशात एकही ढग नव्हता, किंवा असणे शक्य नव्हते.

"आजच ते घडणार का?" माझ्या सुखावर न विश्वासून मी स्वतःला प्रश्न केला. "उद्या मी इथं जागी होणार नाही, तर निकोल्स्कोयेमधल्या खांबांच्या अपरिचित घरात जागी होणार हे खरं का? आता पुन्हा मी त्यांची कधीही वाट

जहणार नाही, त्यांना कधीही भेटायला जाणार नाही, रात्रीच्या वेळी कात्यापाशी त्यांच्याबद्दल कधीही बोलणार नाही हे खरं का? ह्या दिवाणखान्यात त्यांना शेजारी बसवून मी कधीच पियानो वाजवणार नाही का? किंवा त्यांचा निरोप घेणार नाही का आणि रात्रीच्या वेळी ते सुरक्षित जातील अथवा नाही याबद्दल धास्तावणार नाही का?" पण मला आठवले, काल ते म्हणाले होते की, त्यांची ती शेवटची खेप होती आणि कात्याने विवाहाचा माझा पोषाख मला घालून बघायला लावला होता व "उद्यापर्यंत" म्हणाली होती. मग क्षणभर माझा विश्वास बसला आणि मग परत मनात शंका येऊ लागल्या. "आजपासून तिथं त्यांच्या आईबरोबर मी रहायला लागणार आणि नदेज्दा, म्हातारा ग्रिगोरी अथवा कात्या माझ्याबरोबर नसणार हे खरंच का? रात्रीच्या वेळी आमच्या म्हाताऱ्या दाईचं मी चुंबन घेणार नाही का? आणि नेहमीप्रमाणं माझ्यावर क्रूसचिन्ह करून 'झोपा आता ताईसाहेब' असं तो म्हणालेली मी ऐकणार नाही का? सोन्याला इतःपर मी शिकवणार नाही का, अथवा तिच्याशी खेळणार नाही का किंवा सकाळी तिच्या भिंतीवर टिचक्या मारणार नाही का आणि तिचं उंच स्वरातलं हसणं ऐकणार नाही का? खरंच का आज मी स्वतःला परकी होणार आणि माझ्यापुढं एक नवीन जीवन खुलं होणार, माझ्या आशांना आणि स्वप्नांना ते प्रत्यक्षात उतरवणार? हे नवीन आयुष्य खरंच सदैव टिकणार?"

सर्गेई मिखाइलिच यांची मी अधीरपणे वाट पहात होते. माझ्या माझ्या विचारांच्या सोबतीने एकटे बसणे मला कठीण झाले. ते लौकर आले आणि मगच माझा विश्वास बसू लागला

की, त्या दिवसापासून मी त्यांची पत्नी होणार आहे. मगच विचार मला घाबरवेनासा झाला.

दुपारच्या जेवणापूर्वी माझ्या वडिलांच्या धर्मविधीसाठी आम्ही चर्चमध्ये गेलो.

"आत्ता ते जिवंत असते तर!" घरी परत येताना माझ्या मनात विचार आला. त्यांचा सर्वोत्तम मित्र असलेल्या माणसाच्या बाहूवर माझा हात विसावला होता. प्रार्थनेच्या वेळी मी डोके एवढे खाली झुकविले होते की, फरशीच्या दगडाचा थंडगार स्पर्श जाणवत होता आणि माझ्या पित्याची मूर्ती नजरेसमोर अगदी ठळकपणे मी उभी केली होती. माझा आत्मा त्यांच्या आत्म्याने जाणून घेतला होता आणि माझ्या निवडीला त्यांनी आशीर्वाद दिला होता, अशी मला ठाम श्रद्धा वाटली होती. आत्तासुद्धा त्यांचा आत्मा आमच्याभोवती घुटमळत होता आणि त्यांचा आशीर्वाद मला ऐकू येत होता असे भासले. आठवणी आणि आशा, आनंद आणि खेद यांचे मिश्रण घडून त्यातून एकच एक पवित्र व प्रसन्न भावना निर्माण झाली होती. ह्या स्तब्ध, ताज्या हवेशी, नीरवतेशी, उघड्या शेतांशी आणि इतःपर गाल भाजणारे प्रकाशकिरण न उधळणाऱ्या फिकट आकाशाशी त्या भावनेचा सूर जमून गेला होता. माझ्या शेजारचा माणूस माझ्या भावनेला समजला होता आणि तिच्यात सहभागी होत होता असे मला भासले. काहीही न बोलता ते मुकाटपणे चालत होते. त्यांच्या मुद्रेकडे मी अधूनमधून कटाक्ष टाकत होते. थोडा आनंद आणि थोडा खेद अशी तीच पवित्र भावना त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेली होती, तीच भावना माझ्या अंतःकरणात होती, सभोवतालच्या प्रत्येक गोष्टीत होती.

एकदम ते माझ्या बाजूला वळले आणि काहीतरी बोलण्याच्या बेतात असल्याचे मी पाहिले. माझ्या मनात विचार चमकून गेला: "ज्याचा मी विचार करतेय त्याच्याविना दुसरं काहीतरी ते बोलतील काय." पण ते माझ्या पित्याविषयी बोलले, त्यांचे नांवही न उच्चारता: "एकदा तो म्हणाला होता, 'माझ्या माशाशी लग्न कर!' अर्थात तो गंमत करत होता."

"किती आनंद झाला असता त्यांना!" त्यांचा बाहू दाबत मी म्हणाले.

"खरंच, त्यावेळी तुम्ही अगदी लहान होता," माझ्या डोळ्यांमध्ये टक लावून पहात ते पुढे बोलू लागले. "मी तुमच्या डोळ्यांची चुंबने घ्यायचा, कारण ते त्याच्या डोळ्यांसारखे होते म्हणून मला आवडायचे. पण केवळ त्यांच्या स्वतःखातर ते डोळे मला एवढे प्रिय होतील असं कधी वाटलं नव्हतं! तेव्हा तुम्हाला मी माशा म्हणायचा!"

"मला तू म्हणत चला," मी म्हणाले.

"अगदी आत्ताच तुला तू म्हणायच्या बेतात होतो," ते म्हणाले. "आत्ता कुठं वाटू लागलंय की, तू सर्वस्वी माझीच आहेस!" त्यांची शांत, आनंदी दृष्टी माझ्यावर स्थिरावली.

आखूड खुंटांवरील न मळलेल्या वाटेवरून आम्ही चालत होतो. फक्त आमच्या पावलांचे आणि बोलण्याचे आवाज येत होते. एका दिशेला, घळीपलिकडे, दूरवरच्या एका उघड्या राईपर्यंत तपकिरी छटेचे खुंट पसरत गेले होते. त्या राईला लागून एक शेतगडी बाप्या मुकाटपणे लाकडी नांगराने काळा पट्टा आखत होता व तो पट्टा अधिकाधिक विस्तारत चालला होता. टेकडीच्या पायथ्याशी चरणाऱ्या घोड्यांचा कळप अगदी नजीक भासत होता. दुसऱ्या दिशेला थेट बागेपर्यंत शेताची

नांगरणी आणि पेरणी झालेली होती. बागेमागे आमचे घर दिसत होते. गोठलेले दंव वितळून गेल्यामुळे आता जमीन काळी दिसत होती. पण गव्हाच्या हिवाळी पिकाचे हिरवे पट्टे अधून-मधून डोकावू लागले होते. त्या सर्वांवर थंडा सूर्य चकचकीत चमकत होता आणि प्रत्येक गोष्टीवर लांब केसांच्या म्हाताऱ्या उडत होत्या. आमच्याभोवत्ती हवेत त्यांचे धागे उडत होते व उन्हात एव्हाना वाळलेल्या खुंटांमध्ये अडकत होते. आमच्या डोळ्यांमध्ये आणि केसांमध्ये ते जात होते, आमच्या कपड्यांना चिकटत होते. जेव्हा आम्ही बोलत असू तेव्हा आमचे आवाज स्तब्ध हवेत ओठंगत होते. जणू जगात आम्ही पूर्णतया एकाकी होतो. इत:पर गरम नसलेला सूर्य ज्या ठिकाणी धडधडत आणि चमकत उभा होता त्या निळ्या घुमटाखाली आम्ही एकटे होतो.

मलासुद्धा त्यांना **तू** म्हणायची इच्छा झाली होती, पण लाज वाटत होती.

"तू एवढा वेगात का चालतोस?" अस्पष्टपणे मी भर्रकन म्हटले आणि लाजून लालबुंद झाले.

त्यांनी आपल्या पावलाचा वेग मंदावला आणि माझ्याकडे अधिकच प्रेमळ नजरेने पाहिले. कधी नव्हता एवढा त्यांचा चेहरा आनंदी दिसत होता.

आम्ही घरी गेलो तेव्हा सेर्गेई मिखाइलिच यांची आई व आम्ही बोलावलेले पाहुणे आमची वाट पहात थांबले होते. त्यामुळे चर्चमधून बाहेर पडून निकोल्स्कोयेला जायला बग्गीत बसेपर्यंत परत मला त्यांचा एकांत सहवास लाभला नाही.

चर्च जवळ जवळ रिकामे होते. माझ्या डोळ्याच्या

ञ्यातून मी पाहिले की, त्यांची आई पूर्वेच्या गाभाऱ्यात चिचावर ताठ उभी होती. जांभळ्या फितींची किनार लावलेली टोपी घालून कात्या उभी होती. तिच्या गालांवर अश्रू होते. घरातील दोन-तीन भूदास माझ्याकडे कुतूहलाने पहात होते. सेर्गेई*मिखाइलिचकडे मी पहात नव्हते, पण माझ्याशेजारी त्यांचे अस्तित्व मला जाणवत होते. प्रार्थनेचे शब्द मी लक्षपूर्वक ऐकत होते आणि त्यांचा पुनरुच्चार करीत होते. पण माझ्या अंतःकरणातून प्रतिसाद मिळत नव्हता. प्रार्थना करणे मला जमत नव्हते. तसबिरींकडे, मेणबत्त्यांकडे, पाद्र्याच्या झग्यावर विणलेल्या क्रूसाकडे, तसबिरींच्या गाभाऱ्याकडे, खिडक्यांकडे मी बधीरपणे पहात होते. पण मला काहीही समजत नव्हते. माझ्यावर काहीतरी संस्कार केला जात होता एवढेच मला जाणवत होते. मग हाती क्रूस घेऊन पाद्री आमच्याकडे वळले. त्यांनी आमचे अभिनंदन केले, माझा नामकरणविधी त्यांनी केल्याची आठवण दिली आणि देवाच्या इच्छेने त्यांच्या हातून माझा विवाहसोहळा पार पडला असे ते म्हणाले. कात्याने आणि सेर्गेई मिखाइलिचच्या आईने आमची चुंबने घेतली. ग्रिगोरीने बग्गी बोलाविल्याचे मी ऐकले. सर्व काही एव्हाना संपले होते आणि माझ्यावर केलेल्या धर्मविधीला अनुसरून माझ्या अंतःकरणात काहीच घडले नव्हते, कसलाच प्रतिसाद उमटला नव्हता, या जाणीवेने मी चकित झाले होते, घाबरले होते. त्यांनी आणि मी एकमेकांचे चुंबन घेतले व ते चुंबन आमच्या इतके अनोळखी, इतके परके भासले! "आणि संपलं सारं" मी मनाशी म्हटले.

आम्ही बाहेर पोर्चमध्ये गेलो. कमानींखाली बग्गीची चाके

खडखडली आणि माझ्या चेहऱ्याला ताज्या हवेचा स्पर्श झाला. त्यांनी आपल्या डोक्यावर टोपी चढविली आणि बग्गीत चढण्यासाठी मदत करायला माझ्या दंडाला धरले. भोवती तेजोवलय असलेला गोठलेला चंद्र खिडकीमधून मी पाहिला. ते माझ्याशेजारी बसले आणि त्यांनी दार बंद केले. माझ्या काळजात काहीतरी खुपसल्यासारखी वेदना झाली. ज्या आत्म-विश्वासाने ते वागले होते तो मला अपमानास्पद वाटला. मी डोके झाकून घ्यावे असे कात्या ओरडून सांगत असल्याचे मी ऐकले. फरसबंदीवरून चाके खडखडली, मग नरम रस्ता लागला आणि आम्ही निघालो. मी कोपऱ्यात संकोचून बसले. थंड चांदण्यात दिसणाऱ्या दूरवरच्या चकचकीत शेतांकडे व धावणाऱ्या रस्त्याकडे खिडकीमधून पहात राहिले. मी त्यांच्या-कडे पहात नव्हते, पण माझ्या शेजारी त्यांचे अस्तित्व मला जाणवत होते. "ज्या क्षणापासून मी खूप मोठ्या अपेक्षा केल्या होत्या, त्याच्यापासून हे एवढंच मला लाभलं?" माझ्या मनात विचार आला. त्यांच्या एवढे जवळ एवढे एकाकी बसणे काहीसे मानभंगाचे आणि अपमानास्पद वाटले. काहीतरी बोलण्याच्या उद्देशाने मी त्यांच्याकडे वळले, पण शब्दच उमटेनात. जणू त्यांच्याविषयीची माझी जिव्हाळ्याची भावना आटून गेली होती आणि दुखरी व भीतीची भावना तिच्याजागी ठाण मांडून बसली होती.

"हे खरं आहे यावर या क्षणापर्यंत माझा विश्वास बसत नव्हता," माझ्या कटाक्षाला प्रतिसाद म्हणून ते हळूच म्हणाले.

"हो, पण का कुणास ठाऊक, मला भीती वाटतेय," मी म्हणाले.

"लाडके, माझी तुला भीती वाटते?" त्यांनी विचारले आणि माझा हात पकडून त्यावर आपले डोके टेकले.

माझा हात त्यांच्या हाती निर्जीव पडला होता व माझे काळीज थंडगार पडले होते.

"हो," मी पुटपुटले.

पण असे म्हणत असतानाच माझ्या हृदयाचे ठोके जलद पडू लागले, माझा हात थरथरला आणि त्यांच्या हाताला मी एकदम गच्च पकडले. एक उबदार लाट माझ्या अंगभर पसरली आणि अर्धवट उजेडात माझ्या डोळ्यांनी त्यांच्या डोळ्यांचा वेध घेतला. एकदम मला जाणवले की, मला त्यांची भीती वाटत नव्हती, ती भीती म्हणजे प्रेम होते, नवे प्रेम होते; पूर्वीपेक्षा जास्त स्नेहाळ आणि भक्कम. मी सर्वस्वी त्यांची होते असे मला जाणवले आणि त्यांच्या माझ्यावरील सत्तेचा मला आनंद झाला.

# भाग दुसरा

## ६

दिवस आणि आठवडे उलटले. सरतेशेवटी खेड्यातील [illegible] आयुष्याचे दोन महिने नकळत सरले असे निदान तेव्हा [illegible] त्या दोन महिन्यांमध्ये अनुभवाला आलेले प्रेम, [illegible] आणि सुख सबंध आयुष्यभर पुरले असते. खेड्या-[illegible] कसे जगायचे याबाबतची त्याची आणि माझी [illegible] भिन्न होती असे आढळले, पण आमच्या अपेक्षे-[illegible] नव्हती. जेव्हा मी त्याची वाग्दत्त वधू होते तेव्हा

कठीण श्रमाच्या, स्वार्थत्यागाच्या आणि इतरांसाठी झटण्याच्या आयुष्याचे चित्र मी रंगविले होते, तसे आता ते नव्हते हे खरे! उलट एकमेकांविषयी स्वार्थी प्रेमभावना निर्माण झाली होती, आपल्यावर प्रेम केले जावे अशी इच्छा उत्पन्न झाली होती. तर्काला धरून नसलेली, सतत मौज-मजेची भावना आणि जगातील इतर सर्व गोष्टींचा विसर! कशात ना कशात स्वतःला गुंतवून घेण्यासाठी काहीवेळा तो आपल्या अभ्यासिकेत जाई. काहीवेळा कामाच्या निमित्ताने शहरात जाई अथवा इस्टेटीवर चक्कर मारून येई. पण मला सोडून जाणे त्याच्या किती जिवावर येत होते हे मी पहात होते. मग माझ्यापाशी तो कबूल करी की, माझ्याविना जगातील प्रत्येक गोष्ट त्याला खूप रिती भासत होती, मला सोडून राहणे त्याला शक्य होत नव्हते. मलाही तसेच वाटत होते. मी वाचायची, संगीतामध्ये, माझ्या सासूच्या संगतीत आणि शाळेत वेळ घालवायची. पण हे सगळे मी करायची, कारण ह्या गोष्टींचा त्याच्याशी संबंध होता म्हणून. त्याची खुषी प्राप्त करता यावी म्हणून. त्याच्याविषयीच्या विचाराशी संबंध नसलेली एखादी गोष्ट मी हाती घेतली, तर तात्काळ तिच्यातील माझे स्वारस्य संपायचे. जगामध्ये त्याच्याशिवाय दुसरे काही असू शकते हा विचारच मला विचित्र वाटायचा. ही कदाचित क्षुद्र, स्वार्थी भावना असेल, पण ती मला आनंदित करायची, सर्व जगापेक्षा उंच मला उचलून धरायची. माझ्या दृष्टीने त्याच्या-शिवाय दुसरे काहीच अस्तित्वात नव्हते. जगामधील तोच एकमेव प्रमादातीत पुरुष होता. केवळ त्याच्यासाठी मी जगत होते आणि त्याच्या अपेक्षेप्रमाणे राहण्याचा प्रयत्न करीत होते. आणि मला तो जगातील सर्वात छान आणि सर्वोत्तम स्त्री

... होता. सर्व शक्य गुणांनी त्याने मला अलंकृत केले ... जगातील सर्वात छान आणि सर्वोत्तम पुरुषासाठी ही सर्वगुणसंपन्न स्त्री बनण्याचा मी प्रयत्न करीत होते.

एकदा मी प्रार्थना करीत असताना तो माझ्या खोलीत आला. मी त्याच्याकडे नजर टाकली आणि प्रार्थना म्हणत ... मला विचलित न करण्याच्या हेतूने तो टेबलाशी ... एक पुस्तक चाळू लागला. पण तो माझ्याकडेच पहात ... असे मला जाणवले आणि मी मान वळवून पाहिले. त्याच्या मुद्रेवर स्मित उमटले आणि मी खळाळून हसले. मला ... प्रार्थना करणे अशक्य ठरले.

"तुझी प्रार्थना झाली?" मी विचारले.

"हो, पण तुझ्या प्रार्थनेत अडथळा आणायची माझी इच्छा नाही. मी बाहेर जातो."

"खरंच तू प्रार्थना केलीस?"

त्याने उत्तर दिले नाही आणि तो बाहेर निघून गेला असता, ... मी त्याला थांबवले. "लाडक्या, माझ्यासाठी – खास माझ्यासाठी प्रार्थना म्हण ना माझ्याबरोबर!"

माझ्याशेजारी तो गुडघे टेकून बसला आणि प्रार्थना म्हणू लागला. त्याने आपल्या हातांची गुंफण अगदी चमत्कारिक ... होती. त्याचा चेहरा गंभीर होता व त्याचे शब्द अडखळत ... अधूनमधून तो माझ्याकडे वळून बघायचा. माझ्या ...ची आणि मदतीची अपेक्षा धरायचा. जेव्हा त्याने प्रार्थना ... तेव्हा मी हसले आणि माझ्या हातांची त्याला मिठी ...

... लाजला आणि माझ्या हातांची चुंबने घेऊ लागला.

"... जबाबदार! तूच! जणू काही माझं वय दहा!"

खडखडली आणि माझ्या चेहऱ्याला ताज्या हवेचा स्पर्श झाला. त्यांनी आपल्या डोक्यावर टोपी चढविली आणि बग्गीत चढण्यासाठी मदत करायला माझ्या दंडाला धरले. भोवती तेजोवलय असलेला गोठलेला चंद्र खिडकीमधून मी पाहिला. ते माझ्याशेजारी बसले आणि त्यांनी दार बंद केले. माझ्या काळजात काहीतरी खुपसल्यासारखी वेदना झाली. ज्या आत्मविश्वासाने ते वागले होते तो मला अपमानास्पद वाटला. मी डोके झाकून घ्यावे असे कात्या ओरडून सांगत असल्याचे मी ऐकले. फरसबंदीवरून चाके खडखडली, मग नरम रस्ता लागला आणि आम्ही निघालो. मी कोपऱ्यात संकोचून बसले. थंड चांदण्यात दिसणाऱ्या दूरवरच्या चकचकीत शेतांकडे व धावणाऱ्या रस्त्याकडे खिडकीमधून पहात राहिले. मी त्यांच्याकडे पहात नव्हते, पण माझ्या शेजारी त्यांचे अस्तित्व मला जाणवत होते. "ज्या क्षणापासून मी खूप मोठ्या अपेक्षा केल्या होत्या, त्याच्यापासून हे एवढंच मला लाभलं?" माझ्या मनात विचार आला. त्यांच्या एवढे जवळ एवढे एकाकी बसणे काहीसे मानभंगाचे आणि अपमानास्पद वाटले. काहीतरी बोलण्याच्या उद्देशाने मी त्यांच्याकडे वळले, पण शब्दच उमटेनात. जणू त्यांच्याविषयीची माझी जिव्हाळ्याची भावना आटून गेली होती आणि दुखरी व भीतीची भावना तिच्याजागी ठाण मांडून बसली होती.

"हे खरं आहे यावर या क्षणापर्यंत माझा विश्वास बसत नव्हता," माझ्या कटाक्षाला प्रतिसाद म्हणून ते हळूच म्हणाले.

"हो, पण का कुणास ठाऊक, मला भीती वाटतेय," मी म्हणाले.

"लाडके, माझी तुला भीती वाटते?" त्यांनी विचारले आणि माझा हात पकडून त्यावर आपले डोके टेकले.

माझा हात त्यांच्या हाती निर्जीव पडला होता व माझे काळीज थंडगार पडले होते.

"हो," मी पुटपुटले.

पण असे म्हणत असतानाच माझ्या हृदयाचे ठोके जलद पडू लागले, माझा हात थरथरला आणि त्यांच्या हाताला मी एकदम गच्च पकडले. एक उबदार लाट माझ्या अंगभर पसरली आणि अर्धवट उजेडात माझ्या डोळयांनी त्यांच्या डोळयांचा वेध घेतला. एकदम मला जाणवले की, मला त्यांची भीती वाटत नव्हती, ती भीती म्हणजे प्रेम होते, नवे प्रेम होते; पूर्वीपेक्षा जास्त स्नेहाळ आणि भक्कम. मी सर्वस्वी त्यांची होते असे मला जाणवले आणि त्यांच्या माझ्यावरील सत्तेचा मला आनंद झाला.

# भाग दुसरा

## ६

दिवस आणि आठवडे उलटले. सरतेशेवटी खेड्यातील निवांत आयुष्याचे दोन महिने नकळत सरले असे निदान तेव्हा उमजले. त्या दोन महिन्यांमध्ये अनुभवाला आलेले प्रेम, उत्तेजकता आणि सुख सबंध आयुष्यभर पुरले असते. खेड्या-मध्ये आम्ही कसे जगायचे याबाबतची त्याची आणि माझी कल्पने अगदी भिन्न होती असे आढळले, पण आमच्या अपेक्षे-पेक्षा वाईट नव्हती. जेव्हा मी त्याची वाग्दत्त वधू होते तेव्हा

कठीण श्रमाच्या, स्वार्थत्यागाच्या आणि इतरांसाठी झटण्याच्या आयुष्याचे चित्र मी रंगविले होते, तसे आता ते नव्हते हे खरे! उलट एकमेकांविषयी स्वार्थी प्रेमभावना निर्माण झाली होती, आपल्यावर प्रेम केले जावे अशी इच्छा उत्पन्न झाली होती. तर्काला धरून नसलेली, सतत मौज-मजेची भावना आणि जगातील इतर सर्व गोष्टींचा विसर! कशात ना कशात स्वतःला गुंतवून घेण्यासाठी काहीवेळा तो आपल्या अभ्यासिकेत जाई. काहीवेळा कामाच्या निमित्ताने शहरात जाई अथवा इस्टेटीवर चक्कर मारून येई. पण मला सोडून जाणे त्याच्या किती जिवावर येत होते हे मी पहात होते. मग माझ्यापाशी तो कबूल करी की, माझ्याविना जगातील प्रत्येक गोष्ट त्याला खूप रिती भासत होती, मला सोडून राहणे त्याला शक्य होत नव्हते. मलाही तसेच वाटत होते. मी वाचायची, संगीतामध्ये, माझ्या सासूच्या संगतीत आणि शाळेत वेळ घालवायची. पण हे सगळे मी करायची, कारण ह्या गोष्टींचा त्याच्याशी संबंध होता म्हणून. त्याची खुषी प्राप्त करता यावी म्हणून. त्याच्याविषयीच्या विचाराशी संबंध नसलेली एखादी गोष्ट मी हाती घेतली, तर तात्काळ तिच्यातील माझे स्वारस्य संपायचे. जगामध्ये त्याच्याशिवाय दुसरे काही असू शकते हा विचारच मला विचित्र वाटायचा. ही कदाचित क्षुद्र, स्वार्थी भावना असेल, पण ती मला आनंदित करायची, सर्व जगापेक्षा उंच मला उचलून धरायची. माझ्या दृष्टीने त्याच्या-शिवाय दुसरे काहीच अस्तित्वात नव्हते. जगामधील तोच एकमेव प्रमादातीत पुरुष होता. केवळ त्याच्यासाठी मी जगत होते आणि त्याच्या अपेक्षेप्रमाणे राहण्याचा प्रयत्न करीत होते. आणि मला तो जगातील सर्वात छान आणि सर्वोत्तम स्त्री

मानीत होता. सर्व शक्य गुणांनी त्याने मला अलंकृत केले होते. जगातील सर्वात छान आणि सर्वोत्तम पुरुषासाठी ही सर्वगुणसंपन्न स्त्री बनण्याचा मी प्रयत्न करीत होते.

एकदा मी प्रार्थना करीत असताना तो माझ्या खोलीत आला. मी त्याच्याकडे नजर टाकली आणि प्रार्थना म्हणत राहिले. मला विचलित न करण्याच्या हेतूने तो टेबलाशी बसून एक पुस्तक चाळू लागला. पण तो माझ्याकडेच पहात होता असे मला जाणवले आणि मी मान वळवून पाहिले. त्याच्या मुद्रेवर स्मित उमटले आणि मी खळाळून हसले. मला पुढे प्रार्थना करणे अशक्य ठरले.

"तुझी प्रार्थना झाली?" मी विचारले.

"हो, पण तुझ्या प्रार्थनेत अडथळा आणायची माझी इच्छा नाही. मी बाहेर जातो."

"खरंच तू प्रार्थना केलीस?"

त्याने उत्तर दिले नाही आणि तो बाहेर निघून गेला असता, पण मी त्याला थांबवले. "लाडक्या, माझ्यासाठी – खास माझ्यासाठी प्रार्थना म्हण ना माझ्याबरोबर!"

माझ्याशेजारी तो गुडघे टेकून बसला आणि प्रार्थना म्हणू लागला. त्याने आपल्या हातांची गुंफण अगदी चमत्कारिक केली होती. त्याचा चेहरा गंभीर होता व त्याचे शब्द अडखळत होते. अधूनमधून तो माझ्याकडे वळून बघायचा. माझ्या संमतीची आणि मदतीची अपेक्षा धरायचा. जेव्हा त्याने प्रार्थना संपविली तेव्हा मी हसले आणि माझ्या हातांची त्याला मिठी घातली.

तो लाजला आणि माझ्या हातांची चुंबने घेऊ लागला. "तूच जबाबदार! तूच! जणू काही माझं वय दहा!"

ज्या घरांमध्ये माणसांच्या अनेक पिढ्या एकमेकांवर प्रेम करीत आणि एकमेकांचा आदर करीत जगलेल्या असतात, अशा खेड्यामधील जुन्या घरांपैकी आमचे एक घर होते. प्रत्येक वस्तू कौटुंबिक आठवणी करून देणारी होती. मी तेथे रहायला लागल्यापासून मलाही तेथील प्रत्येक गोष्टीविषयी आपुलकीची भावना वाटू लागली होती. तात्याना सेम्योनोवना यांनी घर सजविले होते आणि जुन्या पद्धतीने त्या कारभार चालवीत होत्या. सर्व काही सुरेख होते असे म्हणता आले नसते, पण तेथे प्रत्येक गोष्टीची विपुलता जाणवत होती. नोकर-चाकरांपासून ते फर्निचर आणि खाण्या-पिण्याच्या वस्तूं-पर्यंत. प्रत्येक गोष्ट भक्कम, स्वच्छ आणि व्यवस्थित होती, आदर निर्माण करीत होती. दिवाणखान्यातील फर्निचर प्रमाण-बद्धतेने मांडले होते. भिंतींवर तैलचित्रे होती आणि फरशीवर घरगुती बनावटीचे गालिचे अंथरलेले होते. बैठकीच्या खोलीत एक जुना पियानो होता, भिन्न प्रकारची दोन छोटी सरकती कपाटे होती, दिवाण होते व दोन छोटी पितळी जडावाची टेबले होती. सर्वात उत्तम सामान माझ्या खोलीत होते. तात्याना सेम्योनोवना सजावटीसाठी स्वत: जातीने खपल्या होत्या. वेगवेगळ्या काळांच्या आणि धर्तीच्या वस्तू तेथे होत्या. त्यात एक जुना मोठा आरसा होता. आरंभी त्या आरशात बघायला मी लाजायची, पण पुढे तो आरसा माझा जिवलग मित्र बनला.

तात्याना सेम्योनोवना कधीही आवाज चढवून बोलत नसत, पण घरात नोकरांची भाऊगर्दी असूनसुद्धा सर्व कामे घड्याळा-प्रमाणे चालत. टाचा नसलेले मऊ बूट घालून हे सर्व नोकर वावरत (तळव्यांची करकर आणि टाचांचा खाडखाड आवाज

ह्या गोष्टी जगात सर्वांत अप्रिय होत्या असे तात्याना सेम्योनोवना यांचे मत होते ) आणि त्या सर्व लोकांना आपापल्या कामांचा अभिमान दिसला. आपल्या म्हाताऱ्या मालकिणी-समोर ते थरथर कापत, पण माझ्या नवऱ्याकडे आणि माझ्या-कडे वडीलधाऱ्या प्रेमळपणे पहात. आमच्यासाठी ते लोक विशेष उत्साहाने काम करीत असे वाटायचे. नियमितपणे दर शनिवारी जमिनी घासल्या जायच्या व गालिचे बदडून काढण्यात यायचे. दर महिन्याच्या पहिल्या तारखेला प्रार्थना होत आणि शुद्ध जलप्राशनाचा विधी घडायचा. तात्याना सेम्योनोवनाच्या आणि तिच्या मुलाच्या प्रत्येक नामकरणदिनावेळी (आणि त्या शरदात प्रथमच माझ्यासुद्धा) मेजवानी झडायची व सगळ्या शेजाऱ्यांना बोलविण्यात यायचे. तात्याना सेम्योनोवनाच्या आठवणीत जेवढे असायचे त्यानुसार हे सर्व चालत होते.

घरच्या कारभारात त्यांचा मुलगा ढवळाढवळ करीत नसे. शेतीच्या कामात आणि शेतकऱ्यांबरोबर तो गुंतलेला असे. तो खूप काम करायचा. हिवाळ्यातसुद्धा तो लौकर उठत असे. सकाळी मी जेव्हा जागी व्हायची तेव्हा तो निघून गेलेला असायचा. बहुतेक चहापानाच्या वेळी तो घरी परतायचा. त्यावेळी आम्ही दोघेच बसत असू. इस्टेटीच्या काळज्या आणि त्रास यांच्यामधून पार पडल्यानंतर अशा वेळांना तो विशेष आनंदी मनःस्थितीत असे. त्या मनःस्थितीला आम्ही **मुक्त उत्साह** म्हणत असू. त्या दिवशी सकाळी त्याने काय केले ते मी बहुधा पृच्छा करायची आणि तो अशा काही फालतू गोष्टींचे वर्णन करायचा, की हसून हसून आमची मुरकुंडी वळायची. काहीवेळा मी गंभीर माहितीचा आग्रह धरीत असे व तो स्मित आवरून गंभीर चेहऱ्याने आढावा द्यायचा प्रयत्न

करायचा. मी त्याच्या डोळ्यांकडे व हलणाऱ्या ओठांकडे टक लावून पहात रहायची आणि त्याच्या बोलण्यामधील अक्षरसुद्धा मला समजायचे नाही. पण त्याला पाहणे आणि त्याचा आवाज ऐकणे मला पुरेसे होई.

"मी काय म्हणालो आत्ता?" तो विचारायचा. "पुन्हा सांग पाहू!"

पण मला ओ की ठो आठवायचे नाही. स्वत:विषयी किंवा माझ्याविषयी न बोलता दुसऱ्याच कसल्यातरी गोष्टीविषयी **तो** बोलायचा हे विचित्र भासायचे. जणू काही बाहेरच्या जगात घडलेली ती घटना फार महत्त्वाची होती. खूप काळानंतर मला समजू लागले आणि त्याच्या कामांमध्ये मी रस घेऊ लागले.

दुपारच्या जेवणाच्या वेळेपर्यंत तात्याना सेम्योनोवना आपली खोली सोडून बाहेर येत नसत. त्या एकट्याच चहा पीत आणि सकाळची आमची अभिवादने परस्पर दूतांमार्फत होत. आमच्या त्या स्वत:च्या महामूर्ख, आनंदी जगतामध्ये त्यांच्या प्रतिष्ठित, सुव्यवस्थित कोपऱ्यामधून येणारा आवाज एवढा विचित्र भासे, की अनेकदा माझा स्वत:वरचा ताबा सुटायचा व त्यांची मोलकरीण हाताची घडी घालून गंभीर आवाजात जेव्हा वर्दी द्यायची की, आमच्या फिरण्यानंतर आम्हाला झोप कशी लागली याबद्दल तात्याना सेम्योनोवनानी विचारणा केली होती, तेव्हा मी खो खो हसत सुटायची. त्यांच्या बाजूने बातमी मिळायची की, सगळी रात्र त्यांच्या कुशीत दुखत होते आणि खेड्यातील मूर्ख कुत्रा भुंकत राहिल्यामुळे सबंध रात्र त्यांना झोप मिळाली नव्हती. तसेच आज आम्हाला बिस्कीटे कशी वाटली याची विचारणा व्हायची आणि निरोप मिळायचा

के नी बिस्कीटे तारासऐवजी निकोलाशाने प्रथमच चाचणी-दाखल भाजली होती, तात्याना सेम्योनोवनाना ती फारशी वाईट लागली नव्हती, विशेषत: क्रेन्देलकी नांवाची बिस्कीटे चांगली वाटली होती, पण टोस्ट मात्र जाळले होते.

दुपारच्या जेवणापर्यंत माझा नवरा आणि मी क्वचितच एकत्र येत असू. मी पियानो वाजवायची किंवा वाचन करायची, तर तो लेखन करायचा अथवा परत बाहेर जायचा. पण चार वाजता आम्ही सगळेजण बैठकीच्या खोलीत जमत असू. मासाहेब आपल्या खोलीमधून तरंगत तरंगत बाहेर यायच्या व आता गरीब बनलेल्या खानदान स्त्रिया आणि धार्मिक यात्रेकरू – अशा दोघी-तिघी नेहमी आमच्या घरात असत – तेथे अवतीर्ण व्हायच्या. माझा नवरा नियमितपणे आपल्या आईच्या हाताला धरून जेवणाच्या मेजापाशी नेत असे. आपला दुसरा दंड त्याने मला द्यावा असा तिचा आग्रह असे. त्यामुळे दारातून जाताना दरवेळी आम्हाला दाटी होई व एकमेकांच्या पायात पाय अडकत. मासाहेब जेवणावेळी अध्यक्षपद स्वीकारीत आणि संभाषण अगदी सुयोग्य, गंभीर, काहीसे पवित्रपणे चाले. ह्या गांभिर्याचा ताण मी आणि माझा नवरा यांच्या-मधल्या सामान्य बोलण्याने कमी होई. किंवा काहीवेळा माता-पुत्रामध्ये वादविवाद उद्‌भवत अथवा ते एकमेकांची थट्टा करीत. त्यांचा वादविवाद आणि उपहास ऐकायला मला आवडायचे, कारण त्यातून त्यांना एकत्र बांधणाऱ्या प्रेमाची नवलाई व नाजुकता प्रकर्षाने मला जाणवायची.

जेवणानंतर मासाहेब दिवाणखान्यामधील एका मोठ्या आरामखुर्चीत स्थानापन्न होत. तंबाखू कुटून तिची तपकीर बनविण्याचा अथवा नव्या पुस्तकांची चिकटलेली पाने फाडण्याचा

त्यांचा उद्योग चाले. माझा नवरा मोठ्यांदा वाचन करी किंवा बैठकीच्या खोलीत जाऊन पियानो वाजवीत बसे. त्यावेळी आम्ही खूप वाचन करीत असू, पण संगीत हा आमच्या मनोरंजनाचा सर्वांत मोठा आणि आवडता प्रकार होता. संगीतामुळे आमच्या हृदयांमधील नव्या तारा छेडल्या जात व आम्हाला एकमेकांची अधिक चांगली ओळख होई. जेव्हा मी त्याचे आवडते संगीत वाजवायची तेव्हा तो दूर एका कोपऱ्यात माझ्या दृष्टीआड बसायचा; संगीतामुळे आपल्यावर होणारे परिणाम मला कळू नयेत अशी त्याची खटपट चाले. पण अनेकदा त्याच्या ध्यानीमनी नसताना मी पियानोपासून उठायची आणि पटकन त्याच्याजवळ जायची. त्याच्या मुद्रेवरील भावनेच्या खुणा, त्याच्या डोळ्यांमध्ये निर्माण झालेला आत्यंतिक तेजस्वीपणा व ओलसरपणा पाहण्याचा प्रयत्न करायची. आपल्या ह्या भावना लपवून ठेवण्याची तो पराकाष्ठा करी.

मासाहेबांना बैठकीच्या खोलीत डोकावण्याची अनेकदा ऊर्मी यायची, पण आम्हाला त्यामुळे अवघड वाटेल अशी त्यांना कदाचित भीती वाटत असावी. आपल्या मुद्रेवर गंभीर आणि तिऱ्हाईतपणाचा भाव आणून त्या खोलीमधून चालत जात, पण स्वतःच्या खोलीत जाऊन ताबडतोब परतण्याची वास्तवात त्यांना मुळीच आवश्यकता नसे हे मला ठाऊक असे.

संध्याकाळचा चहा मी दिवाणखान्यात देत असे. पुन्हा एकदा घरातील सगळी माणसे तेथे एकत्र जमत. चकाकत्या समोवारभोवतीची ती गंभीर बैठक, कपांची आणि ग्लासांची ती देवघेव, दीर्घ काळपर्यंत मला अस्वस्थ करीत राहिली. त्या मानाला मी पात्र नव्हते, एवढ्या मोठ्या समोवारचा नळ फिरविण्याच्या दृष्टीने मी फार लहान आणि धांदरट

होते असे मला वाटायचे. निकिताच्या तबकात प्याले ठेवून "प्योत्र इवानिच आणि मार्या मिनिचना यांच्यासाठी" असे म्हणणे व नंतर "आणखी साखर?" असे विचारणे मला चमत्कारिक वाटे. नंतर दाईसाठी आणि अधिक मानाच्या नोकरांसाठी साखरेचे खडे काढून देण्याचे काम मला करावे लागे.

"छान! छान!!" माझा नवरा अनेकदा उद्गारायचा. अगदी खऱ्याखुऱ्या मालकिणीप्रमाणं!" त्याच्या अशा बोलण्याने माझा आणखीच गोंधळ उडायचा.

चहानंतर मासाहेब आपला 'पेशन्स'चा डाव लावून बसत अथवा मार्या मिनिचनाकडून आपले भविष्य वदवून घेत. मग त्या आमची चुंबने घेत, आमच्यावर क्रूसचिन्हे करीत आणि आम्ही आमच्या खोलीत जात असू. सर्वसाधारणपणे मध्यरात्रीपर्यंत आम्ही जागत असू. सबंध दिवसामधील तो सर्वात उत्तम आणि प्रसन्न काळ असायचा. आपल्या पूर्वायुष्यातील गोष्टी तो मला सांगायचा, किंवा आम्ही पुढील बेत आखत असू. काहीवेळा आमचा तात्त्विक वाद सुरू होई. वरच्या मजल्यावर आमचे आवाज ऐकू जाऊ नयेत म्हणून हलक्या आवाजात बोलण्याचा आम्ही प्रयत्न करीत असू. कारण आम्ही लवकर झोपी जावे अशी तात्याना सेम्योनोवनाची ताकीद होती. काहीवेळा भूक लागायची म्हणून आम्ही स्वयंपाकघरात जात असू व निकिताकडून खाद्यपदार्थ घेऊन माझ्या खोलीत एका मेणबत्तीच्या उजेडात खात असू.

भूतकाळाचा आणि तात्याना सेम्योनोवनाचा कडक अंमल त्या मोठ्या जुन्या घरात अद्याप चालत होता व आम्ही पाहुण्यांप्रमाणे तेथे रहात होतो. मला केवळ तात्याना

सेम्योनोवनाचीच नव्हे, तर म्हातार्‍या नोकरांची, फर्निचरची, इतकेच नव्हे तर तसबिरींचीसुद्धा धास्ती वाटत असे. त्या सर्वांबद्दल मनात एक भीतीयुक्त आदर निर्माण होत असे. ही आपली स्वतःची जागा नाही आणि तो व मी जोपर्यंत तेथे राहत आहोत तोपर्यंत आम्हाला अत्यंत काळजीपूर्वक आणि अवधानपूर्वक बावरले पाहिजे अशी मनात सतत जाणीव असायची. आत्ता जेव्हा मी आठवण करते तेव्हा मला जाणवते की, प्रत्येकावर बंधन घालणारी त्या घरामधील न बदलणारी व्यवस्था व तेथे सर्वत्र पसरलेली रिकामटेकड्या आणि चौकस लोकांची सेना, यांमुळे ते घर कोंदट आणि गैरसोयीचे वाटायचे. पण त्यावेळी त्या बंधनामुळे आमच्या प्रेमाची तीव्रता वाढली होती.

माझ्याप्रमाणेच, तोसुद्धा आपली नाखुषी कधी दाखवीत नसे. उलट अप्रिय गोष्टी न पाहण्याचा तो प्रयत्न करी. मासाहेबांचा हुजर्‍या द्मीत्री सीदरोव याला धूम्रपानाची आवड होती. रोज दुपारी जेवणानंतर, जेव्हा आम्ही बैठकीच्या खोलीत असू तेव्हा तो माझ्या नवर्‍याच्या अभ्यासिकेत जायचा आणि मेजाच्या कप्प्यातून हळूच तंबाखू घ्यायचा. सेर्गेई मिखा-इलिच चोरपावलांनी माझ्याकडे येई, डोळे मिचकावी आणि ओठांवर बोट ठेवून आपले हसू आवरीत माझे लक्ष द्मीत्री सीदरोवकडे वेधी. आपल्याला माणसे पहात आहेत याची त्याला मुळीच कल्पना नसे. आम्हाला न पाहता, सर्व काही ठीक पार पडले अशा विश्वासाने द्मीत्री निघून गेला म्हणजे माझा नवरा माझे कौतुक करी आणि माझे चुंबन घेई. त्याचे हे शांत राहणे, त्याची सहनशीलता आणि प्रत्येक गोष्टीबाबत बाह्यतः बेफिकीर राहण्याची वृत्ती काहीवेळा मला आवडत

नसे. त्याचा तो दुबळेपणा होता असे माझे मत होते. पण ते सुद्धा नेमकी तशीच होते याची मला जाणीव नव्हती. अगदी लहान बाळ जणू, ज्याला आपली इच्छा दाखवता येत नाही –" असे मला वाटायचे.

एकदा त्याच्या दुबळेपणाबाबत मी आश्चर्य व्यक्त केले तेव्हा तो म्हणाला: "लाडके, मी एवढा सुखात असताना कुठल्याही गोष्टीचा मला राग कसा येईल? इतरांना वाकवण्यापेक्षा स्वतः मान तुकवणं जास्त सोपं आहे. फार पूर्वीच याबद्दल माझी खात्री पटलीय. सुखी राहणं अशक्य आहे असा एकही प्रसंग नाही. आणि आपण किती सुखात आहोत! तू आणि मी कित्ती आनंदात आहोत! मला रागावताच येत नाही. आता मला वाईट काही दिसतच नाही. फक्त काहीवेळा दयनीय किंवा गंमतीदार वाटतं. आणि सर्वात महत्त्वाची आठवण ठेव: 'सर्वोत्तम म्हणजे चांगल्याचा शत्रू!' तुझा विश्वास बसणार नाही. पण जेव्हा जेव्हा दारावरची घंटा वाजते, किंवा एखादं पत्र येतं, अथवा सकाळी मला जाग येते, तेव्हा तेव्हा मी घाबरतो! मी घाबरतो कारण आयुष्य पुढं चाललंय आणि गोष्टी बदलल्या पाहिजेत. पण आत्ता या घडीला जे आहे त्याहून अधिक चांगलं असू शकणार नाही!"

त्याचे बोलणे मला नीटसे समजले नाही, तरी त्याच्या बोलण्यावर मी विश्वास ठेवला. मी आनंदात होते आणि प्रत्येक गोष्ट जशी असायला हवी होती तशीच होती, असे मला भासत होते. प्रत्येकालाच अशा परिस्थितीत असे वाटत असते. पण तरीही माझी धारणा होती की, याहून मोठे नसले तरी दुसऱ्या प्रकारचे सुख कुठेतरी अस्तित्वात होते.

अशा रीतीने दोन महिने सरले. थंडी आणि हिम घेऊन

हिवाळा आला. माझा नवरा माझ्या सांगाती असूनही मला एकाकी वाटू लागले. आयुष्याची आपोआप पुनरावृत्ती घडत होती, माझ्यात किंवा त्याच्यात काहीच नवीन राहिले नव्हते आणि आम्ही जुन्याकडे परतत होतो असे मला वाटू लागले. पूर्वीपेक्षा जास्त प्रमाणात तो माझ्याविना आपल्या कामांमध्ये स्वतःला गुंतवून घेऊ लागला. त्याच्या अंतर्मनात एक गुप्त जग होते आणि त्या जगात मला प्रवेश द्यायची त्याची इच्छा नव्हती अशी कल्पना मी करू लागले. त्याची सदैव समतोल वागणूक मला चीड आणत होती. पूर्वीपेक्षा कमी प्रेम मी त्याच्यावर करीत नव्हते आणि त्याच्या प्रेमातही कमी सुखी नव्हते, पण माझे प्रेम जेथे होते तेथेच थांबले होते, ते वाढत नव्हते आणि माझ्या काळजात एक नवी अस्वस्थ भावना हळूच शिरली होती. त्याच्याबरोबर प्रेमात पडण्याचे अतीव सुख अनुभवल्यानंतर केवळ प्रेम करीत राहणे पुरेसे नव्हते. प्राप्त झालेल्या ह्या संथ जीवनप्रवाहापेक्षा मला अधिक हालचाल हवी होती. मला धोका आणि उत्तेजकता हवी होती. माझ्या प्रेमासाठी स्वतःचा बळी द्यायची इच्छा होती. माझ्यात विपुल शक्ती होती आणि आमच्या निवांत जीवनात तिला वाट मिळत नव्हती. मला निराशेचे झटके येऊ लागले. त्यांना मी त्याच्यापासून लपविण्याचा प्रयत्न करू लागले. अनिर्बंध प्रेमाचे आणि हर्षाचे क्षण त्याला घाबरवू लागले.

माझी अवस्था पूर्वीच त्याच्या ध्यानात आली होती आणि शहरात जाऊन येण्याचा प्रस्ताव त्याने मांडला होता. पण मीच विरोध केला होता. आपल्या जीवनाचा साचा बदलू नको, आपल्या सुखाला गालबोट लावू नको, असे मी त्याला विनविले होते. आणि खरेच मी सुखी होते. पण माझ्या

सुखासाठी मला त्रास सहन करावा लागला नव्हता, कुठल्याही प्रकारचा स्वार्थत्याग करावा लागला नव्हता, ही वस्तुस्थिती माझ्या मनाला छळत होती. कष्ट सोसण्याची आणि त्याग करण्याची इच्छा मला छळत होती. माझे त्याच्यावर प्रेम होते आणि मी त्याचे सर्वस्व होते हे मी पहात होते. पण आमचे प्रेम प्रत्येकाने पहावे असे मला वाटत होते. त्याच्यावर प्रेम करायला इतरांनी मला प्रतिबंध करावा आणि त्यांचे प्रयत्न व्यर्थ गेल्याचे त्यांना जाणवावे, असे मला वाटत होते. माझे मन आणि माझ्या संवेदना गुंतलेल्या होत्या. पंण आणखी एक भावना होती–यौवनाची भावना! उत्तेजक जगण्याची तीव्र इच्छा! आणि आमच्या संथ जीवनात त्या इच्छेचे समाधान घडत नव्हते.

मला हवे तेव्हा शहरात जाऊ असे तो का म्हणाला होता? ते जर तो म्हणाला नसता, तर कदाचित मला जाणवले असते की, मला छळणारी भावना ही एक चूक होती व ती अपायकारक होती. ज्या त्यागाची संधी मिळण्यासाठी मी झुरत होते तो त्याग ह्या भावनेला चिरडून टाकण्यात होता, हे न समजण्यात माझी चूक होती. शहरात मुक्काम करून माझे एकटेवाणेपण नष्ट करता येईल हा विचार वारंवार मनात डोकावू लागला. पण केवळ माझ्याखातर, त्याच्या सर्व प्रिय गोष्टींपासून त्याला तोडून टाकण्याचे मला दुःख होत होते आणि लाजही वाटत होती.

दिवस रखडत चालले होते. घराभोवती बर्फाचे ढीग उंच उंच वाढत चालले होते. आम्ही दोघे नेहमी एकत्र होतो. एकमेकांच्या दृष्टिआड कधीही जात नव्हतो. आणि तिकडे दूर शहरात, गजबजाटात व गोंगाटात, लोकांचे जमाव उत्तेजकता अनुभवीत

होते, दुःखाला आणि आनंदाला भोगत होते, आमच्याविषयी आणि आमच्या क्षणिक अस्तित्वाविषयी विचारसुद्धा करीत नव्हते. आमच्या सवयींमुळे आमच्या जीवनाचा एक साचा बनत होता, आमचे प्रेम मुक्त बनण्याऐवजी काळाच्या थंड, अलिप्त प्रवाहाखाली दबत होते, ह्याचा मला सर्वांत जास्त त्रास होत होता. सकाळी आम्ही आनंदी असायचे, दुपारच्या जेवणावेळी प्रतिष्ठित वागायचे आणि संध्याकाळी स्नेहाळ बनायचे.

"भलेपणानं वाग," मी स्वतःला बजावीत असे. "तो सांगतो त्याप्रमाणं भलेपणानं वागणं आणि प्रामाणिक जगणं चांगलं आहे. पण त्यासाठी आमच्यापाशी नंतर भरपूर वेळ असेल. आत्ता ह्या क्षणाला दुसऱ्या गोष्टी मला केल्या पाहिजेत, त्या करण्याची जोवर माझ्यात ताकद आहे तोवर!" भलेपणाने वागावे अशी मला इच्छा होत नव्हती. मला थरार हवा होता. प्रेमाने आमच्या जीवनावर सत्ता चालवावी, जीवनाने प्रेमावर सत्ता चालवू नये असे मला वाटत होते. त्याच्या सांगाती कड्याच्या टोकाशी जावे आणि म्हणावे, "एक पाऊल आणि मी खाली कोसळेन; एक क्षण आणि मी हरवले!" मग त्याचा चेहरा प्रेताप्रमाणे पांढराफटक पडेल, आपल्या बळकट बाहूंमध्ये मला तो उचलून घेईल, त्या कड्यावर मला क्षणभर तसेच उचलून धरील, माझ्या काळजाचा ठोका थांबावा म्हणून, आणि नंतर तेथून दूर घेऊन जाईल.

ह्या मनःस्थितीमुळे माझी प्रकृती बिघडू लागली, मनाचा तोल जाऊ लागला. एके सकाळी माझी अवस्था नेहमीपेक्षा जास्त वाईट बनली होती आणि तोसुद्धा कामावरून चिडलेल्या मनःस्थितीत आला होता. त्याच्या बाबतीत असे अगदी

क्वचित घडत असे. माझ्या तात्काळ ते ध्यानात आले आणि मी कारण विचारले. पण तो मला सांगेना. तो विषय बोलण्याच्या लायकीचा नाही असे तो म्हणाला. नंतर मला समजले की, माझ्या नवऱ्याचा द्वेष करणाऱ्या जिल्हा पोलीस अधिकाऱ्याने आमच्या काही शेतमजुरांना बोलावून घेतले होते व बेकायदेशीर मागण्या करून त्यांना धमकावले होते. ही क्षुल्लक बाब समजून तिकडे दुर्लक्ष करणे माझ्या नवऱ्याला जमले नव्हते, म्हणून तो चिडला होता व माझ्याशी बोलू इच्छित नव्हता. पण मी मात्र स्वतःची अशी कल्पना करून घेतली की, मला तो कुक्कुले बाळ समजत होता आणि त्याच्या चिंता मला समजणार नाहीत असे त्याला वाटत होते. मी तेथून बाजूला झाले व गप्प बसले. मार्था मिनिचना आमच्याकडे अधूनमधून चहाला येत होती. चहा घेण्यासाठी मी तिला बोलावणे धाडले.

मी पटकन चहा संपविला आणि मार्था मिनिचनाला बैठकीच्या दालनात माझ्याबरोबर घेऊन गेले. ज्या विषयात मला काडीमात्र रस नव्हता अशा विषयावर मी उगीचच मोठमोठ्यांदा तिच्याशी बोलू लागले. माझ्याकडे अधूनमधून कटाक्ष टाकीत तो येरझाऱ्या घालीत होता. त्यामुळे आणखीच बोलण्याची आणि जोरजोराने हसण्याची मला ऊर्मी आली. माझे सगळे बोलणे आणि मार्था मिनिचनाचे सारे बोलणे — सर्व काही मला गंमती-शीर भासू लागले. सरतेशेवटी अक्षरही न बोलता तो आपल्या अभ्यासिकेत निघून गेला व त्याने दार बंद करून घेतले. ज्या क्षणी तो गेला त्या क्षणी माझा आनंद एवढा पटकन ओसरला. की मार्था मिनिचनाला तो बदल जाणवला आणि काय बिघडले म्हणून तिने पृच्छा केली. मी उत्तर न देता खुर्चीवर बसून राहिले. मी रडण्याच्या बेतात होते.

"कसली चिंता करीत असावा तो?" मी मनाशी नवल करीत होते. "त्याला महत्त्वाचा भासणारा काहीतरी मूर्खपणा असावा. पण ती क्षुल्लक बाब असल्याचं मी त्याला दाखवून देईन. मला समजणार नाही असं त्याला वाटतं! आपल्या प्रतिष्ठितपणाचा, वरिष्ठतेचा बाऊ करून आणि नेहमी आपलंच बरोबर असतं असं दाखवून तो माझा अपमान करतो. पण माझंही बरोबर आहे, जेव्हा मला कंटाळा येतो आणि माझं आयुष्य मला रितं वाटतं, जेव्हा मला जगावंसं वाटतं, पुढं जावंसं वाटतं. दर दिवशी, दर क्षणाला, मला काहीतरी नवीन हवंय, पण त्याला एकाच जागी थबकून रहायचंय आणि मीसुद्धा त्याच्याबरोबर थबकावं असं त्याला वाटतं. आणि त्याला किती सोपं ठरेल सारं! मला शहरात घेऊन जायला नको; जशी मी आहे तसंच राहिलं म्हणजे झालं—साधं, महत्त्वाकांक्षा नसलेलं, फक्त जगणारं! साधी रहा म्हणून तो मला उपदेश करतो, पण स्वतः मात्र साधा नाही. असं आहे सगळं!"

मी कमालीची दुखावले आणि त्याचा मला राग आला. ह्याची मला भीती वाटली आणि मी त्याच्यापाशी गेले. आपल्या अभ्यासिकेत बसून तो लिहीत होता. माझी चाहूल लागताच क्षणभर त्याने मान उचलून कटाक्ष टाकला व पुन्हा शांतपणे तो लिहू लागला. त्याची नजर मला आवडली नाही आणि त्याच्या जवळ न जाता तशीच उभी राहिले. एक पुस्तक उघडून त्याची पाने चाळू लागले. त्याने पुन्हा माझ्याकडे कटाक्ष टाकला.

"माशा, तुझं काय बिनसलंय?" त्याने विचारले.

नुसत्या थंड नजरेने मी त्याला उत्तर दिले. माझी नजर

म्हणत होती : "कशाला विचारतोस? एवढं सौजन्य कशाला?" त्याने मानेला झटका दिला व लाजरे, स्निग्ध स्मित केले. आणि प्रथमच त्याच्या स्मिताला मी स्मिताने प्रत्युत्तर केले नाही.

"आज काय घडलं?" मी विचारले. "का तू मला सांगत नाहीस?"

"फारसं महत्त्वाचं नाही. थोडं अप्रिय घडलं," तो उत्तरला. "पण आता मी तुला त्याबद्दल सांगू शकतो. आपले दोन शेतमजूर शहरात गेले होते..."

मी त्याला त्याचे बोलणे पुरे करू दिले नाही. "चहाच्या वेळी मी तुला विचारलं तेव्हा का सांगितलं नाहीस?"

"नंतर मला वाईट वाटलं असतं असं काहीतरी माझ्या तोंडून त्यावेळी बाहेर पडलं असतं. तेव्हा मी रागात होतो."

"पण तेव्हाच मला तुझ्या तोंडून ती हकीकत ऐकायची होती."

"का?"

"तुला मी कधीच मदत करू शकणार नाही असं का वाटतं तुला?"

"असं कधी वाटतं मला?" लेखणी खाली ठेवीत तो म्हणाला. "मला वाटतं की, तुझ्यावाचून मी जगू शकणार नाही. प्रत्येक बाबतीत तू मला मदत करतेस. अगदी प्रत्येक बाबतीत! केवळ मदतच करत नाहीस, तर प्रत्येक गोष्ट तूच करतेस! वेडी कुठली!" तो हसला. "तू म्हणजे माझं सारं जीवन. प्रत्येक गोष्ट मला चांगली वाटते याचं केवळ कारण तू इथं आहेस, कारण तुला..."

"हो. ठाऊक आहे मला! मी छान, लाडकं लहान बाळ

आहे, ज्याला शांत केलं पाहिजे..." मी अशा काही स्वरात बोलले, की त्याने चमकून आश्चर्याने माझ्याकडे पाहिले. जणू काही प्रथमच तो मला पहात होता. "मला सांत्वनाची गरज नाही, तुझ्यात ते भरपूर आहे, अगदी खूप," मी पुढे म्हणाले.

"तर असं घडलं बघ..." मला थोपवून तो घाईघाईने बोलू लागला. माझे बोलणे पूर्ण होईल अशी जणू त्याला धास्ती वाटली होती. "तू काय केलं असतंस..."

"मला आता त्यासंबंधी काहीही ऐकायची इच्छा नाही," मी म्हणाले. खरे म्हणजे मला ऐकायचे होते, पण त्याचा तोल बिघडवण्यात मला आनंद मिळत होता. "आयुष्याशी मला खेळायचं नाही... तू जसा जगतोस तसं मलाही जगायचंय!"

त्याच्या संवेदनाक्षम चेहऱ्यावर वेदना आणि तीव्र अवधान उमटले.

"मला तू बरोबरीच्या नात्यानं वागवावं अशी इच्छा आहे. मला..."

पण मी वाक्य संपवू शकले नाही. त्याचा चेहरा कमालीचा दु:खी झाला. विषण्णतेने त्याला घेरले. क्षणभर तो गप्प झाला.

"कोणत्या बाबतीत तू माझ्या बरोबरीनं जगत नाहीस?" त्याने विचारले. "पोलिस अधिकाऱ्याबरोबर आणि दारुड्या शेतमजुरांबरोबर मला तोंड द्यावं लागतं, तुला नाही म्हणून?"

"केवळ तेवढंच नव्हे," मी म्हणाले.

"लाडके, कृपा करून मला समजून घे," तो पुढे बोलू लागला. "चिंता नेहमीच वेदनादायी असते हे मला ठाऊक आहे. ते जाणून घेण्याइतपत मी पुरेसा जगलोय. माझं तुझ्यावर प्रेम आहे, त्यामुळं तुला चिंतामुक्त ठेवावं असं मला वाटणं

अगदी स्वाभाविक आहे. तुझ्यावरचं माझं प्रेम हेच माझं सर्व जीवन आहे आणि त्या जीवनापासून तू मला वंचित करू नकोस."

"तुझं नेहमीच बरोबर असतं," त्याच्याकडे न पाहता मी म्हणाले.

त्याच्या अंतःकरणात सर्व काही पुन्हा स्पष्ट आणि शांत होते, तर माझ्या काळजात मात्र चिडीची आणि काहीशी पश्चात्तापाची भावना राहिली होती, ह्याचा मला राग आला होता.

"माशा! तुला काय झालंय?" तो म्हणाला. "आपल्यापैकी कोण बरोबर हा प्रश्न नाही, तर काहीतरी दुसरंच आहे. माझ्यावर चिडली का आहेस? पूर्ण विचार कर आणि मगच मला सर्व काही सांग. तोपर्यंत काहीही बोलू नको. माझ्याबाबत तू असमाधानी आहेस आणि कदाचित ते बरोबर आहे. मात्र नेमका माझा दोष कुठं आहे तो मला समजू दे."

पण माझे संपूर्ण काळीज मी त्याच्यापुढे कशी उघडे करणार? त्याने तात्काळ मला जाणले, पुन्हा एकदा त्याच्यासमोर मी बच्ची ठरले, त्याला दिसत नाही आणि त्याने आधीच जाणले नाही असे मी काहीच करू शकत नाही, ह्या वस्तुस्थितीमुळे मी आणखीच चेतविली गेले.

"मला तुझा राग नाही," मी म्हणाले. "मला खूप कंटाळा आलाय आणि कंटाळ्यात जगायची माझी इच्छा नाही. पण तू म्हणतोस तसं असलं पाहिजे आणि तुझं बरोबर असणार."

एवढे बोलून मी त्याच्याकडे पाहिले. मला जे हवे होते ते मी साध्य केले होते. त्याचा समतोल ढळला होता. त्याच्या चेहऱ्यावर दुःखाची आणि भीतीची भावना होती.

"माशा," खालच्या, खळबळत्या आवाजात तो बोलू लागला. "आपण आत्ता जे काही करतोय ते खूप गंभीर स्वरूपाचं आहे. आपल्या नशीबाचा कौल लागतोय. तू मला उत्तर देऊ नको, फक्त ऐक अशी मी तुला विनंती करतो. माझा छळ करावा असं तुला का वाटतं?"

पण मी त्याच्या बोलण्यात अडथळा आणला. "तू जे काही बोलशील ते बरोबर असणार. मला ते माहीत आहे, म्हणून तू काहीच न सांगणं अधिक चांगलं!" मी थंडपणे उत्तरले. जणू मी नव्हे तर एखादे दुष्ट पिशाच्च माझ्या जिभेवाटे बोलत होते.

"तू काय बोलते आहेस त्याचं तुला भान तरी आहे का?" तो उद्‌गारला.

मला रडू फुटले आणि बरे वाटले. माझ्याशेजारी तो गप्प बसून राहिला. मला त्याची दया आली. मी जे काही केले होते त्याची मला लाज वाटली व संताप आला. मी त्याच्याकडे पाहिले नाही. तो माझ्याकडे कठोरपणे अगर गोंधळून पहात असावा असे मला जाणवले. मी नजर वर केली. एक स्निग्ध, प्रेमळ कटाक्ष माझ्याकडे वळला होता व जणू माझी क्षमा मागत होता. मी त्याचा हात माझ्या हाती घेऊन म्हटले:

"मला क्षमा कर. मी काय बोलत होते ते माझं मलाच समजत नव्हतं."

"पण मला समजलं आणि तुझं बरोबर होतं."

"काय?"

"आपण सेंट पीटरबुर्गला गेलंच पाहिजे. इथं आपल्याला करण्यासारखं काहीही नाही."

"जशी तुझी इच्छा," मी म्हणाले.

त्याने माझ्याभोवती आपल्या बाहूंचा विळखा घातला आणि माझे चुंबन घेतले.

"मला माफ कर," तो म्हणाला: "माझ्याकडून तुझ्यावर अन्याय घडला."

त्या संध्याकाळी खूप वेळपर्यंत मी त्याच्यासाठी पियानो वाजविला आणि स्वतःशीच काहीतरी पुटपुटत तो खोलीत फिरत राहिला. असे स्वतःशी बोलण्याची त्याला सवय होती आणि तो काय बोलतो असा प्रश्न मी त्याला अनेकदा विचारायची. तो नेहमी मला सांगायचा — बहुतेक वेळा तो कविता गुणगुणायचा किंवा काहीतरी मूर्ख बडबड करायचा, पण त्या मूर्खपणामधून त्याच्या मनाची घडण मला दिसत असे.

"आज काय पुटपुटतो आहेस तू?" मी विचारले.

तो थांबला, क्षणभर त्याने विचार केला आणि मग सस्मित मुद्रेने लेर्मोन्तोवच्या दोन ओळी म्हणाला:

...तो वेडा वादळाची आस धरतोय,
जणू वादळातून त्याला शांती लाभणार आहे!

"हा सर्वसामान्य माणसापेक्षा श्रेष्ठ आहे! याला सारं काही माहीत आहे," माझ्या मनात आले. "याच्यावर प्रेम न करणं कसं जमेल मला?"

मी उठले, त्याचा बाहू धरला आणि त्याच्या पावलाशी पाऊल जुळवून त्याच्याबरोबर फिरू लागले.

"खरं की नाही?" माझ्या डोळ्यांमध्ये खोल पहात स्मित करीत त्याने विचारले.

"हो," मी पुटपुटले. आम्ही दोघेही उल्हसित बनलो. त्याचे डोळे हसत होते, आम्ही लांब लांब पावले टाकू

लागलो, आमच्या अंगठ्यांवर चालू लागलो. अशा रीतीने आम्ही सर्व खोल्यांमधून फिरलो. आमच्या अशा वागण्याने ग्रिगोरी त्रासला होता आणि पेशन्सचा डाव लावून बसलेल्या मासाहेब चकित झाल्या होत्या. भोजनदालनात जेव्हा आम्ही प्रवेश केला तेव्हा थांबलो, एकमेकांकडे आम्ही पाहिले व खो खो हसत सुटलो.

दोन आठवड्यांनंतर, सणाच्या जरा आधी, आम्ही पीटर-बुर्गमध्ये दाखल झालो होतो.

७

पीटरबुर्गपर्यंतचा आमचा प्रवास, वाटेत आठवडाभर मॉस्कोत मुक्काम, त्याच्या आणि माझ्या नातेवाईकांच्या भेटी, नवी शहरे, नवे चेहरे, आमच्या नव्या घरात सामानाची मांडामांड – ह्या सगळ्या गोष्टी एखाद्या स्वप्नासारख्या पार पडल्या. सर्व काही अगदी वेगळे होते, नवीन आणि प्रसन्न होते. त्याच्या उपस्थितीमुळे आणि त्याच्या प्रेमामुळे प्रत्येक गोष्टीला तेज चढत होते. आमचे खेड्यातील निवांत जीवन कुठलीतरी दूरची आणि क्षुल्लक आठवण असल्याप्रमाणे भासत होते. शहरची माणसे गर्विष्ठ आणि थंडे वागणारी असतील अशी माझी अपेक्षा होती. पण घडले अगदी उलट. अनोळखी माणसांनी आणि नातेवाईकांनीही माझे मनःपूर्वक प्रेमाने व आपुलकीने स्वागत केले. जणू काही केवळ माझाच सारेजण विचार करीत होते, जणू आनंद साजरा करण्यासाठी माझीच वाट पहात होते, असे मला भासले. त्या उच्चभ्रू समाजात, मला सर्वोत्तम भासणाऱ्या लोकांमध्ये माझ्या नवऱ्याच्या एवढ्या ओळखी

असतील याची मला कल्पना नव्हती. ह्या ओळखीच्या माणसां-बद्दल माझ्यापाशी तो कधी बोलला नव्हता. मला दयाळू वाटणाऱ्या त्या काही लोकांविषयी तो जेव्हा तिखटपणे बोलायचा तेव्हा मला ते काहीसे विचित्र आणि अप्रिय वाटायचे. त्या लोकांशी तो एवढा थंडपणे का वागतो, अथवा ज्यांच्या ओळखी झाल्या तर आपल्याला कृतकृत्य झाल्याप्रमाणे वाटावे अशा लोकांना तो टाळण्याचा प्रयत्न का करतो, हे मला समजत नसे. मला वाटायचे की, दयाळू माणसांच्या जेवढ्या जास्त ओळखी होतील तेवढे जास्त चांगले व ती सर्व दयाळू माणसे होती.

खेडे सोडायच्या आधी तो मला म्हणाला होता: "इथं आपण छोटे कुबेर आहोत, पण तिथं काही आपली श्रीमंतांमध्ये गणना व्हायची नाही, तेव्हा शहरात आपण फार तर ईस्टर-पर्यंत राहू शकू. बड्या लोकांच्या फारशा भेटीगाठी करायच्या नाहीत, अन्यथा कर्जाचा डोंगर शिरावर चढेल. माझी इच्छा नाही की तुला..."

"कशाला हवीत बडी माणसं?" मी म्हणाले होते. "आपण फक्त आपल्या नातेवाईकांना भेटत जाऊ, नाटकं पाहू, थोडं चांगलं संगीत ऐकू आणि ईस्टरपूर्वीच खेड्यात परतू."

पण पीटरबुर्गमध्ये आमचे आगमन होताच ह्या सर्व योजनांचा विसर पडला. अचानक मला एका नव्या आणि अद्भुत जगाचा शोध लागला. अनेक आनंदांमध्ये मी गुरफटून गेले, अनेक नव्या छंदांमध्ये रमून गेले. नकळतपणे मी माझ्या सर्व भूतकाळाचा त्याग केला, पूर्वीच्या सर्व योजनांना मूठमाती दिली.

"ते काहीच नव्हतं... केवळ आरंभ होता... हे खरं आयुष्य! आणि अजून कितीतरी माझ्या पुढ्यात वाढून

ठेवलंय!" माझ्या मनात आले. खेड्यात मला त्रासदायक वाटणारा संथपणा आणि रिकामटेकडेपणा जादूसारखा नाहीसा झाला. माझ्या नवऱ्याविषयीचे माझे प्रेम निवांत बनले आणि त्याचे माझ्यावरचे प्रेम कमी झाले नाही ना, असा कधी विचारसुद्धा करावासा वाटला नाही. त्याच्या प्रेमाविषयी शंका घेणे मला शक्यच नव्हते. माझा प्रत्येक विचार तात्काळ समजून घेतला जात होता, माझ्या प्रत्येक भावनेची बूज राखली जात होती, माझी प्रत्येक इच्छा पूर्ण केली जात होती. त्याचा थंडपणा नाहीसा झाल्याचे भासत होते, किंवा निदान मला त्याची इतःपर चीड येत नव्हती. त्याच्या जुन्या प्रेमाव्यतिरिक्त, त्याला माझ्याबद्दल नवे कौतुकही वाटत होते असे मला जाणवले. एखाद्या भेटीला जाऊन आल्यानंतर, नवी ओळख करताना अथवा आमच्या घरात सायंकालीन मेजवानीच्या वेळी गृहिणीची भूमिका मी पार पाडत असताना, आपल्या हातून काही चूक घडेल म्हणून मनोमनी मी धास्तावलेली असताना, तो म्हणायचा: "छान, शाब्बास पोरी! घाबरू नकोस! झकास चाललंय सगळं!" त्याच्या अशा धीराच्या वागण्याने मी आनंदित व्हायची.

आमच्या आगमनानंतर लौकरच, त्याने आपल्या आईला एक पत्र लिहिले. त्या पत्रात मी थोडा मजकूर लिहावा म्हणून त्याने मला हाक मारली तेव्हा त्याने स्वतःचा मजकूर माझ्या नजरेला पडू न देण्याचा प्रयत्न केला होता आणि अर्थातच त्याने लिहिलेले वाचण्याचा मी आग्रह धरला होता.

"तुम्ही माशाला ओळखणार नाही," त्याने लिहिले होते. "मी स्वतःसुद्धा तिला ओळखत नाही. एवढा सुंदर डौल तिच्यात कुठून येतो, एवढा **गोडवा**, एवढं संभाषण चातुर्य

ती कुठून शिकली कोण जाणे! आणि हे सगळं अगदी अकृत्रिम, लोभसवाणं! प्रत्येकाला तिनं मुग्ध केलंय, त्यात माझाही समावेश आहे. जर शक्य असतं तर आत्ता करतो त्याहून जास्त प्रेम मी तिच्यावर केलं असतं!"

"अशी आहे तर मी!" माझ्या मनात विचार आला आणि मला खूप आनंद झाला. मीसुद्धा त्याच्यावर जास्त प्रेम करीत होते असे भासले. आमच्या ओळखीच्या सर्व लोकांमधील माझी लोकप्रियता माझ्या अपेक्षेपलिकडची होती. त्याबद्दल चारी बाजूंनी मी ऐकत होते. एका घरात एका काकांना मी विशेष आवडले होते; दुसऱ्या घरात एक मावशी माझ्यावर बेहद्द खूष होती. माझ्याशी तुलना करू शकेल अशी एकही स्त्री पीटरबुर्गमध्ये नव्हती असे एखादा पुरुष म्हणायचा. मी मनात आणले तर बड्या लोकांमध्ये मी सर्वात **सुंदर** स्त्री होऊ शकेन, अशी खात्री एखादी महिला मला द्यायची. प्रिन्सेस डी. नामक एक वयस्क, फॅशनेबल महिला आणि माझ्या नवऱ्याची चुलत बहीण, अचानकपणे माझ्या विशेष प्रेमात पडली होती. तिच्या वारेमाप स्तुतीने माझे डोके फिरले. बॉलनृत्याला जाण्यासाठी तिने मला प्रथम जेव्हा निमंत्रण दिले आणि माझ्या नवऱ्याचा काही आक्षेप नाही ना असे त्याला विचारले, तेव्हा तो माझ्याकडे वळला व किंचित धूर्त स्मित करीत माझी जाण्याची इच्छा होती का असे त्याने विचारले. मी होकारार्थी मान हलविली आणि माझे गाल शरमेने लाल झाल्याची मला जाणीव झाली.

"जायची इच्छा कबूल करणं म्हणजे अपराधाची कबुली दिल्यासारखं वाटतंय ना?" दिलखुलास स्मित करीत तो म्हणाला.

"पण तू म्हणाला होतास की, बड्यांच्या पार्ट्यांना आपण जाऊ शकणार नाही आणि तुला असले समारंभ आवडत नाहीत," हसून मी उत्तरले आणि त्याच्याकडे आर्जवी नजरेने पाहिले.

"तुला एवढी इच्छाच असेल तर जाऊ या," तो म्हणाला.

"पण आपण जावं असं मला वाटत नाही."

"पण तुझी इच्छा आहे? खूप खूप?"

मी गप्प राहिले.

"बड्या माणसांचा समाज वाईट नसतो, पण अपुऱ्या राहिलेल्या भौतिक इच्छा वाईट आणि कुरूप असतात. आपण जाऊ — नक्की," तो ठामपणे म्हणाला.

"खरं सांगायचं तर," मी कबूल केले, "ह्या बॉलनृत्याला जाण्याची मला जेवढी तीव्र इच्छा आहे तेवढी दुसरी कसल्याही गोष्टीबाबत नाही."

आम्ही गेलो आणि माझ्या सुखाला सीमा उरली नाही. नृत्याच्या जागी मला पूर्वीपेक्षाही अधिक तीव्रतेने जाणवले की, तेथील केंद्रबिंदू मी होते व सर्व काही माझ्याभोवती फिरत होते. जणू खास माझ्यासाठी ते भव्य दालन प्रकाशाने उजळले होते, संगीत वाजत होते आणि लोक जमले होते. केशरचनाकारापासून ते सेविकेपर्यंत आणि नर्तकांपासून ते दालनात फिरणाऱ्या वृद्ध पुरुषांपर्यंत प्रत्येकजण जणू मला सांगत होता अथवा जाणीव करून देत होता, की त्या सर्वांना मी आवडले होते. माझ्या नवऱ्याच्या चुलत बहिणीने मला सांगितले की, इतर कोणत्याही स्त्रीपेक्षा मी वेगळी होते, माझ्यात काहीतरी असाधारण होते, काहीतरी रांगडे, साधे आणि मोहक होते, अशी त्या नृत्यदालनामधील लोकांची माझ्याबद्दल प्रतिक्रिया

होती. ह्या यशाने मी एवढी हुरळून गेले की, त्या वर्षी किमान दोन अथवा तीन बॉलनृत्यांना जायची माझी इच्छा मी माझ्या नवऱ्यापाशी प्रांजलपणे बोलून दाखविली. "म्हणजे माझी आकंठ तृप्ती होईल," मी ढोंगीपणाने पुस्ती जोडली.

माझ्या नवऱ्याने स्वेच्छेने मान्यता दिली आणि आरंभी मोठ्या आनंदाने तो माझ्याबरोबर वावरला, माझ्या सुखात सहभागी झाला. पूर्वी तो जे काही बोलला होता ते जणू तो विसरून गेला होता, किंवा त्याने आपले शब्द मागे घेतले होते असे मला वाटले.

पण नंतर तो कंटाळू लागला आणि आम्ही ज्या तऱ्हेचे आयुष्य जगत होतो त्यात त्याची दमणूक होऊ लागली. पण मला त्याची पर्वा वाटत नव्हती. आणि काहीवेळा त्याची गंभीर, प्रश्नार्थक नजर माझ्याकडे वळलेली माझ्या ध्यानात आली, तरी तिचा अर्थ मला समजत नव्हता. ह्या सर्व नव्या माणसांच्या माझ्याविषयीच्या त्या तथाकथित प्रेमामुळे, आयुष्यात मी प्रथमच अनुभवीत असलेल्या उच्चभ्रू, नाविन्याच्या वातावरणामुळे मी दिपून गेले होते. त्याच्या नैतिक प्रभावाच्या वर्चस्वामधून अचानकपणे मी मोकळी झाले होते. ह्या वर्तुळां मध्ये मी केवळ त्याच्या बरोबरीचीच नव्हे तर त्याच्याहून श्रेष्ठ मानली जात होते ही वस्तुस्थिती मला सुखद वाटत होती. त्यामुळे माझ्या प्रेमाचा मी त्याच्यावर अधिक जोराने व स्वेच्छेने वर्षाव करू शकत होते. उच्चभ्रू जीवनात त्याच्या दृष्टीने मला कोणता धोका होता हे आकलन होत नव्हते. अभिमानाची आणि आत्मतुष्टीची भावना मला नवी होती. नृत्यदालनात प्रवेश केल्यानंतर सगळ्यांच्या नजरा माझ्याकडे वळून, तर मी त्याची होते ह्याची प्रत्येकापाशी कबुली द्यायची

जणू लाज वाटून तो घाईघाईने मला सोडून जायचा आणि सायंकालीन काळ्या जाकीटांच्या गर्दीत मिसळून अदृश्य व्हायचा. अनेकदा नृत्यदालनाच्या दुसऱ्या टोकाशी त्याची एकाकी, दुर्लक्षित, कंटाळलेली आकृती माझ्या दृष्टीला पडत असे आणि मी मनाशी म्हणायची : "जरा थांब! घरी पोहोचेपर्यंत जरा थांब! मी एवढी सुंदर आणि मोहक बनायचा कुणासाठी प्रयत्न करते हे तुला मग समजेल! आणि इतर सर्वांपेक्षा कुणावर माझं जास्त प्रेम आहे तेही समजेल!" आणि मला खरेच भासायचे की, केवळ त्याच्यासाठी माझ्या यशाचा मला आनंद वाटत होता. त्याच्यासाठी मी त्याचा त्याग करू शकत होते याचा आनंद वाटत होता. त्या उच्चभ्रू समाजामध्ये माझ्या दृष्टीने एकच गोष्ट मला अपायकारक वाटत होती व ती म्हणजे मला भेटणाऱ्या पुरुषांपैकी कुणाकडे तरी मी आकर्षित होण्याची शक्यता होती आणि त्यामुळे माझ्या नवऱ्याचा मत्सर जागा झाला असता. पण त्याचा माझ्यावर एवढा विश्वास होता आणि त्याच्या तुलनेने ही सर्व तरुण मंडळी एवढी क्षुल्लक भासत होती, की ह्या धोक्याची मला भीती वाटत नव्हती. इतक्या लोकांच्या अवधानाचा विषय बनल्याबद्दल मला सुख वाटत होते, माझा अहंकार फुलत होता आणि माझ्या नवऱ्यावर मी प्रेम करण्यात विशिष्ट गुण सामावला होता असे मला वाटत होते. त्याच्याकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोन आत्मविश्वासू आणि अधिक नैमित्तिक बनला होता.

"आज त्या न. न. बरोबर तुझ्या गप्पा रंगात आलेल्या मी पाहिल्या," बॉलनृत्यानंतर एके रात्री घरी परतताना मी त्याला म्हटले व तर्जनी हलवून दम दिला. ज्या स्त्रीचा मी

उल्लेख केला होता ती पीटरबुर्गमध्ये ख्यातनाम होती आणि त्या संध्याकाळी खरोखरीच तो तिच्याबरोबर बोलला होता. त्याला डिवचण्याच्या उद्देशाने मी तसे म्हणाले होते, कारण तो नेहमीपेक्षा जास्त गप्प आणि कंटाळलेला दिसत होता.

"छी:! कशाली असं बोलतेस? माशा, हे तूच बोलते आहेस का?" तो म्हणाला आणि जणू शारीरिक वेदना झाल्याप्रमाणे दात आवळून मागे सरला. "तुला आणि मला असली भाषा शोभत नाही! असल्या गोष्टीत दुसऱ्यांना खुशाल रमू दे! अशा खोटेपणापायी आपल्यामधल्या प्रामाणिक नात्यात बिघाड होईल. आपले संबंध परत सुधारतील अशी अजून मला आशा आहे."

मी शरमले आणि गप्प झाले.

"माशा, आपले संबंध सुधारतील ना? काय वाटतं तुला?" त्याने विचारले.

"ते कधीच बिघडले नव्हते आणि कधीही बिघडणार नाहीत," मी म्हणाले. त्यावेळी मला खरोखरीच तसे भासत होते.

"मी तशी आशा करतो," तो म्हणाला. "पण आपण खेड्यात परतायची वेळ झालीय."

तशा तऱ्हेने फक्त एकदाच तो माझ्याशी बोलला. बाकीचा सारा वेळ माझी कल्पना होती की, माझ्याएवढाच तोसुद्धा प्रसन्न होता. आणि खरेच मी किती सुखात व मजेत होते! मी स्वतःची खात्री पटवायची: "काही वेळा तो कंटाळतो, पण त्याच्याखातर मी खेड्यातलं कंटाळवाणं आयुष्य सोसलं नाही का? आमच्या संबंधात थोडा फरक पडला असला म्हणून काय झालं? निकोलस्कोयेमध्ये तात्याना सेम्योनोवना-

बरोबर आम्ही परत एकटे रहायला लागलो, की सर्व काही पूर्वीसारखं होईल!"

हिवाळा कसा संपला ते माझ्या ध्यानातच आले नाही. आमचे पहिले बेत बाजूला ठेवून आम्ही ईस्टरसुद्धा पीटरबुर्गमध्ये साजरा केला. संत तीमोथीचा सप्ताह सुरू झाला तेव्हा आम्ही प्रयाणाच्या तयारीला लागलो. माझ्या नवऱ्याने घरासाठी काही वस्तू खरेदी केल्या, घरच्या माणसांसाठी भेटवस्तू घेतल्या, आमच्या खेड्यातील जीवनात रंग भरण्यासाठी त्याने फुलेही घेतली. अत्यंत स्नेहाळ आणि आनंदी मनःस्थितीत तो होता. तेवढ्यात त्याची चुलत बहीण अचानक उगवली आणि शनिवारपर्यंत आम्ही आमचे जाणे लांबणीवर टाकावे असा आग्रह धरून बसली. काऊंटेस र. हिच्या घरी मोठी पार्टी होणार होती आणि त्या पार्टीला मी हजर असावे अशी काऊंटेस र. ची फार फार इच्छा होती. शिवाय त्यावेळी पीटरबुर्गमध्ये मुक्काम करून असलेल्या प्रिन्स म. यांना गेल्या बॉलनृत्यापासून माझी ओळख करून घ्यायची इच्छा होती आणि केवळ त्याच एका हेतूने ते पार्टीला येणार होते. रशियामधील मी सर्वात सुंदर स्त्री आहे, असे म्हणे ज्याच्या-त्याच्यापाशी ते सांगत होते. शहरामधील सगळी नामवंत मंडळी पार्टीला जमणार होती. थोडक्यात म्हणजे त्या पार्टीला मी जाणे आवश्यक होते.

दिवाणखान्याच्या दुसऱ्या टोकाला माझा नवरा कुणाशीतरी बोलत होता.

"तर मग मेरी, तुम्ही येणार ना?" त्याच्या चुलत बहिणीने मला विचारले.

"परवा खेड्यात परतायचा आमचा बेत होता," माझ्या

नवऱ्याकडे कटाक्ष टाकीत, थोड्याशा अनिश्चित सुरात मी बोलू लागले.

आमची नजरानजर झाली व त्याने चटकन दृष्टी दुसरीकडे फिरविली.

"त्याचं मन वळवून मी त्याला रहायला लावीन," ती म्हणाली, "मग शनिवारी आपण पार्टीला जाऊ आणि सगळ्यांची डोकी फिरवून टाकू. जायचं ना?"

"आमचे बेत बदलावे लागतील आणि एव्हाना आम्ही सामानाची बांधाबांध केलीय," शरणागती पत्करायला मी आरंभ केला होता.

"त्यापेक्षा आजच रात्री जाऊन तिला प्रिन्सला मुजरा करून येऊं दे," हॉलच्या दुसऱ्या टोकापासून माझा नवरा काहीशा चिडक्या आवाजात म्हणाला. त्याचा हा सूर यापूर्वी मी कधीही ऐकला नव्हता.

"अग बाई! ह्याला मत्सर वाटतोय! पहिल्यांदाच बघतेय असा अवतार," त्याची चुलत बहीण हसून म्हणाली. "सेर्गेई मिखाइलिच, फक्त प्रिन्ससाठी नव्हे तर आम्हा सगळ्यांसाठी तिनं यावं म्हणून मी तिची मनधरणी करतेय. काऊंटेस र. यांनी फार फार आग्रह केलाय!"

"तिचं तिला ठरवूं दे," माझा नवरा थंडपणे म्हणाला आणि खोलीतून निघून गेला.

नेहमीपेक्षा तो जास्त बेचैन झाल्याचे मला आढळले. त्यामुळे माझी द्विधा मनःस्थिती बनली व त्याच्या चुलत बहिणीला मी कसलेही आश्वासन दिले नाही. ती निघून जाताच तडक मी त्याच्यापाशी गेले. विचारात गढून तो येरझाऱ्या घालीत होता. मी चोरपावलांनी खोलीत प्रवेश केल्याचे त्याच्या ध्यानात आले नाही.

"निकोलस्कोयेमधल्या आमच्या जुन्या घराची त्याला आठवण येतेय," त्याच्याकडे पाहताना माझ्या मनात आले. "चकचकीत ऊन पडलेल्या आमच्या बैठकीच्या खोलीत सकाळची कॉफी, मग त्याचं शेतावर जाणं आणि शेतमजुरांना भेटणं, संध्याकाळी दिवाणखाना आणि मध्यरात्री गुपचुप जाऊन आमचं खाणं... नाही!" मी ठरविले. "पृथ्वीवरचे सर्व नृत्यसमारंभ आणि पृथ्वीवरच्या सगळ्या प्रिन्स मंडळींची स्तुती यांचा मी त्याच्या आनंदासाठी आणि त्याच्या प्रेमळ स्पर्शासाठी त्याग करीन!" मी पार्टीला जाणार नाही आणि जाण्याची माझी इच्छाही नव्हती असे त्याला मी सांगणार होते, तोच अचानक त्याची नजर मागे वळली व त्याने मला पाहिले. त्याने कपाळाला आठ्या घातल्या. त्याचा सौम्य, कष्टी चेहरा बदलला. पुन्हा एकदा त्याच्या नजरेत भेदकपणा, धूर्तता आणि श्रेष्ठता उमटली. माझ्या नजरेत सामान्य माणूस म्हणून राहण्याची त्याची इच्छा नव्हती. परमेश्वरासमान त्याला रहायचे होते. माझ्यापुढे त्याला एक पायरी उंच उभे रहायचे होते.

"काय झालं लाडके?" माझ्याकडे वळून त्याने शांतपणे, सहज सुरात विचारले.

मी काही बोलले नाही. माझ्यापासून तो लपवू पहात होता, जसा तो मला आवडत होता तसा तो स्वतःला दाखवू इच्छित नव्हता, याचा मला राग आला.

"शनिवारी तुला पार्टीला जायचंय?" त्याने विचारले.

"मला जायचं होतं," मी म्हणाले, "पण तू नाराज आहेस... शिवाय सामानाची बांधाबांध झालीय."

यापूर्वी इतक्या थंड नजरेने त्याने माझ्याकडे कधीही पाहिले

नव्हते वा एवढ्या थंड स्वरात तो माझ्याशी कधीही बोलला नव्हता. "मी मंगळवारपर्यंत थांबू शकतो आणि सामान परत उघडायला त्यांना सांगीन," तो म्हणाला. "तुझी इच्छा असेल तर जरूर जा. मी खेड्याला जाणार नाही."

नेहमीप्रमाणे, अस्वस्थ मन:स्थितीत तो मागे-पुढे येरझाऱ्या घालू लागला. माझ्याकडे पाहण्याचे तो टाळीत होता.

"मला तुझं वागणंच कळत नाही," जेथे मी उभी होते तेथेच थांबून म्हणाले. माझी नजर त्याचा पाठलाग करीत होती. "तू म्हणतोस की, तू नेहमी शांत असतोस (असे तो कधीही म्हणाला नव्हता) – मग माझ्याशी असा विचित्र तिऱ्हाईतासारखा का बोलतोस? तुझ्यासाठी माझ्या ह्या आनंदाचा त्याग करायला मी तयार आहे आणि इथं तू सांगतोस जा म्हणून! तेसुद्धा उपहासानं! यापूर्वी अशा रीतीनं तू माझ्याशी कधी बोलला नव्हतास!"

"अरे वा! तू **त्याग** करतेस... (त्याने या शब्दावर जोर दिला)... तसा मीही **त्याग** करतोय! याहून उत्तम ते काय? औदार्याची स्पर्धाच लागलीय. खरंच, सुखी विवाहाला यापेक्षा आणखी काय पाहिजे?"

एवढा कडवट उपहास त्याच्या तोंडून मी प्रथमच ऐकत होते. पण त्याच्या उपहासामुळे मी शरमले नाही, तर अपमानीत झाले. त्याच्या भावनावेगाची मला भीती वाटली नाही. तर माझ्याही भावना तशाच तीव्र बनल्या. हाच का तो? आमच्या नात्यात खोटेपणा असू नये म्हणून नेहमी घाबरणारा हाच का तो? नेहमी साधा आणि प्रामाणिक वागणारा? आज हे सारे बोलतोय? का? कारण त्याच्यासाठी खरंच माझ्या ह्या आनंदाचा बळी देत होते म्हणून? ज्या आनंदाचा

उपभोग घेण्यात मला काही गैर वाटत नाही अशा सुखाचा बळी देत होते म्हणून? अवघ्या मिनिटापूर्वी मी त्याला समजून घेतले होते आणि त्याच्यावर अमाप प्रेम करीत होते म्हणून? आमच्या भूमिका बदलल्या होत्या. आता साधे, स्पष्ट शब्द तो टाळीत होता आणि मी त्यांचा पाठपुरावा करीत होते.

"तू फार बदलला आहेस," उसासा टाकीत मी म्हटले. "काय मी तुझा अपराध केला? पार्टी हे काही कारण नव्हे... तुझ्या मनात माझ्याविरुद्ध काहीतरी आकस आहे. का असा अप्रामाणिकपणा? तुला त्याची नेहमी धास्ती वाटायची. माझ्याविरुद्ध तुझी काय तक्रार आहे ते सरळ सांग मला!" माझ्याबद्दल त्याने तक्रार करावी असे सबंध हिवाळाभरात काही घडले नव्हते ह्याची समाधानाने आठवण करीत असताना माझ्या मनात आले की, "आता त्याला काहीतरी बोलणे भागच होते."

खोलीच्या मध्यभागी जाऊन मी उभी राहिले आणि त्याच्याकडे पाहिले. आता त्याला माझ्या अगदी जवळून जावे लागणार होते. "तो माझ्या जवळ येईल, मला मिठी घालील आणि सारं काही संपेल," माझ्या मनात आले व तो किती चुकीचा वागला होता ते दाखविण्याची संधी गमावीत असल्याचे मला दुःखही झाले. पण तो खोलीच्या टोकाशी थांबला आणि त्याने माझ्याकडे पाहिले.

"तुला अजूनही समजलं नाही?" त्याने विचारले.

"नाही."

"तर मग तुला खुलासा करून सांगतो. आयुष्यात प्रथमच मला ही भावना जाणवली आणि ती तिरस्करणीय आहे हे मला माहीत आहे, पण तरीही मला ती जाणवली..."

तो थांबला. आपल्या स्वरातील कठोरपणामुळे त्याचा तोच दचकला.

"काय म्हणायचंय तुला?" मी विचारले. संतापामुळे माझ्या डोळ्यात अश्रू जमू लागले होते.

"प्रिन्स तुला सुंदर समजतो आणि म्हणून केवळ त्याच्या भेटीला तू धावते आहेस ही बाब अगदी तिरस्करणीय आहे. आपल्या नवऱ्याला विसरून, स्वतःला आणि एक स्त्री या नात्यानं स्वतःच्या प्रतिष्ठेला विसरून असं तू वागते आहेस. तुला स्वतःच्या प्रतिष्ठेची जाण नसली, तरी तुझ्या नवऱ्याला तुझ्याबद्दल काय वाटलं पाहिजे हे समजून घेण्याची तुझी इच्छा नाही. उलट तू आपल्या नवऱ्यापाशी येऊन त्याला सांगतेस की, त्याच्यासाठी तू **स्वार्थत्याग करते आहेस**! दुसऱ्या शब्दात म्हणजे 'महाराजांसमोर माझं दर्शन घडवण्यात मला आनंदच झाला असता, पण तुझ्यासाठी त्या आनंदाचा मी **बळी देते**!'"

तो जेवढा अधिक बोलत होता तेवढा स्वतःच्या आवाजाच्या ध्वनीमुळे अधिक संतापत होता. त्याचा आवाज कठोर, पाशवी आणि चावरा बनला होता. अशा परिस्थितीत यापूर्वी मी त्याला कधीही पाहिले नव्हते आणि असे काही पाहीन अशी कधी अपेक्षाही धरली नव्हती. माझा चेहरा आरक्त बनला. मी घाबरले होते, पण त्याचवेळी निष्कारण निर्भर्त्सना झाल्याबद्दल संतापाची व अभिमानाची भावना मनात उफाळून येत होती. मला त्याच्यावर सूड घ्यावासा वाटत होता.

"फार पूर्वीच मी हे सारं अपेक्षिलं होतं! बोल...बोल!" मी म्हणाले.

"तू काय अपेक्षा केली होतीस ते मला ठाऊक नाही," तो पुढे बोलत राहिला. "पण दर दिवशी अशा **मूर्ख** लोकां-

बरोबर घाणीत, रिकामटेकडेपणात आणि चैनीत लोळत असलेल्या तुला बघून मी मात्र याहून वाईटाची अपेक्षा धरायला पाहिजे होती. आता ती वेळ येऊन ठेपलीय. आजपर्यंत मी सहन केलं. यापूर्वी एवढी बेअब्रू कधी अनुभवली नव्हती, एवढा कधी दुखावला गेलो नव्हतो. तुझ्या मित्राने त्याचे घाणेरडे पंजे माझ्या काळजात खुपसले आणि मत्सराची भाषा जेव्हा तो बोलू लागला तेव्हा मी दुखावलो. माझा मत्सर आणि तो सुद्धा कुणाबद्दल? जो माणूस ना तुला माहीत ना मला माहीत अशाबद्दल? आणि तू मला समजून घेऊ इच्छित नाहीस, स्वार्थत्याग करू पाहतेस? कसा? तुझी शरम वाटते मला! स्वतःची अशी विटंबना करून घेतेस याची लाज वाटते मला. त्याग म्हणे!"

"यालाच नवरेशाही म्हणतात तर!" माझ्या मनात आले. "कुठलाही अपराध नसताना बाईचा अपमान करायचा, तिची नाचक्की करायची. हा नवऱ्याचा हक्क! पण मी त्याच्या-समोर मुळीच मान तुकवणार नाही!"

"नाही, तुझ्यासाठी मी काहीही त्याग करणार नाही," मी म्हणाले. माझ्या नाकपुड्या फुगल्याचे व माझ्या चेहऱ्या-वरील रक्त साकळून गेल्याचे मला जाणवले. "शनिवारी मी पार्टीला जाईन... नक्की जाईन!"

"हवी तेवढी मौज कर! पण तुझ्या आणि माझ्यातलं सारं काही संपलं!" अनावर संतापाने तो ओरडला. "माझा असा सतत छळ करायला मी तुला मुभा देणार नाही. मूर्खपणा झाला माझा..." तो पुन्हा बोलू लागणार होता, पण त्याचे ओठ थरथरले. मोठ्या कष्टाने त्याने स्वतःला आवरले व तो गप्प बसला.

त्या क्षणाला त्याची मला भीती वाटत होती आणि तिटकाराही वाटत होता. त्याने केलेल्या सर्व अपमानांचे उट्टे काढण्यासाठी मला खूप खूप बोलायचे होते, पण मी जर तोंड उघडले असते तर मला रडू कोसळले असते आणि त्याच्यासमोर मी स्वतःची किंमत कमी करून घेतली असती. शब्दही न उच्चारता मी खोलीमधून बाहेर गेले. पण ज्या क्षणी त्याची पावले मला ऐकू येईनाशी झाली त्या क्षणी आमच्या कृत्याची मला भीती वाटली. माझ्या सर्व सुखाचे निधान असलेला बंध कदाचित कायमचा तुटेल ह्या विचाराने मी घाबरले.

"जर मी त्याच्यापाशी गेले आणि काही न बोलता माझा हात त्याच्या हाती देऊन त्याच्या दृष्टीला दृष्टी भिडवली, तर मला समजून घेण्याइतपत तो शांत झाला असेल काय? माझं औदार्य त्याला समजेल काय? माझ्या दुःखाला त्याने ढोंग म्हटले तर? किंवा माझ्या पश्चात्तापाचा अर्थ स्वतःचे बरोबर होते असा त्याने करून घेतला तर? मोठ्या ताठ्याने त्याने मला क्षमा केली तर? ज्या माणसावर मी एवढे प्रेम केले तो एवढ्या क्रूरपणे माझा अपमान कसा करू शकला?"

मी त्याच्याकडे गेले नाही. मी माझ्या खोलीत जाऊन खूप वेळपर्यंत एकटी बसले आणि मनसोक्त रडले. आम्ही बोललेला प्रत्येक शब्द आठवून मला भीती वाटली. त्या शब्दांच्या जागी दुसरे—चांगले शब्द—बसविण्याचा मी प्रयत्न केला. परत पुन्हा त्या भयानक शब्दांची आणि अपमानांची आठवण होऊन मी शहारले. त्या संध्याकाळी चहाच्या वेळी माझ्या खोलीतून मी बाहेर पडले. आमच्या भेटीला स. आला होता व त्याच्या उपस्थितीतच मी माझ्या नवऱ्याला भेटले तेव्हा आम्हा दोघांमध्ये एक मोठी दरी निर्माण झाल्याचे मला जाणवले.

ती दरी कायमच राहणार असे दिसले. आम्ही गावी केव्हा जाणार अशी स. ने विचारणा केली.

"मंगळवारी," माझ्या नवऱ्याने मला उत्तर देण्याचा अवसर न देता पटकन म्हटले. "प्रथम आम्ही काऊंटेस र. कडे पार्टीला जाणार आहोत. तू येणार ना?" माझ्याकडे वळून त्याने विचारले.

त्याच्या आवाजातील तिऱ्हाईतपणा पाहून माझ्या जिवाचा थरकाप झाला. मी त्याच्याकडे नजर फेकली. त्याचे डोळे माझ्यावर रोखलेले होते. त्या डोळ्यांमध्ये संताप आणि उपहास भरलेला होता. त्याचा आवाज थंड आणि कठोर होता.

"हो," मी उत्तरले.

संध्याकाळी जेव्हा आम्ही दोघेच घरात राहिलो तेव्हा तो माझ्यापाशी आला व आपला हात माझ्यापुढे धरून पुटपुटला: "मी तुला जे काही बोललो ते विसरून जा."

मी त्याचा हात घेतला. माझ्या ओठांवर थरथरते स्मित होते आणि अश्रुधारा वाहण्याच्या बेतात होत्या. पण काहीतरी भावनाविवश प्रसंग घडेल अशा भीतीने त्याने चटकन आपला हात मागे घेतला व थोड्या दूर अंतरावरील खुर्चीत तो बसला. "अजूनही त्याला स्वतःचेच बरोबर वाटत असेल का?" मी नवल करीत राहिले व पार्टीला न जाण्याबद्दलचा खुलासा आणि विनंती माझ्या जिभेवर आली तरी ओठांमधून उमटली नाही.

"आपण जाणं लांबणीवर टाकल्याचं आईला कळवायला पाहिजे, नाहीतर ती काळजी करीत बसेल," तो म्हणाला.

"केव्हा जाण्याचा विचार आहे?" मी विचारले.

"पार्टीनंतर, मंगळवारी!"

"माझ्यासाठी तू हे करत नाहीस अशी आशा धरते," त्याच्या डोळयांमध्ये बघत मी म्हणाले. पण तो निर्विकार डोळयांनी मला पहात होता. जणू त्याने आपल्या डोळयांवर पडदा ओढून घेतला होता. अचानक त्याचा चेहरा म्हातारा आणि अप्रिय भासला.

आम्ही पार्टीला गेलो आणि आमच्यामधील संबंध परत मैत्रीचे झाल्याचे भासले, पण त्यांचे पूर्वीचे स्वरूप पूर्ण पालटून गेले होते.

पार्टीच्या वेळी मी दोन स्त्रियांमध्ये बसले होते. जेव्हा प्रिन्स माझ्यापाशी आले तेव्हा साहजिकच उठून उभे राहून मला त्यांच्याशी बोलावे लागले. मी उभी राहिले तेव्हा नकळत माझ्या डोळयांनी माझ्या नवऱ्याचा शोध घेतला. हॉलच्या एका टोकाला उभे राहून तो माझ्याकडेच पहात होता. माझी नजर भिडताच त्याने आपले तोंड फिरविले. अचानक मला शरम वाटली आणि मी कमालीची दुखावले. प्रिन्सच्या डोळयांदेखत मी शरमिंद्या भावनेने लालेलाल झाले. पण तरीही, त्यांची नजर झेलत त्यांचे बोलणे ऐकणे मला भाग होते. आमचे संभाषण छोटे झाले. माझ्याशेजारी बसून गप्पा मारायला त्यांना जागा नव्हती आणि कदाचित त्यांच्या सहवासात मी अवघडल्याचे त्यांच्या ध्यानात आले असावे. मागील वेळच्या नृत्याविषयी, उन्हाळयात मी कोठे राहिले त्याविषयी आमचे बोलणे झाले. माझा निरोप घेताना त्यांनी माझ्या नवऱ्याशी ओळख करून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. हॉलच्या टोकाशी त्यांची भेट झाल्याचे व ते एकमेकांशी बोलत असल्याचे नंतर मी पाहिले. प्रिन्स माझ्याबद्दल काहीतरी बोलले असावे, कारण संभाषणाच्या दरम्यान त्यांनी माझ्याकडे कटाक्ष

टाकून स्मित केले. माझा नवरा एकदम ताठ झाला व त्याचा चेहरा गोरामोरा बनला. त्याने झुकून अभिवादन केले व प्रिन्सपासून तो दूर गेला. मीही लाजले. प्रिन्सना माझ्याविषयी आणि त्याहीपेक्षा माझ्या नवऱ्याविषयी काय वाटले असावे, ह्या विचाराची मला लाज वाटली. प्रिन्सबरोबर मी बोलत असतानाचे माझे अवघडले लाजरेपण आणि माझ्या नवऱ्याचे विचित्र वागणे प्रत्येकाच्या ध्यानात आले असणार अशी मी कल्पना करून घेतली. ह्याचा खुलासा लोक कसा करणार होते देवच जाणे! किंवा माझ्या नवऱ्याबरोबरचे संभाषण त्यांना माहीत तर झाले नव्हते?

त्याची चुलत बहीण मला घरापर्यंत पोहचवायला आली. वाटेत आम्ही त्याच्याबद्दल बोलत होतो. मला राहवले नाही आणि त्या पार्टीवरून झालेल्या आमच्यामधील भांडणाचा सगळा वृत्तांत मी तिला सांगितला. हा गैरसमज लौकरच नाहीसा होईल, त्याच्या पुसटशा खुणासुद्धा राहणार नाहीत, असे सांगून तिने मला शांत करण्याचा प्रयत्न केला. तिच्या समजुतीप्रमाणे माझ्या नवऱ्याचा स्वभाव कसा होता ते तिने मला सांगितले. तो खूप गर्विष्ठ आणि माणूसघाणा बनला होता असे तिचे मत होते. मी तिच्याशी सहमत झाले. आता मी त्याला अधिक चांगली समजू लागले होते, भावनावश न होता जाणू लागले होते, असे मला भासले.

पण जेव्हा एकांतात मी माझ्या नवऱ्याला भेटले तेव्हा त्याच्याविषयीचा हा निष्कर्ष माझ्या सदसद्विवेकबुद्धीला अपराधा-सारखा बोचत राहिला आणि आमच्यामधील दरी अधिकच रुंदावल्याचे मला जाणवले.

८

त्या दिवसापासून पुढे आमचे जीवन आणि आमचे संबंध पूर्ण बदलले. आम्हाला इतःपर एकमेकांच्या सहवासात तसे सुख लाभेना. काही विषय आम्ही टाळू लागलो व एकांतात बोलण्यापेक्षा तिसऱ्या व्यक्तीच्या उपस्थितीत बोलणे आम्हाला अधिक सोपे जाऊ लागले. खेड्यातील जीवन किंवा बॉल-नृत्याचे समारंभ यांच्याविषयी संभाषण सुरू झाले रे झाले की, जुन्या खपल्या खरवडून काढल्यासारखे आम्हाला वाटे व एकमेकांच्या नजरेला नजर देण्याचे आम्ही टाळत असू. आम्हाला अलग करणाऱ्या दरीची आम्हा दोघांनाही जाणीव असावी आणि तिला ओलांडण्याची आम्हाला धास्ती वाटत होती. तो गर्विष्ठ आणि चटकन संतापणारा आहे अशी माझी खात्री झाली होती. त्याला न दुखावण्याची खबरदारी घेणे मला भाग होते. त्याची खात्री पटली होती की, उच्चभ्रू समाजाविना राहणे मला शक्य नव्हते, खेड्यातील आयुष्य मला आवडत नव्हते आणि माझ्या हीन रुचीशी जमवून घेणे त्याला भाग होते. म्हणून आम्ही दोघेही हे विषय टाळत होतो व प्रत्येकजण दुसऱ्यावर चुकीचे आरोप करीत होता. एकमेकांना परिपूर्ण मानायचे आम्ही केव्हाच थांबविले होते. आम्ही इतरांशी तुलना करीत असू व गुप्तपणे एकमेकांना जोखत असू.

आम्ही प्रयाण करण्यापूर्वी मी आजारी पडले आणि निको-ल्स्कोयेला जाण्याऐवजी आम्ही गावाबाहेर दाचा* घेतला. म्हणून सेर्गेई मिखाइलिच एकटाच आपल्या आईला भेटायला

*रशियन धर्तीचे खेड्यातील बैठे घर—अनु.

गेला. जेव्हा तो जायला निघाला तेव्हा त्याच्याबरोबर प्रवास करण्यास मी पुरेशी बरी झाले होते. पण त्याने मला राहण्याचा आग्रह केला. जणू माझ्या तब्येतीची त्याला भीती वाटत होती. मला जाणवले की, माझ्या प्रकृतीची त्याला चिंता वाटत नव्हती, तर खेड्यात आमच्या दरम्यान सुरळीत घडले नसते अशी त्याला धास्ती वाटत होती. मी आग्रह धरला नाही आणि माघारी राहिले .

त्याच्याविना मला खूप एकटे एकटे वाटले आणि माझे आयुष्य रिते बनले. पण तो परत आला तेव्हा एकेकाळी माझे आयुष्य जसे बदलले होते तसे घडले नाही याचे मला आश्चर्य वाटले. आमच्या आरंभीच्या प्रेमाच्या दिवसात, माझ्या एखाद्या विचारात अगर मतात तो सहभागी झाला नाही तर मला निराश वाटायचे; त्याची प्रत्येक कृती, त्याचा प्रत्येक शब्द मला परिपूर्णतेचा नमुना भासत; नुसती एकमेकांच्या नजरेला नजर भिडली तरी आमच्या ओठांवर आनंदाचे स्मित फुटायचे; ते दिवस गेले होते. आमचे संबंध इतके नकळत बदलले की, आमचे जुने प्रेम केव्हा अदृश्य झाले तेच आमच्या लक्षात आले नाही. आमच्या प्रत्येकाच्या स्वतःच्या आवडीनिवडी आणि चिंता निर्माण झाल्या. त्यांच्यात दुसऱ्याला सहभागी करून घेण्याचा आम्ही प्रयत्न केला नाही. प्रत्येकाचे स्वतःचे स्वतंत्र जग होते आणि दुसऱ्याचा त्याच्याशी काहीही संबंध नव्हता, याची चिंतासुद्धा आम्हाला वाटेनाशी झाली. ह्या परिस्थितीची आम्हाला सवय झाली व सुमारे वर्षभरात आम्ही एकमेकांकडे न अवघडता पाहू शकू लागलो. माझ्या सहवासात त्याला आनंदाच्या ऊर्मी अजिबात येईनाशा झाल्या. त्याचा बालिश-पणा, प्रत्येक गोष्टीला क्षमा करण्याची त्याची सिद्धता आणि

एकेकाळी ज्याने मला संताप येत असे तो त्याचा उदासीनपणा, ह्या सगळ्याच गोष्टी अदृश्य झाल्या. मला अवघडून टाकणारी आणि सुखविणारी त्याची शोधक नजर इत:पर थांबली. आता आम्ही एकत्र प्रार्थना करीत नव्हतो किंवा नुक्त उन्मादाचे उमाळे आम्हाला येत नव्हते. आम्ही क्वचित एकमेकांना भेटत असू, कारण कामाच्या निमित्ताने तो सतत दूर असायचा. मला एकटीला सोडून जायला त्याला वाईट वाटत नव्हते अथवा भीतीही वाटत नव्हती. मी सतत उच्चभ्रू समाजात वावरत होते व तेथे मला त्याची गरज नव्हती.

आमची इत:पर भांडणे होत नव्हती अथवा मतभेद घडत नव्हते. मी त्याला खूष ठेवण्याचा प्रयत्न करायची आणि तो माझ्या सर्व इच्छा पूर्ण करायचा. आम्ही एकमेकांवर प्रेम करीत होतो असे भासत होते.

आम्ही एकांतात क्वचितच रहात असू. अशा वेळांना मला आनंद वाटायचा नाही, हुरहुर जाणवायची नाही किंवा मन गोंधळून जायचे नाही. जणू मी एकटी स्वत:मध्ये गुरफटून गेले होते. मला पूर्ण जाणीव झाली होती की, तो माझा नवरा होता, कुणी अनोळखी नव्हता, तर एक भला माणूस होता, व माझ्या स्वत:इतकीच त्याला मी पूर्ण जाणत होते. तो कसा वागेल, काय म्हणेल, माझ्याकडे तो कसा पाहील, ही प्रत्येक गोष्ट मला माहीत होती अशी माझी खात्री पटली होती. तो जर वेगळा वागला, अथवा माझ्या अपेक्षेपेक्षा वेगळ्या नजरेने त्याने मला पाहिले, तर त्याने चूक केली असे मला वाटायचे. थोडक्यात म्हणजे तो माझा नवरा होता; बस्स एवढेच! ते तसेच असले पाहिजे, नवरे आणि बायका

नेहमी तसेच असतात व आम्ही नेहमी तसेच होतो असे माझे मत होते.

जेव्हा तो दूर गेला, विशेषत: पहिल्यांदा, तेव्हा त्याच्याविना मला खूप एकाकी वाटले व भीती वाटली. त्याच्या पाठबळाची गरज मला जास्त प्रकर्षाने जाणवली. तो परतल्यावर मी आनंदाने त्याला मिठी मारायची, पण दोन तासांनंतर हा आनंद मी विसरून जायची आणि त्याच्याशी कोणत्या विषयावर बोलावे असा मला प्रश्न पडायचा. फक्त निवांत, संयमित हळुवारपणाच्या क्षणांना मला जाणवायचे की, काहीतरी बिनसले होते; माझे काळीज जड बनायचे आणि त्याच्या नजरेत तोच भाव वाचल्याचा मला भास व्हायचा. ह्या हळुवारपणाच्या मर्यादांची – ज्यापलिकडे तो जाणार नव्हता आणि मी जाऊ शकत नव्हते – मला जाणीव होती. काहीवेळा ह्याचा मला विषाद वाटे, पण माझ्या इतर उद्योगांमध्ये त्यावर झुरत बसायला मला वेळ नव्हता. माझी सदैव वाट पाहणाऱ्या बहुविध मनोरंजनांमध्ये हा अस्पष्ट जाणीवेतून निर्माण होणारा खिन्नपणा बुडवून टाकायचा मी प्रयत्न करायची.

आरंभी झगमगाटाने आणि स्तुतीने मला फक्त दिपवून टाकणाऱ्या फॅशनेबल आयुष्याने लौकरच मला पुरते जिंकून घेतले व त्या जीवनाची मला सवय जडली. त्या आयुष्याने माझ्याभोवती साखळ्या बांधल्या आणि प्रेमाची तहान लागलेले माझे हृदय काबीज केले. एकाकीपण म्हणजे काय ते मी विसरून गेले आणि माझ्या जीवनाचा विचार करण्याचे मला धाडस होईना. सकाळी उशिरा प्रहरापासून ते उशीरा रात्रीपर्यंत माझा सारा वेळ व्यापलेला होता. मी घराबाहेर गेले नाही तरी कधीही एकटी नसे. ह्या सगळ्या गोष्टींचा इत:पर

मला ना आनंद वाटत होता ना कंटाळा येत होता. अशाच रीतीने मी कायम जगत राहिले पाहिजे असा मी स्वतःचा ग्रह करून घेतला होता.

तीन वर्षे उलटली आणि आमचे संबंध तसेच राहिले. जणू ते थिजले होते. त्यांचा एक साचा बनला होता. अधिक चांगले वा वाईट होणे त्यांना शक्य नव्हते. त्या तीन वर्षांमध्ये आमच्या कुटुंबात दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. पण त्यापैकी एकाही घटनेने माझ्या जीवनात बदल झाला नाही. त्या घटना म्हणजे माझ्या पहिल्या बाळाचा जन्म आणि तात्याना निकोलोवनाचा मृत्यू. पहिल्याप्रथम मातृप्रेमाने मला एवढे भारून टाकले व मला एवढा अनपेक्षित आनंद झाला की, माझे एक नवे जीवन सुरू होणार असे मला भासले. पण दोनच महिन्यात, जेव्हा मी परत माझ्या वर्तुळांमध्ये वावरू लागले, तेव्हा ती भावना कोसळून पडली व तिचे एका सवयीत आणि माझ्या कर्तव्याची औपचारिक पूर्ती करण्यात रूपांतर झाले. याउलट, आमच्या मुलाचा जन्म झाल्यानंतर, माझा नवरा पूर्वीप्रमाणे शांत बनला व घरीच राहू लागला. आपला पूर्वीचा प्रेमळपणा आणि आनंदीपणा तो बाळाला देऊ लागला. नृत्याच्या पोषाखात अनेकदा माझ्या बाळाच्या खोलीत मी क्रूस-चिन्ह करायला जायची तेव्हा माझा नवरा मला तेथे आढळायचा. त्याची रोषपूर्ण आणि शोधक दृष्टी पाहून मला शरमल्यासारखे व्हायचे. अचानक मला सदसद्विवेकबुद्धी टोचू लागायची की, माझ्या बाळाकडे मी दुर्लक्ष करीत होते आणि इतर स्त्रियांपेक्षा मी खरेच अधिक वाईट होते का. असा प्रश्न स्वतःला विचारू लागायची. "पण मी काय

करणार?" माझ्या मनात यायचे. "माझ्या मुलावर माझं प्रेम आहे, पण सगळा दिवस त्याच्या शेजारी बसून राहणं मला शक्य नाही. मला खूप कंटाळा येईल. आणि कोणत्याही परिस्थितीत मी प्रतारणा करणार नाही."

सेर्गेई मिखाइलिच आपल्या आईच्या मृत्यूने खूप दुःखी झाला होता. ती गेल्यानंतर निकोल्स्कोयेमध्ये राहणे त्याला कठीण झाले होते असे तो म्हणाला. पण माझ्या बाबतीत सांगायचे तर, तिच्याविना खेड्यातील जीवन मला अधिक आल्हादक आणि निवांत वाटत होते. अर्थात तिच्या मृत्यूचे मला दुःख झाले होते व माझ्या नवऱ्याबद्दल मला सहानुभूती वाटत होती. तो तीन वर्षांचा बहुतेक काळ आम्ही शहरातच राहिलो. दोन महिन्यांसाठी एकदा मी खेड्यात गेले आणि तिसऱ्या वर्षी आम्ही परदेशी गेलो.

एका औषधी झऱ्याच्या स्थळी आम्ही उन्हाळा घालविला. तेव्हा मी एकवीस वर्षांची होते. माझ्या समजुतीप्रमाणे आमचे छान चालले होते. कौटुंबिक जीवनापासून मला जे काही लाभत होते त्याहून अधिकाची अपेक्षा मी करीत नव्हते. माझ्या ओळखीच्या प्रत्येक व्यक्तीला मी आवडत होते असा माझा समज होता. माझी प्रकृती छान होती. माझे कपडे उत्तम होते. मी सुंदर असल्याची मला जाणीव होती. हवा सुरेख होती. सौंदर्याच्या आणि लावण्याच्या वातावरणात मी वेढलेली होते. मी खूप मजेत होते. निकोल्स्कोयेमध्ये असताना मी जशी आनंदी असायची तशी आता नव्हते. त्यावेळी मला वाटायचे की, सुखी असण्याचा माझा हक्क होता, माझे सुख कितीही मोठे असले तरी त्याहून जास्त सुखाची मी अपेक्षा करायची, अधिकाधिक सुखाची मला तहान होती. तो वेगळ्या

प्रकारचा आनंद होता. पण ह्या उन्हाळ्यातही मी समाधानी होते. मला कसलीही वांच्छा नव्हती, कसलीही आस नव्हती, कसलीही भीती नव्हती. माझे आयुष्य परिपूर्ण भासत होते आणि माझी सदसद्विवेकबुद्धी शांत होती. त्या मोसमातील सर्व तरुण पुरुषांमध्ये म्हाताऱ्या प्रिन्स क. प्रमाणे, आमच्या राजदूताप्रमाणे, कुणीही जास्त स्वारस्यपूर्ण नव्हते व प्रिन्स क. माझा अनुनय करीत होते. एक तरुण होता, तर दुसरा वयस्क होता. एक सोनेरी केसांचा इंग्रज होता, तर दुसरा छोटी दाढी राखलेला फ्रेंच होता. ते सगळे मला सारखेच होते, तेवढेच आवश्यक होते. फक्त त्यांच्यामधील एकाचे, मार्क्विस ड. नामक इटालियनाचे, मला जास्त आकर्षण वाटत होते, कारण माझ्याविषयीचे कौतुक तो धीटपणे व्यक्त करीत असे. माझ्याबरोबर राहण्याची, माझ्याशी नृत्य करण्याची वा घोड्यावरून सफर करण्याची, कॅसिनोत येण्याची व मी किती सुंदर आहे हे सांगण्याची एकही संधी तो दवडत नसे.

आमच्या घरासमोर तो उभा असलेला अनेकदा मी आमच्या खिडकीमधून पाहिले होते. त्याच्या चमकत्या डोळ्यांचे एकटक पाहणे खूपदा मला लाजवायचे आणि मी तोंड फिरवायची. तो तरुण, देखणा आणि सुरेख होता. पण सर्वांत महत्त्वाचे म्हणजे त्याचे स्मित आणि त्याचे कपाळ मला माझ्या नवऱ्याची आठवण करून द्यायचे. हे साम्य मला चकित करायचे. पण सर्गेई मिखाइलिचच्या दयाळू आणि सौम्य अशा मोहक मुद्रे-ऐवजी त्याच्यात काहीतरी रासवट आणि पाशवी होते. त्याचे ओठ. त्याची नजर, त्याची लांब हनुवटी यांच्यातून हा रासवट-पणा व्यक्त व्हायचा. तेव्हा माझी समजूत होती की, माझ्यावर तो अनावर प्रेम करीत आहे व काहीवेळा गर्विष्ठ

सहानुभूतीने मी त्याच्याविषयी विचार करायची. किंचित मैत्रीच्या माफक विश्वासात घेऊन त्याला गोंजारायला मला आवडले असते, पण ह्या प्रारंभिक लीलांना त्याने ताडकन धुडकावून लावले आणि त्याच्या अबोल वासनेने मला अस्वस्थ करणे चालू ठेवले. कोणत्याही क्षणी त्याच्या ओठांवाटे ती वासना धबधबा कोसळली असती असे वाटायचे. ह्या माणसाची मला भीती वाटत होती, पण तसे मी मान्य करीत नव्हते आणि अनेकदा माझी इच्छा नसतानाही त्याच्याविषयी मी विचार करीत होते. माझ्या नवऱ्याची त्याच्याशी ओळख झाली होती. माझ्या ओळखीच्या लोकांच्या दृष्टीने तो फक्त त्याच्या बायकोचा नवरा होता. त्या सर्वांपेक्षा ह्या इटालियनाशी माझा नवरा जास्तच थंडपणे व उद्धट वागायचा.

मोसमाच्या अखेरी मी आजारी पडले व दोन आठवडेपर्यंत घराबाहेर जाऊ शकले नाही. संगीत ऐकण्यासाठी एके संध्याकाळी मी बाहेर पडले. आजारपणातून उठल्यानंतर मी प्रथमच बाहेर पडले होते, तेव्हा मला समजले की खूप काळापासून अपेक्षित असलेल्या लेडी स. नामक ख्यातनाम सुंदरीचे आगमन झाले होते. माझे आनंदाने स्वागत झाले व माझ्याभोवती तात्काळ ओळखीच्यांचा गराडा पडला, पण नव्या सुंदरीभोवती जास्त माणसे होती. तिच्या सौंदर्याविना बोलायला लोकांना दुसरा विषय नव्हता. त्यांनी माझे तिच्याकडे लक्ष वेधले आणि ती खरोखरीच मोहक असल्याचे मला आढळले. पण तिचा आत्मतुष्ट चेहरा मला आवडला नाही आणि तसे मी बोलून दाखविले. एकेकाळी जी मला मौज वाटत होती ती प्रत्येक गोष्ट त्यादिवशी कंटाळवाणी भासली. दुसऱ्या दिवशी लेडी स. ने किल्ला पाहण्याची सफर

आयोजित केली होती, पण मी जायला नकार दिला. माझ्या-बरोबर जवळ जवळ कुणीच राहिले नाही आणि माझ्या दृष्टीला सर्व वेगळेच दिसू लागले. प्रत्येक व्यक्ती आणि प्रत्येक गोष्ट मूर्ख व रटाळ भासू लागली. मला रडावेसे वाटत होते. माझे औषधोपचार संपताच रशियाला परतायची माझी इच्छा होती. माझे काळीज जड झाले होते, पण त्याची स्वतःपाशी कबुली द्यायलाही मी तयार नव्हते. माझ्या अशक्तपणाची सबब सांगून चार लोकांमध्ये जायचे मी थांबवले. फक्त काहीवेळा पाणी प्यायला मी जायची, किंवा ल. म. नामक माझ्या ओळखीच्या रशियन बाईबरोबर भोवतालच्या ग्रामीण भागात बग्गीतून जायची. माझे उपचार केव्हा संपतील त्याची वाट पहात माझा नवरा हायडेलबर्गला गेला होता. नंतर आम्ही रशियाला परतणार होतो. मला भेटण्यासाठी तो अधूनमधून येई.

एके दिवशी लेडी स. ने सगळ्यांना शिकारीच्या मोहीमेवर नेले आणि दुपारच्या जेवणानंतर ल. म. व मी किल्ल्यावर फिरायला गेलो. सावकाशपणे बग्गीतून जात असताना कधी नव्हे एवढ्या गंभीरपणे आम्ही चर्चेत रमलो. प्राचीन चेस्नट झाडांमधून रस्ता वळणे घेत गेला होता. मावळत्या सूर्यकिरणांमध्ये न्हाऊन निघालेला बादेनभोवतालचा सुंदर, काळजीपूर्वक राखलेला ग्रामीण प्रदेश आम्हाला दिसत होता. ल. म. शी माझी खूप काळापासून ओळख असली तरी. ती एक प्रेमळ व बुद्धिमान स्त्री होती आणि तिला विश्वासात घेऊन बोलणे शक्य होते, तिच्यासारखी मैत्रीण असण्यात आनंद होता, ह्याची मला पूर्वी कधीच कल्पना नव्हती. आमच्या कुटुंबांबद्दल, आमच्या मुलांबद्दल आणि

त्या उपचारस्थळीच्या फालतू जीवनाबद्दल आम्ही बोलतो. रशियाला परत जावे, खेड्यात परत जावे, अशी इच्छा आम्ही प्रगट केली. तशा आठवणींच्या सुखद-खिन्न स्थितीतच आम्ही किल्ल्यात प्रवेश केला.

भिंतींच्या आत गारवा होता व सावली होती. वरच्या बाजूने अवशेषांवर जेथे सूर्यप्रकाश पडला होता तेथून पावलांचे आणि बोलण्यांचे आवाज ऐकू आले. दरवाजामधून बादेनचा रमणीय निसर्ग-देखावा दिसत होता. पण आम्हा रशियनांना तो थंड भासत होता. विश्रांतीसाठी आम्ही खाली बसलो व मुकाटपणे सूर्यास्त न्याहाळू लागलो. आता आवाज अधिक स्पष्ट येऊ लागले होते व कुणीतरी माझे नांव उच्चारल्याचा मला भास झाला. मी कान देऊन ऐकू लागले व प्रत्येक शब्द मी स्पष्ट ऐकला. आवाज परिचित होते: एक मार्क्विस ड. होता व दुसरा त्याचा फ्रेंच मित्र—तोही माझ्या परिचयाचा—होता. ते माझ्याविषयी आणि लेडी स. विषयी बोलत होते. फ्रेंच माणूस आम्हा दोघींची तुलना करीत होता व आमच्या सौंदर्याच्या प्रकारांचे विश्लेषण करीत होता. तो अपमानास्पद काहीही बोलला नाही, पण त्याचे बोलणे ऐकताना माझा चेहरा आरक्त बनला. आमच्यातील चांगल्या गोष्टींची त्याने तपशीलवार चर्चा केली: मला एव्हाना एक मूल होते, तर लेडी स. फक्त एकोणीस वर्षांची होती; माझे केस अधिक दाट होते, तर लेडी स. ची आकृती जास्त डौलदार होती. लेडी स. ख्यातनाम घराण्यातील होती, तर "तुमची ती मैत्रीण अशीतशीच आहे, इथं वारंवार येऊ लागलेल्या रशियन प्रिन्सेसपैकी एक आहे." शेवटी त्याने म्हटले की, लेडी स. बरोबर स्पर्धा

करण्याचा मी प्रयत्न केला नव्हता हा शहाणपणा होता, कारण बादेनमधील लोकांच्या दृष्टीने आता मी संपले होते.

"मला तिच्याबद्दल वाईट वाटतं."

आणि कुत्सित हसून फ्रेन्च पुढे बोलला: "जर तुमच्याशी तिनं जमवून घेतलं तर ठीक!"

"ती जर दूर गेली तर मी तिचा पाठलाग करीन," इटालियन हेलातील कर्कश्य आवाज आला.

"सुखी माणूस! अजून प्रेम करू शकतो!" फ्रेंच हसून म्हणाला.

"प्रेम!" इटालियनाने पुनरुच्चार केला. मग थोडे थांबून तो पुढे म्हणाला: "प्रेमाविना मला राहताच येत नाही. आयुष्य त्यासाठीच आहे. जीवनाला प्रेमप्रकरणात गुंतवणं इतकी एकच करण्यायोग्य गोष्ट आहे. आणि माझी प्रेमप्रकरणं कधीही अर्ध्यात तुटत नाहीत. हे प्रकरणसुद्धा शेवटाला नेण्याचा माझा इरादा आहे."

"मित्रा, तुला यश लाभो!" फ्रेंच म्हणाला.

आम्हाला पुढचे ऐकू आले नाही, कारण ते कोपऱ्याशी वळले व त्यांच्या पावलांचा आवाज दुसऱ्या बाजूने ऐकू आला. पायऱ्या उतरून ते खाली आले आणि काही मिनिटां-नंतर बाजूच्या दारातून आमच्यासमोर ठाकले. आम्हाला पाहताच ते कमालीचे दचकले. मार्क्विस ड. जेव्हा माझ्या-पाशी आला तेव्हा मी लाजले व किल्ल्याबाहेर पडताना त्याने आपला बाहू मला दिला तेव्हा मला धक्का बसला. पण मी त्याला नकार देऊ शकले नाही आणि ल. म. व त्याचा मित्र यांच्या पाठोपाठ आम्ही बग्गीकडे निघालो. फ्रेंच जे काही बोलला होता त्याचा मला राग आला होता,

पण मनातल्या मनात मात्र मी मान्य केले होते की, ज्याचा मी आधीच तर्क बांधला होता ते फक्त त्याने बोलून दाखविले होते. मार्क्विस ज्या रांगड्या पद्धतीने बोलला होता त्याचे मला आश्चर्य वाटले होते व संताप आला होता. त्याचे बोलणे माझ्या कानांवर गेले असणार याची कल्पना असूनही माझ्या उपस्थितीत तो घाबरला नव्हता ही बाब दुःखदायी होती. त्याला माझ्या निकट पाहून मला कमालीचा तिटकारा वाटत होता. त्याच्याकडे न पाहता, त्याला उत्तर न देता, स्पर्श जाणवेल न जाणवेल अशा रीतीने त्याचा दंड पकडून मी ल. म. च्या आणि फ्रेंचाच्या मागे घाईघाईने जात होते. मार्क्विस काहीतरी सुंदर देखाव्याबद्दल बोलत होता, माझ्या अचानक भेटीमुळे झालेल्या आनंदाला प्रकट करीत होता, त्याच सुरात आणखी बरेच काही बडबडत होता, पण मी काहीच ऐकत नव्हते. माझ्या मनात माझ्या नवऱ्याविषयीचे, मुलाविषयीचे आणि रशियाविषयीचे विचार घोळत होते. मला लाज वाटत होती, कशाचातरी खेद वाटत होता, काहीतरी हवेसे वाटत होते. Hôtel de Bade मधील माझ्या छोट्या खोलीत परतायची मला घाई झाली होती. एकटेपणी बसून घडलेल्या गोष्टींचा शांत चित्ताने विचार करायचा होता. पण ल. म. खूप सावकाश चालत होती आणि बग्गीपर्यंत पोहोचायला अजून बरेच अंतर होते. माझा जोडीदार मुद्दाम आपली पावले सावकाश टाकीत असल्याचे भासत होते. जणू मला थांबवून ठेवण्याचा त्याचा इरादा दिसत होता. "असं शक्य नाही!" माझ्या मनात आले आणि मी वेगाने जाण्याचा प्रयत्न केला. पण तो चक्क मला मागे खेचून धरीत होता. एवढेच नव्हे तर त्याने माझा हात

ज़ावला. रस्त्याच्या वळणाआड ल. म. गेली आणि आम्ही अगदी एकटे राहिलो. मी घाबरले.

"माफ करा," मी थंडपणे म्हटले आणि माझा हात सोडवून घ्यायचा प्रयत्न केला. पण माझ्या बाहीची लेस त्याच्या कोटाच्या बटणात अडकली होती. तो खाली झुकला, त्याची छाती माझ्या वक्षःस्थळाजवळ आली. तो लेस सोडवू लागला व त्याच्या उघड्या बोटांचा माझ्या हाताला स्पर्श झाला. एका नव्या भावनेमुळे — कदाचित भीतीच्या, कदाचित सुखाच्या — माझ्या पाठीतून शहारे उमटले. मी त्याच्याकडे कटाक्ष टाकला. त्याच्याविषयीचा सर्व तिरस्कार थंड कटाक्षाद्वारे दाखविण्याचा प्रयत्न केला, पण त्याऐवजी माझ्या नजरेतून भीती आणि गोंधळ उमटले. त्याचे ओलसर, भाजते डोळे माझ्या चेहऱ्याच्या अगदी जवळ होते. मला जणू गिळत होते, माझ्या मानेला आणि स्तनांना अधाशीपणे निरखत होते. त्याचे दोन्ही हात माझ्या दंडाला कुरवाळत होते. त्याचे विलग ओठ काहीतरी पुटपुटत होते — त्याचे माझ्यावर प्रेम होते, मी त्याचे सर्वस्व होते असे म्हणत होते. त्याचे ओठ अधिक जवळ आले आणि त्याच्या गरम हातांनी माझ्या हातांना गच्च दाबले. माझ्या नसांमधून आग पेटत गेली आणि डोळ्यांसमोर अंधेरी आली. माझा थरकाप झाला आणि त्याला ज्या शब्दांनी मी थोपवू पहात होते ते शब्द माझ्या घशातच अडकले.

अचानक त्याच्या ओठांचा स्पर्श माझ्या गालाला जाणवला. मी थंडगार पडले व माझे सर्वांग थरथर कापू लागले. मी थांबले व त्याच्याकडे पाहिले. बोलण्याची किंवा हालचाल करण्याची माझ्यात ताकदच उरली नव्हती.

घाबरून मी काहीतरी घडण्याची वाट पहात होते, काहीतरी घडावेसे मला वाटत होते. क्षणभरच ही अवस्था टिकली, पण तो क्षण फार भयानक होता. मी त्याला पुरता पाहिला. त्याचा चेहरा मी स्पष्ट निरखला. माझ्या नवऱ्याशी साधर्म्य असलेले त्याचे कपाळ त्याच्या गवती टोपीच्या कडेखालून दिसत होते. फुगीर नाकपुड्यांचे त्यांचे देखणे सरळ नाक; त्याच्या मेण लावलेल्या लांब मिशा आणि त्याची दाढी, त्याचे गुळगुळीत गाल व उन्हाने तांबूस बनलेली त्याची मान. मला त्याचा तिटकारा वाटत होता. मला त्याची भीती वाटत होती. मला तो परका होता. पण ह्या परक्या, तिरस्करणीय पुरुषाने त्याच वेळी माझ्या मनात केवढ्या आंदोलनांना आणि केवढ्या वासनांना जाग आणली होती! त्याच्या रांगड्या, देखण्या मुखाने घेतलेल्या चुंबनांना झेलण्याची, सुरेख नसांचे जाळे असलेल्या आणि बोटांमध्ये अंगठ्या असलेल्या त्याच्या हातांच्या मिठ्यांमध्ये स्वतःला गुरफटवून घेण्याची किती दुर्दम्य इच्छा मनात उसळली होती! माझ्या-समोर अचानक खुल्या झालेल्या पापी सुखांच्या कर्दमात बेगुमान झोकून देण्याची अनावर इच्छा निर्माण झाली होती! ती न अनुभवलेली चोरटी सुखे मला खुणावीत होती.

"किती अभागी मी," माझ्या मनात आले. "खुशाल माझ्या मस्तकावर आणखी संकटं कोसळू देत!"

त्याने माझ्याभोवती एका हाताचा विळखा घातला आणि तो माझ्यावर झुकला.

"खुशाल आणि शरमेचा आणि पापांचा माझ्या मस्तकावर वर्षाव घडू दे!"

"माझं तुमच्यावर प्रेम आहे," तो कुजबुजला. त्याचा

हा आवाज अगदी माझ्या नवऱ्यासारखा होता. माझ्या नवऱ्याची आणि मुलाची मला आठवण झाली. पण एकेकाळी मला प्रिय असणारे ते जीव आता जणू अस्तित्वात नव्हते असे भासले. अचानक रस्त्याच्या वळणावरून ल. म. मला हाका मारीत असल्याचे ऐकू आले. मी भानावर आले, माझा हात झटक्यासरशी सोडवून घेतला आणि त्याच्याकडे न पाहता धावत ल. म. कडे गेले.

आम्ही बग्गीत बसलो आणि मगच केवळ मी त्याच्याकडे चोरून पाहिले. त्याने आपली टोपी काढली होती व सस्मित चेहऱ्याने तो काहीतरी बोलत होता. त्या क्षणाला मला त्याच्याबद्दल वाटणारी अमाप घृणा त्याला समजणे शक्य नव्हते.

माझे आयुष्य इतके दुःखी भासले! माझा भविष्यकाळ कमालीचा निराश वाटला आणि माझा भूतकाळ काळाकुट्ट होता! ल. म. माझ्याशी बोलत होती, पण तिचे बोलणे मला समजत नव्हते. मला असे भासले की, माझी तिला दया आली होती म्हणून, माझ्याविषयी तिला वाटणारा तिरस्कार लपविता यावा म्हणून केवळ ती बोलत होती. तिच्या प्रत्येक शब्दामधून आणि कटाक्षामधून हा तिरस्कार व अपमानास्पद करुणा मला जाणवली. त्याने माझ्या गालाचे जेथे चुंबन घेतले होते तेथे शरमेची आग जळत होती. माझ्या नवऱ्याचा आणि मुलाचा विचार मला असह्य झाला होता.

खोलीत एकटे बसून माझ्या परिस्थितीचा विचार करण्याचा माझा इरादा होता. पण एकटे राहण्याची मला भीती वाटत होती. मला आणून दिलेला चहासुद्धा न संपविता अत्यंत घाईघाईने, कोणत्याही कारणाचा विचार न करता मी

सामान भरू लागले व संध्याकाळच्या आगगाडीने माझ्या नवऱ्याकडे हायडेलबर्गला रवाना झाले.

आगगाडीच्या रिकाम्या डब्यात मी जेव्हा माझ्या मोलकरणीबरोबर चढले, आगगाडी सुरू झाली व खिडकी-मधून ताजी हवा चेहऱ्याला स्पर्शू लागली, तेव्हा मी भानावर आले आणि माझ्या भूत-भविष्याचा स्पष्ट आढावा घेऊ लागले. पीटरबुर्गला आम्ही मुक्काम हलविल्यापासूनच्या माझ्या सर्व वैवाहिक जीवनाला मी नव्या दृष्टिकोनामधून पाहिले व माझ्या सदसद्विवेकबुद्धीला खुपले. आमचा नुकताच विवाह झाला होता तेव्हाचे आमचे खेड्यातील जीवन आणि त्यावेळी आम्ही रचलेले बेत प्रथमच मला स्पष्टपणे आठवले आणि पहिल्यांदाच मी स्वतःला प्रश्न केला की, हा सारा काळ त्याला कोणते सुख मिळाले होते? मला अपराधाची भावना जाणवली. "पण त्यानं मला थोपवलं का नाही?" मी स्वतःला विचारले. "का हा ढोंगीपणा? त्यानं खुलासा का टाळला? का माझा अपमान केला? आपल्या प्रेमाची सत्ता त्यानं माझ्यावर का वापरली नाही? का त्याचं माझ्यावर प्रेमच नव्हतं?" पण त्याचा कितीही मोठा दोष असला तरी त्या दुसऱ्या पुरुषाचे चुंबन माझ्या गालावर होते व तेथे ते मला जाणवत होते. आम्ही हायडेलबर्गच्या जेवढे अधिक जवळ जात होतो तेवढा माझा नवरा मला जास्त स्पष्ट दिसत होता आणि त्याला भेटण्याच्या कल्पनेने माझी भीती वाढत चालली होती. "त्याला मी सगळं सांगून टाकीन," मनाशी मी म्हटले. "मी पश्चात्तापाचे अश्रू ढाळीन आणि तो मला क्षमा करील." पण हे "सगळं" म्हणजे

न्य ते माझे मलाच ठाऊक नव्हते किंवा तो मला क्षमा करील ह्यावर माझा विश्वास नव्हता.

पण ज्या क्षणी मी खोलीत शिरले आणि त्याचा शांत, पण तरीही आश्चर्यचकित चेहरा पाहिला, त्या क्षणी मला जाणवले की, त्याला काहीही सांगायचे नव्हते, कसलीही कबुली द्यायची नव्हती, कशाहीबद्दल क्षमा मागायची नव्हती. माझे अबोल दुःख आणि पश्चात्ताप यांना माझ्यातच बंद करून ठेवणे भाग होते.

"काय झालं असं अचानक यायला?" तो म्हणाला. "मी उद्या तुझ्याकडं यायच्या बेतात होतो." मग त्याने माझ्या चेहऱ्याकडे अधिक बारकाईने निरखून पाहिले. तो घाबरलेला दिसला. "काय झालं? काही विशेष घडलं का?" त्याने विचारले.

"काहीही नाही," अश्रू आवरण्याचा निष्फळ प्रयत्न करीत मी उत्तरले. "मी कायमची आलेय. मी रशियाला परतायला तयार आहे. तुला हवं तर अगदी उद्यासुद्धा..."

एक दीर्घ क्षण तो गप्प राहिला आणि त्याने मला लक्षपूर्वक न्याहाळले.

"पण काय घडलं ते मला सांग," तो पुन्हा म्हणाला.

मी शरमले आणि माझी नजर खाली झुकली. त्याच्या मुद्रेवर अपमान आणि संताप उमटून गेला. त्याच्या मनात कोणते विचार येऊन गेले असतील ह्या कल्पनेने मी घाबरले. कपटी वागण्याची कला मला एव्हाना अवगत झाली होती. तिचा वापर करीत मी म्हणाले:

"काहीही घडलं नाही. मला खूप कंटाळा आला, निराश वाटू लागलं आणि मी आपल्या आयुष्याबद्दल, तुझ्याबद्दल

विचार करायला सुरुवात केली. खूप काळापासून मी तुझ्याशी वाईट वागतेय. तुला जिथं जाण्याची इच्छा नाही अशा स्थळांना तू मला का घेऊन जातोस? खूप काळापासून माझं चुकतंय," मी परत म्हणाले आणि माझ्या डोळ्यांमध्ये आसवे आली. "आपण कायमचं खेड्यात रहायला परत जाऊ या!"

"माझ्या लाडके! उगीच भावनाविवश होऊ नको," तो थंडपणे म्हणाला. "तुला परत खेड्यात जायची इच्छा झाली याचा मला आनंद झाला, कारण आपल्यापाशी फारसे पैसे उरलेले नाहीत. पण तिथं राहणं हे मात्र केवळ स्वप्न आहे. तुला तिथं कधीही आवडणार नाही हे मला माहीत आहे. आता थोडा चहा पी... ती सर्वात उत्तम गोष्ट आहे," आणि नोकराला बोलाविण्यासाठी तो उठला.

त्याला माझ्याविषयी काय वाटले असावे याची मी कल्पना केली. तो माझ्याकडे काहीशा घुटमळत्या आणि शरमिंद्या नजरेने पहात असल्याचे मला आढळले तेव्हा माझ्या मनात भयंकर विचारांचा कल्लोळ उसळला. छे:! मला समजून घेणे त्याला शक्य नव्हते आणि मला समजून घेण्याची त्याची इच्छा नव्हती. माझ्या बाळाला पाहण्याचे निमित्त करून मी त्याच्या खोलीतून बाहेर पडले. एकटे राहून मला खूप खूप रडायचे होते...

९

खूप काळ रिकामे राहिलेले आणि न तापविलेले निकोल्स्कोयेमधील घर पुन्हा एकदा जिवंत झाले, पण एकेकाळी त्यात जे जीवन होते ते मात्र आता नव्हते.

[illegible] इतःपर तेथे नव्हत्या आणि आम्ही एकटेच एकत्र [illegible]. मात्र आता ह्या एकांतवासाची आम्हाला गरज भासत [illegible] उलट ते एकटेपण भारी वाटत होते. हिवाळा रखडत [illegible] होता. मी आजारी होते. केवळ माझ्या दुसऱ्या मुलाच्या [illegible]नंतरच माझी प्रकृती सुधारली. शहरात असताना [illegible] नवऱ्याबरोबर माझे जसे थंडया मैत्रीचे संबंध होते, [illegible] ते चालू राहिले. पण येथे खेडयामध्ये, तक्तपोशीची [illegible] फळी, प्रत्येक भिंत, फर्निचरचा प्रत्येक नग मला [illegible] करून देत होता की, एकेकाळी तो माझ्या दृष्टीने [illegible] महत्त्वाचा होता व मी काय गमावले होते. जणू [illegible] दरम्यान अक्षम्य जखम उभी होती. जणू तो मला [illegible]बद्दल तरी शिक्षा करीत होता व तिची जाणीव [illegible]ाचा बहाणा करीत होता. क्षमा मागण्यासारखे माझ्या- [illegible] काहीही नव्हते, दयेची याचना करण्याचे कारण नव्हते. [illegible] एकच शिक्षा मला देत होता व ती म्हणजे पूर्वीप्रमाणे [illegible] सर्वस्वाने माझा होत नव्हता. पण आपले सर्वस्व तो [illegible]लाच आणि कशालाच देत नव्हता. जणू ते इतःपर [illegible]वात नव्हते. काहीवेळा मला वाटायचे की, माझा [illegible] करण्यासाठी तो बहाणा करीत होता, जुनी भावना [illegible] त्याच्यात जिवंत होती आणि तिला जागी करण्याचा [illegible] प्रयत्न केला. पण विश्वासात घेण्याचे तो टाळीत होता. [illegible] कपटाचा त्याला संशय वाटायचा आणि भावनेचे [illegible]ही प्रदर्शन करणे वेडगळपणाचे समजून [illegible]ायचा. त्याची नजर आणि त्याचा आवाज बोलत: "मला [illegible] ठाऊक आहे, अगदी संपूर्ण माहीत आहे. तुला काय [illegible]चंय तेसुद्धा ठाऊक आहे. तू बोलशील एक आणि

वागशील दुसरं हेही मला माहीत आहे." मला विश्वासात घेण्याबद्दलची त्याची भीती पाहून आरंभी मी दुखावले. पण ती भीती नव्हती, तर अनिच्छेपायी तो मला विश्वासात घेत नव्हता, असा विचार करायची मला सवय जडली. माझे त्याच्यावर प्रेम आहे असे अचानक त्याला सांगणे, अथवा माझ्याबरोबर देवाची प्रार्थना म्हणायला त्याला सांगणे, किंवा माझे पियानोवादन ऐकायला त्याला बोलाविणे, मला एकदम शक्य नव्हते. एकमेकांशी वागताना योग्यायोग्यतेचे काही नियम आमच्यावर वर्चस्व ठेवून होते. आमच्यापैकी प्रत्येकजण आपले जीवन जगत होता. त्याची स्वतःची कामे होती व त्यांच्यात माझ्या सहभागाची गरज नव्हती. आणि त्यांच्यात सहभागी होण्याची माझीही आता इच्छा नव्हती. माझा निरुद्योगीपणा इतःपर त्याला बोचत नव्हता अथवा कष्टी करीत नव्हता. आम्हाला एकत्र आणण्याच्या दृष्टीने मुले अद्याप खूप लहान होती.

वसंत आला व कात्या आणि सोन्या उन्हाळ्यासाठी खेड्यात आल्या. निकोल्स्कोयेमधील आमच्या घराची नवी डागडुजी सुरू झाली, म्हणून आम्ही पक्रोवस्कोयेला मुक्काम हलविला. ते जुने घर तसेच उभे होते; व्हरांडा, चकचकीत दिवाणखान्यातील लांब टेबल व पियानो, खिडक्यांना पांढरे पडदे लावलेली माझी जुनी खोली; त्या खोलीत माझी बालपणची स्वप्ने जणू मी विसरून गेले होते असे भासत होते. तेथे दोन छोटे पलंग होते—त्यांपैकी एक माझा जुना पलंग होता. त्यावर कोकोशा आपले गुबगुबीत हात पसरून झोपी जायचा आणि रात्रीच्या वेळी मी त्याच्यावर क्रूसचिन्ह करायची. दुसरा छोटुकला पलंग होता व बाळलेण्यां-

मध्ये गुरफटलेला बाऱ्याचा छोटा मुखडा त्याच्यामधून डोकावायचा. त्या दोघांवर क्रूस-चिन्हे केल्यानंतर, त्या स्तब्ध खोलीच्या मध्यभागी मी थांबायची आणि अचानक सर्व कोपऱ्यांमधून, भिंतींमधून, पडद्यांमधून माझ्या यौवनातील जुनी विसरलेली दृश्ये–माझ्या अंगावर धावून यायची. माझ्या बालपणाची जुनी गाणी मी ऐकायची. माझ्या स्वप्नांचे काय झाले? त्या लाडक्या, मधुर गीतांचे काय झाले? माझी प्रत्येक आशा खरी ठरली होती. माझी अंधुक, गोंधळलेली स्वप्ने वास्तवात उतरली होती व वास्तवातील आयुष्य कष्टी, ओबडधोबड आणि आनंदहीन बनले होते. येथील प्रत्येक गोष्ट तशीच राहिली होती... खिडकीमधून मला तीच बाग दिसत होती, तीच हिरवळ, तीच रस्ता, घळीजवळचे तेच बाकडे, तळ्याजवळ गाणारे तेच बुलबुल, तीच पूर्ण उमललेली रानफुले, घरावर तोच चंद्र. पण त्याचवेळी प्रत्येक गोष्ट किती भयानकरीत्या, विश्वास न बसेल एवढी बदलून गेली होती! खूप नजीकची आणि प्रिय वाटावी अशी प्रत्येक गोष्ट किती दूरची आणि परकी भासत होती!

पूर्वीच्या दिवसांप्रमाणेच, आताही मी बैठकीच्या खोलीत कात्याबरोबर हलक्या आवाजात त्याच्याबद्दल बोलत बसते. पण कात्याच्या चेहऱ्यावर आता सुरकुत्या पडल्या आहेत आणि ती वाळलीय. तिचे डोळे इतःपर आनंदाने आणि आशेने चमकत नाहीत. उलट त्यांच्यातून कष्टी सहानुभूती व खंत बोलतात. पूर्वी आम्ही त्याच्याबद्दल बोलताना आनंदोन्मादाने बेहोष होत असू तसे आता घडत नाही. आम्ही त्याच्या वागण्याची चिकित्सा करीत आहोत. आम्ही एवढ्या सुखी का आहोत याचे इतःपर आश्चर्य वाटत नव्हते व आम्हाला

काय वाटते हे सबंध जगाला सांगण्याची आता इच्छा नाही. कारस्थान्यांप्रमाणे आम्ही एकमेकींशी कुजबुजत बसतो. गोष्टी एवढ्या दुःखजनक का बदलल्या असा प्रश्न आम्ही एकमेकींना शेकडो वेळा विचारतो. आणि तो जसा होता तसाच अजून आहे. फक्त त्याच्या भुवयांमधील रेषा अधिक खोल बनलीय, कपाळाशी त्याचे केस पांढरे झालेत आणि त्याची सखोल, शोधक नजर माझ्यापासून नेहमी लपलेली असते. मी अजून तशीच आहे, पण माझ्यात प्रेम उरलेले नाही अथवा प्रेम करण्याची इच्छाही नाही. कामाची मला गरज भासत नाही आणि स्वतःशी मी समाधानी नाही. माझा जुना भाविक उन्माद, त्याच्याबद्दलचे माझे जुने प्रेम, माझा जुना जीवनोत्साह... किती दूर गेलेला, किती अशक्य भासतो! एकेकाळी जे स्पष्ट आणि योग्य वाटत होते, दुसऱ्यांसाठी जगण्यात जो आनंद वाटत होता, त्याचे इतःपर मला आकलन होत नाही. जर स्वतःसाठीसुद्धा जगायची इच्छा नाही, तर दुसऱ्यांसाठी कशाला जगायचे?

पीटरबुर्गला गेल्यानंतर माझी संगीताची आराधना मी संपूर्ण सोडली होती, पण आता जुना पियानो व जुने संगीत मला परत आकर्षित करीत आहेत.

एके दिवशी मला बरे वाटत नव्हते आणि घरात मी एकटीच राहिले होते. बांधकाम कुठवर आले होते ते पाहण्यासाठी सोन्या व कात्या त्याच्याबरोबर निकोल्स्कोयेला गेल्या होत्या. टेबलावर चहाची तयारी मांडलेली होती. ते येण्याची वाट पाहीपर्यंत मी खालच्या मजल्यावर गेले व पियानोपाशी बसले. बीथोवनचा Quasi Una Fanfasia [कल्पनेची भरारी–अनु.] सोनाटा मी उघडला व वाजवायला आरंभ

केला. कुणीही दिसत नव्हते आणि कुणाचीही चाहूल नव्हती. बागेकडील खिडक्या उघड्या होत्या व संगीताचे परिचित, करुण स्वर खोलीत घुमले. मी पहिला अंतरा संपविला आणि अगदी अभावितपणे, केवळ सवयीपायी, जेथे तो ऐकत बसायचा त्या कोपऱ्याकडे कटाक्ष टाकला. तेथे तो नव्हता. त्याची खुर्ची कोपऱ्यात उभी होती. पूर्वी होती तशीच. सूर्यास्ताच्या पार्श्वभूमीवर रानफुलाचे झुडुप खिडकीमधून उठून दिसत होते. उघड्या खिडक्यांमधून संध्याकाळची शीतल हवा आत येत होती. मी पियानोवर माझ्या हातांचे कोपर टेकविले व पंजांमध्ये माझा चेहरा धरून विचार करू लागले. पुन्हा कधीही परत न येणाऱ्या भूतकाळाचा खेदाने विचार करीत व भविष्याचा भीत भीत विचार करीत बराच वेळपर्यंत मी तेथे बसून राहिले. पण माझ्यासमोर मला काहीच दिसत नव्हते. मला कसलीही वांच्छा उरली नव्हती, कसलीही आशा राहिली नव्हती असे मला भासले. "माझं जगून जगलंय का?" मी नवल करीत राहिले आणि विसर पडावा व विचार करू नये म्हणून डोके वर उचलून पुन्हा पियानो वाजवू लागले. परत संगीताचा तोच तुकडा मी वाजवू लागले. "देवा रे," मी सुस्कारा टाकला, "माझा दोष असेल तर मला क्षमा कर, पण पूर्वीच्या सर्व सुंदर गोष्टी मला परत दे! किंवा मी काय करायचं, कसं जगायचं त्याचं शिक्षण तरी दे!"

गवतावर चाकांचा आवाज झालेला मी ऐकला. पोर्चसमोर मग व्हरांड्यात परिचित सावध पावले वाजलेली मी ऐकली. नंतर ती पावले थांबली. पण त्या परिचित पावलांचा आवाज पूर्वीच्या भावना जाग्या करू शकला नाही. जेव्हा

मी वाजविणे थांबविले तेव्हा पावले माझ्या मागे वाजली व माझ्या खांद्यावर हात ठेवला गेला.

"हा सोनाटा ऐकायला किती छान वाटतं," तो म्हणाला.

मी गप्प राहिले.

"चहा घेतलास?"

त्याच्याकडे न पाहताच मी मान हलविली. माझ्या चेहऱ्यावर उमटलेले भाव त्याला दिसू नयेत अशी माझी इच्छा होती.

"आत्ता एका मिनिटात त्या इथं येतील. घोडा नाठाळपणा करायला लागला म्हणून त्या खाली उतरल्या आणि जवळच्या वाटेनं येत आहेत," तो म्हणाला.

"आपण त्यांच्यासाठी थांबू," मी म्हणाले आणि बाहेर व्हरांड्यात गेले. माझ्या पाठोपाठ तो येईल अशी अपेक्षा होती. पण त्याने फक्त मुलांची चौकशी केली व तो त्यांच्याकडे गेला. त्याचे अस्तित्व, त्याचा प्रेमळ, अकृत्रिम आवाज, ह्यांनी मला पुन्हा एकदा सांगितले की मी काहीतरी गमावले होते ही माझी गैरसमजूत होती. आणखी कशाची अपेक्षा मी धरायची? तो सज्जन आणि प्रेमळ होता, चांगला नवरा आणि चांगला बाप होता... याहून जास्त मी काय मागणार? मी व्हरांड्यात गेले आणि छताखाली बाकड्यावर बसले. त्याचे माझ्यावरचे प्रेम त्याने प्रथम व्यक्त केले होते तेव्हा मी याच बाकड्यावर बसले होते. सूर्य मावळला होता आणि अंधार पडू लागला होता. घरावर आणि बागेवर एक काळा मेघ ओठंगला होता. फक्त झाडांच्या पलिकडे आकाशाचा निरभ्र पट्टा दिसत होता. तेथे मावळतीचे रंग उमटले होते आणि शुक्राची चांदणी उगवली होती. मेघाची छाया प्रत्येक गोष्टीवर पसरली होती व प्रत्येक गोष्ट हलक्या

—गोची वाट पहात होती. वारा पडला होता. एकही पान — गवताचे पाते हलत नव्हते. रानफुलांचा आणि काळ्या —नींचा वातावरणात घमघमाट सुटला होता. तो वास बागेत आणि व्हरांड्यात भरला होता. क्षणात त्याचा भपका येई — क्षणात मंद गंध येई. डोळे मिटावे, काहीही पाहू नये, —ाहीही ऐकू नये व फक्त हा मधुर वास प्यावा असे वाटत —े. अद्याप न उमललेले डेलिया आणि गुलाब सावकाश- —े त्यांच्या काळ्या ताटव्यांवर चढत असल्याचे भासत होते. —ळीमध्ये बेडकांची जोरात व कर्कश्यपणे डरांव डरांव चालली —ी. पावसाने त्यांना पाण्यात लोटून देण्यापूर्वी जणू ते —टच्या टाहो फोडत होते. ह्या गोंगाटात एक उंच, पातळ —र उमटत होता. बुलबुल पक्षी इकडून तिकडे उडत्या —ताना एकमेकांना अधीरपणे साद घालीत होते. या वसंता- —ये पुन्हा एकदा एका बुलबुलाने खिडकीखालच्या झुडुपात —री करायचे ठरविले होते. पण मी बाहेर गेले तेव्हा —चा आवाज गल्लीमधून येत असलेला ऐकला. त्याने एक —ळ मारली व तोही वाट पहात गप्प बसला.

—गीत्रच मी स्वतःची समजूत घातली: मीही कशाची —ी वाट पहात होते आणि खंत करीत होते.

—ो खाली आला आणि माझ्या शेजारी बसला.

"आपल्या पोरी भिजणार बहुधा," तो म्हणाला.

"हं." मी पुटपुटले आणि पुन्हा आम्ही खूप वेळपर्यंत — बसलो.

—रा नव्हता व मेघ खाली खाली येत होते. सर्वत्र —धना पसरली आणि सुवास दाटला. एकदम कॅन्व्हासच्या —वर पावसाचा एक थेंब कोसळला आणि तो घरंगळल्या-

सारखे भासले. दुसरा थेंब पाऊलवाटेच्या खडीवर पडला. काटेरी झुडुपांच्या रुंद पानांवर काही मोठ्या थेंबांचा शिडकावा झाला आणि मग ताज्या पावसाने हळू हळू जोर धरला. बुलबुल आणि बेडके एकदम गप्प झाली. फक्त एक कर्कश्य आवाज अजून हवेत उमटत होता. पावसामुळे तो अधिक दूर भासत होता. व्हरांड्यापाशी सुकलेल्या पानां-मध्ये लपलेला एक पक्षी नियमितपणे दोन एकसुरी आवाज काढीत होता. तो उठला आणि आत जायला निघाला.

"कुठं चाललास?" त्याला थांबवीत मी विचारले. "इथं किती छान वाटतंय."

"त्यांच्यासाठी छत्री आणि रबरी बूट पाठवून दिले पाहिजेत मला," तो उत्तरला.

"त्यांना त्याची गरज नाही... एका मिनिटात संपेल पाऊस."

त्याने माझे म्हणणे मान्य केले व व्हरांड्याच्या कठड्या-पाशी आम्ही एकत्र थांबलो. ओल्या, निसरड्या कठड्याशी मी हातावर रेलले आणि कॅन्व्हासखालून डोके बाहेर काढले. माझ्या केसांवर आणि मानेवर थंड पावसाचा शिडकावा बसला. आमच्यावरील छोट्या मेघाने वृष्टी केल्यामुळे तो विरळ आणि पांढुरका बनला. पावसाची झड संपली व आकाशातून आणि पानांवरून विरळ थेंब पडू लागले. पुन्हा बेडकांची डरांव डरांव सुरू झाली, पुन्हा बुलबुलांनी धीर करून एकमेकांना साद घालायला आरंभ केला. आमच्या भोवती सर्वत्र उजाडले.

"किती छान आहे नाही?" कठड्यावर बसत आणि

ज्ञ्या ओल्या केसांवरून हात फिरवत तो म्हणाला.
त्या माध्या कुरवाळण्याने मला दूषणासारखे वाटले आणि त्याच्याची मला अनावर इच्छा झाली.

"माणसाला आणखी काय हवं असतं?" त्याने विचारले. आता मी खूप समाधानी आहे... मला आणखी काहीही नको. मी पूर्ण सुखी आहे!"

"सुखाबद्दल पूर्वी तू असं म्हणत नसे," मी स्वतःशी म्हणाले. "तू म्हणायचास, सुख कितीही मोठं असलं तरी आणखी काहीतरी हवंसं वाटतं. आता तू शांत आणि समाधानी आहेस, पण माझं काळीज अबोल पश्चात्तापानं आणि न सांडलेल्या अश्रूंनी गच्च भरलंय." मात्र प्रत्यक्षात मी म्हणाले :

"मीसुद्धा समाधानी आहे, पण असं समाधान मला दुःखी करतं. माझ्या अंतरात खूप गोंधळ माजलाय, खूप अपुरेपणा जाणवतोय. इथं सर्व काही सुंदर आणि निवांतपणानं भरलेलं असूनही मला सदैव कशाची तरी आस लागते. काहीतरी मिळवण्याची इच्छा असावी आणि निघून गेलेल्या एखाद्या गोष्टीबद्दल खिन्न वाटावं, अशी विषण्ण सुखाची भावना निसर्गानं तुझ्या मनात कधी जागी केली नाही?"

त्याने माझ्या डोक्यावरील हात बाजूला काढला आणि क्षणभर तो गप्प बसला.

"असं वाटायचं पूर्वी, विशेषतः वसंताच्या मोसमात," जणू काही कसलीतरी आठवण झाल्याप्रमाणे तो म्हणाला. "मलाही रात्री झोप लागत नसे... कशाची तरी वाट पहात, आशा करीत बसायचा... त्या रात्री फार सुंदर होत्या! पण तेव्हा सर्व काही माझ्या पुढं होतं आणि आता

सर्व काही मागं आहे. आता माझ्यापाशी जे आहे त्यात मी समाधानी आणि तुष्ट आहे." त्याने एवढ्या निष्काळजीपणे आणि विश्वासाने आपले बोलणे संपविले की, जरी त्याचे शब्द ऐकताना मला वाईट वाटले होते, तरी तो खरे बोलत होता यावर माझा विश्वास बसला.

"तुला आता कशाचीही इच्छा नाही?" मी विचारले.

"अशक्य अशा कोणत्याही गोष्टीची नाही," मला काय वाटले होते त्याचा तर्क करून तो उत्तरला. "तुझं डोकं भिजतंय," तो पुढे म्हणाला आणि पुन्हा माझ्या केसांवरून त्याने हात फिरविला. जणू मी लहान मूल होते अशा रीतीने तो मला कुरवाळीत होता. "पावसात भिजणाऱ्या पानांचा आणि गवताचा तुझा मत्सर वाटतो... तुला पानं व्हावं, गवत व्हावं, पाऊस व्हावं असं वाटतं! पण मला केवळ त्यांच्याकडं पाहून समाधान लाभतं! प्रत्येक तरुण, सुंदर आणि आनंदी गोष्टीकडं पाहून वाटतं तसंच!"

"आणि भूतकाळातल्या कशाहीबद्दल तुला खंत वाटत नाही?" मी विचारीत राहिले. माझे अंतःकरण अधिकाधिक जड होत चालले होते.

त्याने क्षणभर विचार केला. अत्यंत प्रामाणिकपणे उत्तर देण्याची त्याची इच्छा मला दिसली.

"नाही," तुटकपणे तो म्हणाला.

"हे खरं नाही! मुळीच खरं नाही!" मी उद्गारले आणि वळून त्याच्या डोळ्यांमध्ये पाहिले. "आपण जे गमावलं त्याचा तुला खेद होत नाही?"

"नाही," तो पुन्हा म्हणाला. "मला भूतकाळाबद्दल कृतज्ञता वाटते, दुःख नाही!"

"पण तो परतावा अशी तुला इच्छा होत नाही?" मी चिकाटीने विचारले.

त्याने मान फिरविली व बागेकडे टक लावून तो पाहू लागला.

"मला पंख असावेत अशी मी इतःपर इच्छा धरत नाही," तो म्हणाला. "ते अशक्य आहे."

"आणि भूतकाळात तुला कधी दोष शोधावेसे वाटत नाहीत? तुझा किंवा माझा अपराध होता असं कधी वाटत नाही?"

"कधीही नाही. सर्व काही उत्तमाकरताच घडलं!"

"हे बघ," माझ्याकडे त्याने पहावे म्हणून त्याच्या हाताला स्पर्श करीत मी म्हणाले. "तुला योग्य वाटत होतं तसं मी जगावं असं तू कधीही का सांगितलं नाहीस मला? ज्या स्वातंत्र्याचा कसा उपयोग करायचा हे मला माहीत नव्हतं असं स्वातंत्र्य तू मला का दिलंस? मला शिकवणं का थांबवलंस? जर तुझी इच्छा असती... जर तू मला मार्ग-दर्शन केलं असतंस... तर काहीही घडलं नसतं, काहीही झालं नसतं!" थंड्या चिडीमुळे आणि तिरस्कारामुळे माझा आवाज चढला. जुन्या प्रेमामुळे नव्हे.

"काय घडलं नसतं?" माझ्याकडे गर्रकन वळून त्याने चकित सुरात विचारले. "अद्याप तसं काहीच घडलेलं नाही. सर्व काही छान आहे... खूप छान आहे," स्मित करीत तो पुढे म्हणाला.

"हा मला समजून घेत नाही असं तर नाही ना," माझ्या मनात आले, "अथवा सर्वांत वाईट म्हणजे मला समजून घेऊ इच्छित नाही?" माझे डोळे अश्रूंनी डबडबले.

"तुझ्या उदासीन वागण्यानं, तुझ्या तिरस्कार दाखवण्यानं मला नेहमी शिक्षा भोगावी लागली नसती. वस्तुतः मला दोषी ठरवायला तुझ्यापाशी काही एक कारण नाही," मी उसळून बोलू लागले. "मी पूर्ण निर्दोषी असूनही माझं सारं प्रेयस तू हिरावून घेतलंस. एरवी तसं घडलं नसतं."

"अरेच्चा, तू काय बोलते आहेस लाडके?" जणू काही माझ्या बोलण्याचा आशय समजला नाही अशा थाटात तो म्हणाला.

"मला अडवू नकोस. सारं बोलून टाकू दे मला. तुझा विश्वास, तुझं प्रेम, तुझा आदर तू माझ्यापासून हिरावून घेतलास. तुझं माझ्यावर प्रेम आहे असा इतःपर मला विश्वास वाटत नाही. थांब, खूप दिवसांपासून मला छळणाऱ्या सर्व गोष्टी मला बोलून टाकू दे," तो पुन्हा बोलण्याचा प्रयत्न करू लागला तेव्हा मी म्हणाले. "आयुष्य मला माहीत नव्हतं आणि मला एकटीला आयुष्य शिकायला तू मुभा दिलीस हा माझा दोष होता का? मला काय हवं ते आता समजल्यानंतर, जवळ जवळ वर्षभर हरतऱ्हेनं मी तुझ्यापाशी परत यायचा प्रयत्न करत असताना, तू मला दूर लोटतोस, जणू काही मला काय हवं होतं ते तुला माहीत नव्हतं, हाही माझा अपराध काय? आणि तू अशा रीतीनं सारं करतोस की, त्याचा राग करणं अशक्य ठरतं. फक्त मी अपराधी आणि दुःखी ठरते. तुझा आणि माझा पूर्ण विनाश व्हावा अशा आयुष्यात तू मला परत फेकू पहात आहेस."

"असं तुला का वाटतं?" खरोखरीच चकित होत घाबरून त्याने विचारले.

"इथं मी कधीही राहू शकणार नाही हे केवळ कालच तू बोलला नाहीस का? आणि मला न आवडणाऱ्या पीटर-वर्गला हिवाळ्यात आपल्याला जावं लागणार असं तूच सतत म्हणत नाहीस का? मला मदत करण्याचं बाजूलाच राहिलं, उलट तू कधीही मला विश्वासात घेत नाहीस, कधीही माझ्याशी कळकळीनं आणि प्रेमानं एक शब्द बोलत नाहीस. आणि माझा जेव्हा पूर्ण अधःपात होईल, तेव्हा तू मला दूषण देशील आणि मी खाली कोसळले ह्याचा तुला आनंद होईल."

"थांब," तो कठोरपणे आणि थंडपणे म्हणाला. "आत्ता तू जे काही बोलते आहेस ते अगदी चुकीचं आहे. त्यावरून एवढंच दिसतं की, माझ्याविषयी तुझा वाईट ग्रह करून घेतला आहेस आणि तुझं..."

"आणि माझं तुझ्यावर प्रेम नाही? म्हण! म्हण!" माझे बोलणे संपले आणि मला रडू कोसळले. मी बाकावर बसले आणि माझ्या हातरुमालाने चेहरा झाकून घेतला.

"माझी ही परीक्षा केली ह्यानं!" माझ्या मनात आले आणि मला घुसमटून टाकणारा हुंदका आवरण्याचा मी प्रयत्न केला. "आमचं प्रेम संपलं, कायमचं दूर निघून गेलं," कुठूनतरी एक आवाज मला सतत सांगत होता. तो माझ्या-जवळ आला नाही. माझे सांत्वन करण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. माझ्या बोलण्याचा त्याला अपमान वाटला होता. त्याचा आवाज शांत आणि थंड होता.

"माझ्यावर कशाबद्दल तू ठपका देते आहेस मला माहीत नाही," तो बोलू लागला. "जर मी तुझ्यावर प्रेम करत नाही जसा पूर्वी करायचा..."

"जसा पूर्वी करायचा!" मी रुमालात पुटपुटले आणि दु:खाश्रूंच्या सरी वेगाने कोसळू लागल्या.

"...तर तो काळाचा आणि आपला स्वत:चा दोष आहे. प्रत्येक काळात प्रेमाचा एक प्रकार असतो." तो थांबला. "तुला मी पूर्ण सत्य सांगू? सरळपणाचा तू जर आग्रहच धरतेस तर... तुला प्रथम भेटलो त्या वर्षी जसा तुझ्याबद्दल-च्या विचारांनी आणि माझ्या मनात सतत वाढत गेलेल्य प्रेमामुळं मी रात्र रात्र झोपू शकत नव्हतो, त्याचप्रमाणं पीटरबुर्गमध्ये आणि परदेशी असताना, मला छळणाऱ्या त्या प्रेमाचा मी मोडूनतोडून नाश केल्यानंतरही रात्रीमागून रात्री मी झोपेविना तळमळून काढल्या. मी प्रेमाचा नाश नाही केला. मला जे छळत होतं त्याचाच तेवढा नाश केला. मला शांतता लाभली आणि मी अजूनही तुझ्यावर प्रेम करतो. फक्त त्याची तऱ्हा वेगळी आहे."

"तू त्याला प्रेम म्हणतोस, पण तो निव्वळ छळवाद आहे," मी पुटपुटले. "बड्या लोकांच्या सहवासात तू मला का रहायला दिलंस? तुला ते एवढं अपायकारक वाटलं की, त्या कारणावरून तू माझ्यावर प्रेम करायचा थांबलास?"

"समाज कारण नाही लाडके."

"तुझी सत्ता माझ्यावर का वापरली नाहीस? मी पुढे बोलत राहिले. "मला बांधून का ठेवलं नाहीस? ठार का मारलं नाहीस? मला सुखी करणाऱ्या सगळ्या गोष्टींपासून वंचित करण्यापेक्षा ते जास्त चांगलं ठरलं असतं! मी समाधानी राहिले असते आणि मला लाज वाटली नसती."

पुन्हा मी हुंदके देऊ लागले व माझा चेहरा मी झाकून घेतला.

नेमक्या त्याच क्षणाला पावसात भिजलेल्या कात्या आणि ल्या धावत-पळत व्हरांड्यात आल्या. त्या मोठमोठ्याने बोलत. खिदळत येत होत्या. पण आम्हाला पाहताच एक कुणीही न बोलता त्या घरात पळाल्या.

त्या गेल्यानंतर बराच वेळपर्यंत आम्ही मुकाट बसून राहिलो. मी खूप रडून घेतले आणि मला हलके वाटले. त्याच्याकडे मी कटाक्ष टाकला. आपल्या हातांमध्ये डोके धरून तो बसला होता. माझ्या दृष्टिक्षेपाला उत्तर म्हणून त्याला काहीतरी बोलायचे होते, पण त्याने एक मोठा सुस्कारा टाकला आणि परत डोके हातांमध्ये खुपसले.

मी त्याच्यापाशी गेले आणि त्याचा हात बाजूला ओढला. त्याने खिन्नपणे माझ्याकडे पाहिले.

"खरंच," जणू आपली विचारधारा पुढे नेत तो म्हणाला. खऱ्या जीवनाचा शोध लागेपर्यंत आपणा सर्वांना, विशेषत: तुम्हा बायकांना, आयुष्याच्या खोटेपणांमधून जावं लागतं. आणि दुसऱ्याच्या अनुभवावरून आपल्यापैकी कुणाचंही भलं होत नाही. ह्या मोहक बेगडी आयुष्याला तू पुरतेपणी अनुभवलेलं नव्हतंस जेव्हा मी तुझ्या प्रेमात पडलो होतो; आणि त्या जीवनाला तुला एकटीला अनुभवायला मी मोकळं सोडलं कारण तुला थोपवून धरायचा मला अधिकार नव्हता असं वाटलं. वस्तुत: माझ्या स्वत:च्या दृष्टीनं तसलं जीवन जगण्याची वेळ केव्हाच निघून गेली होती."

"जर तू माझ्यावर प्रेम करतोस तर त्या बेगडी आयुष्यात तू माझ्याबरोबर का राहिलास आणि मला तसं जगायला का दिलंस?" मी विचारले.

"कारण तुझी कितीही इच्छा असती तरी तुझा माझ्या

शब्दावर विश्वास बसला नसता. तुला स्वतःला अनुभवानं खात्री पटवून घ्यायची होती आणि तसंच तू केलंस."

"तू सारासार विचार फार करत बसलास, पण प्रेम फार कमी केलंस," मी म्हणाले.

पुन्हा आम्ही गप्प झालो.

"आत्ता तू जे म्हणालीस ते दुष्टपणाचं होतं, पण खरं होतं," तो म्हणाला आणि एकदम उठून व्हरांड्यात फेऱ्या मारू लागला. "होय, ते सत्य होतं. माझीच चूक होती," माझ्यापुढे थांबत तो म्हणाला. "एक तर मी स्वतःला तुझ्यावर प्रेम करायची परवानगी द्यायला नको होती, किंवा तुझ्यावर मी अधिक साधेपणानं प्रेम करायला हवं होतं."

"विसरून जाऊ या सगळं," मी भीत भीत म्हटले.

"नाही. जे घडलं ते मागं फिरवता येत नाही, कधीही नाही," असे बोलताना त्याचा आवाज खूप स्निग्ध बनला.

"सगळं एव्हाना मागं फिरलंय," त्याच्या खांद्यावर हात ठेवीत मी म्हणाले.

त्याने माझा हात आपल्या हाती घेऊन हळूच दाबला.

"मला काहीही खंती नाहीत असं मी सांगितलं ते खरं नव्हतं. भूतकाळाची मला खंत आहे. जे प्रेम मेलं आणि पुन्हा कधीही जिवंत करता येणार नाही, त्याचं मला दुःख होतं. कुणाचा दोष हा? मला माहीत नाही. प्रेम राहिलंय, पण एकेकाळी होतं ते नव्हे. प्रेमाची जागा राहिलीय, पण खुद्द प्रेम कसल्यातरी आजारातून गेलं... त्याच्यात कसलीही ताकद किंवा शक्ती उरली नाही. आठवणी आणि कृतज्ञता उरल्यात, पण..."

"असं बोलू नकोस," मी अडविले. "पूर्वी जसं होतं

...च मगळं होईल. शक्य आहे तसं घडणं, होय ना?"
...च्या डोळयांमध्ये पहात मी विचारले. पण त्याचे डोळे नितळ
...णि शांत होते. माझ्या डोळयांमध्ये त्यांनी खोलवर पाहिले नाही.

आणि बोलत असताना मला जाणवले की, ज्याची मी
...च्छा धरीत होते आणि त्याच्यापाशी मागणी करीत होते
... अशक्य होते. तो शांतपणे आणि प्रेमळपणे स्मित करीत
...ता. एका वृद्ध माणसाचे ते स्मित होते असे मला भासले.

"तू कितीतरी तरुण आहेस, पण मी खूप म्हातारा
...लोय!" तो म्हणाला. "तुला जे हवंय ते इतःपर माझ्यात
...ही... कशाला स्वतःची फसवणूक करायची?" तसेच
...स्मित ठेवीत तो पुढे म्हणाला.

मी त्याच्याशेजारी मुकाट उभी राहिले आणि मला काळ-
...जात खूप हलके हलके वाटत होते.

"जे निघून गेलंय ते परत आणण्याचा आपण प्रयत्न
...रायचा नाही," तो परत बोलू लागला. "आपण स्वतःशी
...तारणा करायची नाही. आणि पूर्वीची चिंता आणि पूर्वीची
...हुर इतःपर नसली तर त्याबद्दल आपण आभारच मानले
...हिजेत! आपल्याला काहीही धुंडाळायचं नाही, काहीही
...पल्याला विचलित करायचं नाही. आपल्याला सुखाचा
...धूर वाटा लाभला. आता आपण बाजूला होऊन त्याला
... मोकळी करून देण्याची वेळ आलीय," तो म्हणाला
...णि दारात थांबलेल्या दाईच्या कडेवरील वान्याकडे त्याने
... दाखविले. "लाडके, तर असं आहे," बोलणे संपवीत
... खाली झुकला आणि माझ्या मस्तकाचे त्याने चुंबन घेतले.
... चुंबन एका प्रेमिकाचे नव्हते, तर जुन्या स्नेह्याचे होते.

...गेमधून रात्रीचा गंध अधिक जोराने आणि मधुरपणे

दरवळत होता. आवाज आणि शांतता यांना अधिक गांभिर्य प्राप्त झाले होते. ताऱ्यांचा प्रकाश अधिक तेजस्वी बनला होता. मी त्याच्याकडे पाहिले आणि एकदम मला काळजात हलके वाटले. जणू दुखरी नस काढून टाकली होती. त्यावेळचे प्रेम कायमचे निघून गेले होते ह्याची मला स्पष्ट आणि शांत जाणीव झाली. त्या प्रेमाचे पुनरुज्जीवन करणे तर शक्य नव्हतेच, उलट तसे करणे अत्यंत पीडादायी व अवघड झाले असते. आणि त्यावेळी खूप सुखाचा वाटलेला तो काळ खरोखरीच एवढा सुरेख होता का? हे सगळे घडले त्याला किती किती काळ लोटून गेला होता! ...

"आपण चहा विसरूनच गेलो," तो म्हणाला आणि आम्ही एकत्र बैठकीच्या खोलीत गेलो. दारामध्ये आम्हाला परत दाईच्या कडेवर बसलेला वान्या भेटला. मी बाळाला घेतले, त्याची उघडी गुलाबी पावले झाकली, त्याला छातीशी घट्ट धरले आणि माझ्या ओठांचा ओझरता स्पर्श करीत त्याचे चुंबन घेतले. झोपेत असल्याप्रमाणे त्याने आपल्या बाळमुठींची उघडझाप केली आणि जणू काही पाहण्यासाठी अथवा काहीतरी आठवण्यासाठी आपले पेंगुळले डोळे उघडले. अचानक ते डोळे माझ्यावर स्थिरावले आणि त्यांच्यात चमक उमटली. त्याच्या ओठांवर स्मित झळकले. "माझा! सर्वस्वी माझा!" माझ्या मनात आले आणि माझ्या सर्व अवयवांमध्ये सुख दाटून आले. चटकन मी त्याला स्तनांशी आवळून धरले. त्याला दुखू नये म्हणून मला स्वतःचा भावनावेग आवरावा लागला. त्याच्या छोटुकल्या थंड पावलांची, त्याच्या पोटाची आणि हातांची, त्याच्या जावळाने भरलेल्या डोक्याची मी भराभरा चुंबने घेऊ लागले. माझ्यापाशी माझा नवरा

आला. मी पटकन बाळाचे तोंड झाकले आणि परत उघडले.

"इवान सेर्गेइच!" आपल्या बोटाने बाळाच्या हनुवटीला स्पर्श करीत माझा नवरा म्हणाला. पण परत मी झटकन इवान सेर्गेइचला झाकले. माझ्याशिवाय कुणालाही जास्त वेळपर्यंत त्याला बघायला मिळू नये. मी नवऱ्याकडे पाहिले. तो माझ्याकडे हसऱ्या डोळयांनी पहात होता. त्याच्या डोळयांकडे टक लावून पाहताना बऱ्याच काळानंतर प्रथमच मला आनंद जाणवला आणि काळजात हलके वाटले.

त्या दिवशी माझ्या नवऱ्याबरोबरचा माझा प्रणय संपला. माझे जुने प्रेम म्हणजे जी गोष्ट पुन्हा कधीही परतणार नाही अशी एक लाडकी आठवण बनले. पण माझ्या मुलांविषयी आणि माझ्या मुलांच्या बापाविषयी एक नवी प्रेमभावना निर्माण झाली. ह्या नव्या प्रेमभावनेने आणखी एका सुखी जीवनाच्या आरंभाची ग्वाही दिली, पण हे जीवन अगदी वेगळे होते आणि अगदी आजतागायत ह्या सुखी जीवनाची समाप्ती झालेली नाही...

१८५९

# एका घोड्याची कहाणी

मि. आ. स्ताखोविच यांच्या
स्मृतीला अर्पण*

## प्रकरण एक

प्रकाश वर वर चढत होता, सूर्याची किरणे विस्तारत चालली होती, काळसर रुपेरी धुके पांढुरके चमकू लागले होते, चंद्राची कोर अधिक फिकट बनू लागली होती, जंगलात किलबिल वाढली होती, माणसांची वर्दळ सुरू झाली होती आणि जहागीरदाराच्या वाड्याच्या तबेल्यात वाळल्या गवतावर टापांची चाळवाचाळव व फुरफुर आवाज सतत ऐकू येऊ लागले होते. घोडे एकमेकांना रेटू लागले होते, अधूनमधून कर्कश्य खिंकाळत होते.

"अरे हो हो! भरपूर वेळ आहे! एवढ्यात भूक लागली!" करकरणारे फाटक उघडत घोड्यांच्या कळपाचा

---

*प्रस्तुत गोष्टीचा विषय प्रथम मि. आ. स्ताखोविच यांना सुचला होता—सं.

म्हातारा राखणदार म्हणाला. "मार्ग व्हा!" एक घोडी फाटकाकडे झेपावली तेव्हा हात उडवीत तो ओरडला.

राखणदार नेस्तरने कझाकी पोषाख केला होता. त्याच्या चामडी कमरपट्ट्यात अनेक उपकरणे लटकावलेली होती. त्याने आपल्या खांद्यावर चाबूक टाकला होता आणि रुमालात बांधलेला पाव कमरपट्ट्यात खोवला होता. आपल्याबरोबर त्याने खोगीर व लगाम आणले होते.

राखणदाराच्या उपहासात्मक स्वराने घोडे ना घाबरले ना अपमानीत झाले. आपल्याला जणू पर्वा नाही असा बहाणा करून फाटकापासून बेफिकीरपणे ते दूर सरले. फक्त भरपूर आयाळीची उदी रंगाची एक म्हातारी घोडी आपल्या कानांची घडी घालून पटकन मागे वळली. त्यासरशी, तिच्या मागेच उभ्या असलेल्या एका तरुण घोडीने निष्कारण खिंकाळून जवळ आलेल्या पहिल्याच घोड्यावर मागच्या पायांनी लाथ झाडली.

"हो-हो!" राखणदार अधिक मोठ्यांदा आणि जास्त दटावणीच्या सुरात ओरडला व आवाराच्या दुसऱ्या टोकाकडे निघाला.

त्या कुंपणामधील सर्व घोड्यांपैकी (तेथे सुमारे शंभर घोडे होते) फक्त एक घोडा मुळीच अधीरपणा न दाखविता उभा होता. पडवीच्या ओकच्या लाकडी खांबाला चाटीत, डोळे अर्धवट मिटून तो कबरा, खसी केलेला घोडा शांतपणे उभा होता. त्या खांबाची चव कशी होती हे सांगणे अवघड आहे, पण तो खांब चाटताना कबरा घोडा अत्यंत गंभीर आणि कष्टी दिसत होता.

"पुन्हा वात्रटपणा केलास ना?" राखणदार त्या घोड्या-

पाशी येत पूर्वीच्याच सुरात म्हणाला आणि खताच्या ढिगावर त्याने खोगीर व खोगीरावरचे गुळगुळीत कापड ठेवले.

कबरा, खसी केलेला घोडा खांब चाटायचा थांबला आणि एक स्नायू न हलविता नेस्तरकडे एकटक पहात राहिला. तो घोडा खिदळला नाही, त्याने कपाळाला आठ्या घातल्या नाही, त्याला राग आला नाही, पण काही सेकंदांच्या अवधीनंतर त्याच्या पोटावर शहारा उमटून गेला. त्याने एक दीर्घ उसासा टाकला व मान वळविली. राखणदाराने त्याच्या मानेला आपल्या हाताचा विळखा घातला व लगाम चढविला.

"उसासे कशाला टाकतोस?" नेस्तरने घोड्याला विचारले.

खसी घोड्याने शेपटीला हलकासा झटका दिला. जणू त्याला म्हणायचे होते: "तसं काही विशेष नाही नेस्तर!" राखणदाराने घोड्याच्या पाठीवर खोगीर आणि खोगीरावरचे कापड टाकले. आपली नापसंती व्यक्त करायला खसी घोड्याने कान टवकारले, पण त्याबद्दल त्याला मूर्खपणाचे विशेषण बहाल झाले. जेव्हा पट्टा आवळला गेला तेव्हा खसी घोड्याने पट्ट्याला प्रतिबंध करण्यासाठी उसळी मारली, पण प्रथम त्याच्या तोंडात लगाम खुपसला गेला आणि पोटात राखणदाराच्या ढोपराची ढुशी बसताच घोड्याचा दम तुटला. तरीही, नेस्तर जेव्हा आपल्या दातांनी पट्टा खेचत होता तेव्हा खसी घोड्याने परत आपले कान मागे टवकारून भोवती वळून पाहण्याचे धाडस दाखविले. असे वागून आपले भले होणार नाही याची घोड्याला जाणीव होती, पण नेस्तरला आपली नापसंती समजावी अशी त्याची इच्छा होती व आपली नापसंती लपविण्याचा त्याचा मुळीच इरादा नव्हता.

त्याच्यावर खोगीर चढवून झाल्यानंतर, आपला उजवा सुजलेला पाय त्याने ढिला सोडला व लगाम चघळू लागला. वस्तुत: म्हाताऱ्याला त्याला समजायला हवे होते की, लगामाएवढी बेचव वस्तू दुसरी कोणतीही नव्हती.

आखूड रिकीबीत एक पाय अडकवून नेस्तर घोड्याच्या पाठीवर स्वार झाला, त्याने आपला चाबूक मोकळा सोडला, गुडघ्यांखाली अडकलेला कोट वर खेचला व बग्गीवाले, कोल्ह्यांची शिकार करणारे आणि घोड्यांच्या कळपांचे राखणदार ज्या विशिष्ट ढबीने घोड्यावर बसतात तसे बसून लगाम खेचले. खसी घोड्याने डोके वर करून आज्ञेप्रमाणे कुठेही जायची तयारी असल्याची खूण दिली, पण तो जागचा हलला मात्र नाही. त्याला माहीत होते की, जाण्यापूर्वी त्याचा स्वार मोठमोठ्यांदा ओरडून दुसऱ्या राखणदाराला, वास्काला आणि इतर घोड्यांनाही हुकुमांची फैरच्या फैर देईल. आणि खरेच नेस्तरने ओरडायला आरंभ केला.

"वास्का!" त्याने हाक मारली. "अरे ए वास्का! घोड्या मोकळ्या सोडल्यास? अरे हरामखोरा, कुठं आहेस तू? झोपलायस? फाटक उघड! पहिल्यांदा घोड्या बाहेर जाऊं देत." अशाच प्रकारच्या आणखी बऱ्याच गोष्टी नेस्तर ओरडत राहिला. फाटक करकरले. चिडलेला आणि अजून झोपेत असलेला वास्का फाटकापाशी एका घोड्याचा लगाम धरून उभा होता आणि इतर घोड्यांना बाहेर सोडत होता. गवतावर सावध पावले टाकीत आणि हुंगत घोडे एकामागोमाग एक बाहेर जात होते. शिंग्या, एक वर्षाची तट्टे, दूधपिती शिंगरे, आपल्या मोठ्या पोटांची चिंता बाळगणाऱ्या गर्भार, अवघडलेल्या घोड्या — एकेकांच्या रांगेने फाटकाबाहेर जात होत्या.

तरुण घोड्या दोन-दोन तीन-तीनच्या रांगांनी पुढे घुसत होत्या, एकमेकींच्या पाठींवर आपली डोकी टाकीत होत्या आणि घाईघाईमध्ये जाताना त्यांचे पाय घसरत होते. अशा वागण्या-बद्दल त्यांना राखणदारांच्या शिव्या खाव्या लागत होत्या. दूध पिणारी शिंगरे परक्या घोड्यांच्या पायांमध्येसुद्धा शिरत होती आणि मोठ्या घोड्यांच्या खिंकाळण्यांना आपल्या कर्कश्य खिंकाळ्यांनी प्रतिसाद देत होती.

एका खट्याळ तरुण शिंगीने फाटकाबाहेर पडताच डोके खाली-वर हलविले, मागचे पाय हवेत उडविले आणि बारीक चीत्कार काढले, पण म्हाताऱ्या, करड्या रंगाच्या झूल्दीबा घोडीच्या पुढे जाण्याची मात्र तिची हिंमत झाली नाही. झूल्दीबा नेहमी सर्व घोड्यांच्या अग्रभागी मंद, भारी, डौलदार चालीने जायची. चालताना तिचे मोठे पोट इकडून तिकडे झुलायचे.

आत्ता आत्तापर्यंत गजबजलेले आणि दाटी झालेले ते कुंपण अवघ्या काही मिनिटात रिकामे झाले. पडवीला आधार देणारे खांब भकास आणि एकाकी दिसू लागले. तुडविल्या गेलेल्या, लीदीने माखलेल्या वाळल्या गवताविना दुसरे काहीही दिसत नव्हते. कबऱ्या, खसी घोड्याला ह्या दृश्याची सवय झाली होती, तरीही त्याचा त्याच्यावर खिन्न परिणाम झाल्याचे भासले. जणू कुणालातरी मान डोलवून दाखवावी तसे त्याने सावकाशपणे डोके वर-खाली केले, पट्ट्याच्या बंधनातून शक्य होता तेवढा खोल निःश्वास टाकला व म्हाताऱ्या नेस्तरला आपल्या हडकुळ्या पाठीवर घेऊन कळपाच्या पाठोपाठ त्याचे ताठ, वाकडे पाय रखडत जाऊ लागले.

"आता मला ठाऊक आहे की, आम्ही एकदा रस्त्याला

लागलो म्हणजे हा आपला जुना, तांब्याच्या बनावटीचा, माखळी असलेला पाईप शिलगावणार," घोडा स्वतःशी म्हणाला. "मला ह्याचा आनंद होतो, कारण भल्या सकाळच्या प्रहरी, गवतावर अजून दंव ओलं असताना, त्याच्या पाईपचा वास घ्यायला प्रसन्न वाटतं. हा वास माझ्या मनात अनेक रम्य आठवणी जाग्या करतो. फक्त माझी एकच हरकत आहे की, म्हाताऱ्यानं तोंडात पाईप धरला रे धरला, म्हणजे एकदम त्याला आपण कुणी फार मोठे आहोत असं वाटायला लागतं, एका बाजूला स्वारी करून तो बसतो— माझी जी बाजू दुखते, नेमक्या त्याच बाजूला नेहमी बसतो. पण मरो ते! दुसऱ्याच्या आनंदासाठी स्वतःचा बळी द्यायची ही काही माझी पहिलीच वेळ नाही. एक घोडा या नात्यानं त्या स्वार्थत्यागात विशिष्ट आनंद मानायची मला सवय लागलीय. मारूं देत बढाया बिचाऱ्याला! तो जेव्हा एकटा असतो आणि कुणीही त्याला पहात नाही, तेव्हाच फक्त असं वागतो. त्याला सुख होत असेल तर खुशाल एका बाजूची स्वारी करून बसू देत," रस्त्याच्या मध्यभागातून आपल्या थरथरणाऱ्या पायांनी सावध टापा टाकीत जाताना खसी घोडा मनाशी म्हणत होता.

## प्रकरण दोन

नेस्तरने घोड्यांच्या कळपाला नदीकिनारी चरण्यासाठी नेले. तेथे पोहोचल्यावर तो खाली उतरला आणि खसी घोड्यावरचे खोगीर त्याने उतरविले. जमिनीमधून आणि वळसा घालून गेलेल्या नदीच्या पात्रामधून धुक्याचे लोट

उमटत होते. त्या लोटांमध्ये गुरफटलेल्या आणि दंवामध्ये भिजलेल्या ताज्या पाण-कुरणांकडे घोडे हळू हळू जाऊ लागले.

पट्टा काढून टाकताच नेस्तरने खसी घोड्याच्या हनुवटी-खाली खाजविले, तेव्हा घोड्याने डोळे मिटून आपला आनंद आणि आपली कृतज्ञता व्यक्त केली. "आवडतं, बेट्याला," नेस्तर पुटपुटला. पण खरे म्हणजे खसी घोड्याला ते मुळीच आवडत नव्हते. केवळ भावनेची बूज राखायची म्हणून तो बहाणा करायचा आणि बिनहरकत संमती दाखवायला मान डोलावायचा. पण अचानक, काहीही इशारा न देता अथवा कारण नसताना (कदाचित, अतिप्रेमळपणे वागल्यास खसी घोड्याला आपले महत्त्व कमी वाटायला लागेल अशी नेस्तरची भावना झाल्यामुळे), म्हाताऱ्याने त्या घोड्याचे डोके दूर सारले व खसी घोड्याच्या हडकुळ्या पायावर लगामाच्या बकलाचा जोरदार तडाखा हाणला आणि नंतर, एकही शब्द न बोलता तो आपल्या नेहमीच्या जागी, टेकाडावरील खुंटावर बसायला निघून गेला.

अशा वागण्याचा अर्थातच खसी घोड्याला राग आला, पण आपल्याला राग आल्याचे कोणतेही चिन्ह त्याने दाखविले नाही. तो केवळ वळला आणि नदीतीराकडे जाऊ लागला. सावकाशपणे शेपटी हलवीत, हवा हुंगत आणि देखाव्यापुरते गवत चरत त्याने नदीची वाट धरली. शिंग्या, वर्षाचे तट्टू आणि दूधपिती शिंगरे त्याच्या भोवताली हुंदडत होती, पण त्याने त्यांच्याकडे लक्ष दिले नाही. आरोग्याच्या दृष्टीने उत्तम गोष्ट म्हणजे, विशेषतः त्याच्या वयाला, रिकाम्या पोटावर भरपूर पाणी प्यायचे आणि मगच न्याहारी सुरू करायची हे त्याला माहीत होते. म्हणून त्याने नदीतीराची

सर्वात उतरती आणि विस्तृत जागा निवडली, आपले खूर आणि पायबंद पाण्यात भिजविले, आपला जबडा पाण्यात बुडविला आणि आपल्या खरबरीत ओठांनी तो पाणी पिऊ लागला. त्याचे पोट पाण्याने फुगत चालले होते. त्याची रेघारेघांची, झडलेली शेपूट वळवळत होती. मणक्याच्या जोडाशी त्याच्या शेपटीचे केस झडून गेले होते.

म्हाताऱ्या खसी घोड्याला नेहमी सतावणारी आणि त्याला राग आणणारी एक खोडकर उदी घोडी पाण्यामधून त्याच्या दिशेने आली. जणू काही काम असल्याचा तिने आव आणला होता, पण प्रत्यक्षात मात्र कबरा जेथे पाणी पीत होता तेथील पाणी गढूळ करण्याचा तिचा इरादा होता. एव्हाना खसी घोड्याने भरपूर पाणी पिऊन घेतले होते आणि जणू काही घोडीचा दुष्टावा आपल्या गावीच नाही असे दाखवून शांत-पणे त्याने चिखलामधून पावले उचलली, मानेला एक झटका दिला आणि तरुण मंडळींपासून सुरक्षित दूर अंतरावर न्याहारीला आरंभ केला. अखंड तीन तासपर्यंत त्याचे चरणे चालले होते. क्वचितच तो आपले डोके वर उचलीत होता, गवत कमीत कमी तुडविले जावे म्हणून त्याने आपले पाय चमत्कारिकरीत्या फताडे पसरले होते. त्याच्या बाहेर आलेल्या बरगड्यांखालचे पोट एखाद्या गच्च भरलेल्या पोत्याप्रमाणे दिसू लागेपर्यंत जेव्हा तो चरला, तेव्हा कमीत कमी वेदना होईल अशा रीतीने आपल्या दुखऱ्या पायांवर त्याने स्वतःचा वजन तोल सांभाळला—त्याचा पुढचा उजवा पाय सर्वात जास्त दुबळा होता—आणि तो झोपी गेला.

काहीवेळा म्हातारपण गौरवशाली असते, काहीवेळा किळसवाणे असते, काहीवेळा केविलवाणे असते. काहीवेळा

ते गौरवशाली असते आणि किळसवाणेही असते. कबऱ्या, खसी घोड्याचे म्हातारपण ह्या प्रकारचे होते.

खसी घोडा मोठा होता – किमान साडेपाच फूट उंच होता. त्याचा रंग काळाभोर होता व त्यावर फिकट पिवळे ठिपके होते. म्हणजे एकेकाळी तो तसा होता, पण आता ते ठिपके मळकट तपकिरी बनले होते. त्याच्या अंगावर एकूण तीन ठिपके होते. एक ठिपका त्याच्या नाकाच्या एका बाजूने वर चढत गेला होता व त्याने त्याच्या डोक्याला आणि अर्ध्या मानेला व्यापले होते. त्याची लांब आयाळ काही ठिकाणी पांढरी आणि काही ठिकाणी तपकिरी होती व तिच्यात जटांच्या गुठळ्या बनल्या होत्या. दुसरा ठिपका त्याच्या उजव्या बाजूला होता आणि त्याने त्याच्या पोटाचा अर्धा भाग व्यापला होता. तिसरा त्याच्या पुठ्ठ्यावर होता आणि त्याच्या शेपटीच्या वरच्या भागावर व अर्ध्या कटि-पार्श्वभागावर तो पसरला होता. बाकीची त्याची शेपूट रेघारेघांची आणि पांढुरकी होती. त्याच्या डोळ्यांच्या खोबणींभोवती मोठे खड्डे होते; त्याचा काळपट आणि लोंब-णारा खालचा ओठ कुठल्यातरी मारामारीत फाटला होता; एखाद्या लाकडामधून कोरून काढल्याप्रमाणे वाटणाऱ्या त्याच्या हडकुळ्या मानेच्या टोकाशी त्याचे प्रचंड हाड्याळ डोके अवजडपणे खाली झुकले होते. त्याच्या लोंबत्या खालच्या ओठामधून, त्याच्या तोंडातून एका बाजूने बाहेर डोकावणारी काळसर जीभ आणि पिवळ्या दातांचे काही खुंट दिसत होते. त्याचा एक कान फाटला होता. बहुतेक वेळांना त्याचे कान पडलेले असत. पण एखादी माशी फारच चिवटपणा करू लागली म्हणजे तिला भिवविण्यासाठी तो आपल्या कानांना

क्वचित झटका द्यायचा. त्याच्या एका कानामागे केसांच्या झुलुपाचे अवशेष राहिले होते. त्याचे बोडके कपाळ खोल गेले होते आणि त्यावर सुरकुत्या पडल्या होत्या. त्याच्या गळ्याखालील कातडे रिकाम्या पिशवीप्रमाणे लोंबत होते. माशीच्या प्रत्येक स्पर्शाबरोबर, त्याच्या डोक्यावरील आणि मानेवरील गाठाळ शिरा थरथरत होत्या. त्याच्या मुद्रेवर कठोर संयमी धीरगंभीर आणि प्रदीर्घ यातना सोसल्याचा भाव होता. त्याचे पुढचे पाय गुडघ्यांमध्ये वाकलेले होते, दोन्ही खूर सुजलेले होते आणि त्याच्या ठिपकेदार एका पायाच्या ढोपरापाशी मुटीच्या आकाराचे टेंगूळ होते. त्याचे मागचे पाय अधिक बऱ्या अवस्थेत होते, पण त्याच्या कटि-पार्श्वभागावरील लव झडून गेली होती आणि परत कधी उगवलीच नव्हती. त्याच्या हडकुळया देहाच्या मानाने त्याचे पाय फार लांब वाटत होते. त्याच्या फासळया छान गोलाकार होत्या, तरी त्या एवढ्या बाहेर आणि पुढे आल्या होत्या, की त्यांच्या दरम्यानच्या खळग्यांमधील कातडी सुकून गेल्या-सारखी भासत होती. त्याच्या खांद्यांवर आणि पाठीवर मारा-च्या अनेक खुणा होत्या. त्याच्या पार्श्वभागावर एक ताजी जखम होती. ती जखम सुजली होती व सडत होती. माकड्याशी जोडलेला काळया शेपटीचा खुंट खाली लोंबत होता व त्यावर जवळ जवळ केस नव्हते. त्याच्या शेपटीजवळ-च्या उदी पुठ्ठ्यावर हाताच्या पंजाच्या आकाराची एक जखम होती व तिच्यामधून पांढरे केस उगवले होते (बहुधा कीटकदंशामुळे), आणि त्याच्या खांद्याच्या हाडापाशी आणखी एका जखमेचा वण होता. कायम हगवणीच्या विकारामुळे त्याच्या मागच्या पायांचे घोटे आणि शेपटी

डागाळले होते. त्याच्या कातड्यावरील आखूड केस खराट्या-सारखे ताठ उभे होते. तरीसुद्धा, ह्या खसी घोड्याचे किळसवाणे वार्धक्य पाहूनसुद्धा, एखाद्याला नक्कीच जाणवले असते व जाणकार तर नक्कीच म्हणाला असता, की हा घोडा एकेकाळी अतिशय उमदा असावा.

खरोखरीच एखादा जाणकार म्हणाला असता की, अशा हाडा-पेरांचा, एवढ्या मोठ्या ढोपरांचा, अशा सुंदर खुरांचा, अशा सडपातळ पायांचा, अशा डौलदार मानेचा आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे असे टप्पोरे, काळे, तेजस्वी डोळ्यांचे, तोंडावर आणि मानेवर खानदान शिरांचे जाळे असलेले सुरेख डोके लाभलेला, सुबक त्वचा आणि लव असलेला घोडा निर्माण करणारी रशियात फक्त एकच जात होती. ह्या घोड्यामध्ये खरेच काहीतरी भव्यपण होते. त्या-च्यामध्ये किळसवाण्या वार्धक्याचे (हे किळसवाणेपण त्याच्या कबऱ्या रंगामुळे अधिकच वाढले होते) आणि ज्यांना आपल्या सामर्थ्याची व सौंदर्याची जाणीव असते अशांचे वैशिष्ट्यच असलेल्या आत्मविश्वासू वागण्याचे विलक्षण मिश्रण झाले होते.

एखाद्या जिवंत भग्नावशेषाप्रमाणे तो घोडा त्या दंवमाखल्या कुरणात उभा होता आणि तेथून जवळच, विखुरलेल्या कळपाचे हुंदडणे, फुरफुरणे आणि यौवनाने मुसमुसलेले खिंकाळणे ऐकू येत होते.

## प्रकरण तीन

सूर्य एव्हाना जंगलावर चढला होता. कुरणावर आणि नदीच्या वळसेदार पात्रावर ऊन झळाळत होते. दंवाचे वाळून

छोटे बिंदू बनले होते. दलदलीवर आणि जंगलावर विरळ होत जाणारे धुके धुराच्या पातळ पडद्याप्रमाणे अधूनमधून ओठंगले होते. काळे मेघ गोळा होत होते, पण अजून वारा नव्हता. नदीपलिकडील शेतांमध्ये रायच्या पिकाचे आखूड हिरवे दांडोरे उभे होते. ताज्या हिरवळीचा आणि फुलांचा गंध हवेत दाटला होता. जंगलामधून कोकिळा कर्कश्य ओरडत होती आणि उताणा पसरलेला नेस्तर आपल्या उरलेल्या आयुष्याची वर्षे मोजत होता. रायच्या शेतांवर आणि पाण-कुरणांवर चंडोल भराऱ्या घेत होते. उशीरा आलेला एक ससा चुकून कळपात सापडला. तो घाईघाईने सुरक्षित अंतरावर पळाला आणि सावधपणे झुडुपात दडला. गवतामध्ये तोंड खुपसून वास्का झोपला होता. त्याच्याभोवती घोड्यांनी मोठे रिंगण धरले होते आणि त्या अर्ध्या उतारापर्यंत विखुरल्या होत्या. चरायला कुणी अडथळा करणार नाही अशा ठिका-णांना शोधून वयस्क घोड्या फुरफुरत तेथील रसदार, लुस-लुशीत गवत चरत होत्या. त्यांच्या पाठीमागे दंवाचा चमक-दार पट्टा उमटला होता. सबंध कळप नकळतपणे एकाच दिशेने सरकत होता. आणि ऐटबाज म्हातारी झूल्दीबा परत एकदा म्होरकी बनून इतरांना वाट दाखवत होती. प्रथमच व्यायलेल्या तरण्या मूश्काने आपली शेपटी उंचावली, ती विचकली आणि तिला लगटून थरथरत्या पायांवर उभ्या राहिलेल्या तिच्या छोट्या अंजिरी रंगाच्या शिंगरावर ती फुरफुरली. रेशमाप्रमाणे मऊ आणि तुकतुकीत त्वचेच्या, अजाप एकट्या असलेल्या तपकिरी रंगाच्या लास्तच्काने मान एवढी खाली घातली होती की, तिच्या कपाळावरील रेशमी काळ्या बटांनी तिच्या भुवया व डोळे यांना झाकून

टाकले होते. गवत तोडून हवेत उधळायचे आणि गवताची पाती भिरभिरत खाली पडत असताना त्यांना आपल्या दंवाने ओल्या बनलेल्या पायबंदांनी मारायचे, असा खेळ तिने मांडला होता. एक शिंगरू निव्वळ गंमत म्हणून एव्हाना आपल्या आईभोवती सव्वीस वेळा धावले होते, पण आपल्या बाळाला पुरते ओळखणारी ती घोडी मात्र शांतपणे गवत चरत चालली होती; फक्त आपल्या मोठ्या काळ्या डोळ्यांचा एक कटाक्ष अधूनमधून त्या शिंगरावर फेकत होती. काळ्या रंगाचे, मोठ्या डोक्याचे आणि दोन कानांमध्ये ताठ उभ्या असलेल्या झुलुपामुळे चकित मुद्रा दिसणारे, गर्भावस्थेतल्याप्रमाणेच अद्याप एका बाजूला शेपूट वळलेले एक सर्वात लहान शिंगरू आपले कान ताठ करून आणि नजर स्थिर राखून त्या आई-भोवती प्रदक्षिणा घालणाऱ्या शिंगराकडे पहात होते. त्याच्या नजरेत असूया होती वा नापसंती होती हे सांगणे कठीण ठरले असते. काही शिंगरे आपल्या मातांच्या स्तनांच्या बोंडांना अधीरपणे लुचत होती; तर काही शिंगरे आपल्या मातांच्या हाकांना न जुमानता, अगदी विरुद्ध दिशांना चटकन, वेड्याबागड्या चालीने पळत होती, तेथे काहीतरी शोधण्याचा आव आणत होती आणि मग अकारण अचानक थांबून कर्कश्य आरोळ्या ठोकत होती; तर काही शिंगरे जमिनीवर पहुडली होती, अथवा गवत खुडायला शिकत होती, अथवा आपल्या मागील पायांनी आपल्या कानांमागे खाजवीत होती. अद्याप न व्यायलेल्या दोन घोड्या इतरांपासून वेगळ्या झाल्या होत्या व मोठ्या कष्टाने चालत एकत्र चरत होत्या. इतरांना त्यांच्या अवस्थेबद्दल पुरेपूर आदर होता आणि एकही शिंगरू त्यांच्यापाशी जाऊन त्यांना त्रास देण्याचे धाडस करीत नव्हते.

एखाद्या नाठाळ शिंगराने त्यांच्यापाशी जाण्याचे धाडस केलेच तर कानाचा अथवा शेपटीचा नुसता एक झटका त्याला त्याच्या अयोग्य वर्तनाची समज द्यायला पुरेसा होता.

वर्षभराची तट्टे आणि शिंग्या मोठेपणाचा आव आणत होती. हवेत उड्या मारण्याचे अथवा हुंदडणाऱ्या बालकांमध्ये सामील होण्याचे ती कटाक्षाने टाळत होती. त्यांच्या आयाळ भादरलेल्या हंसासमान बाकदार माना खाली घालून आणि त्यांनाही जणू शेपट्या होत्या अशा थाटात आपल्या छोट्या केरसुण्या हलवून मोठ्या प्रतिष्ठितपणे ती गवत चघळत होती. आपल्या मोठ्यांच्याप्रमाणे, तीसुद्धा काहीवेळा खाली निजून गडाबडा लोळत अथवा एकमेकांच्या पाठी खाजवत. सर्वांत आनंदी होत्या दोन आणि तीन वर्षांच्या शिंग्या व कुमारी घोड्या. त्यांचा नेहमी एक वेगळा, उत्साही मुलींचा गट बनायचा आणि सतत पाय आपटत, फुरफुरत, खिदळत, खिंकाळत त्या हुंदडायच्या. त्या एकत्र येत, एकमेकींच्या खांद्यांवर माना टाकत, एकमेकींना हुंगत, हवेत झेपा घेत. काहीवेळा फुरफुरत आणि आपल्या शेपट्या फुलवून, अर्धवट दुडक्या-अर्धवट साध्या चालीने एकमेकींसमोर नखरेबाजपणाने फिरत.

ह्या स्वच्छंद कुमारिकांमध्ये सर्वांत सुंदर आणि सैतानी होती एक उदी घोडी. ती जसे करायची, तस्सेच इतरजणी करायच्या. जेथे ती जाई तेथे सुंदर कुमारिकांचा सगळा तांडा जायचा. ह्या सकाळी ती विशेष उत्तेजक मनःस्थितीत होती. माणसांना एखादेवेळी जसे आनंदाने झपाटले जाते, तसेच आज तिला आनंदी वृत्तीने झपाटले होते. नदीपाशी न्हाताऱ्या खसी घोड्याची खोडी काढल्यानंतर, कशाला

तरी न्यायल्याचा बहाणा करून ती पाण्याच्या कडेने धावली व एकदा फुरफुराट करून भरवेगाने तिने कुरणात धूम ठोकली. तिच्या पाठोपाठ इतरही धावल्या आणि त्यांना आवरायला वास्काला दौडत जाणे भाग पडले. थोडेसे खाऊन झाल्यावर ती जमिनीवर गडाबडा लोळली. मग म्हाताऱ्या घोड्यांच्या समोर पळापळ करीत त्यांना डिवचू लागली. नंतर तिने एका शिंगराला त्याच्या आईपासून दूर पळविले आणि जणू काही त्याला चावा घ्यायला ती त्याच्यामागे धावली. शिंगराची आई घाबरली आणि शिंगरू केविलवाणे खिंकाळले. पण त्या उदी घोडीने त्या शिंगराला साधा स्पर्शसुद्धा केला नाही. आपल्या मैत्रिणींची करमणूक करण्यासाठी तिने त्या शिंगराला केवळ भीतीची हूल दिली होती. तिच्या मैत्रिणी मजेने तिच्या लीला पहात होत्या. नंतर तिच्या डोक्यात एक जोरदार कल्पना चमकली. नदीच्या दूर टोकाला रायच्या शेतामध्ये एक शेतकरी बाप्या नांगराला घोडा जुंपून शेत नांगरत होता. त्या राखाडी रंगाच्या घोड्याचे माथे फिरविण्याचे ह्या घोडीने ठरविले. ती थांबली, मोठ्या डौलात तिने डोके उंचावले, अंगाला एक झटका दिला आणि अत्यंत मधुर, नाजुक अशा स्वरात तिने प्रदीर्घ खिंकाळी फोडली. त्या खिंकाळीत इच्छा होती, प्रेमाचे आश्वासन होते, प्रेमाची आसही होती.

लव्हाळ्यांमध्ये एक पक्षी आवेगाने आपल्या जोडीदारणीला साद घालत होता; एक कोकिळा आणि एक लाव पक्षीण प्रेमगीत आळवीत होत्या; एवढेच काय तर फुलेसुद्धा एकमेकांकडे वाऱ्यामार्फत मधुर वासाची धूळ पाठवीत होती.

"मी तरुण आहे, सुंदर आहे आणि बळकट आहे,"

घोडी खिंकाळून सांगत होती. "आणि तरीही प्रेमाची मधुरता मला अद्याप चाखायला दिलेली नाही; एवढंच नव्हे तर एकाही प्रेमिकानं माझ्यावर अद्याप नजरसुद्धा फिरवलेली नाही."

उदासपणा आणि यौवनाने भरलेली ही अर्थपूर्ण खिंकाळी उतारावरून आणि शेतांवरून प्रवास करीत त्या दूरच्या राखाडी घोड्याच्या कानांपर्यंत पोहोचली. त्याने आपले कान टवकारले आणि तो जागच्या जागी थांबला. बाप्याने आपल्या तागाच्या बुटाने त्या घोड्याच्या पोटात एक लाथ मारली, पण राखाडी घोडा त्या रुपेरी आवाजाने एवढा मुग्ध झाला होता की, तो तसाच स्तब्ध राहिला आणि त्याने खिंकाळून प्रतिसाद दिला. बाप्या चिडला, त्याने लगाम खेचले आणि घोड्याच्या पोटात परत एक लाथ हाणली. यावेळी ती लाथ एवढी जबरदस्त होती, की घोड्याने खिंकाळणे मध्येच थांबविले व तो पुढे सरकला. त्या राखाडी घोड्याला एका गोड कारुण्याने घेरले. त्याचे आवेगी खिंकाळणे आणि बाप्याचे रागीट शब्द यांचा आवाज दूरच्या त्याच्या शेतापासून दुसऱ्या तीरावरील घोड्यांच्या कळपापर्यंत येऊन पोहोचला.

त्या घोडीच्या केवळ आवाजामुळे मुग्ध होऊन तो राखाडी घोडा आपले काम विसरला होता. मग त्याने प्रत्यक्षात तिचे देखणे रूप न्याहाळले असते, आपल्या कानांना टवकारून, नाकपुड्या फुगवून, हवा तोंडात ओढून आणि मान पुढे काढून, आपल्या तरुण आणि सुंदर देहाचा प्रत्येक अवयव कंपित करून जेव्हा ती त्याला साद घालीत होती तेव्हा जर त्याने तिला पाहिले असते, तर त्याची काय अवस्था झाली असती!

पण ती घोडी फार काळ आपल्या भावनांमध्ये गुरफटून बसली नाही. उत्तर देणारा आवाज विरल्यानंतर पुन्हा एकदा ती खिंकाळली, नंतर मुंडी खाली घालून तिने जमीन उकरली व कबऱ्या, खसी घोड्याला चिडवून त्रास देण्यासाठी ती धावली. तरुण मंडळींच्या चेष्टेचा आणि विनोदाचा तो सतत लक्ष्य होता. माणसांपेक्षा ह्या तरुण घोड्यांकडून त्याला जास्त त्रास सहन करावा लागत होता.

तरीही त्याने त्यांपैकी कुणालाही कधीही अपाय केला नव्हता. माणसांना अजून त्याची गरज होती, पण शिंगरांनी त्याचा एवढा छळवाद का मांडावा?

## प्रकरण चार

तो म्हातारा होता, ते तरुण होते. तो हडकुळा होता, ते तुकतुकीत होते. तो कष्टी होता, ते आनंदी होते. थोडक्यात, तो संपूर्ण परका, अनोळखी, अगदी वेगळा होता आणि म्हणून त्याची कीव करण्याचे कारण नव्हते. घोडे फक्त स्वतःची कीव करतात आणि क्वचित अपवादाने ज्यांना ते आपल्यापैकी समजतात त्यांची दया करतात. पण कबरा खसी घोडा म्हातारा, रोड व कुरूप होता हा काही त्याचा दोष नव्हता. त्याला दोषी ठरविणे योग्य नव्हते. पण इतर घोड्यांच्या मते तो अपराधी होता. आणि जे तरुण, बळकट व आनंदी होते, ज्यांच्यासमोर सुखाची सर्व ताटे वाढून ठेवलेली होती, किंचित डिवचल्यास ज्यांचे स्नायू थरारत होते व शेपट्या ताठ होत होत्या, फक्त तेच निर्दोष होते. कदाचित कबऱ्या खसी घोड्याला याची जाणीव झाली होती

त्याच्या अधिक चिंतनपर क्षणांना त्याने कबूल केले होते
. आपले संपूर्ण जीवन जगून टाकण्याचा गुन्हा त्याच्याकडून
झाला होता व त्याबद्दल शिक्षा भोगायची त्याची तयारी
होती. पण सरतेशेवटी तो एक साधा घोडा होता आणि त्याला
निष्कारण छळणाऱ्या ह्या तरुण मंडळींना त्यांच्या आयुष्याच्या
अखेरीस हीच अवस्था सोसावी लागणार होती याचा
विचार त्याच्या मनात आला म्हणजे तो अपरिहार्यपणे कष्टी
होत होता, त्याला संताप येत होता, अपमान वाटत होता.
घोड्यांच्या निष्ठुरतेमागे खानदानाची भावना होती. त्या
प्रत्येकाच्या कुळाचा उगम प्रख्यात स्मेतान्कापर्यंत पोहोचत
होता, तर म्हातारा कबरा खसी घोडा कुठल्या कुळात
जन्मला होता हे कुणालाच माहीत नव्हते. तो कुणीही नव्हता
आणि तीन वर्षांपूर्वी घोड्यांच्या बाजारात त्याला ऐंशी
रूबलना विकत घेतलेले होते.

उद्दी घोडी फिरायला निघाल्याच्या थाटात चालत चालत
त्याच्यापाशी गेली व तिने त्याला ढुशी मारली. याहून
वेगळ्याची अपेक्षा त्याने केली नव्हती. आपले डोळेसुद्धा
न उघडता त्याने कान पाडले व दात विचकले. घोडीने
त्याच्याकडे पाठ फिरविली आणि लाथ मारण्याचा पवित्रा
घेतला. त्याने डोळे उघडले व तो दूर चालत गेला. आता
झोप पळाल्यामुळे तो चरू लागला. पुन्हा एकदा घोडी व
तिच्या मैत्रिणी त्याच्यापाशी गेल्या. डोक्यावर अजिबात
केस नसलेली दोन वर्षांची एक मूर्ख शिंगी नेहमी उद्दी
घोडीचे अनुकरण करायची, तिच्या शेजारून चालायची आणि
सर्व अनुकरणशील लोकांप्रमाणे अतिरेकी अनुकरण करायची.
उद्दी घोडी सर्वसाधारणपणे स्वतःच्या नादात असल्याचा बहाणा

करून त्याच्यापाशी जायची, अगदी त्याच्या जवळ जाऊनही त्याला न पाहिल्याचा बहाणा करायची व त्यामुळे त्याला रागावण्याचा हक्क होता अथवा नव्हता ते सांगता यायचे नाही आणि त्यातच सर्वात मोठी गंमत होती. आत्ता ती असेच वागली, पण खूप रंगात आलेल्या तिच्या टकल्या मैत्रिणीने खसी घोड्याला आपल्या छातीने जोरात दणका मारला. पुन्हा त्याने दात विचकले, एक चीत्कार काढला आणि त्याच्याकडून कधी अपेक्षित नसलेल्या जहालपणाने तो तिच्या मागे धावला आणि तिच्या पार्श्वभागाला त्याने चावा घेतला. टकल्या शिंगीने आपल्या पुठ्ठ्याची त्याच्या उघड्या फासळ्यांवर जोरात धडक दिली. म्हातारा घोडा फुरफुरला आणि तिच्या पाठी जाण्याचा त्याचा इरादा होता, पण त्याने विचार बदलला व एक दीर्घ सुस्कारा टाकून दूर चालत गेला.

खसी घोड्याने टकल्या शिंगीवर केलेल्या धाडसी हल्ल्याचा सूड घेण्याचा निर्णय कळपातील तरुणांनी घेतला असावा, कारण उरलेल्या दिवसात त्यांनी त्याला धड चरूसुद्धा दिले नाही व सतत सतावत राहिले. राखणदाराने अनेकदा त्यांना म्हाताऱ्या घोड्यापासून दूर हाकलले. त्यांच्या वर्तनाचा त्याला उलगडा होत नव्हता. खसी घोडा एवढा अपमानीत झाला होता की, कळप घरी जायची वेळ झाली तेव्हा तो स्वतःच नेस्तरपाशी जाऊन उभा राहिला व जेव्हा त्याच्यावर खोगीर चढले आणि राखणदार त्याच्या पाठीवर स्वार झाला तेव्हा त्याला खूप बरे वाटले, अधिक सुरक्षित वाटले.

म्हाताऱ्या राखणदाराला घरी घेऊन जाताना त्याच्या मनात कोणते विचार येत होते हे कोण सांगू शकणार? कदाचित

...च्या निष्ठुरपणाची त्याला खंत वाटत होती, अथवा ...चित म्हाताऱ्यांच्या स्वभावाला अनुसरून त्याने त्याचा ...ध करणाऱ्यांना क्षमा केली होती, मानीपणा राखून ...ल्या मनात राग गिळून टाकला होता. त्याच्या मनात ... काही विचार येत होते ते त्याने तबेल्यात पोहोचेपर्यंत ...शीच ठेवले.

...या संध्याकाळी नेस्तरला भेटायला काही शेजारी आले ...ते. जहागीरदाराच्या वाड्यात काम करणाऱ्या नोकरांच्या ...पटांजवळून जात असताना त्याच्या झोपडीच्या खांबाशी ... गाडी बांधलेली नेस्तरने पाहिली होती. घरी जायला ... एवढा उतावीळ बनला होता की, कुंपणात कळप ...नाक्षणी त्याने खसी घोड्यावरून खाली उडी टाकली ...णि घोड्यावरचे खोगीर उतरवायला वास्काला ओरडून ...गितले. मग त्याने फाटकाला कुलूप ठोकले व आपल्या ...त्रांच्या भेटीला तो निघून गेला.

कुंपणामध्ये त्या रात्री एक विशेष घटना घडली; तिचे ... कारण कदाचित असावे टकल्या शिंगीचा, स्मेतान्काच्या ...नीचा, घोड्यांच्या बाजारात विकत घेतलेल्या व आई-...चा पत्ता नसलेल्या "लुतभऱ्या घोड्या"ने अपमान ... होता व पर्यायाने सबंध कळपाच्या खानदानी भावनेचा ...मान केला होता; अथवा दुसरे कारण असावे, खोगीर ...लेला स्वाररहित खसी घोडा इतर घोड्यांना विचित्र ...ला होता. सर्व लहान-थोर घोडे दात विचकून खसी ...ड्याच्या पाठीशी लागले होते, त्याच्या पोकळ बरगड्यां-... खुरांनी लाथा झाडत होते, त्याला मोठमोठ्याने कण्हायला ... होते. खसी घोड्याला ते सर्व जेव्हा असह्य झाले

तेव्हा कुंपणाच्या मध्यभागी तो थांबला. त्याच्या तोंडावर थंड म्हातारपणाचा दुबळा संताप उमटला होता. नंतर त्याच्या मुद्रेवर निराशा पसरली. त्याने कान खाली पाडले आणि अचानक काहीतरी केले ज्यामुळे सर्व घोडे जागच्याजागी एकदम स्तब्ध झाले. व्याझोपूरीखा नांवाच्या सर्वात वडील घोडीने खसी घोड्याला एकदा हुंगले व एक दीर्घ उसासा टाकला. खसी घोड्यानेही एक मोठा उसासा टाकला.

. . . .

## प्रकरण पाच

चांदण्यात न्हालेल्या कुंपणाच्या मध्यभागी खोगीर चढविलेल्या खसी घोड्याची उंच आकृती उभी होती. त्याने नुकत्याच सांगितलेल्या हकीकतीमुळे जणू चकित झालेले इतर घोडे त्याच्या भोवती गप्प आणि स्तब्ध उभे होते. आणि ते खरेच चकित झाले होते.

त्यांनी ही हकीकत ऐकली होती.

. . .

### पहिली रात्र

"पहिला ल्यूबेझ्नी आणि बाबा यांचा मी मुलगा. माझ्या कुळानुसार माझं नांव पहिला मूझिक. पण जरी माझ्या कुळाचं नांव पहिला मूझिक असलं तरी मला नेहमी खोल्स्तो-मेर म्हणून हाक मारीत. माझ्या लांब ढांगांच्या चालीमुळं लोकांनी मला ते नांव दिलं होतं आणि सबंध रशियात

माझ्याएवढी लांब ढांग कुणाचीही नव्हती. माझ्या नसांमध्ये जेवढं खानदान रक्त वहात होतं तेवढं खानदानीपण जगातल्या इतर कुणाही घोड्यामध्ये नव्हतं. हे मी तुम्हाला कधीही सांगितलं नसतं. कशासाठी? तुम्ही मला कधीही ओळखलं नसतं, जसं व्याझोपूरीखानं मला प्रथम ओळखलं नाही. माझ्या तारुण्यात ती माझ्याबरोबर ख्रेनोवोला रहात होती आणि मी कोण आहे याचा तिला आत्ता कुठं शोध लागला. व्याझोपूरीखा साक्षीला नसती तर आत्ता तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवला नसता आणि मी तुम्हाला कधी सांगितलंही नसतं – घोड्यांच्या कळपानं माझी कीव करावी असं मला वाटत नाही – पण तुम्ही मला सांगणं भाग पाडलंत. होय, तोच तो खोल्स्तोमेर ज्याला घोड्यांचे अस्सल जाणकार शोधताहेत आणि ज्याचा पत्ता त्यांना अजून लागत नाही. तोच मी खोल्स्तोमेर, ज्याला काऊंट स्वतः जाणत होता आणि त्याच्या आवडत्या लेबेदला शर्यतीत मी हरवलं म्हणून त्यानं मला स्टडमधून हाकून लावलं."

"मी जेव्हा जन्मलो तेव्हा **कबरा** म्हणजे काय ते मला माहीत नव्हतं. मी नुसता घोडा होतो असं मला वाटलं. माझ्या रंगाबाबत जेव्हा पहिले शेरे मारण्यात आले तेव्हा माझ्या आईला आणि मला खूप धक्का बसल्याचं मला आठवतं. मला वाटतं मी रात्रीचा जन्मलो आणि माझ्या आईनं मला चाटूनपुसून स्वच्छ केल्यानंतर सकाळच्या दरम्यान माझ्या पायांवर मी उभा राहू शकलो. काहीतरी मला हवं होतं, सर्व गोष्टींचं मला खूप आश्चर्य वाटत होतं आणि तरीही सर्व काही साधं वाटत होतं, असं मला आठवतं. तबेल्यात आमचे स्टॉल एका लांब, उबदार कॉरीडॉरमध्ये होते आणि

जाळीदार दारांमधून आम्ही सर्व काही पाहू शकत होतो. आईनं माझ्यापुढं स्तनांच्या बोंडचा धरल्या, पण मी एवढा बावळट होतो की, कधी मी तिच्या पुढच्या पायांमध्ये तोंड खुपसायचा, तर कधी छातीमध्ये. अचानक आईनं जाळीमधून दृष्टिक्षेप टाकला, माझ्यावर पाय टाकला आणि ती माघारी सरली. त्या दिवशी काम करणारा मोतद्दार आमच्याकडं जाळीमधून पहात होता.

"'अरे बघा, बाबा व्यायली,' तो म्हणाला आणि त्यानं कडी काढली. ताज्या कडब्यावरून चालत तो माझ्यापाशी आला आणि त्यानं माझ्याभोवती आपल्या हातांचा विळखा टाकला.

"'ए तारास, अरे येऊन बघ,' त्यानं साद घातली. 'अगदी नीलकण्ठ पक्ष्यासारखा कबरा आहे.'

"मी त्याच्यापासून उशी घेऊन पळालो आणि गुडघ्यांवर कोसळलो.

"'अरेच्चा! सैतानाचा बच्चा कुठला!' तो म्हणाला.

"आई अस्वस्थ होती, पण माझं रक्षण करण्याचा तिनं मुळीच प्रयत्न केला नाही. तिनं फक्त एक खोल सुस्कारा सोडला आणि मान फिरवली. दुसरे मोतद्दार आत आले आणि मला बघू लागले. त्यातला एक तबेल्याच्या राखण-दाराला सांगायला गेला. माझ्या रंगाला ते सगळे हसत होते आणि वेगवेगळी गंमतीदार नांवं मला ठेवत होते. त्यांचा अर्थ ना माझ्या आईला समजत होता ना मला. हावेळपावेतो आमच्यात किंवा आमच्या नातेवाईकात कबरा घोडा कधी जन्मला नव्हता. घोड्याच्या रंगात दोष देण्यासारखं काही असतं याची आम्हाला कल्पना नव्हती. तरीही, माझ्या

...ऱ्डीबद्दल आणि देखण्या आकृतीबद्दल प्रत्येकानं माझं कौतुक केलं.

'किती उत्साही आहे पहा!' मोतद्दार म्हणाला. 'आवरता आवरत नाही!'

थोड्याच वेळात राखणदार आत आला. त्यानं माझ्या ...बद्दल आश्चर्य व्यक्त केलं आणि तो संकटात पडल्यासारखी ...ची चर्या झाली.

'असला छोटा राक्षस कुठून आला?' तो म्हणाला. 'जनरल याला स्टडमध्ये ठेवणार नाहीत. छी: बाबा, तू ...झा घात केलास!' माझ्या आईकडं वळून तो म्हणाला. '...ा कबऱ्या विदूषकाऐवजी टकलं शिंगरू दिलं असतंस तरी ...लं असतं!'

माझी आई काहीच बोलली नाही. अशा परिस्थितीत ...स्कारे टाकायची तिला सवय होती, त्याप्रमाणं तिनं आणखी ...क सुस्कारा टाकला.

'कुणासारखा झालाय हा बेटा? अगदी थेट मूझिक,' ... पुढं बोलत होता. 'याला स्टडमध्ये ठेवणं शक्य नाही. ... आमची अब्रू घालवील. पण तरीहा मोठा छान घोडा ...हे. खूपच सुरेख,' तो म्हणाला आणि ज्या कुणी मला ...हिलं त्या प्रत्येकानं हेच उद्गार काढले.

काही दिवसांनंतर खुद्द जनरल मला पहायला आले आणि ...द्धा हादरले. माझ्या कातडीच्या रंगाबद्दल त्यांनी माझी ... माझ्या आईची निर्भर्त्सना केली.

'आणि तरीही हा फार छान घोडा आहे, फार ...र.' माझ्यावर नजर टाकणारा प्रत्येकजण म्हणत होता.

वसंताच्या मोसमापर्यंत आम्ही आमच्या मातांच्या

तबेल्यात राहिलो. प्रत्येक शिंगरू आपापल्या आईबरोबर रहात होतं. पण सूर्यच्या ऊबेनं जेव्हा तबेल्याच्या छपरावरचं बर्फ वितळू लागलं तेव्हा ताजा कडबा पसरलेल्या मोठ्या आवारात अधूनमधून आम्हाला आमच्या मातांबरोबर जायला मिळू लागलं. इथं मी प्रथमच माझ्या जवळच्या आणि दूरच्या नातेवाईकांची ओळख करून घेतली. वेगवेगळ्या दारांमधून आपल्या शिंगरांबरोबर बाहेर पडणाऱ्या त्यावेळच्या सर्व अत्यंत सुप्रसिद्ध घोड्या मी पाहिल्या. त्यांच्यात म्हातारी गोलान्का होती; स्मेतान्काची मुलगी मूश्का होती; क्रास्नूखा होती; खोगीर चढवलेली दोब्रोखोतिखा होती; सर्व त्याकाळच्या ख्यातनाम होत्या. आपल्या शिंगरांबरोबर तिथं त्या एकत्र जमायच्या, उन्हात फिरायच्या, गवतात लोळायच्या, एकमेकींना हुंगायच्या. सर्वसामान्य घोडे जसं वागतात तसंच त्या वागायच्या. सुंदरींनी भरलेलं ते आवार आजघटकेलाही माझ्या नजरेसमोर उभं राहतं. मीसुद्धा एकेकाळी तरुण आणि नाठाळ होतो ह्यावर तुमचा आज विश्वास बसणार नाही, पण मी खरंच तसा होतो. तिथंच माझी व्याझोपूरीखाशी गाठ पडली. त्यावेळी ती एक वर्षाची होती; खूप दयाळू, आनंदी आणि दमदार घोडी. मला अपमान करायचा नाही, पण जरी तुम्ही तिला दुर्मीळ खानदानातली मानत असलात तरी त्या काळात कळपामध्ये ती सर्वात खालच्या कुळातली मानली जात होती. ती स्वतःसुद्धा हे मान्य करील.

"माणसांना तिटकारा वाटणारा माझा कबरा रंग घोड्यांना मात्र खूप आवडायचा. ते सारे मला वेढायचे, माझं कौतुक करायचे आणि माझ्याशी खेळायचे. माणसं माझ्या रंगासंबंधी काय बोलायची ते मी विसरायला लागलो आणि आनंदान

लागलो. पण लौकरच मला माझं पहिलं दुःख अनुभवावं लागलं आणि त्याला कारणीभूत खुद्द माझी आई होती.

जेव्हा बर्फ वितळू लागलं, छपरांखाली चिमण्या चिवचिवू लागल्या आणि हवेत वसंताचे गंध दरवळू लागले, तेव्हा माझ्या आईचं माझ्याशी वागणं बदललं. तिची एकूण वागणूकच बदलली. तिच्या वयाला न शोभेल अशा रीतीनं आवारात उधळू लागली; किंवा उदास होऊन खिंकाळू लागली; इतर घोड्यांना चावू लागली व लाथा मारू लागली; मला हुंगून तिरस्कारानं फुरफुरू लागली; अथवा चुलत बहिणीच्या, कूपचिखाच्या, खांद्यावर मान उन्हात खूप काळ उदास उभी राहू लागली आणि आपल्या स्तनांपासून दूर ढकलू लागली.

एक दिवस राखणदार आला, त्यानं मोतद्दारांकरवी लगाम घातला आणि तिला ते घेऊन जाऊ लागले. खिंकाळली, मी प्रत्युत्तर करून तिच्यामागं धावलो. पण माझ्याकडं ढुंकूनही पाहिलं नाही. मोतद्दार तारासनं धरून ठेवलं आणि तिच्यापाठी दार बंद झालं. मी करून मोतद्दाराला गवतात खाली पाडलं, पण दार आणि माझ्या आईच्या खिंकाळण्याचा आवाज फिकट गेलेला मी ऐकत होतो. आणि तिच्या खिंकाळण्यात हाका नव्हत्या, तर वेगळंच काहीतरी होतं. नंतर मला की, दुसऱ्या एका आवाजानं, घनगंभीर आणि आवाजानं, तिला उत्तर दिलं होतं. तो दोब्रीचा होता आणि माझ्या आईशी त्याची गाठ घालून देण्या- दोन मोतद्दार त्याला घेऊन येत होते. मला एवढं झालं होतं की, तारास आमच्या स्टॉलमधून बाहेर

केव्हा गेला तेसुद्धा मला समजलं नाही. माझ्या आईच्या प्रेमाला मी कायमचा मुकलो असं मला वाटलं. 'आणि हे सारं मी कबरा म्हणून.' लोकांचे माझ्या रंगाबद्दलचे शेरे आठवल्यामुळं माझ्या मनात विचार आला आणि एवढी चीड दाटली, की माझ्या डोक्यानं आणि गुडघ्यांनी स्टॉलच्या भिंतींवर मी धडका मारू लागलो. मला दरदरून घाम फुटला तेव्हा माझ्या धडका थांबल्या आणि थकून मी स्तब्ध उभा राहिलो.

"थोड्याच वेळात माझी आई परत आली. आगळ्या गतीनं दौडत कॉरीडॉरमधून ती आत आली. तिच्यासाठी दार उघडण्यात आलं आणि तिला मी ओळखलंच नाही. एकदम ती तरुण आणि देखणी दिसू लागली होती. तिनं मला हुंगलं, फुरफुर आवाज केला आणि ती खिदळू लागली. इत:पर ती माझ्यावर प्रेम करत नव्हती हे तिच्या प्रत्येक हालचालीतून जाणवत होतं. दोब्री किती सुंदर होता आणि तिचं त्याच्यावर किती गाढ प्रेम होतं ते तिनं मला सांगितलं. त्याच्या भेटीला तिला पुन:पुन्हा नेत होते आणि तिच्या-माझ्यातले संबंध जास्त जास्त थंडावत चालले होते.

"लौकरच आम्हाला चरायला सोडलं. त्यामुळं मला नवे आनंद गवसले आणि माझ्या आईच्या गमावलेल्या प्रेमाची त्यांनी थोडीफार भरपाई केली. मी मित्र आणि साथी मिळवले. गवत चरायला, मोठ्या घोड्यांप्रमाणं खिंकाळायला आणि आमच्या मातांभोवती रिंगण धरून दौड करायला आम्ही एकत्र शिकलो. ते मजेचे दिवस होते. प्रत्येक गोष्टीची मला क्षमा होत होती, प्रत्येकजण माझ्यावर प्रेम करत होता. माझं कौतुक करत होता आणि माझ्या सगळ्या लीला

निरखत होता. पण हे फार काळ टिकलं नाही.
एक भयानक गोष्ट घडली–" खसी घोड्याने
दीर्घ सुस्कारा टाकला आणि तो दूर चालत गेला.

झाली. फाटक करकरले आणि नेस्तर आत आला.
थांगले. राखणदाराने खसी घोड्यावरचे खोगीर घट्ट
व कळपाला घेऊन तो कुरणाकडे गेला.

# प्रकरण सहा

## दुसरी रात्र

ध्याकाळी घोड्यांचा कळप घरी परत येताच पुन्हा सगळे
कबऱ्या खसी घोड्याभोवती जमा झाले.

ऑगस्टमध्ये माझ्या आईपासून मला दूर नेण्यात आलं,"
सांगू लागला. "मला फारसं दुःख झालं नाही. माझी
नोकरच माझ्या धाकट्या भावाला (प्रख्यात ऊसान)
देणार होती आणि पूर्वी तिला माझ्याविषयी वाटणारी
आता राहिली नव्हती हे मला दिसत होतं. मला
वाटत नव्हता. तिच्याविषयीचं माझ्या अंतःकरणातलं
मंडावत चाललेलं मला जाणवलं. शिवाय मला ठाऊक
की, माझ्या आईला सोडल्यानंतर माझी शिंगरांच्या
रवानगी व्हायची होती आणि तिथं दोन-दोन अथवा
शिंगरांबरोबर आम्ही राहणार होतो व दररोज
हवा खायला बाहेर काढणार होते. मला मीलय-
ठेवण्यात आलं. मीलय हा स्वारीचा घोडा होता.
सम्राटाचा घोडा बनला. चित्रकारांनी त्याची चित्रं

काढली आणि शिल्पकारांनी त्याची शिल्पं बनवली. पण त्यावेळी तो साधं शिंगरू होता. त्याची कातडी मऊ, चकचकीत होती, मान हंसासारखी होती, हार्प वाद्याच्या तारांप्रमाणं पाय बारीक आणि सरळ होते. तो नेहमी आनंदी, सुस्वभावी आणि उदार मनानं वागायचा. त्याला हुंदडायला खूप आवडायचं. आपल्या साथीदारांना तो चाटायचा, घोड्यांच्या आणि माणसांच्या खोड्या काढायचा. आम्हा दोघांची दाट मैत्री जमली आणि सर्व तारुण्यभर ती मैत्री टिकली. तेव्हा तो आनंदी आणि चंचल होता. एव्हाना शिंग्यांच्या प्रेमात पडू लागला होता, त्याचे चोरटे प्रणयचाळे चालू झाले होते आणि माझ्या भाबडेपणाला तो हसत होता. माझ्या दुर्दैवानं, आत्मप्रतिष्ठेच्या भावनेपायी मी त्याची नक्कल करू लागलो. लौकरच मी प्रेमात पडलो. ह्या अकाली प्रेमबाधेपायी माझ्या आयुष्यात प्रचंड बदल घडला.

"हो, मी प्रेमात पडलो. व्याझोपूरीखा माझ्यापेक्षा एका वर्षानं मोठी होती आणि आम्हा दोघांची गट्टी जमली होती. पण शरदाच्या अखेरी ती मला लाजू लागल्याचं माझ्या ध्यानात आलं... माझ्या पहिल्या प्रेमाची संपूर्ण करुण कहाणी सांगण्याचा मी प्रयत्न करणार नाही. तिच्याबद्दलचं माझं बेभान प्रेम तिला स्वत:लाच चांगलं आठवतंय. त्या प्रेमाची अखेर माझ्या आयुष्यात सर्वांत महत्त्वाचा बदल होण्यात झाली. राखणदारांनी मला तिच्यापासून दूर हाकललं आणि निर्दयपणं मारलं. एके संध्याकाळी ते मला एका खास स्टॉल-मध्ये घेऊन गेले. सबंध रात्र मी रडत होतो. जणू दुसऱ्या दिवशी घडणाऱ्या गोष्टीची मला आधीच चाहूल लागली होती.

"सकाळच्या प्रहरी जनरल, तबेल्याचा राखणदार, मोतद्दार, कळपाचे राखणदार वगैरे लोक माझ्या स्टॉलच्या कॉरीडॉरमध्ये जमा झाले आणि भयानक गोंधळ सुरू झाला. जनरल राखणदारावर खेकसले. राखणदारानं स्वतःचं समर्थन केलं की, मला बाहेर न सोडण्याबद्दल त्यानं मोतद्दारांना ताकीद दिली होती, पण त्यांनी त्याची आज्ञा पाळली नव्हती. त्या सर्वांना फोडून काढीन अशी जनरलनी तंबी दिली आणि शिंगराला खसी केलं पाहिजे असं ते म्हणाले. त्यांच्या सर्व हुकुमांचं पालन होईल असं राखणदारानं आश्वासन दिलं. वातावरण निवलं आणि ते निघून गेले. मला काहीही समजलं नाही, पण मला काहीतरी करण्याचा त्यांचा इरादा मात्र स्पष्ट दिसला.

. . . . . . . . . . . . . . . . . . .

. . . . . . . . . . . . . . .

"दुसऱ्या दिवशी मी कायमचा खिंकाळायचा थांबलो. आत्ता मी जो आहे तसा त्या दिवशी प्रथम बनलो. सारं जग माझ्या दृष्टीनं बदलून गेलं. मला कशातच काही रस वाटेना. मी एकलकोंडा आणि विचारी बनलो. आरंभी कशानंही मी चेतावत नव्हतो. खायचं, प्यायचं आणि फिरायचंही मी नाकारलं. मग माझ्या साथीदारांबरोबर खेळणं तर दूरच. नंतर काही वेळा मला उड्या मारायची, नाचायची आणि खिंकाळायची ऊर्मी यायची. पण मग मी स्वतःला भयंकर प्रश्न विचारायचा: 'कशाला? कशासाठी?' आणि माझ्यातले सारे त्राण गळून जायचे.

"एका संध्याकाळी मला फिरायला बाहेर काढलं होतं आणि त्याचवेळी शेतांमधून कळप परत येत होता. दूर

अंतरावर धुळीच्या लोटामध्ये गुरफटलेल्या आमच्या घोड्यांच्या अंधुक आकृती दिसत होत्या. त्यांचं आनंदी खिदळणं आणि टापा आपटणं मी ऐकलं. मोतद्दारानं दोरी खेचल्यामुळं माझ्या मानेला काचत होतं तरी मी थांबलो आणि एखाद्या कायमच्या हरवलेल्या आनंदाकडं जसं बघावं तशा नजरेनं जवळ येणाऱ्या कळपाकडं बघू लागलो. ते जसे जवळ आले तसं मी एका पाठोपाठ सर्वांना ओळखलं. सगळे माझे जुने मित्र – खूप देखणे, चपळ आणि निरोगी. त्यांच्यातल्या काहींनी माझ्याकडं कटाक्ष टाकला. मोतद्दार माझ्या दोरीला हिसडे मारत होता, पण वेदनेची मला पर्वा वाटत नव्हती. भान हरपून मी पूर्वीसारखा खिंकाळलो आणि त्यांच्याकडं दौडत गेलो. पण माझं खिंकाळणं केविलवाणं, हास्यास्पद आणि विशोभित भासलं. माझा एकही जुना मित्र हसला नाही, पण सभ्यतेखातर अनेकांनी माझ्याकडं आपल्या पाठी फिरवल्याचं माझ्या ध्यानात आलं. माझं दर्शन त्यांना किळसवाणं, करुण, लज्जास्पद आणि सर्वात महत्त्वाचं म्हणजे हास्यास्पद वाटलं होतं हे स्पष्ट होतं. माझी रोड, दोराळ मान विनोदी दिसत असावी आणि माझं मोठं डोकंसुद्धा (माझं बरंच वजन घटलं होतं) माझे लांब, वेडेवाकडे पाय आणि पूर्वीच्या तऱ्हेनं मोतद्दाराभोवती मूर्खासारखा पिंगा घालणं विनोदी दिसलं असावं. कुणीही माझ्या खिंकाळण्याला उत्तर दिलं नाही. प्रत्येकजण माझ्यापासून दूर झाला. आणि अचानक मला सारं काही समजलं. त्यांच्या दृष्टीनं मी कायमचा परका बनल्याचं मी पाहिलं. मला अतीव दुःख झालं. तबेल्यात मी परत कसा आलो तेसुद्धा आठवत नाही.

"असं घडण्याच्या आधीपासूनच गंभीर आणि चिंतनशील बनण्याकडं माझा कल होत होता. आता मी पूर्णतः तसा बनलो. माझ्या कबऱ्या रंगामुळं लोकांच्या मनात निर्माण होणारा अनाकलनीय तिरस्कार, माझ्यावर कोसळलेलं विचित्र आणि अनपेक्षित दुर्दैव, स्टड-फार्मवर माझी बनलेली विशिष्ट अवस्था – ज्या अवस्थेची मला जाणीव होती, पण जिला मी स्वतः मुळीच समजू शकत नव्हतो – ह्या सर्व गोष्टीं-मुळं मी अंतर्मुख बनलो. माझ्या कबरेपणाबद्दल दोष देणाऱ्या माणसांच्या अन्यायी वागण्याची मी खंत करू लागलो. मातृ-प्रेमाच्या तकलादूपणाबद्दल आणि केवळ शारीरिक घटकांवर अवलंबून असलेल्या एकूण स्त्री-प्रेमाबद्दल मी दुःख करू लागलो. मला सर्वात अधिक वाईट वाटलं माणूस म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्राण्यांच्या विशिष्ट जमातीच्या लहरी-पणाचं. ही माणूस जात आमच्या आयुष्यांमध्ये फार महत्त्वाची भूमिका बजावते. तिच्या लहरीपणापायी स्टड-फार्मवर माझी विशिष्ट अवस्था बनली होती आणि त्या अवस्थेची जाणीव असूनही मला तिचा खुलासा करता येत नव्हता. माणसांचा लहरीपणा कशातून उद्‌भवतो याची पूर्ण जाणीव करून देणारा पुढील प्रसंग घडला.

"दिवाळी उत्सवाच्या दरम्यान तो प्रसंग घडला. सबंध दिवसभर मला चारा आणि पाणी मिळालं नव्हतं. मागाहून मला त्याचं कारण समजलं की, मोतद्दार झिंगून पडल्या-मुळं असं घडलं होतं. त्यादिवशी राखणदार माझ्या तबेल्यात डोकावला आणि मला चारा-पाणी दिलेलं नाही असं त्याच्या ध्यानात येताच त्यानं गैरहजर मोतद्दारावर शिव्यांची लाखोली वाहिली आणि तो निघून गेला. दुसऱ्या दिवशी मोतद्दार

आणि त्याचा मित्र आमच्या तबेल्यात चारा घेऊन आले तेव्हा मोतद्दार विशेष फिकट आणि खचलेला दिसत असल्याचं माझ्या ध्यानात आलं. त्याच्या लांब पाठीमधल्या कशानंतरी माझं विशेष लक्ष आकर्षून घेतलं आणि त्याच्याबद्दल मला करुणा वाटली. जाळीमधून त्यानं रागानं गवत फेकलं. मी माझं डोकं बाहेर काढलं आणि त्यांच्या खांद्यावर ते टेकवायची माझी इच्छा होती. पण त्यानं माझ्या नाकावर एवढा जोरात ठोसा मारला, की मी ताडकन मागं उडालो. त्या पाठोपाठ त्यानं माझ्या पोटात लाथ हाणली.

"'ह्या लूतभऱ्या सैतानामुळं सगळा अनर्थ ओढवला!' तो म्हणाला.

"'ते कसं काय?' दुसऱ्या मोतद्दारानं विचारलं.

"'काऊंटच्या शिंगरांची तो पाहणी करत नाही, पण **स्वतः-च्या** मात्र दिवसातून दोनदा चौकशी करतो.'

"'म्हणजे? त्यांनी राखणदाराला कबरा बक्षीस दिला?' दुसऱ्यानं विचारलं.

"'कुणाला ठाऊक बक्षीस दिला का विकला! काऊंटची शिंगरं उपाशी मेली तरी त्याची राखणदाराला पर्वा नाही, पण त्याची **मालमत्ता** उपाशी ठेवण्याचं मी धाडस कसं केलं! त्यानं मला आडवं पडायला लावलं आणि चाबकानं झोडपलं. धर्माची काही चाड नाही! माणसांपेक्षा जनावरांची त्याला जास्त काळजी. तो देवाला मानत नाही हे कुणालाही समजू शकतं. हरामखोरानं स्वतः फटके मोजले. जनरल असं कधी कुणाला झोडपत नाहीत. माझी सगळी पाठ सोलून निघालीय. काळीज नाही त्याला!'

"धर्माबद्दल आणि चाबकाच्या माराबद्दल तो जे काही

बोलला ते मला समजलं, पण **त्याची स्वतःची, त्याची मालमत्ता** ह्या शब्दांचा अर्थ मात्र त्यावेळी मुळीच समजला नाही. मी आणि राखणदार यांच्या दरम्यानचा काही संबंध ह्या शब्दांमध्ये सामावला होता, एवढं मला दिसत होतं. पण हा कोणता संबंध होता ह्याची त्यावेळी मला कल्पना नव्हती. पुढं काही काळानंतर, दुसऱ्या घोड्यांपासून मला जेव्हा वेगळं करण्यात आलं, तेव्हा लक्षात आला. **मला** माणसाची मालमत्ता कसं म्हणतात हे त्यावेळी कदाचित मला समजू शकलं नसतं. माझ्या संदर्भात, एका जिवंत घोड्याच्या संदर्भात, माझा घोडा हे शब्द मला चमत्कारिक भासले. जणू त्यानं माझी जमीन, माझी हवा, माझं पाणी म्हणावं तसे!

"आणि तरीही, ह्या शब्दांनी माझ्यावर प्रचंड परिणाम केला. सारा वेळ मी त्यांच्यावर विचार करत राहिलो आणि माणसांबरोबर अत्यंत वेगवेगळे संबंध अनुभवल्यानंतरच केवळ ह्या विचित्र शब्दांना माणसं जोडत असलेल्या अर्थाचं शेवटी मला आकलन झालं. तो अर्थ असा आहे: लोकाचं आयुष्य कृतींनुसार नव्हे तर शब्दांनुसार चालतं. एखाद्या गोष्टीला करण्याच्या अथवा न करण्याच्या संधीचा त्यांना आनंद वाटत नाही, तर वस्तूंना विशिष्ट पारंपारिक शब्द वापरण्याच्या संधीचा त्यांना आनंद होतो. माझा, माझी, माझं ह्या शब्दांना त्यांच्या दृष्टीनं सर्वात जास्त महत्त्व असतं. सर्व प्रकारच्या प्राण्यांना आणि वस्तूंना हे शब्द ते वापरतात. एवढंच नव्हे तर जमीन, माणसं आणि घोड्यांनाही हे शब्द वापरतात. विशिष्ट वस्तूला **माझी** म्हणण्याचा अधिकार फक्त एकाच माणसाला असावा, असं त्यांनी परस्परांमध्ये

ठरवलंय. आणि त्यांच्या ह्या खेळात सर्वांत जास्त वस्तूंना **हा शब्द** वापरण्याचा हक्क जो माणूस जिंकतो, त्याला सर्वांत सुखी माणूस समजलं जातं. असं का असावं हे काही मला कळत नाही, पण हे असं आहे खरं! त्यातील प्रत्यक्ष फायदे हुडकून काढण्याचा मी बराच काळ प्रयत्न केला, पण मला काही जमलं नाही.

"उदाहरणार्थ, मला आपली मालमत्ता म्हणणाऱ्या अनेक लोकांनी माझ्यावर कधी स्वारी केली नाही; अगदी वेगळीच माणसं माझ्यावर स्वार व्हायची किंवा मला गाडीला जुंपायची. आणि मला आपली मालमत्ता म्हणणारी माणसं मला खाऊ घालत नव्हती, तर दुसरीच माणसं माझा चारा-पाणी करायची. माझा खरारा करणारी, माझी काळजी घेणारी माणसं अगदी वेगळीच होती—गाडीवान, मोतद्दार आणि तत्सम. म्हणून, विशाल निरीक्षणाच्या परिणामी, मी अशा निष्कर्षाला आलो की, केवळ आम्हा घोड्यांच्या संबंधात नव्हे तर एकूण सर्व वस्तूंच्या संबंधात, **माझा, माझी आणि माझं** ही संकल्पना दुसऱ्या कशावरही नव्हे, तर अत्यंत नीच आणि पाशवी अशा मानवी प्रवृत्तीवर आधारलेली आहे. ह्या प्रवृत्तीला माणसं आपापसात खाजगी मालमत्तेची प्रवृत्ती अथवा हक्क म्हणतात. एखादा माणूस 'माझं घर' म्हणतो, पण ते त्यानं केवळ बांधून ठेवलेलं असतं आणि त्यात तो रहात नाही. एखादा व्यापारी 'माझं कापडाचं दुकान' म्हणतो, जरी तो स्वतःच्या दुकानामधल्या सर्वोत्तम कापडाचे कपडे स्वतः वापरत नाही. जमिनीच्या विशिष्ट तुकड्याला आपला म्हणणारी काही माणसं आहेत, जरी त्या जमिनीला त्यांनी स्वतः कधीही पाहिलेलं नसतं

अथवा तिच्यावर पाय ठेवलेला नसतो. दुसऱ्या माणसांना आपली म्हणणारीही काही माणसं आहेत, जरी त्यांनी त्या दुसऱ्या माणसांना कधीही पाहिलेलं नसतं आणि ती त्यांना अपाय करतात एवढाच त्यांच्यातला संबंध असतो. काही विशिष्ट बायकांना आपल्या बायका, आपल्या पत्नी म्हणणारे पुरुष आहेत, जरी त्या बायका इतर पुरुषांबरोबर राहतात. आणि शक्य तितकं जास्त भलं करणं हे लोकांचं आयुष्यातलं ध्येय नाही, तर शक्य तितक्या जास्त वस्तूंना **आपल्या** म्हणणं हे त्यांचं ध्येय असतं. आमच्यात आणि माणसांमध्ये इथंच मुख्य फरक आहे अशी माझी खात्री झालीय. मानवी कार्य, निदान ज्या माणसांशी माझा काही संबंध आला त्या माणसांची कार्यं, शब्दांनुसार चालत होती, तर आमची कृतींनुसार चालत होती. आणि ह्या केवळ एकच वरचढ गुणामुळं, माणसांपेक्षा आमच्यात असलेल्या इतर वरचढ गुणांचा उल्लेख करायची आवश्यकताच नाही, आम्ही पूर्णपणं दावा करू शकतो की, सजीव प्राण्यांमध्ये आम्ही माणसांपेक्षा एक पायरी उंचावर आहोत.

"तर मला **माझा** घोडा म्हणण्याचा हक्क तबेल्यांच्या राखणदाराला देण्यात आला होता आणि त्या कारणासाठी त्यानं मोतद्दाराला चाबकानं झोडपून काढलं होतं. ह्या शोधामुळं, तसंच माझ्या रंगामुळं लोकांच्या मनात निर्माण होणाऱ्या विचारांमुळं आणि दृष्टिकोनांमुळं, मी हताश बनलो. त्याशिवाय माझ्या आईच्या अप्रामाणिकपणाचं दुःख मनात सलत होतंच. त्या सगळ्यांचा परिणाम मिळून मी आज आहे तसा गंभीर आणि चिंतनशील खसी घोडा बनलो.

"माझं तिहेरी दुर्दैव होतं: मी कबरा होतो, मला खसी

केलेलं होतं आणि कुणाही सजीव प्राण्याप्रमाणं स्वाभाविकरीत्या देवाच्या आणि माझ्या स्वत:च्या मालकीचा असण्याऐवजी, लोकांच्या समजुतीनुसार मी तबेल्याच्या राखणदाराच्या मालकीचा होतो.

"माझ्याबद्दल त्यांनी अशी कल्पना केल्यामुळं अनेक परिणाम घडले होते. पहिला परिणाम म्हणजे इतर घोड्यां-पासून मला अलग ठेवण्यात आलं होतं, अधिक चांगलं खाऊ घालण्यात येत होतं, वारंवार व्यायाम दिला जात होता आणि लौकर गाडीला जोडलं. माझ्या तिसऱ्या वर्षात मला प्रथम लगाम चढवण्यात आला. मला स्वत:ची मालमत्ता समजणारा तो राखणदार अनेक मोतद्दारांना घेऊन मला लगाम चढवायला आला तो दिवस मला आठवतो. मी प्रतिकार करीन आणि मला आवरणं अवघड जाईल अशी त्याची अपेक्षा होती, म्हणून त्यानं अनेक मोतद्दार सांगाती आणले होते. त्यांनी माझा ओठ फाडला. दांड्यांमध्ये मला रेटताना त्यांनी दोरांनी मला बांधून ठेवलं. माझ्या पाठीवर त्यांनी कातडी पट्ट्यांचा मोठा तिढा घातला आणि मी लाथा झाडू नये म्हणून दांड्यांना पट्टे बांधले. आणि हा सारा वेळ मी केवळ एकच एक इच्छेनं भारला होतो: कामाबद्दल माझं प्रेम आणि आतुरता दाखविण्याच्या इच्छेनं!

"एखाद्या जुन्या घोड्याप्रमाणं मला टापा टाकताना पाहून ते चकित झाले. त्यांनी मला गाडीला जुंपलं आणि दुडक्या चालीनं धावण्याचा मी सराव करू लागलो. मी एवढी सुरेख प्रगती केली, की तीन महिन्यांच्या अखेरी जनरलनी आणि इतर अनेकांनी माझ्या चालीचं कौतुक केलं. ऐकायला विचित्र वाटेल, पण मी स्वत:च्या मालकीचा नसून त्या राखणदाराच्या मालकीचा होतो अशी त्यांची कल्पना असल्यामुळंच, त्यांच्या

दृष्टीनं माझ्या चालीला अगदी वेगळा अर्थ होता.

"माझ्या बांधव शिंगरांना शर्यतींना नेत होते, त्यांच्या मगळया नोंदी ठेवण्यात येत होत्या, लोक त्यांना पहायला येत. मुलामेदार दुचाकी गाड्यांना त्या शिंगरांना जोडण्यात येई आणि त्यांच्या पाठीवर किनखापी झुली टाकण्यात येत. मला मात्र राखणदाराच्या सामान्य गाडीला जुंपण्यात येई आणि त्याच्या कामानिमित्तानं चेस्मेन्का आणि इतर वस्त्यांना गाडी खेचत जावं लागे. आणि ह्या सर्वांचं कारण माझा कबरा रंग होता आणि त्यांच्या मतानं मी काऊंटच्या नव्हे, तर राखणदाराच्या मालकीचा होतो म्हणून!

"उद्या जर आपण जिवंत राहिलो तर, मी राखणदाराच्या मालकीचा होतो अशा त्याच्या समजुतीपायी, केवढे गंभीर परिणाम माझ्या आयुष्यात घडले त्याची हकीकत मी तुम्हाला सांगीन."

दुसरा सबंध दिवस सगळे घोडे खोल्स्तोमेरबरोबर अत्यंत अदबीने वागत होते. पण नेस्तर मात्र त्याच्याशी नेहमी-प्रमाणेच तुसडा वागत होता. शेतगड्याच्या नांगराच्या राखाडी घोड्याने कळापर्यंत वाट काढली आणि तो खिंकाळला आणि उदी घोडी पुन्हा त्याच्याशी नखरेबाज वागली.

## प्रकरण सात

### तिसरी रात्र

चंद्रकोर आकाशात उगवली होती आणि इतर घोड्यांच्या गराड्यात कुंपणाच्या मध्यभागी उभ्या असलेल्या खोल्स्तोमेरवर त्या चंद्रकोरीचा प्रकाश पडला होता.

"माझी मालकी काऊंटकडं अथवा देवाकडं नव्हती, तर राखणदाराकडं असल्यामुळं," कबरा खसी घोडा पुढे सांगू लागला, "अत्यंत आश्चर्यकारक परिणाम असा घडला की, माझी चपळ गती, घोड्याचा सर्वात मोठा गुण, माझ्या हद्दपारीचं कारण ठरली.

"एके दिवशी शर्यतीच्या मैदानात लेबेद घोड्याचा सराव चालला होता आणि चेस्मेन्काहून परतणाऱ्या राखणदारानं मला थेट मैदानात नेलं. लेबेद जवळून धावत गेला. त्याची दौड चांगली होती, पण जास्त नखरा दाखवत होता. एक खूर जमिनीला टेकताच दुसरा खूर वर उचलण्याचं तंत्र मी अवगत केलं होतं, त्यामुळं एकही हालचाल वाया जात नसे आणि शरीर पुढं रेटायला प्रत्येक प्रयत्नाचा उपयोग होई. माझं हे तंत्र लेबेदला अवगत नव्हतं. मी म्हटलं तसं लेबेद आमच्या जवळून धावत गेला. मी धावपट्टीवर निघालो आणि राखणदारानं मला थोपवलं नाही. 'कबऱ्याला प्रयत्न करून बघायला काय हरकत आहे?' तो ओरडला आणि जेव्हा पुढच्या वेळी लेबेद आमच्यापाशी आला तेव्हा त्यानं मला सोडलं. लेबेदनं एव्हाना वेग घेतला होता, त्यामुळं पहिल्या फेरीत मी मागं पडलो, पण दुसऱ्या फेरीपासून मी वेग घेऊ लागलो. लेबेदच्या दुचाकी गाडीला मी गाठलं, त्याच्या जोडीनं धावलो आणि त्याला मागं टाकलं. मला पुन्हा एकदा संधी देण्यात आली. पुन्हा तसंच घडलं. मी अधिक वेगवान ठरलो. आणि ह्यामुळं सगळे हादरले. माझा कुणाला पत्ता लागणार नाही अशा दूरच्या ठिकाणी मला विकून टाकण्याचं ठरलं. 'काऊंटच्या कानांवर ही बातमी गेली तर चांगलीच कंबख्ती भरेल!' असं ते म्हणाले.

"म्हणून एका घोडे-विक्रेत्याला मला विकण्यात आलं. बग्गीचा मधला घोडा म्हणून. पण त्या व्यापाऱ्यानं फार काळ मला ठेवलं नाही. नवीन बदली घोड्यांसाठी आलेल्या एका शिलेदारानं मला विकत घेतलं. हे सर्व इतकं क्रूर आणि अन्यायी होतं की, जेव्हा मला ख्रेनोवोपासून दूर नेण्यात आलं, मला प्रिय असलेल्या माझ्या सर्व परिचित जागांपासून दूर नेण्यात आलं, तेव्हा मला आनंद झाला. माझ्या पूर्वीच्या साथीदारांमध्ये राहणं मला फार कष्टाचं ठरलं होतं. त्यांना प्रेम, सन्मान, स्वातंत्र्य लाभत होतं; आणि माझ्या नशिबी केवळ अपमान, अपमान आणि आयुष्याच्या अंतापर्यंत राबणं. का? का म्हणून? केवळ माझा कबरा रंग होता म्हणून आणि त्या कारणासाठी मला दुसऱ्या कुणाचीतरी मालमत्ता बनवण्यात आली होती."

खोल्स्तोमेरला त्या रात्री आपली कहाणी पुढे सांगण्याची संधी मिळाली नाही. काहीतरी घडल्यामुळे घोड्यांमध्ये खूप गडबड उडाली होती. अद्याप न व्यायलेली कूपचिखा घोडी लक्षपूर्वक कहाणी ऐकत होती, पण अचानक वळून सावकाश-पणं ती पडवीत गेली आणि मोठमोठ्यानं कण्हू लागली. तिच्या कण्हण्यामुळे सर्व घोड्यांच्या माना तिच्याकडे वळल्या. कूपचिखा आडवी होत होती, परत धडपडून पायांवर उभी रहात होती, पुन्हा खाली आडवी होत होती, असे त्यांनी पाहिले. कूपचिखाला काय होत होते हे म्हाताऱ्या घोड्यांना उमगले, पण छोटी शिंगरे एवढी घाबरली की, त्यांनी खसी घोड्याला सोडून कूपचिखाभोवती गराडा घातला.

सकाळच्या दरम्यान आपल्या पायांवर थरथरत आणखी एक शिंगरू उभे होते. नेस्तरने मोतद्दाराला बोलावून घेतले

आणि मोतद्दार घोडीला व शिंगराला तबेल्यात घेऊन गेला. नेस्तरने बाकीचा कळप नेहमीप्रमाणे चरायला नेला.

# प्रकरण आठ

## चौथी रात्र

त्या संध्याकाळी, फाटक बंद झाल्यानंतर आणि सर्वत्र स्तब्धता पसरल्यानंतर, कबरा खसी घोडा आपली कहाणी पुढे सांगू लागला.

"एकाच्या हातून दुसऱ्याच्या हाती जात असताना मला खूप माणसं आणि घोडे पहायला मिळाले. दोन मालकांनी मला दीर्घ काळपर्यंत ठेवलं: एक सरदार होता, शिलेदारांचा अधिकारी होता; दुसरी एक म्हातारी होती, चमत्कारी संत निकोलाच्या चर्चपाशी राहणारी.

"माझ्या आयुष्यातले सर्वात चांगले दिवस शिलेदाराच्या संगतीत गेले. जरी माझ्या नाशाला तो कारणीभूत झाला होता, जरी त्यानं आयुष्यात कुणावरही आणि कशावरही कधीही प्रेम केलं नव्हतं, तरी माझं त्याच्यावर प्रेम होतं. त्याच कारणासाठी माझं त्याच्यावर प्रेम होते. तो देखणा होता, श्रीमंत होता, सुखी होता आणि म्हणून कुणावरही प्रेम करत नव्हता, आणि त्याचसाठी मी त्याच्यावर प्रेम करत होतो. तुम्हाला हे समजू शकतं. आपणा घोड्यांमध्ये ही उच्च भावना असते. त्याचा थंडपणा, त्याचं क्रौर्य, माझं त्याच्यावर सर्वस्वी अवलंबून राहणं – ह्यामुळं त्याच्याविषयीच्या माझ्या प्रेमाला एक विशिष्ट बळ प्राप्त झालं. 'मार

मला, ऊर फुटेपर्यंत पळव मला,' त्या मस्त दिवसांमध्ये माझ्या मनात यायचं, 'मला त्याचा केवळ आनंदच होईल.'

"राखणदारानं मला ज्या घोडे-विक्रेत्याला विकलं होतं, त्याच्यापासून शिलेदारानं आठशे रूबलना मला विकत घेतलं. दुसऱ्या कुणापाशीही कबरे घोडे नव्हते म्हणून त्यानं मला विकत घेतलं. माझ्या आयुष्यातले ते सर्वोत्तम दिवस होते. त्याची एक रखेली होती. मला ते माहीत होतं, कारण दररोज मी त्याला तिच्याकडं घेऊन जात होतो आणि काही-वेळा त्या दोघांना एकत्र फिरायला नेत होतो. त्याची रखेली देखणी होती आणि तोसुद्धा देखणा होता. त्यांचा कोचमन-सुद्धा देखणा होता आणि त्यामुळं मला ते आवडत होते. मी अत्यंत आनंदात होतो.

"माझे दिवस असे चालले होते: सकाळी मोतद्दार माझा खरारा करायला यायचा; कोचमन नव्हे, तर मोतद्दार. हा मोतद्दार एका शेतकरी घरातला उमदा तरुण मुलगा होता. आमच्या अंगांमधली वाफ निघून जावी म्हणून आणि लीद बाहेर टाकण्यासाठी तो दार उघडं ठेवायचा. नंतर आमच्या पाठींवरच्या झूली काढून माझ्या खराऱ्याला तो सुरुवात करायचा. माझ्या खुरांमुळं चरे पडलेल्या आणि खोंचे आलेल्या पांढुरक्या तक्तपोशीवर माझ्या खराऱ्यानंतर केस पडायचे. त्या मुलाचा हात मी गंमतीनं चावायचा आणि पाय आपटायचा. माझी पाळी आली म्हणजे थंड पाण्याच्या हौदापाशी मला घेऊन जायचा आणि स्वतःच्या करामतीकडं कौतुकानं टक लावून पहायचा—बाणांसारख्या सरळ आणि रुंद खुरांशी संपणाऱ्या माझ्या पायांकडं, सहज घसरंगळता येईल अशा तुकतुकीत असलेल्या माझ्या चकाकत्या पाठीकडं

आणि पुढ्याकडं. नंतर उंच जाळीवर थोडं गवत फेकण्यात येई आणि लाकडी गव्हाणीत ओट ओतायचे. सरतेशेवटी, फेओफान, मुख्य कोचमन, आत यायचा.

"हा कोचमन थेट आपल्या मालकासारखा होता. दोघंही कुणाला घाबरत नव्हते वा स्वतःशिवाय कुणावर प्रेम करत नव्हते. त्या कारणापायी दोघांवर सगळ्यांचं प्रेम होतं. फेओफान लाल पोलकेवजा सदरा घालायचा, मखमली तुमान चढवायचा आणि बिनबाह्यांचा कोट घालायचा. सणाच्या दिवशी असा बिनबाह्यांचा कोट घालून, तेलपाणी माखलेल्या चकाकत्या केसांनी आणि कल्ल्यांनी त्याची स्वारी तबेल्यात यायची व ओरडायची 'काय रे प्राण्या, विसरलास मला?' आणि सहज गंमतीनं चिमट्याचा दांडा माझ्या फऱ्यात तो किंचित टोचायचा. अशा वेळी मला फार मजा वाटायची. तो गंमत करतो हे मला समजायचं आणि माझे कान पाडून मी दात विचकायचा.

"जोडीमध्ये काम करणारं एक काळं शिंगरू आमच्याकडं होतं. रात्रीच्या वेळी मला त्याच्याबरोबर गाडीला जोडायचे. ह्या पोल्कानला विनोदबुद्धी अजिबात नव्हती आणि तो सैताना-सारखा दुष्ट होता. आमचे स्टॉल एकमेकांशेजारी होते आणि काहीवेळा सळयांमधून आम्ही एकमेकांचे चावे घेत असू व त्यात गंमतीचा लवलेश नसे. फेओफान त्याला भीत नव्हता. तो थेट त्याच्यासमोर चालत जायचा आणि जणू त्याला ठार मारणार अशा पवित्र्यात गर्जना करायचा. पण प्रत्यक्षात मात्र त्याच्या जवळून निघून जायचा आणि काढणी घेऊन परतायचा. एकदा कुझ्नेत्स्की रस्त्यावर पोल्काननं आणि मी दौडायला सुरुवात केली. पण ना कोचमन घाबरला,

ना मालक घाबरला. ते फक्त हसत होते, वाटेत येणाऱ्या लोकांवर ओरडत होते. त्यांनी एवढ्या कौशल्यानं आम्हाला सांभाळलं, की एकही जीव दुखावला नाही.

"त्यांच्या सेवेत मी माझे सर्वोत्तम गुण खर्चले आणि अर्धं आयुष्य वेचलं. त्यांनी मला खूप प्यायला दिल्यामुळं माझे पाय मोडले, पण तरीही माझ्या जीवनातले ते सर्वोत्तम दिवस होते.

"बारा वाजता ते मला गाडीला जुंपायला येत, माझ्या खुरांना वंगण लावत, माझी आयाळ आणि कपाळावरची बट ओली करत आणि दांड्यांमध्ये मला जुंपत.

"आमच्या घसरगाडीला मखमली अस्तर लावलेलं होतं, जोखडावर छोटी चांदीची बकलं होती आणि लगाम व जाळीची दोरी रेशमी होते. जं असं काही होतं की, सर्व पट्टे आणि लगाम जागच्याजागी आवळून बांधल्यानंतर कुठं संपतं आणि घोडा कुठं सुरू होतो ते सांगणं कठीण जायचं. मला बहुधा पडवीतच जुंपायचे. खांद्यांपेक्षा पाठ रुंद असलेला फेओफान एका बगलेत लाल लगाम धरून यायचा, एक पाय रिकीबीत अडकवायचा, काहीतरी थट्टा करायचा आणि दाखवण्यापुरता चाबूक खांद्यावर लोंबता ठेवायचा. त्यानं माझ्यावर चाबकाचा वापर कधीही केला नाही. आणि म्हणायचा: 'चला!' मी बागडत फाटकाबाहेर पडायचा. सांडपाणी बाहेर टाकायला आलेली स्वैपाकीण दारातच थांबून रहायची आणि आवारात सर्पण आणून टाकणारे शेतमजूर बाप्ये आ वासून माझ्याकडं पहात रहायचे.

"फाटकाबाहेर आल्यानंतर थोडं अंतर दूर जाऊन आम्ही थांबत असू. मग इतर हुजरे आणि कोचमन आमच्याभोवती

गोळा होत व त्यांच्या गप्पा सुरू होत. प्रवेशद्वारापाशी आम्ही सगळेजण थांबून रहात असू. काही वेळा तर तीन तीन तासपर्यंत. अधून मधून थोडी दौड करून परत येऊन थांबून रहात असू.

"शेवटी प्रवेशद्वारात एकदम गडबड माजायची आणि पांढऱ्या केसांचा ढेरपोटचा तीखोन बाहेर धावत येऊन ओरडायचा 'चला आणा!' त्या काळात 'आगे बढो!' असं ओरडायची मूर्ख सवय नव्हती. जणू काही पुढं जायचं का मागं जायचं हे जाणायची मला अक्कल नव्हती! फेओफान आपल्या जिभेनं 'च्यॅक' आवाज करायचा. आम्ही दारापाशी जायचो आणि शिरस्त्राण घातलेला, राखाडो केसाळ कातडीत आपला देखणा, लालबुंद, काळ्या भुवयांचा चेहरा लपवलेला—जो कधीही लपवायला नको होता—सरदार अगदी सहज लगबगीनं बाहेर यायचा. ती घसरगाडी, घोडा, हात पसरून अगदी सज्ज पवित्र्यात पाठीची कमान करून बसलेला फेओफान—ह्या सर्व गोष्टी जणू काही खास नव्हत्या अशा थाटात आरांचा, तलवारीचा आणि पितळी टाचांचा खडखडाट करत, गालिच्यावरून भरभर चालत, माझ्याकडं आणि फेओफानकडं लक्ष द्यायला जणू वेळ नसल्याचा आव आणून सरदार बाहेर यायचा. सगळीजणं त्याच्याकडं भीतीनं आणि कौतुकानं टक लावून पहात रहायचे. फेओफान जिभेनं 'च्यॅक' आवाज करायचा, मी लगामाला हिसका देऊन डौलानं चालत स्वारीच्या ठोकळ्यापाशी जायचा. तिथं मी सरदाराकडं एक तिरपा कटाक्ष टाकायचा आणि रेशमी बटा रुळणाऱ्या माझ्या खानदान डोक्याला एक झटका द्यायचा. सरदार जर चांगल्या मन:स्थितीत असला तर फेओफानशी

काहीतरी चतुर बोलायचा, फेओफान आपल्या देखण्या डोक्याला किंचित कलतं करून, हात खाली न करता उत्तर द्यायचा. केवळ मलाच समजेल अशी लगामांची किंचित हालचाल तो करायचा आणि टप टप आवाज करीत आमच्या स्वाऱ्या निघायच्या. दर टापेगणिक माझी गती वाढायची, माझ्या देहामधला प्रत्येक स्नायू थरथरत असायचा, अटकफळीवर बर्फ आणि चिखल उडवीत धावायचा. कोचमनच्या पोटात जणू कळ आल्याप्रमाणं 'एख्' असा उद्‌गार काढायची आणखी एक मूर्ख सवय त्या काळी नव्हती. त्या दिवसां-मध्ये 'सम्हालो' असं ओरडत आणि फेओफान 'सम्हालो' ओरडला म्हणजे रस्त्यावरचे लोक पांगत, वाट मोकळी करून देत आणि माना लांब करून देखणा खसी घोडा, देखणा कोचमन आणि देखणा सरदार पहात..

"धावणाऱ्या दुसऱ्या घोड्याला मागं टाकायला मला आवडायचं. जर फेओफानला आणि मला लायक प्रतिस्पर्धी दिसला तर वाऱ्याच्या वेगानं आम्ही त्याचा पाठलाग करत असू. हळू हळू अंतर कमी करत मी त्या दुसऱ्या घसर-गाडीच्या एवढा जवळ जायचा की, माझ्या टापांचा चिखल दुसऱ्या गाडीच्या मागं उडू लागायचा. नंतर उतारूच्या डोक्यावर फुरफुर आवाज करीत मी पुढं धावायचा, नंतर दुसऱ्या घोड्याच्या जोखडापुढं जायचा आणि मग एवढा पुढं धावायचा की, माझा प्रतिस्पर्धी मला दिसेनासा होई आणि त्याच्या टापांचा आवाज माझ्यामागं मंद मंद होत अजिबात ऐकू येईनासा होई. सरदार, फेओफान आणि मी चकार शब्द काढत नसू. आमच्या कामात आम्ही खूप दंग असल्याचा आव आणत असू आणि वाटेत भेटणाऱ्या दुय्यम

दर्जाच्या घोड्यांकडं ढुंकून पहात नसू. इतर घोड्यांना मागं टाकायला मला आवडायचं, तसंच समोरून धावत येणाऱ्या उमद्या, चांगल्या घोड्याला पहायलाही मला आवडायचं. एक क्षण, बर्फाची सळसळ, एक कटाक्ष आणि तो शेजारून निघून जायचा. आम्ही परत आपापल्या दिशांना एकाकी दौडत रहायचे."

फाटक करकरले आणि नेस्तरचे व वास्काचे आवाज ऐकू आले.

## पाचवी रात्र

हवा बदलत होती. सकाळपासून आकाश ढगाळले होते, दंव पडले नव्हते, पण वातावरण उबदार होते आणि डासांचा सुळसुळाट झाला होता. कळप कुंपणात परत येताच सगळे घोडे कबऱ्या खसी घोड्याभोवती जमा झाले व त्याने आपली कहाणी संपविली.

"लौकरच माझं सुखी जीवन संपुष्टात आलं. अवघी दोन वर्षं ते टिकलं. दुसऱ्या हिवाळ्याच्या अखेरी आयुष्यातला अभूतपूर्व आनंद मी उपभोगला आणि त्यापाठोपाठ सर्वात मोठं दुःख सोसावं लागलं.

"ईस्टरच्या सणाच्या वेळी सरदाराला घेऊन मी शर्यतींना गेलो होतो. आतलास्नी आणि बीचोक हे घोडे शर्यतीत धावणार होते. बेटिंगच्या अड्ड्यात माझा मालक काय बोलला ते मला ठाऊक नाही, पण जेव्हा तो परत आला तेव्हा मला शर्यतीच्या मैदानात नेण्याची त्यानं फेओफानला आज्ञा केली. आतलास्नीबरोबर मला शर्यतीची स्पर्धा करायला लावल्याचं

आठवतं. आतलास्नी दुचाकी गाडी ओढत होता आणि मी शहरची घसरगाडी. वळणावर मी त्याला गाठलं आणि लोकांच्या हंशाचा आणि शाबासकीचा प्रचंड वर्षाव झाला.

"मला नेण्यात आलं तेव्हा लोकांचा भला मोठा जमाव माझ्या मागं धावला. सुमारे पाच अश्वप्रेमींनी सरदाराला माझ्यासाठी काही हजार देऊ केले. तो फक्त हसला तेव्हा त्याचे शुभ्र दात दिसले.

"'छे: छे:', तो म्हणाला, 'तो घोडा नाही, माझा मित्र आहे. सोन्याचा पर्वत दिला तरी मी त्याला विकणार नाही. अच्छा मंडळी,' त्यानं घसरगाडीचं दार उघडलं आणि तो आत बसला.

"'स्तोझेन्का रस्त्यावर चल!' त्याच्या रखेलीचा तो पत्ता होता. आम्ही तडक निघालो.

"आणि मला माहीत झालेला तो शेवटचा सुखी दिवस.

"आम्ही त्याच्या रखेलीच्या घरी पोहोचलो. तिला तो 'आपली' म्हणायचा, पण तिचं दुसऱ्या एकावर प्रेम होतं आणि ती त्याच्याबरोबर कुठंतरी गेली होती. तिच्या घरी गेल्यावर सरदाराला हे सांगण्यात आलं. त्यावेळी पाच वाजले होते आणि माझ्यावरचं जू न काढताच तो तिच्या पाठलागावर निघाला. आणि माझ्या बाबतीत कधीही न घडलेली गोष्ट घडली. मला चाबकाचे फटकारे मारून पळवण्यात आलं. प्रथमच माझी पावलं चुकीची पडली. मी शरमलो आणि चूक सुधारू इच्छित होतो, तेवढ्यात सरदार बेंबीच्या देठापासून ओरडत असलेला मी ऐकलं, 'धाव साल्या!' आणि हवा कापत चाबूक सणसणला व माझ्या पाठीवर उडाला. मी पुढं धाव मारली. धातूच्या

अटकफळीवर माझे पाय आपटत होते. पंचवीस वेर्स्ता दौड केल्यावर आम्ही त्याच्या रखेलीला गाठलं.

"मी त्याला घरी आणलं, पण सबंध रात्र माझं अंग थरथरत होतं आणि मी काहीही खाऊ शकलो नाही. सकाळी त्यांनी मला पाणी दिलं. मी पाणी प्यायलो, पण तेव्हापासून मी वेगळा घोडा बनलो. मी आजारी पडलो, त्यांनी माझे खूप हाल केले. लोकांच्या भाषेत म्हणजे 'उपचार केले.' माझे खूर निसटले, माझ्या अंगावर जखमा चिघळल्या, माझे पाय वाकडे बनले, माझी छाती खपाटीला गेली. माझ्यात उत्साह राहिला नाही आणि शरीरानं मी दुबळा बनलो.

"त्यांनी मला घोड्यांच्या व्यापाऱ्याला विकलं. त्यानं मला गाजरं आणि आणखी काही खाऊ घातलं व अडाणी ग्राहकांना फसविण्यासाठी मला दिखाऊ धडधाकट बनवलं. इतःपर मला ताकद नव्हती आणि चपळ वेगही राहिला नव्हता. एखादं गिऱ्हाईक आलं म्हणजे तो घोड्यांचा व्यापारी माझ्या स्टॉलमध्ये यायचा आणि चाबकानं मला झोडपून माझी घाबरगुंडी उडवायचा, खूप छळायचा. मग चाबकाच्या माराच्या खुणा पुसून टाकायचा आणि मला बाहेर घेऊन जायचा.

"एका म्हातारीनं मला विकत घेतलं. चमत्कारी संत निकोलाच्या चर्चला नेहमी ती मला घेऊन जायची. तिच्या गाडीवानाला ती चाबकानं मारायची. तो गाडीवान माझ्या तबेल्यात येऊन रडायचा. अश्रूंना छान खारट चव असते हे मला त्याच्यामुळं समजलं. मग ती म्हातारी मेली. तिच्या कारभाऱ्यानं मला एका दुकानदाराला विकलं. त्या दुकानदारापाशी असताना मी रगड गहू खाल्ला आणि माझे

आजार वाढले. त्यानं मला एका शेतकऱ्याला विकून टाकलं. मी त्याचा नांगर ओढत होतो आणि जवळ जवळ काहीच खात नव्हतो. पुन्हा मी आजारी पडलो.

"एका जिप्सीशी माझा सौदा करण्यात आला. त्या जिप्सीनं माझे फार फार हाल केले आणि सरतेशेवटी इथल्या वेलिफाला विकलं. तर आता मी इथं आहे."

सगळे गप्प राहिले. पाऊस पडायला आरंभ झाला होता.

## प्रकरण नऊ

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी कळप जेव्हा घरी परतत होता तेव्हा वाटेत त्यांना मालक भेटला आणि मालकाबरोबर एक पाहुणा होता. झूल्दीबा घरापाशी आली तेव्हा तिने प्रथम त्यांना पाहिले: दोन पुरुषांच्या आकृती: त्यातील एक होता गवती टोपी घातलेला तरुण मालक आणि दुसरा होता लष्करी गणवेषातील उंच, लठ्ठ माणूस. म्हाताऱ्या घोडीने त्यांच्याकडे संशयाने पाहिले व ती बाजूला सटकली. बाकीचे घोडे तरुण असल्यामुळे जेव्हा मालक आणि त्याचा पाहुणा सरळ त्यांच्यात घुसले व बोटांनी खुणा करून परस्परांशी बोलू लागले, तेव्हा त्यांना लाजल्यासारखे झाले व ते अस्वस्थ बनले.

"तो पंचरंगी घोडा मी वोयेइकोवपासून विकत घेतला," मालक म्हणाला.

"ती काळ्या रंगाची आणि पांढऱ्या मोजांची शिंगी कुणाची? खूप सुंदर आहे," पाहुणा म्हणाला.

त्या दोघांनी खूप घोडे पाहिले. घोड्यांच्या मागे पळून

आणि त्यांना स्तब्ध उभे रहायला लावून त्यांनी घोडे पाहिले. उदी घोडीकडे त्यांचे ध्यान गेले.

"ती ख्रेनोवोच्या स्वारीच्या घोड्यांच्या जातीतली आहे," मालक म्हणाला.

चालता चालता सर्व घोडे पाहणे त्यांना शक्य झाले नाही. मालकाने नेस्तरला हाक मारली तेव्हा म्हाताऱ्याने कबऱ्या खसी घोड्याच्या कुशीत टाच मारली व दुडक्या चालीने तो मालकाजवळ आला. खसी घोडा एका पायाने लंगडत होता तरी त्याने धावण्याचा प्रयत्न केला. पृथ्वीच्या शेवटच्या टोकापर्यंत उरी फुटेपर्यंत धावायची त्याला आज्ञा केली असती तरी तो मुळीच कुरकुरला नसता हे स्पष्ट होते. भरधाव पळायला त्याला आवडले असते आणि आपल्या धडक्या पायाने त्याने तसा प्रयत्न केला.

"आख्ख्या रशियात तुम्हाला तिच्यापेक्षा चांगली घोडी सापडणार नाही, असं मी छातीठोक सांगू शकतो," एका घोडीकडे बोट दाखवीत मालक म्हणाला. पाहुणा काहीतरी कौतुकादाखल बोलला. मालक उत्तेजित होऊन इकडेतिकडे पळापळ करीत होता, आपली जनावरे दाखवीत होता, त्या प्रत्येक घोड्याचा इतिहास आणि वंशावळ सांगत होता. पाहुणा कंटाळलेला भासत होता, पण आपल्याला रस आहे असे दाखविण्यासाठी तो वेगवेगळे प्रश्न शोधून काढीत होता.

"असं? अरेच्चा," विमनस्कपणे तो उद्गारत होता.

"जरा हिच्याकडे नजर टाका," आपल्या पाहुण्याचे कंटाळलेपण गावीही नसलेला मालक उत्साहाने म्हणाला. "तिचे पाय बघा. खूप महागात पडली मला, पण तिचा तीन वर्षांचा मुलगा एव्हाना धावायला लागलाय!"

"चांगला पळतो?" पाहुण्याने विचारले.

एकामागून एक अशा सर्व घोड्यांबद्दल त्यांनी चर्चा केली आणि शेवटी बोलण्यासारखे काहीही शिल्लक राहिले नाही. एक स्तब्धता पसरली.

"बरं, आपण जऊ या?"

"चला!"

फाटकामधून ते बाहेर गेले. प्रदर्शन संपले म्हणून पाहुणा आनंदला होता. आता घरी जाऊन मस्त पाहुणचार झोडण्याच्या कल्पनेने तो सुखावला होता. आता त्याला उत्साह वाटू लागला होता. ते जात होते तेव्हा पुढील हुकुमांची वाट पहात नेस्तर कबऱ्या घोड्यावर स्वार होता.. पाहुण्याने आपल्या मोठ्या गुबगुबीत हाताने खसी घोड्याच्या पुठ्ठ्यावर थाप मारली.

"हा मस्त घोडा आहे पहा!" तो म्हणाला. "माझा स्वतःचा एकेकाळी एक कबरा घोडा होता. सांगितलेलं आठवतं?"

पाहुण्याचा शेरा मालकाच्या स्वतःच्या घोड्यांबाबत नसल्या-मुळे मालकाने ते बोलणे ऐकले नाही. तो आपल्या कळपाकडे पहात नुसता पुढे जात राहिला.

अचानक त्याच्या अगदी कानापाशी दुबळे, जराजर्जर, विचित्र खिंकाळणे ऐकू आले. खसी घोडा खिंकाळत होता, पण त्याने आपले खिंकाळणे अर्ध्यातच सोडले. पाहुणा अथवा मालक यांपैकी कुणीच त्याच्याकडे लक्ष दिले नाही व ते घरी निघून गेले.

तो लठ्ठ माणूस म्हणजे आपला लाडका मालक होता, एकेकाळी श्रीमंत आणि देखणा असलेला सरदार सेर्पुखोवस्कोय होता, हे खोल्स्तोमेरने ओळखले होते.

# प्रकरण दहा

. . . . . . . . . . . . . . . . . .

पावसाची झिमझिम चालूच राहिली. कुंपणामध्ये भयाणता पसरली होती, पण मोठ्या वाड्यात मात्र वेगळे वातावरण होते. आलीशान दिवाणखान्यात थाटामाटाने चहापान चालू होते. टेबलापाशी यजमान, यजमानीण आणि त्यांचा पाहुणा बसले होते.

यजमानीण गरोदर होती. तिच्या मोठ्या पोटावरून, समोवारपाशी ज्या ताठपणे ती बसली होती त्यावरून, तिच्या लठ्ठपणावरून आणि तिच्या मोठ्या डोळ्यांमध्ये उमटलेल्या दीनवाण्या व गंभीर भावावरून तिची अवस्था स्पष्ट होत होती.

दहा वर्षे जुन्या असलेल्या खास सिगारचे खोके यजमानाने आपल्या हाती धरले होते. तशा सिगार इतर कुणापाशीही नव्हत्या, किंवा निदान तशी तो पाहुण्यापाशी बढाई मारीत होता. यजमान पंचवीस वर्षांचा देखणा, ताज्यातवान्या चेहऱ्याचा, व्यवस्थित केस राखलेला, सुदृढ तरुण होता. लंडनमध्ये शिवलेला ढिल्या अंगाचा वूलन सूट त्याने घरात परिधान केला होता. त्याच्या घड्याळाच्या साखळीवर सोन्याचे अलंकार लोंबत होते. त्याच्या सदऱ्याच्या बाह्यांची बटणेही सोन्याची होती व त्यात फिरोसाचे खडे बसविले होते. त्याने तिसऱ्या नेपोलियनसारखी दाढी राखली होती. त्याच्या वरच्या ओठावर दोन्ही बाजूला उंदराच्या छोट्या शेपट्यां-प्रमाणे मिशा होत्या. त्या मिशांना मेण लावून पॅरिसमधील

फॅशनप्रमाणे व्यवस्थित पीळ दिलेला होता. यजमानीणीने जाळीदार रेशमी लांब झगा परिधान केला होता. त्यावर फुलांच्या गुच्छांचे डिझाईन होते. तिच्या दाट, तपकिरी केसांमध्ये — जरी तिचे ते स्वतःचे नव्हते तरीही अत्यंत सुंदर असलेल्या — दोन सोनेरी आकडे खोवलेले होते. तिच्या हातांवर आणि बोटांवर अनेक मौल्यवान कंकणे व अंगठ्या होत्या. समोवार चांदीचा होता. चहादाणी, कप आणि बशा उत्तम दर्जाच्या होत्या. झकपक खानदानी नोकराचा पोषाख केलेला एक सेवक दाराशी पुतळ्याप्रमाणे स्तब्ध उभा राहून आज्ञेची वाट पहात होता. फर्निचर कोरीव नक्षीकामाचे होते आणि भिंतीवरील कागद काळसर, मोठमोठ्या फुलांच्या ठशांचे होते. टेबलापाशी जातिवंत ग्रेहाऊंड कुत्रा पहुडला होता. त्याच्या गळ्यातील चांदीची साखळी मधून मधून किणकिणत होती. त्या कुत्र्याला एक खासे इंग्रजी नांव दिलेले होते, ज्याचा नीट उच्चार यजमान वा यजमानीण यांच्यापैकी कुणालाही करता येत नव्हता, कारण त्या दोघांनाही इंग्रजी भाषा येत नव्हती. एका कोपऱ्यात फुलांच्या कुंड्यांच्या मध्यभागी जडावकाम केलेला पियानो उभा होता. सर्व सजावटीमध्ये नवेपणा, दुर्मीळता आणि मौल्यवानता जाणवत होती. सारे काही छान होते, पण त्यावर चैनीचा, भपक्याचा आणि बौद्धिक स्वारस्यांच्या अभावाचा ठसा होता.

यजमानाला घोड्यांच्या शर्यतींचा फार नाद होता. तो बळकट, निकोप आणि उत्साही स्वभावाचा माणूस होता. कधीही नाउमेद न होणाऱ्या, सेबल कातडी कोटांमधून वावरणाऱ्या, नटयांना भारी मेजवान्या देणाऱ्या, अत्यंत महागड्या हॉटेलांमधून अत्यंत महागडी, नवनवी मद्ये

पिणाऱ्या, स्वतःच्या नांवाने बक्षिसे देणाऱ्या आणि अत्यंत खर्चिक रखेल्या ठेवणाऱ्या माणसांपैकी तो एक होता.

त्याचा पाहुणा, निकिता सेर्पुखोवस्कोय, चाळीशी उलटलेला, टक्कल पडलेला, मोठ्या मिशा व कल्ले राखलेला माणूस होता. आपल्या तारुण्यात तो खूप देखणा असावा. आता मात्र त्याचा अवतार शारीरिकदृष्टया, नैतिकदृष्टया आणि आर्थिकदृष्टया धुळधाण झालेल्या माणसाप्रमाणे होता.

त्याच्यावर कर्जाचे एवढे मोठे डोंगर चढले होते की तुरुंगवास चुकविण्यासाठी त्याला सरकारी नोकरीत जावे लागले होते. या घटकेला एका प्रांतिक गावाच्या वाटेवर तो निघाला होता. घोड्यांच्या पैदास केंद्राचा प्रमुख म्हणून त्याची त्या गावी नेमणूक झाली होती. ही नोकरीसुद्धा त्याला केवळ नातेवाईकांच्या वशिल्याने मिळाली होती. त्याच्या अंगात लष्करी सदरा आणि निळी तुमान होती. हे कपडे श्रीमंती थाटाचे होते. अंतर्वस्त्रेही तशीच होती आणि त्याचे घड्याळ इंग्लिश बनावटीचे होते. त्याच्या बुटांचा खास तळवा जवळ जवळ इंचभर जाड होता.

निकिता सेर्पुखोवस्कोयने आपली वीस लाख रूबलची इस्टेट गमावली होती आणि आत्ता तो एक लाख वीस हजार रूबलच्या कर्जात होता. मोठी इस्टेट असलेल्या माणसाला कीर्ती लाभल्यामुळे कर्जाऊ पैसे मिळत जातात आणि आणखी दहा वर्षेपर्यंत तो चैनीत जगू शकतो. हा दहा वर्षांचा काळ संपला होता, कीर्ती विरून गेली होती आणि निकिताचे आयुष्य आता एक ओझे बनले होते. तो दारू प्यायला लागला होता. म्हणजे दारू त्याला नशा चढवू लागली होती. यापूर्वी त्याला असे कधीही होत नव्हते. मद्यपानाच्या बाबतीत

बोलायचे तर त्याने कधी खरी सुरुवातही केली नव्हती आणि अखेरही केली नव्हती. त्याच्या नजरेच्या चलबिचलीवरून (त्याचे डोळे भिरभिरू लागले होते) आणि त्याच्या आवाजामधील व हालचालींमधील अडखळण्यावरून त्याची पतित स्थिती उघड होत होती. हा अस्वस्थपणा त्याला नवा होता हे पाहणाऱ्याला विशेष ठळकपणे जाणवायचे. यापूर्वी कधीही कशाचीही आणि कुणाचीही त्याला भीती नव्हती व अगदी अलिकडील दैवघटित बदलांमुळे त्याच्या स्वभावाशी मुळीच न जुळणाऱ्या भित्र्या मन:स्थितीत त्याला टाकले होते. यजमान आणि यजमानीण अशा दोघांच्याही ध्यानात हे आले. एकमेकांचे विचार समजल्याचे आणि झोपायच्या वेळेपर्यंत ह्या माणसाविषयीची चर्चा लांबणीवर टाकण्याचे सूचित करणाऱ्या नेत्रकटाक्षांची त्यांनी देवघेव केली. सध्याच्या घटकेला बिचाऱ्या निकिताला ते सहन करणार होते आणि त्याच्याशी चांगलेही वागणार होते. आपल्या यजमानाचे सुख पाहून निकिता अपमानीत झाला. कधीही परत येऊ न शकणाऱ्या आपल्या भूतकाळाच्या आठवणी त्याची इच्छा नसतानाही त्याच्या मनात दाटल्या व त्याला मत्सराने ग्रासले.

"मारी, आम्ही धूम्रपान केलं तर चालेल?" त्याने त्या स्त्रीला विचारले. खूप अनुभवांती कमावलेल्या त्याच्या त्या विशिष्ट, फसव्या स्वरात नम्रता व मैत्रीभाव होता, पण पूर्णत: आदर नव्हता. उच्चभ्रू माणसे आपल्या मित्रांच्या रखेल्यांशी बोलताना आणि पत्नींशी बोलताना जो भेद दाखवतात, तो भेद त्या स्वरात ठळक होता. तिचा अपमान करण्याचा त्याचा हेतू होता असे मुळीच नव्हे, उलट तिचा

आणि यजमानाचा अनुग्रह प्राप्त करण्याची त्याची इच्छा होती. मात्र अशी कबुली त्याने खचितच दिली नसती. फक्त एवढेच की, अशा स्त्रियांशी अशा स्वरात बोलण्याची त्याची सवय होती. त्याने जर तिला खानदान गृहिणीप्रमाणे समजून वर्तन केले असते तर ती स्वतःच चकित झाली असती, एवढेच नव्हे तर त्याचा तिला अपमान वाटला असता, हे त्याला माहीत होते. शिवाय, आपल्या समान दर्जाच्या माणसाच्या खऱ्या पत्नीबरोबर बोलण्यासाठी वापरायचा मान्यवर आदरणीय स्वर त्याला शिलकीत ठेवायचा होता. रखेली म्हणून राहणाऱ्या बायकांशी तो नेहमी आदराने बोलायचा ; पण याचा अर्थ मासिकांमधून व्यक्त होणाऱ्या तथाकथित मतांशी तो सहमत होता असे मुळीच नाही (असला कचरा तो कधीही वाचत नसे). प्रत्येक व्यक्तीला तिचा दर्जा ध्यानात न घेता माणूस म्हणून वागवावे, लग्नाचा फोलपणा व तत्सम मतांशी तो सहमत होता असे मुळीच नव्हे. तर सर्व सभ्य माणसे अशा स्त्रियांना त्या तऱ्हेने वागवीत होती व जरी त्याचा अधःपात घडला होता तरी तो अत्यंत सभ्य होता, म्हणून तसे वागत होता.

त्याने सिगार घेतली. यजमानाने पोच न ठेवता मूठभर सिगार उचलल्या आणि त्याला देऊ केल्या.

"घे, किती छान आहेत हे तुला समजेलच."

निकिताने सिगार बाजूला सारल्या. त्याच्या डोळ्यांमध्ये अपमानाची आणि दुखावल्याची भावना चमकली.

"आभारी आहे." त्याने आपली सिगार-केस पुढे केली. "माझी ओढून पहा."

यजमानीण अधिक संवेदनाक्षम होती. जे काही घडले ते

ध्यानात घेऊन ती घाईघाईने म्हणाली, "मला सिगार फार फार आवडतात. माझ्याभोवतालची प्रत्येक व्यक्ती जर नेहमी धूम्रपान करत नसती, तर स्वतः धूम्रपान करण्याचा मला नक्की मोह झाला असता."

आणि तिने आपले ठेवणीतले एक सुंदर, प्रेमळ स्मित केले. प्रतिसादादाखल त्याने अर्धवट स्मित केले. त्याचे दोन दात पडलेले होते.

"नाही, हीच घे," बोथट भावनांचा यजमान आग्रह करीत म्हणाला. "दुसऱ्या सिगार तेवढ्या दमदार नाहीत. फ्रित्स, आणखी एक पेटी आणा. तिथं दोन आहेत."

जर्मन नोकराने सिगारची नवी पेटी आणली.

"कोणत्या जास्त आवडतात तुला? कडक? ह्या झकास आहेत. सगळ्या घे," यजमान आग्रह करीत राहिला. आपल्याजवळील दुर्मीळ गोष्टी दाखविण्याच्या हव्यासापायी त्याला इतर सर्व शिष्टाचारांचा विसर पडायचा. सेर्पुखोवस्कोयने सिगार पेटविली आणि त्यांनी सुरू केलेले संभाषण पुढे चालू ठेवण्याच्या इराद्याने तो घाईघाईने म्हणाला:

"तर आतलास्नी तुला केवढ्याला पडला?"

"खूप महाग. किमान पाच हजार. पण घोडा त्या लायकीचा होता. त्याची प्रजा फार सुरेख निपजलीय!"

"शर्यतीची आहेत?"

"अगदी प्रत्येक. यंदा त्याच्या मुलानं तीन बक्षिसं पटकावली: तूलामध्ये, मॉस्कोत आणि पीटरबुर्गमध्ये वोयेइकोवच्या वोरोनोयशी त्यानं स्पर्धा केली. त्या पाजी जॉकीनं चार चुकांचा गोंधळ घातला नसता तर त्यानं घोड्यामागंच त्याला ठेवला असता."

"अजून थोडा कच्चा आहे तो. माझं मत सांगायचं तर त्याच्यात ज्यू रक्त जरा जास्तच आहे," सेर्पुखोवस्कोय म्हणाला.

"घोड्या कशा आहेत? उद्या तुला दाखवीन. दोब्रीन्याला मी तीन हजार मोजले आणि लास्कवायाला दोन हजार."

पुन्हा एकदा यजमान आपल्या श्रीमंतीची फुशारकी मारू लागला. सेर्पुखोवस्कोयला ते क्लेशदायी वाटत होते व ऐकण्याचा तो केवळ बहाणा करीत होता हे यजमानीणीला समजत होते.

"तुम्ही आणखी चहा घेणार?" तिने विचारले.

"नाही," यजमान उत्तरला आणि पुढे बोलत राहिला. ती उठली, पण यजमानाने तिला थांबविले, आपल्या बाहूंचा तिच्याभोवती विळखा घातला आणि तिचे चुंबन घेतले.

त्यांना पहात असताना सेर्पुखोवस्कोय स्मित करण्याच्या बेतात होता. त्यांच्यासाठी त्याला कृत्रिम स्मित करणे भाग होते. पण जेव्हा यजमान उठला, तिच्या कमरेभोवती हात घालून त्याने तिला दारापर्यंत पोहोचविले, तेव्हा सेर्पुखोवस्कोयच्या चेहऱ्यावरील भाव अचानक बदलला. त्याने एक मोठा उसासा टाकला आणि त्याच्या सुजल्या चेहऱ्यावर निराशा दाटली. तिच्यात रागीट तिरस्काराची एक छटाही सामावली होती.

## प्रकरण अकरा

यजमान सस्मित मुद्रेने परतला आणि निकितासमोर बसला. थोडा वेळपर्यंत ते दोघे काहीच बोलले नाही.

"तू त्याला वोयेइकोवपासून विकत घेतलंस असं म्हणालास?" सेर्पुखोवस्कोयने आकस्मिकपणे विचारले.

"होय, आतलास्नीला. मला दूबोवित्स्कीकडून एक घोडी घ्यायची होती, पण तिथं विशेष लायक काही सापडलं नाही."

"त्याचं दिवाळं वाजलंय," सेर्पुखोवस्कोय म्हणाला, मग एकदम थांबला आणि त्याने भोवती नजर टाकली. ह्या "दिवाळे वाजलेल्या" सद्‌गृहस्थाला तो वीस हजार रूबल देणे लागत होता याची त्याला आठवण झाली. दूबोवित्स्कीचे दिवाळे वाजले असे जर लोक म्हणत होते, तर त्याच्याबद्दल काय बोलत असतील? तो गप्प झाला.

पुन्हा एकदा दीर्घ काळ शांतता नांदली. आपल्या पाहुण्यासमोर बढाई मारण्याच्या सर्व गोष्टींची यजमानाने ह्या दरम्यान मनातल्या मनात उजळणी केली. आपले दिवाळे वाजलेले नाही असे दाखविण्यासाठी काय बोलावे याचा सेर्पुखोवस्कोय विचार करीत राहिला. पण सिगारचे जोरदार झुरके मारूनही दोघांची मने ढिलेपणाने काम करीत होती.

"हा मला दारू कधी पाजणार?" सेर्पुखोवस्कोयने मनाशी विचार केला.

"आता दारू प्यायलीच पाहिजे, नाही तर ह्याच्याबरोबर कंटाळून मरण येईल," यजमानाच्या मनात आले.

"इथं बराच काळ राहण्याचा तुझा विचार आहे?" सेर्पुखोवस्कोयने विचारले.

"आणखी एक महिना. बरं आता जेवू या काय? फ्रित्स, जेवण तयार आहे ना?"

ते भोजन-दालनात गेले. एका झुंबराखाली शमादानासह

एक टेबल होते व त्यावर सर्व उत्तम गोष्टी मांडलेल्या होत्या: सिफॉन, बुचात बाहुल्या अडकवलेल्या बाटल्या, वोदका, खास मद्ये भरलेली काचपात्रे, स्वादिष्ट खाद्यपदार्थ. ते प्यायले, खाल्ले, परत प्यायले, परत खाल्ले आणि शेवटी बोलायला सुरुवात केली. सेर्पुखोवस्कोयचा चेहरा लालबुंद बनला आणि आता कसलीही भीड न बाळगता तो बोलू लागला.

बायकांविषयी त्यांनी चर्चा केली. जिप्सी बायका, फ्रेंच बायका, नर्तिका—ज्या ज्या बायकांबरोबर ते राहिले होते त्यांच्याविषयी ते बोलले.

"तर तू मातीयेला सोडलंस?" यजमानाने विचारले. ह्या मातीये नांवाच्या बाईनेच सेर्पुखोवस्कोयचा सर्वनाश केला होता.

"मी नाही सोडलं! तिनं मला टाकलं! छे:! पुरुषाला कशाकशामधून जावं लागतं! आजकाल हजार रूबल हाती आले तर आनंद होतो आणि सगळ्यांपासून दूर जाण्यात सुख वाटतं. इतःपर मॉस्कोत राहणं मला शक्य नाही. छे:! आठवण झाली तरी अंगावर काटा येतो!"

यजमानाला सेर्पुखोवस्कोयचे बोलणे ऐकायचा कंटाळा आला होता. त्याला स्वतःबद्दल बोलायचे होते, बढाया मारायच्या होत्या. आणि सेर्पुखोवस्कोयला स्वतःबद्दल, आपल्या दैदिप्यमान भूतकाळाबद्दल बोलायचे होते. यजमानाने त्याच्या प्याल्यात मद्य ओतले आणि त्याचे बोलणे संपायची तो वाट पाहू लागला. इतर कुणी यापूर्वी विचारसुद्धा केला नसेल अशा पद्धतीने आपण आपला स्टड-फार्म कसा उभा केला होता हे त्याला सांगायची घाई झाली होती. मारी केवळ पैशाखातर

त्याच्यावर प्रेम करीत नाही, तर पूर्ण तनमनाने त्याच्यावर लोभावली आहे, हे सांगायची त्याची इच्छा होती.

"मी तुला आता सांगणार होतो की, माझ्या फार्मवर–" त्याने बोलायला आरंभ केला, पण सेर्पुखोवस्कोयने त्याला मध्येच अडविले.

"मी खरं खरं म्हणू शकतो की, एक काळ असा होता त्यावेळी मी आयुष्यावर प्रेम केलं आणि कसं जगायचं ते मला ठाऊक होतं," तो म्हणाला. "तू आत्ता घोडागाडी-मधून जाण्याबद्दल बोललास. मग सांग मला, कोणत्या सर्वात वेगवान घोड्याच्या गाडीतून तू फिरला आहेस?"

आपल्या स्टड-फार्मविषयी बोलण्याची संधी मिळाली म्हणून यजमान एकदम खूष झाला, पण त्याने बोलायला सुरुवात करायच्या आधीच सेर्पुखोवस्कोयने परत खंड पाडला.

"खरंच," तो म्हणाला, "तुम्ही स्टड-फार्मचे मालक प्रसिद्ध बनायला हपापलेले असता. पण स्वतः आनंद लुटत नाही, मजेत वेळ घालवत नाही. मी तसा कधीच नव्हतो. आज मी तुला सांगितलेलं आठवतं की, एकदा माझ्यापाशी एक कबरा घोडा होता, अगदी तुझा राखणदार ज्या घोड्यावर बसला होता तसा ठिपकेदार? वा, काय घोडा होता! तुझा विश्वास बसणार नाही. खूप पूर्वीची, ४२ सालची गोष्ट आहे. मी नुकताच मॉस्कोत आलो होतो. एकदा एका घोड्यांच्या व्यापाऱ्याकडं गेलो आणि कबरा खसी घोडा नजरेला पडला. चांगला गुणी. किंमत? एक हजार. मला आवडला, विकत घेतला आणि गाडीला जुंपून फिरू लागलो. त्या घोड्याच्या तुल्यबळ घोडा ना तुझ्यापाशी, ना माझ्या-पाशी ना कुणापाशी कधी होता अथवा कधी असणार नाही.

वेग, ताकद, सौंदर्य याबाबतीत त्याची जोडच नाही! त्या-वेळी तू बच्चा होतास. तुला माहीत असणं शक्य नाही, पण त्याच्याबद्दल ऐकलं असशील. सगळ्या मॉस्कोला ठाऊक होतं."

"हो, मला वाटतं, मीसुद्धा ऐकलंय त्याच्याबद्दल," अनिच्छेने यजमान म्हणाला. "पण मला सांगायचं होतं की, माझा..."

"अर्थात तू ऐकलं असणार! मी तसाच त्याला विकत घेतला होता. ना कसले कागदपत्र, ना वंशावळ ना शिफारस. वोयइकोवनं आणि मी त्याचं खानदान शोधून काढलं. त्याचं नांव होतं खोल्स्तामेर. पहिल्या ल्यूबेझ्नीचा मुलगा. त्याची ढांग एक वारभर लांब. ख्रेनोवो स्टड-फार्मनं त्याला तबेल्यांच्या राखणदाराला विकलं, कारण तो कबऱ्या रंगाचा होता आणि राखणदारानं त्याला खसी बनवून घोड्यां-च्या व्यापाऱ्याला विकलं. त्या घोड्यासारखा घोडा कधी झालाच नाही! व्वा! काय दिवस होते! तारुण्याचे! माझ्या हरवलेल्या तारुण्याचे!" एक जिप्सी गाणे उद्‌धृत करीत त्याने उसासा टाकला. त्याला नशा चढू लागली होती. "खरंच, ते मस्त दिवस होते. मी पंचविशीत होतो, वर्षाला ऐंशी हजाराचं उत्पन्न होतं, एकही केस पांढरा नव्हता, माझे सगळे दात शाबूत होते, प्रत्येक दात मोत्या-सारखा होता. हात लावीन त्या प्रत्येक गोष्टीत यश लाभत होतं आणि आता... सारं काही संपलंय!"

"आत्ता घोडे ज्या वेगानं पळतात तो वेग त्या काळी नव्हता," मधल्या विरामाचा फायदा घेऊन यजमान

म्हणाला. "तुला सांगतो, माझे पहिले घोडे धावायला लागले..."

"तुझे घोडे! पण त्या काळी खूप वेगानं धावणारे घोडे होते..."

"खूप वेगानं म्हणजे?"

"म्हणजे... खूप वेगानं! मॉस्कोतल्या शर्यतींमध्ये एकदा त्रोल्स्तामेरला पळायला लावलेलं मला आठवतंय. माझे स्वतःचे घोडे शर्यतींमध्ये मी कधी दाखल केले नाही. मला रेसचे घोडे कधीच आवडले नाही. फक्त अस्सल जातकुळीचे घोडे बाळगले: जनरल, शोले, मोहंमद, कबऱ्याला मी गाडीला जुंपायचा. माझ्यापाशी कोचमनसुद्धा खासा होता. फार आवडायचा मला. दारू पिऊन पिऊन मेला. तर मी रेसच्या मैदानावर गेलो. 'तू रेसचे घोडे केव्हापासून बघायला लागशील सेर्पुखोवस्कोय?' त्यांनी मला विचारलं. 'मला काय करायचेत रेसचे घोडे? माझा हा कबरा तुमच्या सगळ्या पट्टीच्या घोड्यांना हरवील,' मी म्हणालो. 'ह्या जन्मी शक्य नाही,' ते म्हणाले. 'हजार रूबलची पैज' मी म्हणालो. आम्ही पैज लावली. घोड्यांची शर्यत लावली. माझा पाच सेकंदांनी पहिला आला आणि मी हजार रूबल जिंकले. पण ते काहीच नव्हे. एकदा तर मी जातिवंत घोड्यांच्या त्रोयका*मधून तीन तासात शंभर वेर्स्ता अंतर काटलं होतं. सगळ्या मॉस्कोत चर्चा झाली होती."

---

* त्रोयका – तीन घोडे जोडलेली रशियन धाटणीची घोडागाडी – अनु.

सेर्पुखोवस्कोय इतका सतत आणि कौशल्याने खोटे बोलत होता, की यजमानाला त्याचा एकही शब्द खोडून काढणे शक्य होत नव्हते. भकास मुद्रा करून त्याच्या समोर तो बसला होता व स्वतःसाठी आणि आपल्या पाहुण्यासाठी मधून मधून मद्य ओतण्यात विरंगुळा शोधत होता.

उजाडू लागले होते. अजूनही ते बसले होते. यजमान कमालीचा कंटाळला होता. तो उठला.

"मला वाटतं, आता झोपू या," सेर्पुखोवस्कोय म्हणाला आणि लटपटत्या पायांनी, धापा टाकीत तो आपल्या खोलीकडे गेला.

यजमान आपल्या रखेलीशेजारी निजला होता.

"छे:, अगदी अशक्य माणूस आहे. खूप झिंगला आणि नुसत्या थापा मारत होता."

"आणि माझ्याशी चावटपणा करायचा त्यानं प्रयत्न केला."

"तो कर्जाऊ पैसे मागेल अशी मला भीती वाटते."

संपूर्ण कपड्यांसह धापा टाकीत सेर्पुखोवस्कोय पलंगावर आडवा पडला होता:

"मी फार थापा मारल्या," त्याच्या मनात आले. "काय बिघडलं? दारू छान होती. पण तो साला डुक्कर आहे. एखाद्या व्यापाऱ्यासारखा. आणि मीही डुक्कर..." तो स्वतःशी म्हणाला आणि खो खो हसत सुटला. "पूर्वी मी त्यांना ठेवायचा, आता त्या मला ठेवतात. ती विंकलर मला ठेवून आहे... तिच्यापासून पैसे घेईन. त्याला असाच

...डा शिकवला पाहिजे, त्याची लायकीच तशी आहे. पण ...ना अंगातले कपडे काढावे. हे पायातले बूट निघता निघत ...होन."

"अरे ए!" तो ओरडला, पण त्याच्या दिमतीला असलेला ...गूम केव्हाच झोपी गेला होता.

तो उठून बसला; आपला सदरा, जाकीट त्याने काढले, ...जार कशीबशी उतरविली, पण बूट काढणे काही त्याला ...मेना. त्याचे सुटलेले मऊ पोट अडथळा आणत होते. शेवटी ...क बूट निघाला, पण कितीही धापा टाकल्या आणि खेचले ...री दुसरा बूट निघेना. म्हणून एक बूट तसाच पायात ...वून तो बिछान्यावर पालथा पडला आणि घोरायला ...गला. सबंध खोलीमध्ये तंबाखूचा, दारूचा आणि घाणेरड्या ...र्धक्याचा दर्प भरून राहिला.

# प्रकरण बारा

त्या रात्री खोल्स्तोमेरला अनेक गोष्टींची आठवण करणे ...क्य होते, पण वास्काने त्यात विघ्न आणले. वास्काने ...च्या पाठीवर झूल टाकली आणि दौडत दौडत एका ...घापाशी नेले. सबंध रात्रभर त्याला एका शेतकऱ्याच्या ...ड्यापाशी बाहेर बांधून ठेवले. दोन घोडे एकमेकांना ...टून राहिले. सकाळी वास्का आणि खोल्स्तोमेर कळपात ... आले व खोल्स्तोमेरने स्वतःचे अंग खाजवायला प्रारंभ केला.

"मला एवढी खाज का सुटतेय?" त्याने मनाशी नवल ...ले.

पांच दिवस उलटले. घोड्यांच्या डॉक्टरला बोलाविण्यात आले.

"ह्याला खवडा झालाय," घोड्यांचा डॉक्टर आनंदाने म्हणाला. "जिप्सींना विकून टाका."

"कशाला? मुंडकं कापा त्याचं. मात्र कसंही करून आजच्या आज त्याची ब्याद टाळा."

सकाळ नितळ आणि निवांत होती. कळप कुरणामध्ये गेला होता. खोल्स्तोमेर मागे राहिला होता. एक विचित्र दिसणारा माणूस त्याच्यापाशी आला. हडकुळा, काळसर, घाणेरडा आणि कोटावर अनेक डाग पडलेला. तो जनावरांची कातडी सोलून काढणारा माणूस होता. खोल्स्तोमेरकडे नजरही न टाकता त्याने काढणी हाती धरली व तो निघाला. खोल्स्तोमेर मुकाटपणे, मागे वळून न पाहता, नेहमीप्रमाणे पाय फरफटत, त्याच्यामागून निघाला. त्याचे मागचे पाय गवतामध्ये अडखळत होते. कुंपणाबाहेर पडल्यानंतर तो विहीरीच्या दिशेने वळला, पण त्या माणसाने त्याला मागे खेचत म्हटले:

"आता काय उपयोग?"

त्या माणसाने आणि मागून येणाऱ्या वास्काने खोल्स्तोमेरला घळीमागील विटांच्या एका आडोशात नेले. अत्यंत सामान्य दिसणाऱ्या त्या स्थळी काहीतरी असामान्य असल्याप्रमाणे एकदम ते थांबले. मग त्या माणसाने काढणी वास्काच्या हाती दिली, अंगातील कोट काढला, बाह्या वर सरसावल्या, बुटाच्या वरच्या भागातून सुरा व धार लावायचा दगड बाहेर काढला आणि सुऱ्याच्या पात्याला धार लावायला सुरुवात केली. काढणीच्या दोराला चघळून वेळ

[illegible] म्हणून खसी घोड्याने त्याला तोंडात पकडण्याचा [illegible] केला. पण दोर खूप दूर होता. म्हणून त्याने एक [illegible] व डोळे मिटून घेतले. त्याचा ओठ खाली [illegible]. पिवळ्या दातांचे खुंट त्यामधून डोकावत होते. [illegible] लावतांना होणाऱ्या आवाजाच्या तालावर तो [illegible] लागला. फक्त त्याच्या सुजलेल्या दुखऱ्या पायाची [illegible] त्रास देत होती. अचानक कुणीतरी त्याचा [illegible] पकडला आणि डोक्याला वर झटका दिला असे त्याला [illegible]. त्याने डोळे उघडले. त्याच्यासमोर दोन कुत्रे उभे [illegible] दिसले. एक कुत्रा त्या धार लावणाऱ्या [illegible] दिशेने हवा हुंगत होता आणि दुसरा खसी [illegible] कसल्यातरी अपेक्षा नजरेत धरून टक लावून पहात [illegible] खसी घोड्याने एकवार त्यांच्याकडे पाहिले आणि [illegible] धरून ठेवणाऱ्या हाताला आपला गाल घासायला [illegible] केली.

“माझ्यावर उपचार करणार असं दिसतं,” त्याच्या मनात [illegible]. “करूं देत बापडे!”

आणि खरेच, ते त्याच्या गळ्याला काहीतरी करीत असल्याचे [illegible] जाणवले. एकदम खुपसल्याची वेदना झाली. तो [illegible] आणि त्याने पाय झाडले. मग स्वतःला आवरून [illegible] काय घडते याची तो वाट पाहू लागला. त्याच्या माने-[illegible] आणि छातीवरून गरम द्रव पदार्थ ओघळू लागला. [illegible] एवढा खोल श्वास ओढला की, त्याचे पोट एकदम [illegible] आणि क्षणात त्याला खूप छान वाटले. त्याच्या [illegible]चे पूर्ण ओझे त्याच्यापासून दूर पडले. त्याने डोळे [illegible] व डोके खाली झुकविले. कुणीही त्याचे डोके सावरले

नाही. त्याची मान खाली पडली, त्याचे पाय थरथरू लागले आणि त्याचे शरीर डळमळू लागले. त्याला भीतीपेक्षा आश्चर्य अधिक वाटत होते. सर्व काही वेगळे होते. त्या आश्चर्यात असतानाच त्याने पुढे झेपावायचा, वर उडी मारायचा प्रयत्न केला, पण त्याचे पाय एकमेकांमध्ये अडकले व तो एका अंगावर खाली कलंडू लागला. स्वतःला सावरण्याच्या प्रयत्नात त्याने डाव्या बाजूला पुढे झेप घेतली. त्याचे आचके संपे-पर्यंत कसायाने वाट पाहिली व कुत्र्यांना थोपवून धरले. मग जवळ जाऊन त्याने घोड्याचा एक पाय पकडला आणि घोड्याला उताणे केले. कातडी सोलून काढीपर्यंत घोड्याचे पाय धरून ठेवायला त्याने वास्काला सांगितले.

"उमेदीच्या काळात चांगला घोडा होता," वास्का म्हणाला.

"आणि आणखी थोडं मांस असतं तर कातडी चांगली असती," कसाई म्हणाला.

संध्याकाळी घोड्यांचा कळप टेकाड चढून वर आला तेव्हा डाव्या अंगाच्या घोड्यांना दिसले की, जमिनीवर पडलेल्या एका तांबड्या वस्तूभोवती कुत्र्यांचा गराडा पडला होता व काही कावळे आणि घारी वर घिरट्या घालत होत्या. एका कुत्र्याने त्या वस्तूला आपल्या दोन पंजांमध्ये धरले आणि तिच्यात दात खुपसून, डोक्याला हिसडे मारून काडदिशी आवाज करीत लचका तोडला.

उदी घोडी स्तब्ध उभी राहिली. तिने मान ताणून खूप वेळपर्यंत हवा हुंगली. तिला तेथून दूर नेण्यास इतरांना बरेच प्रयास पडले.

पहाटेच्या वेळी, जुन्या जंगलामधून घळीपर्यंत येऊन पोहोचलेल्या खुरटचा झुडुपांमध्ये लांडग्याची काही पिल्ले आनंदाने चीत्कारत होती. त्या पाच पिल्लांपैकी चार एकसारख्या आकाराची होती व सर्वांत लहान दिसणाऱ्या पिल्लाचे डोके त्याच्या देहापेक्षा मोठे होते. एक हडकुळी आणि दुबळी लांडगीण झुडुपांमधून बाहेर आली. तिच्या सुकलेल्या पोटाखालील स्तन जमिनीवर लोंबत होते. अर्धवर्तुळात बसलेल्या आपल्या पिल्लांसमोर येऊन ती बसली. सर्वांत छोटचा पिल्लापाशी जाऊन तिने आपले पुढचे पाय वाकविले, डोके खाली घातले, जबडा उघडला, आपल्या पोटाला काही आचके दिले आणि घोडचाच्या मांसाचा एक मोठा तुकडा बाहेर टाकला. मोठी पिल्ले तात्काळ पुढे धावली, पण आईने त्यांना मागे हाकलले व सबंध तुकडा त्या छोटचा पिल्लाला दिला. छोटचाने रागावल्याप्रमाणे गुरगुर आवाज केला, मांसाचा तुकडा पकडला व आपल्या पंजांमध्ये धरून त्याचे लचके तोडायला आरंभ केला. आईने त्याच पद्धतीने दुसरा, तिसरा तुकडा फेकला. पाचही पिल्लांना तिने अशा रीतीने खाऊ घातले. त्यानंतर केवळ ती त्यांच्यापाशी आडवी झाली व विश्रांती घेऊ लागली.

आठवडाभराच्या अवधीत त्या विटांच्या आडोशामध्ये फक्त मोठी कवटी आणि दोन फऱ्यांची हाडे उरली. बाकी सर्व अदृश्य झाले होते. उन्हाळयासाठी हाडे गोळा करणाऱ्या एका शेतमजुराने ती कवटी व फरे उचलले आणि गरजेसाठी जमिनीत पुरून ठेवले.

त्यानंतर खूप काळाने, खात आणि पोत राहिलेल्या सेर्गुखोवस्कोयचा मृत देह जमिनीत गाडण्यात आला. त्याची कातडी, हाडे आणि त्याचे मांस यांचा कुणालाच उपयोग नव्हता. आणि त्याचा मृत देह सुमारे वीस वर्षे पृथ्वीवर फिरताना जसे ओझे होता, त्याचप्रमाणे त्याचा देह मातीत लोटण्याचे काम ज्यांना करावे लागले त्यांना तो त्रासच वाटला.

दीर्घ काळपर्यंत कुणालाही त्याची गरज नव्हती, त्याचा केवळ त्रासच वाटत होता; तरीही, मृतांना पुरणाऱ्या मृतांनी त्याच्या फुगलेल्या, सडणाऱ्या देहाला उत्तम गणवेष व बूट चढविणे आवश्यक मानले, चारही कोपऱ्यांना गोंडे लावलेल्या सुरेख नव्या शवपेटीत त्याचा देह ठेवला, ही नवी शवपेटी दुसऱ्या एका जस्ताच्या शवपेटीत घालून मॉस्कोला नेली. तेथे दुसरी अधिक जुनी मानवी हाडे उकरून काढण्यात आली व नेमक्या त्याच जागी त्याचा नव्या गणवेषामधील आणि चकचकीत बुटांमधील किडे पडलेला, सडणारा देह जमिनीत पुरण्यात आला.

१८८५

# इवान इल्यिचचा मृत्यू

## १

न्यायालयाच्या मोठ्या इमारतीमध्ये मेल्विन्स्की खटल्याच्या सुनावणीच्या मध्यांतराच्या वेळी, खटला चालविणारी माणसे आणि सरकारी वकील इवान येगोरोविच शेबेक यांच्या कचेरीत जमले होते व प्रसिद्ध क्रासोव खटल्यावर संभाषण केंद्रित झाले होते. तो खटला न्यायालयाच्या कक्षेत नव्हता असे फ्योदर वासिल्येविच तावातावाने सांगत होते, पण इवान येगोरोविच आपल्या मतापासून ढळायला मुळीच तयार नव्हते. प्योत्र इवानोविच ह्या वादामध्ये आरंभापासूनच भाग घेत नव्हते. नुकत्याच आलेल्या ताज्या वर्तमानपत्राच्या वाचनात ते मग्न होते.

"सभ्य गृहस्थहो!" ते म्हणाले. "इवान इल्यिच वारले."

"खरंच?"

"हे वाचा," असे म्हणून त्यांनी फ्योदर वासिल्येविच यांच्या हाती वर्तमानपत्र दिले. त्या ताज्या अंकाला अद्याप छपाईच्या शाईचा वास येत होता.

काळ्या चौकटीत मजकूर छापला होता: "प्रास्कोव्या फ्योदरोवना गोलोविना खेदपूर्वक नातेवाईकांना आणि स्नेह्यांना कळवीत आहेत की, त्यांचे प्रिय पती, इवान इल्यिच

गोलोविन, न्यायालयाचे सदस्य, ४ फेब्रुवारी १८८२ रोजी वारले. दफनक्रिया शुक्रवारी दुपारी एक वाजता होईल."

इवान इल्यिच हे तेथे जमलेल्या सद्गृहस्थांचे सहकारी होते आणि त्या सर्वांना ते आवडत होते. अनेक आठवड्यां-पासून ते आजारी होते आणि त्यांचा आजार असाध्य होता असे म्हटले जात होते. त्यांची जागा त्यांच्यासाठी तशीच राखून ठेवण्यात आली होती, पण अशी एक अफवा होती की, जर त्यांचा मृत्यू घडला तर अलेक्सेयेव यांची त्यांच्या जागी नेमणूक घडण्याची शक्यता होती व अलेक्सेयेव यांच्या जागी एक तर विन्निकोव अथवा श्ताबेल यांची नेमणूक होणार होती. म्हणून इवान इल्यिच यांच्या मृत्यूची बातमी समजताच कचेरीमधील प्रत्येक माणसाच्या मनात पहिला विचार आला तो त्यांच्या अथवा त्यांच्या मित्रांच्या पदांमध्ये घडणाऱ्या संभाव्य बदलांविषयी आणि बढत्यांविषयी.

"श्ताबेल किंवा विन्निकोवच्या जागी माझी नक्की नेमणूक होणार," फ्योदर वासिल्येविच यांच्या मनात आले. "फार पूर्वीपासून त्या पदाचं मला आश्वासन मिळालंय आणि बढतीचा अर्थ पगारामध्ये ८०० रूबलची वाढ, शिवाय कचेरीच्या खर्चासाठी अनुदानं."

"माझ्या मेहुण्याची कालूगाहून बदली करावी असा अर्ज मी केला पाहिजे," प्योत्र इवानोविच यांच्या मनात आले. "माझ्या बायकोला आनंद होईल. तिच्या कुटुंबासाठी मी काहीच करीत नाही असा आरोप आता ती माझ्यावर करू शकणार नाही."

"त्या आजारातून ते कधीच उठणार नाहीत याची मला खात्री होती," प्योत्र इवानोविच मोठ्यांदा म्हणाले. "किती दुर्दैव!"

"काय झालं होतं त्यांना?"

"डॉक्टरांना निदान होत नव्हतं. तशी त्यांनी निदानं केली होती, पण प्रत्येकाचं निदान वेगळं! शेवटच्या वेळी मी त्यांना भेटलो तेव्हा ते जरा बरे दिसले असं मला वाटलं."

"सणानंतर मी त्यांच्याकडं गेलोच नाही. पण जायचा विचार मात्र सारखा मनात यायचा."

"त्यांनी काही पैसा-अडका जमवलाय?"

"त्यांच्या बायकोची थोडी इस्टेट होती, पण तसं म्हणण्या-सारखं फारसं काही नसावं."

"आता त्यांच्याकडं जाणं आलं. फार लांब आहे बुवा त्यांचं घर."

"तुमच्यापासून सगळंच लांब आहे."

"नदीपलिकडं मी राहतो म्हणून हा मला क्षमा करायला तयार नाही," प्योत्र इवानोविच म्हणाले आणि त्यांनी शेबेककडे पाहून स्मित केले. त्यावरून संभाषणाचा ओघ गावामधील सापेक्ष अंतरांकडे वळला व नंतर ते सगळे परत खटला चालवायला गेले.

ह्या मृत्यूच्या बातमीने प्रत्येकाच्या मनात संभाव्य बदलां-विषयी आणि बढत्यांविषयी तर्क तर सुरू झालेच होते, पण त्याशिवाय, त्यांच्या उत्तम ओळखीच्या माणसाचा मृत्यू घडला होता ह्या वस्तुस्थितीने प्रत्येकाला आनंद वाटत होता की, त्याचा स्वत:चा नव्हे तर त्याच्या मित्राचा मृत्यू घडला होता.

"कल्पना करा! तो वारला, पण मी नाही," असा विचार अथवा अशी भावना त्यांच्यापैकी प्रत्येकाने अनुभवली.

इवान इल्यिच यांच्या अधिक निकटच्या ओळखीच्या लोकांनी, त्यांच्या तथाकथित मित्रांनी, अनिच्छेने स्वत:वर एका कंटाळवाण्या कर्तव्याचा बोजा लादून घेतला: दफनविधीला हजर राहण्याचा आणि विधवेचे सांत्वन करण्याचा.

फ्योदर वासिल्येविच आणि प्योत्र इवानोविच यांच्याएवढे निकट स्नेही दुसरे कुणीही नव्हते.

प्योत्र इवानोविच हे इवान इल्यिच यांच्या जोडीनेच शिकले होते. शिवाय इवान इल्यिच यांच्या काही उपकारांचे ओझे त्यांच्यावर होते असे ते मानीत होते.

जेवणाच्या वेळी त्यांनी आपल्या बायकोला इवान इल्यिच यांच्या मृत्यूची बातमी दिली आणि आता तिच्या भावाची त्यांच्या परिसरात बदली करून घेण्याची शक्यता असल्याचे सांगितले. नेहमीप्रमाणे विश्रांतीसाठी न झोपता त्यांनी आपला फ्रॉक-कोट अंगात चढविला व इवान इल्यिच यांच्या घराकडे ते निघाले.

इवान इल्यिच यांच्या घरापाशी एक बग्गी आणि दोन भाडोत्री गाड्या उभ्या होत्या. खालच्या मजल्यावर दारा-जवळच्या हॅट-स्टँडपाशी भिंतीला टेकवून दफनपेटीचे झाकण उभे ठेवलेले होते. त्या झाकणावर झालरींची आणि चकचकीत मुलामेदार नक्षीची सजावट होती. काळा पोषाख केलेल्या दोन स्त्रिया आपले कोट उतरवीत होत्या. त्यांपैकी एका बाईला प्योत्र इवानोविच ओळखीत होते. ती इवान इल्यिचची बहीण होती. दुसरी मात्र अनोळखी होती. प्योत्र इवानोविच यांचा मित्र श्वार्त्झ नुकताच जिना उतरू लागला होता, पण प्योत्र इवानोविच दृष्टीस पडताच तो थबकला आणि त्याने हळूच डोळा मारला. जणू त्याला म्हणायचे

होते : "इवान इलियचनं खासच सगळा घोटाळा केला. पण तुमची-माझी गोष्ट वेगळी."

इंग्रज पद्धतीचे कल्ले राखलेल्या आणि फ्रॉक-कोटामधील सडपातळ बांध्याच्या श्वार्त्झमध्ये नेहमीप्रमाणे एक विशिष्ट डौलदार गांभिर्य होते. आणि हे गांभिर्य, नेहमीच त्यांच्या खेळकर स्वभावाशी ठळकपणे उठून दिसे. सद्य:परिस्थितीत तर त्याला अधिकच तीव्रता प्राप्त झाली होती. तसे निदान प्योत्र इवानोविचना वाटले.

महिलांना प्रथम वाट देण्यासाठी प्योत्र इवानोविच बाजूला सरले आणि नंतर त्या महिलांपाठोपाठ सावकाश जिना चढू लागले. त्यांची वाट पहात श्वार्त्झ वरच्याच पायरीशी थांबून राहिले. त्यांच्या थांबण्याचा अर्थ प्योत्र इवानोविच यांनी जाणला. त्या संध्याकाळी पत्ते खेळायला कुठे भेटायचे त्याची निश्चिती श्वार्त्झना करायची होती यात काही शंका नव्हती. विधवेच्या भेटीसाठी बायका आत गेल्या. गंभीरपणे घट्ट ओठ मिटलेल्या आणि डोळयांमध्ये खेळकर चमक असलेल्या श्वार्त्झनी आपल्या भुवईची हालचाल करून मृताला कोणत्या खोलीत ठेवले होते ते प्योत्र इवानोविचना सांगितले.

अशा प्रसंगी काय करायचे याबद्दल प्रत्येकजण जसा गोंधळात पडलेला असतो त्याप्रमाणे गोंधळात पडलेले प्योत्र इवानोविच आत गेले. अशा प्रसंगी क्रूस-चिन्ह करण्यामुळे काहीही नुकसान होत नसते हे त्यांना माहीत होते. आपण खाली झुकायचे अथवा नाही याबद्दल त्यांची खात्री नव्हती. खोलीत प्रवेश करताच त्यांनी क्रूस-चिन्ह केले आणि लवून नमस्कार केला असे भासविणारी बारीकशी हालचाल केली. त्याच वेळी जितपत शक्य होईल तितपत त्यांनी खोलीभर

ओझरता कटाक्षही टाकला. दोन तरुण, बहुधा पुतणे असावेत, त्यातील एक विद्यार्थी होता, क्रूस-चिन्ह करून बाहेर गेले. एक म्हातारी स्तब्ध उभी होती. विचित्र रीतीने भुवयांची कमान करून एक स्त्री तिला कुजबुजत्या आवाजात काहीतरी सांगत होती. दमदार, खंबीर दिसणारा चर्चचा पाद्री मोठ्यांदा काहीतरी वाचत होता. कुठलाही विरोध त्याचा स्वर सहन करणार नाही असे भासत होते. स्वयंपाकघरातील नोकर गेरासिम जमिनीवर काहीतरी शिंपडीत हलक्या पावलांनी प्योत्र इवानोविच यांच्या समोरून गेला. हे पाहताच प्योत्र इवानोविच यांना तात्काळ प्रेताचा हलका दुर्गंध जाणवला. मागील खेपेस ते जेव्हा इवान इल्यिचला भेटायला आले होते तेव्हा त्यांच्या खोलीत त्यांनी ह्या गोरसवदा नोकराला पाहिले होते. आजारी माणसाच्या उशाशी बसून तो देखभाल करीत होता आणि इवान इल्यिचना त्याचा विशेष लळा लागलेला होता. दफनपेटी आणि पाद्री यांच्या दरम्यानच्या दिशेने, कोपऱ्यातील टेबलावरील तसबिरींकडे तोंड करून प्योत्र इवानोविच सतत क्रूस-चिन्हे करीत होते व खाली झुकत होते. क्रूस-चिन्हांचा आपण अतिरेक करतोय अशी जेव्हा त्यांना जाणीव झाली तेव्हा ते थांबले व मृताकडे टक लावून पाहू लागले.

सर्व मृत देहांप्रमाणे तो देह मृतावस्थेमध्ये विशेष अवजड भासत होता, त्याचे ताठरलेले अवयव दफनपेटीच्या गिरद्यांमध्ये बुडून गेले होते व उशीवर कायम पुढे झुकलेले मस्तक सर्व मृत देहांप्रमाणे आपले पिवळसर मेणासारखे कपाळ दाखवीत होते, खोल गेलेल्या कानशीलांपाशी चकाकते ठिपके दिसत होते आणि बाहेर आलेले नाक वरच्या ओठावर

चिकटविल्यासारखे वाटत होते. इवान इल्यिच खूपच बदलले होते. प्योत्र इवानोविचनी त्यांना अखेरच्या वेळी पाहिले होते तेव्हापेक्षा ते खूपच बारीक झाले होते आणि तरीही इतर सर्व मृत पुरुषांप्रमाणे त्यांच्या चेहऱ्यावर जिवंतपणीपेक्षा अधिक सौंदर्याचा भाँव उमटला होता, किंवा त्यांचा चेहरा निदान अधिक महत्त्वपूर्ण दिसत होता. जे करायचे होते ते केले होते आणि योग्यपणे केले होते, असे जणू तो भाव सांगत होता. शिवाय तो भाव जिवंत लोकांविषयी तिटकारा दाखवीत होता, किंवा आठवण करून देत होता. ही आठवण प्योत्र इवानोविचना अस्थायी वाटली. निदान तिच्याशी त्यांना काहीही कर्तव्य नव्हते. त्यांना अवघडल्यासारखे वाटू लागले. म्हणून घाईघाईने क्रूस-चिन्ह करून—जे सभ्यतेला धरून झाले नाही असे त्यांना वाटले—ते खोलीबाहेर गेले.

दुसऱ्या खोलीत श्वार्झ त्यांची वाट पहात असल्याचे त्यांना आढळले. पाय फाकून, दोन्ही हात पाठीशी धरून आपल्या उंच टोपीशी चाळा करीत ते उभे होते. त्यांच्या खेळकर, सुघड, डौलदार आकृतीकडे एक कटाक्ष टाकताच प्योत्र इवानोविच यांच्या चित्तवृत्ती एकदम फुलल्या. श्वार्झ ह्या साऱ्याच्या पलिकडे उभे होते आणि शोकाच्या प्रभावाखाली सापडण्यास ते तयार नव्हते याची प्योत्र इवानोविचना जाणीव झाली. श्वार्झ यांचा एकूण पवित्रा जणू सांगत होता: "इवान इल्यिच यांच्या दफनविधीमुळं आपल्या नेहमीच्या मेळाव्याला रद्द करण्याचं काहीही कारण नाही; म्हणजे आज संध्याकाळी आपल्या भेटीत आणि पत्त्यांचा नवा डाव उघडण्यात अडथळा आणण्याचं काहीही कारण नाही, जरी नेमक्या त्याचवेळी इवान इल्यिच यांचा नोकर दफनपेटी-

भोवती चार मेणबत्त्या पेटवून ठेवणार होता तरीही. एकूण पाहता ह्या प्रसंगापायी आज संध्याकाळी आपल्या मनोरंजनात बिघाड आणण्याचं कोणतंही कारण नाही." आणि प्योत्र इवानोविच खोलीमधून जात असता हे सर्व श्वार्झ त्यांच्या कानात कुजबुजलेसुद्धा.

पण त्या संध्याकाळी पत्ते खेळणे प्योत्र इवानोविच यांच्या नशिबी नव्हते. प्रास्कोव्या फ्योदरोवना इतर काही महिलां-समवेत आतून बाहेर आली. ती बुटकी, लठ्ठ, बांध्याने खालच्या बाजूस खूप रुंद होती आणि तिचे खांदे मात्र निमुळते होते. वस्तुतः याउलट आपला बांधा घडविण्यासाठी तिने प्रयत्न करूनही काही उपयोग झाला नव्हता. प्रास्कोव्या फ्योदरोवनाने संपूर्ण काळा पोषाख केला होता आणि विणलेला रुमाल डोक्यावर पांघरला होता. दफनपेटीजवळ उभ्या असलेल्या बाईप्रमाणेच तिनेही चमत्कारिकरीत्या आपल्या भुवयांची कमान केली होती. प्रेत ठेवलेल्या खोलीच्या दारा-पर्यंत बरोबरीच्या बायकांना सोबत करीत ती म्हणाली: "धार्मिक विधी आत्ता सुरू होतील. आत या."

किंचित झुकल्यासारखे दाखवून श्वार्झ स्तब्ध उभे राहिले. त्यांनी त्या आमंत्रणाचा ना स्वीकार केला ना त्याला नकार दिला. प्योत्र इवानोविच यांना ओळखताच प्रास्कोव्या फ्योद-रोवनाने एक सुस्कारा टाकला आणि सरळ त्यांच्यापाशी गेली, त्यांचा हात धरून ती म्हणाली: "इवान इलियच यांचे तुम्ही सच्चे मित्र होता हे मला ठाऊक आहे..." मग योग्य प्रतिसादासाठी तिने अपेक्षेने प्योत्र इवानोविच यांच्याकडे पाहिले. त्यावेळी आपल्याकडून क्रूस-चिन्हाची अपेक्षा होती हे जसे प्योत्र इवानोविचना माहीत होते, तसेच

त्यांनी तिचा हात हलकेच दाबून, एक सुस्कारा टाकून "तुम्ही खात्री बाळगा..." वगैरे त्यांनी म्हणावे अशी अपेक्षा होती, हेही त्यांना ठाऊक होते. तर त्यांनी नेमके हे असेच केले आणि तसे केल्यावर आपण अपेक्षित परिणाम साधला असे त्यांना वाटले. त्यांचे अंतःकरण हेलावले आणि तिचेसुद्धा.

"विधींना सुरुवात होण्यापूर्वी जरा इकडं या. मला तुमच्याशी बोलायचंय," विधवा म्हणाली. "तुमच्या हाताचा आधार द्या मला."

प्योत्र इवानोविचनी तिला आपला हात दिला आणि श्वार्त्झ यांच्या समोरून ती दोघे आतल्या खोल्यांकडे निघाली. श्वार्त्झनी प्योत्र इवानोविचना खेदाने डोळा घातला. जणू त्यांना म्हणायचे होते :

"आटोपला तुमचा पत्त्यांचा डाव! तुमच्या जागी आम्ही दुसऱ्या कुणाला खेळायला घेतलं तर राग मानू नका. जेव्हा तुम्ही मोकळे व्हाल तेव्हा पाचवा भिडू म्हणून बसू शकालच."

प्योत्र इवानोविचनी अधिक खोल आणि खेदपूर्वक सुस्कारा टाकला व प्रास्कोव्या फ्योदरोवनाने कृतज्ञतेने त्यांची बोटे दाबली. गुलाबी छापील सुती कापडाने सजविलेल्या दिवाणखान्यात त्यांनी प्रवेश केला. मंद दिव्याचा उजेड तेथे पडला होता. एका टेबलापाशी प्रास्कोव्या फ्योदरोवना दिवाणावर बसली आणि प्योत्र इवानोविच बैठ्या, मऊ गादीच्या स्टुलावर बसले. त्या स्टुलाच्या गादीखालील स्प्रिंगा मोडलेल्या असल्यामुळे प्योत्र इवानोविच स्टुलावर बसताच स्प्रिंगा करकरल्या. त्या स्टुलावर बसू नका असा इशारा देण्याची प्रास्कोव्या फ्योदरोवनाची इच्छा होती, सद्यःपरिस्थितीला धरून तसे बोलणे योग्य दिसले नसते असे तिला वाटले. त्या बैठ्या

स्टुलावर बसताच प्योत्र इवानोविचना आठवले की, जेव्हा इवान इल्यिच हा दिवाणखाना सजवीत होते तेव्हा हिरवी पाने असलेल्या गुलाबी छापील कापडाविषयी त्यांनी त्यांचा सल्ला घेतला होता. दिवाणावर बसण्यासाठी टेबल ओलांडून जाताना (खोलीमध्ये फर्निचरची आणि कला वस्तूंची दाटी झाली होती) विधवेच्या काळ्या रुमालाची लेस कुठल्यातरी कोरीव वस्तूमध्ये अडकली. ती अडकलेली लेस सोडविण्या-साठी प्योत्र इवानोविच अर्धवट वर उठले तेव्हा मोकळ्या झालेल्या स्प्रिंगांनी त्यांना हळूच धक्का दिला. विधवेने स्वतःच लेस सोडवून घेतली आणि त्या हट्टी स्प्रिंगांना दाबून प्योत्र इवानोविच परत स्टुलावर बसले. पण विधवेने लेस पूर्णतया सोडवून घेतली नव्हती, म्हणून प्योत्र इवानोविच परत अर्धवट उठले आणि परत स्टुलाची गादी किंचित वर आली व तिने चक्क छोटासा धक्का मारला. हे सर्व संपल्यानंतर प्रास्कोव्या फ्योदरोवनाने पांढरा तलम हातरुमाल काढला व रडायला आरंभ केला. पण लेसच्या प्रसंगाने आणि बैठ्या स्टुलाबरोबर केलेल्या झटापटीने प्योत्र इवानोविच यांच्या मनोवृत्ती गोठल्या होत्या. म्हणून कपाळाला आठ्या घालून ते नुसते बसून राहिले. परिस्थितीमधील हा ताण इवान इल्यिच यांचा नोकर सोकोलोव याच्या प्रवेशामुळे तुटला. त्याने येऊन सांगितले की प्रास्कोव्या फ्योदरोवनाने स्मशान-भूमीत दफनासाठी निवडलेल्या जागेला २०० रूबल किंमत पडणार होती. ती रडायची थांबली, प्योत्र इवानोविच यांच्याकडे तिने एक हौतात्म्याचा कटाक्ष टाकला आणि हे सारे आपल्याला किती कठीण जात आहे त्याबद्दल फ्रेंचमध्ये सांगितले. प्योत्र इवानोविचनी सहानुभूतीदाखल एक निःश्वास टाकला.

"तुम्हाला हवं तर धूम्रपान करा," दिलदार, पण तरीही दुःखी स्वरात ती म्हणाली आणि थडग्याच्या किंमतीची चर्चा करायला सोकोलोवकडे वळली. धूम्रपान करता करता प्योत्र इवानोविच यांच्या ध्यानात आले की, वेगवेगळ्या थडग्यांच्या जागांच्या किंमतींच्या तिने तपशीलवार चौकशा केल्या होत्या व धूर्तपणे निवड केली होती. ही बाब आटोपल्यावर गाणाऱ्या लोकांना भाड्याने आणण्याच्या प्रश्नाची तिने चर्चा केली. मग सोकोलोव निघून गेला.

"प्रत्येक गोष्ट मी स्वतः जातीनं पाहतेय," प्योत्र इवानोविचना उद्देशून ती म्हणाली आणि टेबलावरील आल्बम तिने हातांनी दूर सारले. प्योत्र इवानोविचच्या सिगारेटची राख टेबलावर सांडण्याचा धोका होता असे ध्यानात येताच चटकन रक्षापात्र पुढे करून ती म्हणाली: "माझ्या दुःखापायी व्यावहारिक बाबींमध्ये लक्ष घालणं मला शक्य झालं नाही असं म्हटलं तर तो निव्वळ बहाणा होईल. उलट, त्याच्यासाठी काही गोष्टी करण्यामुळंच माझं... अं... सांत्वन नव्हे, पण चित्त जरा दुसरीकडं गुंतायला मदत होते." परत एकदा तिने जणू रडण्यासाठी हातरुमाल बाहेर काढला, पण अचानक खूप प्रयत्नांती स्वतःला आवरले, मानेला किंचित झटका दिला व शांतपणे ती बोलली.

"एका व्यावहारिक बाबीची मला तुमच्याशी चर्चा करायची आहे."

प्योत्र इवानोविच किंचित झुकले. पण नव्या बंडाची चिन्हे दाखविणाऱ्या स्प्रिंगांना त्यांनी घट्ट दाबून धरले.

"शेवटचे काही दिवस त्याला भयानक त्रास झाला."

"खरंच?" प्योत्र इवानोविचनी विचारले.

"अतोनात हाल झाले! अखंड किंचाळत होता. आणि तेसुद्धा काही मिनिटं नव्हे तर तासचे तास! तीन दिवस अखंडपणं तो किंचाळत होता, श्वास घ्यायलासुद्धा न थांबता. त्याबद्दल वर्णन करणं अशक्य. ते सारं मी कसं सहन केलं कुणास ठाऊक. तीन खोल्यांपर्यंत दूर त्याचा आवाज ऐकू येत होता. मी कसल्या परिस्थितीमधून गेले याची तुम्हाला कल्पना नाही!"

"म्हणजे अगदी शेवटपर्यंत तो शुद्धीवर होता?" प्योत्र इवानोविचनी विचारले.

"हो," दबत्या आवाजात ती म्हणाली. "अगदी शेवट-पर्यंत. तो मरण्याच्या आधी अवघी पंधरा मिनिटं त्यानं आमचा निरोप घेतला. आणि वालोद्याला दूर घेऊन जायला आम्हाला सांगितलं."

आपल्या स्वतःच्या आणि ह्या स्त्रीच्या ढोंगीपणाची अप्रिय जाणीव असूनसुद्धा, आपल्या अत्यंत परिचयाच्या माणसाच्या—ज्याला आरंभी आनंदी, स्वच्छंदी शाळकरी मुलगा म्हणून, नंतर वाढलेला पुरुष म्हणून आणि स्वतःचा सहकारी म्हणून पाहिले होते—मरणसमयीच्या यातनांच्या विचाराने प्योत्र इवानोविच मुळापासून हबकले. पुन्हा एकदा त्यांच्या नजरे-समोर ते कपाळ आले, वरच्या ओठावर चिकटविलेले ते नाक आले व स्वतःबद्दलच्या भीतीने त्यांचा पगडा घेतला.

"तीन दिवस भयानक यातना आणि मरण. कुठल्याही क्षणी माझ्या बाबतीतही तसंच घडू शकेल," त्यांच्या मनात विचार आला आणि किंचित क्षणभर भीतीने त्यांचा ताबा घेतला. पण तात्काळ नेहमीचा विचार त्यांच्या मनात आला—तो का आला याचे उत्तर त्यांना स्वतःला देता आले

नमने – की मृत्यूने त्यांना नव्हे तर इवान इलियचना भेट दिली होती आणि असे काही त्यांच्या स्वतःच्या बाबतीत घडणे शक्य नव्हते व घडणे इष्टही नव्हते. अशा विचारां-मुळे ते केवळ खिन्न बनले असते आणि तसे घडणे टाळले पाहिजे हे श्वार्त्झच्या चेहऱ्याने त्यांना बोलकेपणाने सांगितले होते. ह्या विचारधारेचा आधार धरून प्योत्र इवानोविचनी आपला तोल सावरला, एवढेच नव्हे तर मृत्यू ही जणू एक दुर्घटना असून ती फक्त इवान इलियच यांच्या बाबतीतच – त्यांच्या स्वतःच्या नव्हे – घडू शकत होती अशा थाटात इवान इलियच यांच्या मृत्यूच्या तपशीलाबाबत त्यांनी चौकशा केल्या.

इवान इलियचच्या खऱ्याखुऱ्या भयानक शारीरिक यातनां-च्या तपशीलवार वर्णनानंतरच केवळ (प्रास्कोव्या फ्योदरोवना-च्या मनःस्थितीवर इवान इलियचच्या यातनांचा किती परिणाम घडला, त्या परिमाणावरून प्योत्र इवानोविच यांना इवान इलियचच्या मरणयातना समजल्या) व्यावहारिक गोष्टींची चर्चा सुरू करणे विधवेला शक्य झाले.

"काय सांगू प्योत्र इवानोविच, मला हे किती अवघड जातंय, किती भयंकर कठीण जातंय, किती किती जड जातंय!" पुन्हा ती रडू लागली.

प्योत्र इवानोविचनी आणखी एक सुस्कारा टाकला आणि प्रास्कोव्या फ्योदरोवनाने आपले नाक शिंकरीपर्यंत ते वाट पहात थांबले. तिचे नाक शिंकरून झाल्यानंतर ते म्हणाले: "तुम्ही खात्री बाळगा." पण तेवढ्यात ती परत बोलू लागली आणि ज्या गोष्टींविषयी तिला त्यांचा सल्ला हवा होता त्या विषयाला तिने हात घातला. तिच्या नवऱ्याच्या मरणाच्या संबंधात सरकारकडून तिला कसे पैसे मिळतील

याबाबत तिने विचारले. पेन्शनविषयी आपण चौकशी करीत आहोत असा तिने आव आणला होता तरी प्योत्र इवानोविचना जाणवले की, ज्या बाबतीत ते स्वत: अज्ञ होते अशा बाबीही तिला पूर्ण तपशीलवार ठाऊक होत्या. ह्या मृत्यूमुळे नेमकी केवढी रक्कम तिला मिळायची होती हे तिला माहीत होते, पण ही रक्कम वाढवून घेण्याचे काही मार्ग आहेत अथवा नाहीत हे जाणून घ्यायला ती उत्सुक होती. हे कसे काय करता येईल याबाबत प्योत्र इवानोविचनी विचार करण्याचा प्रयत्न केला, पण काही मिनिटे विचारमग्न राहून आणि सरकारच्या कंजूसपणावर टीका करून आपली सहानुभूती दाखवीत ते म्हणाले की, याहून अधिक पैसे मिळणे शक्य होईल असे वाटत नाही. त्यासरशी तिने एक खोल नि:श्वास टाकला व ही मुलाखत कशी आटोपती घ्यावी याचा ती विचार करू लागली. प्योत्र इवानोविचना हे समजले. त्यांनी सिगारेट विझविली, ते उठून उभे राहिले, तिच्याशी हस्तांदोलन करून ते बाहेरच्या हॉलमध्ये गेले.

प्योत्र इवानोविच भोजन-दालनात गेले. तेथे भिंतीवर टांगलेले घड्याळ इवान इल्यिचनी मोठ्या हौसेने विकत घेतले होते व आपल्या कलावस्तुसंग्रहात भर पडल्याचा त्यावेळी त्यांना आनंद झाला होता. तेथे एक पाद्री, दफन-विधीसाठी आलेली ओळखीची काही माणसे व इवान इल्यिचची सुंदर मुलगी उभी असल्याचे प्योत्र इवानोविचना आढळले. ती मुलगी पूर्ण काळ्या पोषाखात होती व त्यामुळे तिची बारीक कंबर अधिकच बारीक दिसत होती. तिची मुद्रा दु:खी, खंबीर आणि रागीट भासत होती. तिने प्योत्र इवानो-विचना झुकून असे काही अभिवादन केले की, जणू ते कशा-

बद्दल तरी दोषी होते. तिच्या पाठीमागे एक तरुण पुरुष उभा होता आणि तोसुद्धा तिच्याप्रमाणेच असंतुष्ट दिसत होता. प्योत्र इवानोविचना तो ठाऊक होता—हा श्रीमंत तरुण माणूस तपासणी-मॅजिस्ट्रेट होता आणि ह्या तरुणीचा भावी पती होता. प्योत्र इवानोविचनी खिन्नपणे झुकून अभिवादन केले आणि मृत देह ठेवलेल्या खोलीकडे जायला ते वळणार तोच इवान इल्यिच यांचा मुलगा जिन्यावरून आला. जिम्नाशियममध्ये शिकणारा हा मुलगा खूपसा आपल्या बापासारखा दिसत होता. इवान इल्यिच कायद्याचा अभ्यास करीत होते तेव्हा हुबेहूब असेच दिसायचे ह्याची प्योत्र इवानोविचना आठवण झाली. त्या मुलाचे डोळे रडून रडून लाल झाले होते. तेरा-चौदा वर्षांच्या मळकटलेल्या मुलांप्रमाणे त्याचे डोळे दिसत होते. प्योत्र इवानोविच दृष्टीस पडताच त्याचा चेहरा शरमिंदा झाला व त्याने कपाळाला आठ्या घातल्या. प्योत्र इवानोविचनी त्याच्याकडे पाहून मान हलविली आणि प्रेताच्या खोलीत ते गेले. धार्मिक विधी सुरू झाले होते. मेणबत्त्या, विव्हळणे, धूप, अश्रू, हुंदके. भुवया आकुंचित करून आपल्या समोरील लोकांच्या पायांकडे टक लावून पहात प्योत्र इवानोविच उभे राहिले. मनात विषण्णता उद्भवून येऊ नये म्हणून त्यांनी एकदाही प्रेताकडे अथवा खिन्न करू शकणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही गोष्टीकडे कटाक्ष टाकला नाही. खोली सोडून जाणाऱ्या पहिल्या मंडळींमध्ये त्यांचा समावेश होता. बाहेर हॉलमध्ये कुणीही नव्हते. स्वयंपाकघरातील नोकर गेरासिम भरभर धावत आला, आपल्या मजबूत हातांनी त्याने कोटांचा ढीग चाचपडला व अखेरीस प्योत्र इवानोविच यांचा कोट शोधून त्यांच्यापुढे धरला.

"बरं आहे गेरासिम," काहीतरी बोलायचे म्हणून प्योत्र इवानोविच म्हणाले, "वाईट झालं नाही?"

"देवाची इच्छा, साहेब. एक ना एक दिवस आपण सगळे मरणार," गेरासिम म्हणाला. तो हसला तेव्हा त्या शेतकऱ्याच्या शुभ्र, सरळ दातांची पंक्ती चमकली. मग, जादा कामाच्या घाईत असलेल्या माणसाप्रमाणे त्याने दार उघडले, गाडीवानाला हाक मारली, प्योत्र इवानोविचना घोडागाडीत चढायला मदत केली आणि जणू काही दुसरे काम करायला अधीर झाल्याप्रमाणे उंडचा मारीत जिन्याच्या पायऱ्या तो चढून गेला.

धूप, प्रेत, कार्बोलिक ॲसिड ह्या सर्वांच्या दर्पानंतर, बाहेरच्या ताज्या हवेत श्वास घ्यायला प्योत्र इवानोविचना विशेष प्रसन्न वाटले.

"कुठं?" गाडीवानाने विचारले.

"अजून फारसा उशीर झालेला नाही. थोडा वेळ फ्योदर वासिल्येविचकडं चलतो."

आणि ते निघाले. तेथे खेळाचे पहिले रबर नुकतेच संपले होते, त्यामुळे पुढच्या डावाला पाचवा भिडू म्हणून बसणे त्यांना सोयीचे ठरले.

## २

इवान इल्यिचच्या जीवनाची कहाणी साधी, सामान्य आणि भयानक आहे.

इवान इल्यिच वयाच्या ४५व्या वर्षी वारले. ते न्याय

मंडळाचे सभासद होते. त्यांचे वडील पीटरबुर्गमधील वेगवेगळया मंत्रालयांमधून आणि खात्यांमधून चढत चढत अशा एका पदाला पोहोचले होते, जेथे अशा तऱ्हेचे अंमलदार खऱ्या महत्त्वाचे काहीही काम करण्यास असमर्थ असतात हे स्पष्ट दिसत असूनही, केवळ त्यांच्या प्रदीर्घ नोकरीपायी व उच्च पदापायी त्यांना कामावरून काढून टाकणे अशक्य असते आणि म्हणून ते खोटया पदांना धरून राहतात, पण सहा ते दहा रूबलपर्यंतचे पगार मात्र खरेखुरे घेतात व त्या पगारांवर जख्ख म्हातारे होईपर्यंत जगतात.

तर अशा प्रकारचे होते गुप्त सल्लागार इल्या येफिमोविच गोलोविन; विविध निरुपयोगी संस्थांचे निरुपयोगी सदस्य.

त्यांना तीन मुलगे होते, पैकी इवान इल्यिच हे दुसरे. सर्वात मोठया मुलाने आपल्या वडिलांचाच कित्ता गिरविला, फक्त वेगळया मंत्रालयात आणि लौकरच त्याच्या नोकरीची एवढी वर्षे लोटतील की, त्या वेळी केवळ निष्क्रीयत्वाबद्दल पगार दिले जातात. तिसरा मुलगा मात्र अपयशी ठरला. वेगवेगळया पदांवर त्याची दुष्कीर्तीच झाली होती व आता तो रेलखात्यात काम करीत होता. त्याचे वडील व भाऊ—विशेषत: भावांच्या बायका—त्याला भेटायचे टाळीत आणि शक्य तेव्हा त्याचे अस्तित्वही विसरून जात. त्यांच्या बहिणीचे बॅरन ग्रेफशी लग्न झाले होते. आपल्या सासऱ्या-प्रमाणेच तो सेंट पीटरबुर्गमधील अंमलदार होता. इवान इल्यिच हे कुटुंबाचे अभिमानविषय होते आणि तसाच त्यांचे कुटुंबीय आवडीने त्यांचा उल्लेख करीत. आपल्या मोठया भावाप्रमाणे ते तेवढे थंड आणि चिकित्सक वृत्तीचे नव्हते, तसेच धाकटयाप्रमाणे अविचारीही नव्हते. त्या दोहोंच्या

दरम्यान त्यांचा स्वभाव होता–हुशार, उत्साही, आकर्षक पुरुष. ते आणि त्यांचा धाकटा भाऊ दोघांनी कायदे विद्यालयात अभ्यास केला होता. धाकट्याने शिक्षण कधीच पूर्ण केले नाही, कारण पाचव्या वर्षात असताना त्याला विद्यालयातून काढून टाकण्यात आले होते. इवान इलियच मात्र उत्तमरीत्या उत्तीर्ण झाले. पुढे सबंध आयुष्यभर ते जसे वागले, अगदी तसेच ते कायद्याचे विद्यार्थी असतानाही वागत होते: समर्थ, आनंदी, मनमिळाऊ, सुस्वभावी आणि जे काही आपले कर्तव्य आहे असे ते मानीत त्या सर्व गोष्टींचे काटेकोर पालन. आणि उच्च पदावरील पुरुष ज्या गोष्टींना आपली कर्तव्ये मानीत त्या सर्व गोष्टींना त्यांनी आपली कर्तव्ये मानले होते. लहान असताना आणि मोठेपणी, अशा दोन्ही काळात त्यांनी कधीच कुणाची खुशामत करण्याचा प्रयत्न केला नाही. पण पतंग जसा ज्योतीकडे झेपावतो त्याप्रमाणे यौवनाच्या आरंभापासून ते आपल्यापेक्षा मोठ्या लोकांकडे आकर्षित होत गेले. त्या लोकांचे वागणे, त्यांचे विचार त्यांनी आत्मसात केले आणि त्यांच्याशी स्नेहाचे संबंध स्थापन केले. बालपणीचे आणि यौवनातील सर्व नाद कसल्याही खुणा मागे न ठेवता नाहीसे झाले. एके काळी पोकळ दिमाख दाखविण्यात आणि विषयलोलुपतेत ते रमले होते. विद्यार्थीजीवनात उदारमतवादाशीही त्यांनी थोडा खेळ केला होता. पण ह्या सर्व गोष्टी उपजत बुद्धीला जाणवलेल्या योग्य मर्यादांमध्ये त्यांनी केल्या होत्या.

आपल्या विद्यार्थीजीवनात त्यांनी अशा काही गोष्टी केल्या होत्या ज्या त्या काळात त्यांना किळसवाण्या वाटल्या होत्या व स्वतःचीच घृणा वाटली होती. पण नंतर, उच्चपदस्थ

[illegible]मे कुठलीही क्षिती न बाळगता त्याच गोष्टी करीत असलेली जेव्हा त्यांनी पाहिले तेव्हा त्या सर्व गोष्टी ते विसरून गेले. त्या गोष्टी चांगल्या नाहीत असे जरी त्यांना वाटत होते, तरी आपल्या पापांच्या आठवणींची बोचणी त्यांना राहिली नाही.

कायद्याचा अभ्यास पुरा केल्यावर आणि कपड्यांसाठी वडिलांकडून पैसे मिळाल्यावर, इवान इल्यिचनी शार्मेरकडे काही सूट शिवून घेतले, अपेक्षापूर्ती असे शब्द कोरलेले एक पदक कोटाच्या परतलेल्या गळपट्टीवर खोवले, विद्यालयाच्या प्रमुखांचा निरोप घेतला, दोनोनजवळ आपल्या मित्रांबरोबर शानदार जेवण घेतले आणि नंतर उत्तमोत्तम दुकानांमधून अत्याधुनिक नव्या बॅग, सूट, अंतर्वस्त्रे, दाढीचे सामान इतर गोष्टी खरेदी करून प्रांताच्या एका गावी प्रयाण केले. तेथे त्यांच्या वडिलांनी त्यांच्यासाठी प्रांताच्या गव्हर्नरच्या खास आयोगांच्या चिटणीसाचे पद मिळवून ठेवले होते.

प्रांताच्या गावी इवान इल्यिच यांनी आपल्या विद्यार्थीजीवनाप्रमाणेच तात्काळ तेथील आयुष्य सोपे व प्रसन्न बनविले. ते काम करीत होते, आपल्या कारकीर्दीची काळजी घेत होते आणि त्याचबरोबर प्रसन्न आणि उच्चकुलीन मनोरंजनाच्या प्रकारांमध्ये रमत होते. अधूनमधून आपल्या [illegible]वाने नेमून दिलेल्या कामगिऱ्या पार पाडण्यासाठी ते ग्रामीण भागांमधून दौरे करीत; त्याप्रसंगी आपल्यापेक्षा खालच्या, तसेच वरच्या हुद्द्यांवर काम करणाऱ्या लोकांबरोबर आपली प्रतिष्ठा सांभाळून वागत, सोपविलेल्या कामगिऱ्या चोखपणे बजावीत व लाचलुचपतीला बळी पडत नसत. लाच न घेण्याबद्दल त्यांना स्वतःचा सार्थ अभिमान

वाटायचा. तरुण वय असूनही आणि करमणुकीची आवड असूनही, कचेरीच्या कामात गुंतलेले असताना ते कमालीचे अलिप्त रहात, त्यांचे वागणे औपचारिक आणि काटेकोर असे. पण एरवी चार लोकांमध्ये वावरताना ते खूप आनंदी आणि संभाषणचतुर होते, नेहमी सुस्वभावी, आदबशीर होते. आपल्या साहेबांच्या घरी ते वारंवार जात आणि साहेब व त्यांची पत्नी त्यांना उदार बाळ म्हणून संबोधत.

इथे प्रांतिक गावी त्यांचे एका बाईशी सूत जमले होते. ह्या रुबाबदार तरुण ॲडव्होकेटवर जीव टाकणाऱ्या बायकांपैकी ती एक होती. स्त्रियांच्या टोप्या विकणाऱ्या एका बाईशीही त्यांचे संधान होते. पाहुण्या अंमलदारांबरोबर मद्यपानांच्या पार्ट्या झडत होत्या व रात्रीच्या जेवणानंतर एका दूरच्या रस्त्यावरील घराला भेटी दिल्या जात होत्या. त्यांच्या साहेबांची व साहेबांच्या बायकोची सेवा बजाविली जात होती. पण ह्या सर्व गोष्टी अशा खानदानी पातळीवर घडत होत्या की, त्यांना नांव ठेवणे शक्य नव्हते. Il faut que jeunesse se passe (यौवन प्रमादशील असणारच) ह्या फ्रेंच म्हणीचा आधार घेऊन ते सर्व क्षम्य ठरत होते. ते सर्व काही स्वच्छ हातांनी, स्वच्छ कपड्यांमध्ये, फ्रेंच शब्दात आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे उच्चभ्रू समाजात, याचा अर्थ उच्चपदस्थांच्या संमतीने केले जात होते.

इवान इल्यिचनी ह्या पदावर पाच वर्षे काम केले. ह्या काळाच्या अखेरीस कायद्यात बदल झाला. नवी न्यायालये स्थापन करण्यात आली आणि नव्या माणसांची गरज निर्माण झाली.

इवान इल्यिच त्या नव्या माणसांपैकी एक होते.

त्यांना तपासणी मॅजिस्ट्रेटपद देऊ करण्यात आले. त्याचा अर्थ दुसऱ्या गुबेर्नियात जाणे, प्रस्थापित संबंध तोडणे आणि नवे संबंध जोडणे असा होता, तरीही त्यांनी ते स्वीकारले. इवान इलियचना निरोपाची मेजवानी देण्यात आली, त्यांच्या मित्रांनी सर्वांचा मिळून एक फोटो काढून त्यांना भेट दिला, चांदीची सिगारेट केस भेट दिली. इवान इलियच आपल्या नव्या नेमणुकीच्या स्थळी रवाना झाले.

तपासणी मॅजिस्ट्रेट म्हणूनसुद्धा इवान इलियच अगदी सुयोग्य आणि कुलीन होते. आपली सार्वजनिक कर्तव्ये आणि वैयक्तिक कर्तव्ये यांच्यात तफावत करण्यात त्यांनी चातुर्य दाखविले. पूर्वी गव्हर्नरांच्या खास कामगिऱ्या पार पाडताना त्यांनी स्वत:बद्दल इतरांमध्ये आदर निर्माण केला होता तसाच इथेनाही त्यांनी स्वत:चा दबदबा निर्माण केला. पूर्वीच्या कामापेक्षा मॅजिस्ट्रेटपद त्यांना अधिक स्वारस्यपूर्ण आणि आल्हादक वाटले. अर्थात पूर्वीच्या जागी असताना, शार्मेर-कडील अंगासरशी बसणाऱ्या गणवेषात ताड ताड पावले टाकीत, प्रतीक्षाखोलीत बसलेल्या अधीर अशीलांच्या व कार-कुनांच्या मत्सरी नजरा झेलीत, थेट आपल्या साहेबांच्या कचेरीत जाऊन त्यांच्याबरोबर चहा पिण्यात आणि सिगारेट ओढण्यात त्यांना एक आगळा आनंद लाभायचा हे खरे. पण तेथे त्यांच्या थेट हाताखाली फार थोडी माणसे होती. ग्रामीण भागात आयोगांबरोबर त्यांची पाठवणी होई तेव्हा पोलिस अधिकारी आणि धर्मविरोधी लोकांशी त्यांची गाठ पडे. आणि त्या लोकांशी त्यांना सभ्यपणे वागावे लागे, त्यांच्याशी मित्रत्वाच्या नात्याने चर्चा करावी लागे आणि त्या लोकांना चिरडून टाकण्याची सत्ता आपल्या हाती असूनही

आपण त्यांच्याशी गोडीगुलाबीने वागलो याची जाणीव करून द्यावी लागे. अशी फार थोडी माणसे होती. पण आता तपासणी मॅजिस्ट्रेट ह्या नात्याने त्यांना जाणवत होते की, सर्वजण, अगदी अपवादरहित सर्वजण – त्यात अत्यंत महत्त्वाच्या आणि आत्मसंतुष्ट लोकांचाही समावेश होता – त्यांच्या सत्तेखाली होते. सरकारी शिक्क्याच्या कागदावर त्यांनी काही शब्द लिहिण्याचा अवकाश, अत्यंत महत्त्वाची आणि आत्मसंतुष्ट माणसे तात्काळ त्यांच्यासमोर साक्षीदार अथवा कैदी म्हणूनही उभी केली जात. आणि जर इवान इल्यिचनी त्यांना बसायला सांगितले नाही तर त्यांच्या प्रश्नांना त्या लोकांना उभे राहूनच उत्तरे द्यावी लागत. इवान इल्यिचनी आपल्या सत्तेचा गैरफायदा कधीही घेतला नाही. उलट तिचा ते दयाशीलतेने वापर करीत. पण ह्या सत्तेची जाणीव व दयाळू वागण्याचा हक्क ह्या गोष्टींमुळे नवे पद त्यांना महत्त्वाचे आणि आकर्षक वाटले. तपासणीचे आपले प्रत्यक्ष काम करताना, ज्या गोष्टींशी तपासणी मॅजिस्ट्रेट म्हणून आपली थेट जबाबदारी नाही अशा गोष्टी वगळून टाकण्याची कला इवान इल्यिचनी चटकन आत्मसात केली. केवळ बाह्य स्वरूपात नोंदलेल्या अत्यंत गुंतागुंतीच्या खटल्यांना लिखित अभिव्यक्ती ते देत, वैयक्तिक मताचा त्यांच्यावर मुळीच परिणाम घडू देत नसत आणि तरीही सर्व उपचार काटेकोर पाळीत असत. हे काम नवे होते आणि १८६४ मध्ये सुरू केलेल्या न्यायदानपद्धतीमधील सुधारणा प्रत्यक्ष अंमलात आणणाऱ्यांपैकी ते एक होते.

तपासणी मॅजिस्ट्रेट म्हणून नव्या गावी रहायला आल्यानंतर इवान इल्यिचनी नवे संपर्क जोडले, नव्या ओळखी केल्या,

उगमण्याचे एक नवे धोरण स्वीकारले आणि एक नवा सूर धरला. ह्या वेळी स्थानिक अधिकाऱ्यांपासून त्यांनी स्वतःला प्रतिष्ठितपणे अलिप्त राखले, कायदाक्षेत्रातील आणि श्रीमंत कुटुंबामधील सर्वोत्तम माणसांशी मैत्री जोडली, नेमस्त उदारमतवादी आणि मनमिळाऊ धोरण स्वीकारले व सरकारवर किंचित टीका करण्यासही त्यांनी सुरुवात केली. नेहमीप्रमाणे आपल्या पोषाखाबाबत ते काटेकोर राहिले, पण आपल्या हनुवटीची श्मश्रू त्यांनी थांबविली आणि तिच्यावर दाढी वाढू दिली.

या नव्या गावीसुद्धा पूर्वीच्या गावाप्रमाणेच इवान इल्यिचचे आयुष्य प्रसन्न बनले. गव्हर्नरांच्या वर्तुळाविरोधी असलेला गट खूपच मित्रत्वाने वागणारा आणि रंजक निघाला. इवान इल्यिचची मिळकत वाढली होती आणि व्हिस्ट नामक पत्त्यांच्या खेळाचा त्यांना नवा नाद लागला. एकूण मजेने पत्ते खेळण्याची लकब त्यांना साधली होती. चटकन आणि धडकाव्याने निर्णय घेण्याच्या सवयीमुळे बहुतेक वेळा ते जिंकीत.

ह्या गावी दोन वर्षे वास्तव्य झाले असतानाच इवान इल्यिचची आपल्या भावी पत्नीशी गाठ पडली. इवान इल्यिच ज्यांच्यात वावरत होते त्यांच्यात प्रास्कोव्या फ्योदरोवना मिखेल ही सर्वात तेजस्वी, हुषार, बुद्धिमान आणि आकर्षक तरुणी होती. तपासणी मॅजिस्ट्रेटच्या कामातून विरंगुळा मिळावा म्हणून इवान इल्यिच ज्या मनोरंजनांमध्ये गुंतत, त्यात आता प्रास्कोव्या फ्योदरोवनाबरोबर प्रणयलीला करण्याची भर पडली.

काम आयोगांचे चिटणीस असताना इवान इल्यिच नेहमी

नृत्य करीत. पण तपासणी मॅजिस्ट्रेट झाल्यानंतर ते क्वचित नृत्य करू लागले. जरी ते नव्या कायदा-संहितेचे अंमलबजावणी-दार होते आणि पाचव्या दर्जाचे वकील होते, तरी सर्व-सामान्यांपेक्षा आपण नृत्यातसुद्धा श्रेष्ठ आहोत एवढे दाखविण्या-पुरतेच ते नाचत. तर संध्याकाळच्या अखेरीस प्रसंगोपात्त प्रास्कोव्या फ्योदरोवनाबरोबर ते नाचत आणि ह्या नृत्यां-दरम्यानच त्यांनी तिला वश केले होते. ती त्यांच्या प्रेमात पडली. लग्न करण्याचा इवान इल्यिचचा तसा स्पष्ट, ठाम इरादा नव्हता, पण ही तरुणी जेव्हा त्यांच्या प्रेमात पडली तेव्हा त्यांच्यासमोर प्रश्न उभा राहिला: "का मी लग्न करू नये?"

प्रास्कोव्या फ्योदरोवना चांगल्या कुळातील होती आणि आकर्षक होती. तिच्यापाशी थोडा पैसाही होता. याहून चांगली जोडीदारीण इवान इल्यिचना मिळू शकली असती, पण हीसुद्धा वाईट नव्हती. त्यांना त्यांचा पगार मिळत होता आणि तिचे उत्पन्नही तेवढेच असावे अशी त्यांची कल्पना होती. त्यांना तोलाचे सासू-सासरे मिळाले असते. ती गोड, सुंदर, कुलीन तरुणी होती. इवान इल्यिचनी प्रेमाखातर तिच्याशी लग्न केले आणि त्यांच्या जीवनविषयक सर्व दृष्टिकोनांशी ती सहमत होती असे म्हणणे जेवढे चुकीचे ठरले असते, इवान इल्यिचच्या भोवतालच्या लोकांनी मान्यता दिली म्हणून त्यांनी लग्न केले असे म्हणणे तेवढेच चुकीचे ठरले असते. इवान इल्यिचनी दोन विचार मनाशी बाळगून तिच्याशी लग्न केले: ही विशिष्ट पत्नी प्राप्त करून त्यांना सुखही मिळत होते आणि उच्चपदस्थांच्या त्यांच्याविषयीच्या अपेक्षाही ते पूर्ण करीत होते.

इवान इलियचनी लग्न केले.

प्रत्यक्ष विवाहसोहळा आणि वैवाहिक जीवनाचा पहिला कालखंड. पती-पत्नीचा लडिवाळपणा, नवीन फर्निचर, नवी भांडी, नव्या चादरी—थोडक्यात म्हणजे त्यांच्या बायकोच्या पहिल्या गरोदरपणापर्यंतचा काळ छान गेला. हा कालखंड एवढा चांगला गेला की, समाजाने मान्य केलेल्या सभ्य, छानछोकीच्या, वैविध्यांनी भरलेल्या सकस आयुष्य जगण्यात विवाह हा मुळीच अडथळा नाही असे इवान इलियचना वाटू लागले. उलट विवाहामुळे त्या जीवनाला आणखीच खुमारी आली होती. पण त्यांच्या बायकोच्या गरोदरपणाच्या पहिल्या काही महिन्यांमध्ये त्यांना काहीतरी नव्याच, अनपेक्षित, अप्रिय, अयोग्य आणि असह्य गोष्टीला तोंड द्यावे लागले. ज्या गोष्टीची त्यांना आधी जाणीव होणे शक्य नव्हते आणि तिला नष्ट करणेही शक्य नव्हते.

काहीही कारण नसताना, त्यांनी स्वतःशी म्हटले त्याप्रमाणे केवळ लहरीपणापायी, त्यांच्या जीवनातील प्रसन्नपणा आणि शिष्टाचार बिघडवून टाकायला तिने आरंभ केला. काही कारण नसताना त्यांचा ती मत्सर करू लागली, त्यांनी तिच्याकडे अधिक लक्ष द्यावे अशी मागणी करू लागली, त्यांनी केलेल्या प्रत्येक गोष्टीत उणीवा शोधू लागली आणि अप्रिय, घाणेरडे प्रसंग निर्माण करू लागली.

आपल्या आधीच्या आयुष्यामध्ये इवान इलियचना ज्यामुळे ज्याचा लाभ झाला होता तो त्यांचा निरोगी आणि सहजतेने जगण्याचा दृष्टिकोन जतन करून प्रसंगातील अप्रियतेपासून स्वतःची सुटका करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. आपल्या पत्नीच्या रागीट झटक्यांकडे दुर्लक्ष करून प्रसन्न चित्ताने, मजेने

जगण्याचा त्यांनी प्रयत्न केला. आपल्या मित्रांना पत्ते खेळायला ते घरी बोलावीत आणि ते स्वतःही क्लबात अथवा मित्रांकडे पत्ते खेळायला जात. पण एकदा त्यांच्या पत्नीने एवढ्या घाणेरड्या भाषेत त्यांची निर्भर्त्सना केली आणि त्यानंतर ज्या ज्या वेळी तिने सांगितलेले काम त्यांनी केले नाही त्या त्या वेळी तिने एवढ्या कडक शब्दात त्यांची हजेरी घेतली (जोपर्यंत ते तिच्यासमोर नमत नाहीत आणि तिच्याप्रमाणे घरात खिन्नपणे बसून रहात नाहीत तोपर्यंत तसे वागण्याचा तिने ठाम निर्धारच केला होता) की इवान इल्यिच हबकले. त्यांना जाणीव झाली की, विवाह केल्यामुळे – निदान ह्या बायकोशी – आयुष्यातील सुखांमध्ये आणि औचित्यांमध्ये हमखास भर पडतेच असे नाही, उलट त्यांना धोका उत्पन्न होतो व म्हणून ह्या धोक्यांपासून त्यांनी स्वतःचा बचाव करणे आवश्यक होते. त्या दृष्टीने साधने शोधायला इवान इल्यिचनी आरंभ केला. त्यांच्या कामाचा तेवढा प्रास्कोव्या फ्योदरोवनावर प्रभाव होता, म्हणून आपल्या बायकोविरुद्ध सामना करण्यासाठी आणि आपले स्वातंत्र्य टिकविण्यासाठी इवान इल्यिचनी आपल्या कामाची व तदनुषंगिक जबाबदाऱ्यांची ढाल पुढे करण्यास सुरुवात केली.

बाळाचा जन्म झाल्यानंतर, बाळाला अंगावर पाजण्याच्या निर्माण झालेल्या समस्या, बाळाचे आणि बाळाच्या आईचे खरे व काल्पनिक आजार (ज्यांच्याबाबत सहानुभूती दाखविणे इवान इल्यिचकडून अपेक्षित होते, पण ज्याची त्यांना समज नव्हती) या गोष्टींमुळे कुटुंबाबाहेर एका जगात स्वतःभोवती कुंपण घालून घेण्याची तातडी वाढली. त्यांची बायको जेवढी अधिक चिडखोर आणि हेकेखोर बनली,

ऐवढा आयुष्याचा गुरुत्वमध्य अधिक हेतूपूर्णतेने त्यांनी आपल्या नोकरीकडे सरकविला, आपल्या कामात त्यांनी स्वतःला जास्त गुंतवून घेतले आणि पूर्वीपेक्षा ते जास्त महत्त्वाकांक्षी बनले.

लौकरच, लग्नानंतर केवळ एका वर्षातच, इवान इल्यिचना जाणीव झाली की, वैवाहिक जीवनात काही सोयी लाभत असल्या तरी, प्रत्यक्षात अत्यंत गुंतागुंतीची आणि अवघड अशी ती बाब होती व ह्या दृष्टीने कर्तव्यपालन करण्यासाठी, म्हणजे समाजाची मान्यता लाभावी म्हणून सभ्य देखावा निर्माण करण्यासाठी, एखाद्याला आपल्या व्यवसायात जशी ठाम तत्त्वे पाळावी लागतात तशी ठाम तत्त्वे आचरणे आवश्यक होते.

आणि इवान इल्यिचनी अशी आचारसंहिता तयार केली. घरचे जेवण, बायको आणि निद्रा एवढ्याच सोयी त्यांनी वैवाहिक जीवनापासून अपेक्षित ठेवल्या. त्यामुळे उत्तम प्रकृती राखणे ही महत्त्वाची गोष्ट त्यांना शक्य झाली, कारण त्यावर सामाजिक स्वीकृती अवलंबून होती. कौटुंबिक जीवनात सुखाचा शोध घेण्याची त्यांची इच्छा होती. त्यांना जर ते मिळाले तर कृतज्ञ रहात; जर त्यांना धुडकावण्यात आले आणि केवळ कुरकुर व तक्रारी ऐकू आल्या तर तात्काळ ते आपल्या व्यवसायाचे कुंपण घातलेल्या जगात स्वतःला बंद करून घेत आणि तेथे आनंद मिळवीत.

इवान इल्यिचनी निष्ठापूर्वक चाकरी करून वरिष्ठांची वाहवा मिळविली व तीन वर्षात त्यांची साहाय्यक सरकारी वकीलपदी बढती झाली. त्यांच्या नव्या कामात सर्वात महत्त्वाचे काम होते लोकांवर खटला भरून त्यांना तुरुंगात

डांबण्याचे. त्याशिवाय सार्वजनिक भाषणे, त्यांच्यामुळे मिळणारे यश इत्यादी गोष्टींमुळे हे नवे काम त्यांना अधिक आकर्षक वाटू लागले.

आणखी मुले जन्मली. त्यांची बायको अधिक तिरसट आणि चिडखोर बनली. पण इवान इलियचनी आपल्या कौटुंबिक जीवनाची आचारसंहिता पक्की केल्यामुळे पत्नीच्या कुरकुरीचा त्यांच्यावर काहीही परिणाम घडेनासा झाला.

ह्या गावी सात वर्षे नोकरी केल्यानंतर इवान इलियच यांची वेगळ्या गुबेर्नियात सरकारी वकील म्हणून नेमणूक झाली. त्यांनी मुक्काम बदलला, त्यांना पैशांची टंचाई जाणवत होती आणि त्यांच्या बायकोला नवे गाव मुळीच आवडले नाही. त्यांचा पगार जरी पूर्वीपेक्षा जास्त होता तरी जीवन-मानही अधिक वरचे बनले होते. शिवाय दोन मुलांचा मृत्यू घडल्याने इवान इलियच यांना कौटुंबिक जीवन अधिकच अप्रिय बनले.

नव्या गावात त्यांच्यावर कोसळलेल्या प्रत्येक आपत्तीचा दोष प्रास्कोव्या फ्योदरोवनाने आपल्या नवऱ्याच्या माथी मारला. नवरा-बायकोमधील संभाषणाच्या प्रत्येक विषयामधून, विशेषत: त्यांच्या मुलांच्या शिक्षणाविषयीच्या, अनेक प्रश्न उद्‌भवले होते व कधी ना कधी त्यावरून त्यांची भांडणे घडली होती. आणि पूर्वीच्या ह्या भांडणांमधून नवी भांडणे पेटण्याचा धोका सतत अस्तित्वात होता. प्रेमात असण्याचे कालखंड फार क्वचित येत, पण ते कधीही फार काळ टिकत नसत. तसले कालखंड म्हणजे केवळ बेटे होती. पूर्ण अलिप्ततेमधून प्रकट होणाऱ्या परस्परांविषयीच्या गुप्त तिरस्काराच्या सागरावर परत सफरीला निघण्यापूर्वी ते

जोडपे त्या बेटांवर थोडा काळ मुक्काम करीत असे. ही अलिप्तता अस्तित्वात असू नये असे जर इवान इलियचनी अपेक्षित धरले असते तर तिच्यापायी ते खूप दु:खी झाले असते. पण एव्हाना ह्या परिस्थितीकडे ते केवळ सामान्य म्हणून पहायला शिकले नव्हते, तर त्यांना ती हवीशी वाटू लागली होती. असे नाते साध्य करण्याचा ते जाणीवपूर्वक प्रयत्न करू लागले. कौटुंबिक उद्रेकांपासून स्वत:ला अधिकाधिक मुक्त ठेवण्याचे, त्यांना अपायकारक अथवा बीभत्स होण्यापासून दूर राखण्याचे उद्दिष्ट ते ठेवू लागले. घरी कमीत कमी वेळ घालवून आणि जेव्हा घरात असत तेव्हा बाहेरच्या लोकांना घरी बोलावून शांतता प्राप्त करून त्यांनी हे उद्दिष्ट साध्य केले. त्यांचे काम ही त्यांच्या आयुष्यातील सर्वांत महत्त्वाची गोष्ट होती. त्यांच्या ऑफिसच्या कामाचे जग हेच त्यांच्या जीवनाचे स्वारस्य बनले व त्यात ते पुरते रमून गेले. आपल्या सत्तेची त्यांना होणारी जाणीव, ज्याला नष्ट करण्याची त्यांना इच्छा होई त्याला नष्ट करण्याचा त्यांचा अधिकार, न्यायालयात प्रविष्ट होताना आणि आपल्या कनिष्ठांशी बोलताना जाणवणारा त्यांचा दबदबा, त्यांच्या वरिष्ठांमधील आणि कनिष्ठांमधील त्यांची लोकप्रियता, खटले चालविण्यातील त्यांचे कसब आणि त्या कसबाविषयी त्यांना स्वत:ला वाटणारे कौतुक—ह्या सर्व गोष्टींमधून त्यांना आनंद लाभत होता. सहकाऱ्यांबरोबर गप्पा-गोष्टी, मेजवान्यांचे समारंभ, पत्त्यांचे खेळ ह्या सर्वांमुळे त्यांचे जीवन परिपूर्ण झाले होते. अशा प्रकारे इवान इलियच यांचे आयुष्य अगदी त्यांच्या मनासारखे चालले होते—प्रसन्न आणि दिमाखदार.

असे आणखी सात वर्षे चालत राहिले. आता त्यांची

मुलगी सोळा वर्षांची झाली होती, आणखी एक मूल मरण पावले होते, एक मुलगा उरला होता. शाळकरी वयाचा हा मुलगा खूप कलहांना कारण ठरत होता. त्याला कायदा विद्यालयात शिकायला पाठविण्याची इवान इल्यिचची इच्छा होती. पण केवळ दुष्टाव्यापायी प्रास्कोव्या फ्योदरोवनाने त्याला जिम्नाशियममध्ये पाठवण्याचा आग्रह धरला. मुलगी घरातच शिकत होती व तिची प्रगती चांगली होती. मुलगाही अभ्यासात चांगला होता.

## ३

अशा रीतीने इवान इल्यिचनी आपल्या वैवाहिक जीवनाची सतरा वर्षे व्यतीत केली. एव्हाना ते अत्यंत अनुभवी सरकारी वकील बनले होते. त्यांना अनेक चांगल्या नोकऱ्या सांगून आल्या होत्या, पण त्याहून चांगल्या पदाच्या अपेक्षेने त्यांनी त्या सर्व संधी नाकारल्या होत्या. मात्र एकदा अशी एक घटना घडली की त्यांच्या जीवनाचा संथ सूर एकदम बिघडून गेला. एका विद्यापीठीय शहरी अध्यक्षीय न्यायाधीश म्हणून आपली नेमणूक व्हावी असे इवान इल्यिचच्या मनाने घेतले होते. परंतु गोप्पे यांनी काहीतरी करून त्यांच्या पुढे आघाडी मारली व त्या पदावर स्वतःची नेमणूक करून घेतली. इवान इल्यिच कमालीचे बिथरले, त्यांनी नाना आरोप केले, गोप्पेबरोबर आणि आपल्या नजीकच्या वरिष्ठांबरोबर त्यांनी भांडणे केली. वरिष्ठांचा इवान इल्यिचविषयीचा दृष्टिकोन बदलला आणि पुढील नेमणुकांवेळी इवान इल्यिचकडे परत दुर्लक्ष करण्यात आले.

१८८० मध्ये हे घडले. इवान इल्यिचच्या आयुष्यातील हे सर्वात वाईट वर्ष ठरले. एका बाजूने त्यांची मिळकत त्यांच्या कुटुंबाच्या निर्वाहाला अपुरी पडत होती. दुसऱ्या बाजूने त्यांची उपेक्षा केली जात होती. त्यांना ही गोष्ट अत्यंत अपमानास्पद आणि क्रूर अन्यायाची वाटत होती. पण इतरांना मात्र सर्वसामान्य वाटत होती. इवान इल्यिचच्या वडिलांनीसुद्धा त्यांना मदत केली नव्हती. प्रत्येकाने आपला त्याग केला असे इवान इल्यिचना वाटत होते, उलट इतरांची भावना होती की, ३५०० रूबल पगार मिळविणारे इवान इल्यिच भाग्यवान होते. पण त्यासाठी किती धमक्या खाव्या लागत होत्या, बायकोची किती कटकट सहन करावी लागत होती आणि ताकदीपलिकडचे जीवन जगत असल्यामुळे किती कर्ज झाली होती हे केवळ त्यांना एकट्यालाच ठाऊक होते. इवान इल्यिचच्या दृष्टीने परिस्थिती मुळीच सुरळीत नव्हती.

त्या वर्षी उन्हाळ्यात, खर्च कमी व्हावा ह्या हेतूने, इवान इल्यिच आणि त्यांची पत्नी सुटी घालविण्यासाठी त्यांच्या मेहुण्याकडे खेड्यात रहायला गेले. तेथे खेड्यात इवान इल्यिचनी आयुष्यात प्रथमच रितेपण अनुभवले. त्यांना ...नालीचा कंटाळा आला. त्यांची अत्यंत केविलवाणी अवस्था झाली. काहीतरी केले पाहिजे, निर्णायक पावले उचलली पाहिजेत असे त्यांनी ठरविले.

संबंध रात्रभर न झोपता व्हरांड्यात येरझाऱ्या घातल्या-नंतर त्यांनी सेंट पीटरबुर्गला जाण्याचा निर्णय घेतला. ...च्या मंत्रालयात आपली बदली करून घेण्याचा प्रयत्न करायचा आणि आपली किंमत न करणाऱ्यांना अशा रीतीने ...मन करायचे असे त्यांनी ठरविले.

दुसऱ्या दिवशी, आपल्या बायकोच्या आणि मेहुण्याच्या विरोधांना न जुमानता ते सेंट पीटरबुर्गला जायला निघाले. तेथे जाताना त्यांच्या मनात एकच हेतू होता: पाच हजार रूबल पगाराची नोकरी मिळवायची. मग ती नोकरी कोणत्या खात्यात, कोणत्या मंत्रालयात अगर कोणत्या प्रकारचे काम त्यासाठी करावे लागेल ह्याची त्यांना पर्वा नव्हती. कोणत्याही शासकीय संघटनेत–बँकात, रेल्वेत, सम्राज्ञी मारीयाच्या कचेऱ्यांमध्ये, किंवा कस्टम खात्यातसुद्धा–पाच हजार रूबलची नोकरी मिळावी एवढीच त्यांची इच्छा होती. नव्या नोकरीत पाच हजार मिळावेत आणि त्यांची जेथे किंमत नव्हती त्या मंत्रालयात काम करण्याची त्यांना जरूरी भासू नये, एवढीच अट होती.

ह्या सफरीमध्ये त्यांना आश्चर्यकारक आणि अनपेक्षित यश लाभले. त्यांची आगगाडी कूर्स्क येथे आली तेव्हा प्यो. से. इल्यिन नांवाचा त्यांच्या ओळखीचा एक माणूस त्यांच्या पहिल्या वर्गाच्या डब्यात शिरला आणि त्याने बातमी दिली की, मंत्रालयात महत्त्वाचा बदल घडणार आहे अशा आशयाची तार कूर्स्कच्या गव्हर्नरना नुकतीच मिळाली होती. प्योत्र इवानोविचच्या जागी इवान सेम्योनोविच यांची नेमणूक होणार होती.

हा भावी बदल रशियाच्या दृष्टीने तर महत्त्वाचा होताच, पण इवान इल्यिचच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा होता. नवा माणूस पुढे आल्यामुळे, प्योत्र पेत्रोविच आणि तदनुषंगाने त्यांचा मित्र झखार इवानोविच, एकूण परिस्थिती इवान इल्यिचच्या दृष्टीने भाग्याची ठरली. झखार इवानोविच हे इवान इल्यिचचे स्नेही व सहाध्यायी होते.

मॉस्कोत बातमीला दुजोरा मिळाला आणि सेंट पीटरबुर्ग-मध्ये इवान इल्यिचनी झखार इवानोविचची भेट घेतली. इवान इल्यिचना कायदा मंत्रालयातच नवे पद मिळवून देण्याचे झखार इवानोविचनी आश्वासन दिले.

आठवडाभरानंतर त्यांनी आपल्या बायकोला पुढील तार पाठवली :

"झखारची मिलरच्या जागी नेमणूक झाली. पहिल्या अहवालानंतर माझी नेमणूक होईल."

ह्या बदलामुळे इवान इल्यिचची अनपेक्षितपणे त्यांच्याच मंत्रालयात नेमणूक झाली. त्यांच्या सहकाऱ्यांपेक्षा दोन दर्जे उच्च पदावर ते विराजमान झाले, त्यांना पाच हजार पगार मंजूर झाला व बदलीचा खर्च भागविण्यासाठी साडेतीन हजार मिळाले. आपल्या प्रतिस्पर्ध्यांविषयी आणि मंत्रालयाविषयी त्यांच्या मनात पूर्वी असलेला आकस ते विसरले. आता ते पूर्ण सुखी होते.

इवान इल्यिच खेड्यात परतले तेव्हा खूप आनंदी आणि समाधानी होते. गेल्या कित्येक दिवसात अशी मन:स्थिती त्यांना लाभली नव्हती. प्रास्कोव्या फ्योदरोवनाच्या चित्तवृत्तीही फुलून आल्या व तात्पुरती शांतता नांदू लागली. सेंट पीटरबुर्गमध्ये आपले स्वागत किती अगत्याने झाले, त्यांचे जे शत्रू होते त्यांचा कसा पाणउतारा झाला, त्यांच्या नव्या पदाचा शत्रूंना कसा हेवा वाटला आणि सेंट पीटरबुर्गमध्ये त्यांना लाभलेल्या खास अनुग्रहाबद्दल शत्रूंना कशी असूया वाटली, याचे इवान इल्यिचनी रसभरीत वर्णन केले.

प्रास्कोव्या फ्योदरोवनाने त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून घेतले, त्यांच्या सर्व कथनावर विश्वास बसल्याचा बहाणा

केला, कुठल्याही बाबतीत विरोध दर्शविला नाही. नव्या शहरी कसे रहायचे त्याचे बेत करण्यात ती पूर्ण रमून गेली. तिचे बेत आपल्या योजनांशी मिळतेजुळते आहेत असे आढळताच इवान इल्यिच खूष झाले. त्या दोघांचे एकमत झाले होते, जीवनामधील छोटयाशा गढूळपणानंतर आयुष्य पुन्हा प्रसन्न आणि दिमाखदार बनले होते, ह्याचा त्यांना आनंद झाला होता. ह्या सर्व घटना स्वाभाविक होत्या असे त्यांना वाटले.

अगदी लहानशा मुक्कामापुरते इवान इल्यिच परतले होते. १० सप्टेंबरला त्यांना नव्या कामावर रुजू व्हायचे होते. शिवाय नव्या जागी बस्तान बसवायचे होते, प्रांतिक गावामधून सर्व सामान हलवायचे होते, अनेक नव्या गोष्टी विकत घ्यायच्या होत्या आणि इतर अनेक वस्तूंची मागणी नोंदवायची होती. थोडक्यात म्हणजे त्यांच्या मनात असलेल्या धर्तीनुसार त्यांना स्वतःचे आयुष्य प्रस्थापित करायचे होते आणि प्रास्कोव्या फ्योदरोवनाच्या मनातही तसाच निर्धार होता.

आता सर्व काही अनुकूल घडल्यामुळे, त्यांचे आणि त्यांच्या बायकोचे एकमत झाल्यामुळे, शिवाय त्यांची एकमेकांशी क्वचित भेट होत असल्यामुळे, त्यांच्या वैवाहिक जीवनाच्या आरंभीच्या काळापेक्षा त्यांच्यात अधिक स्नेहाचे नाते निर्माण झाले. आपल्या कुटुंबाला एकदम आपल्याबरोबरच घेऊन जावे असा इवान इल्यिचनी प्रथम विचार केला होता. पण त्यांच्याविषयी व त्यांच्या कुटुंबाविषयी अचानक औदार्याचा व प्रेमाचा पुळका आलेल्या त्यांच्या बहिणीच्या आणि मेहुण्याच्या आग्रहाखातर, ते एकटेच पुढे निघाले.

इवान इल्यिच एकटेच पुढे निघाले. आपल्या यशामुळे

आणि पत्नीशी सुसंवाद जमल्यामुळे त्यांची मन:स्थिती प्रसन्न बनली होती. परस्परपूरक गोष्टींमुळे उल्हसित बनलेली त्यांची मन:स्थिती सर्व वेळ तशीच टिकून राहिली. त्यांना आणि त्यांच्या बायकोला हवा होता, अगदी तसाच रम्य फ्लॅट त्यांना मिळाला. जुन्या धाटणीचे, उंच छताचे मोठे दिवाणखाने, प्रचंड आणि सोयीस्कर अभ्यासिका, त्यांच्या पत्नीसाठी आणि मुलीसाठी खोल्या, त्यांच्या मुलाला शिकविण्यासाठी एक खोली —सर्व काही जणू मुद्दाम त्यांच्यासाठीच बनविल्याप्रमाणे. फर्निचर लावण्याचे आणि सजावटीचे काम इवान इल्यिचनी स्वत:च हाती घेतले. भिंतींना लावायचा कागद निवडणे, पडदे, आच्छादने फर्निचर विकत घेणे वगैरे गोष्टीत ते गढून गेले. बहुतेक फर्निचर त्यांनी जुन्या धाटणीचे घेतले होते व त्यांना ते अगदी सुयोग्य वाटत होते. सामान वाढत वाढत गेले व अखेरीस त्यांच्या मनाशी धरलेल्या उद्दिष्टानुसार फ्लॅट सजू लागला. काम जेव्हा अर्धे पुरे झाले होते तेव्हा अपेक्षेपेक्षा अधिक परिणाम साधल्याचे त्यांना आढळले. ग्राम्यतेचा लवलेशही न राहता आपले घर किती देखणे आणि निर्दोष दिसेल हे ते स्वत:च्या मन:चक्षूमधून पाहू शकत होते. पूर्ण सजलेल्या स्वागतकक्षाची प्रतिमा मनाशी बाळगून ते रात्री झोपत होते. अपुऱ्या दिवाणखान्याकडे नजर टाकताच त्यांना शेकोटीचा कोपरा दिसत होता, पडदा दिसत होता, शोभेच्या वस्तू ठेवण्याचे खुले फडताळ दिसत होते, विखुरलेल्या खुर्च्या दिसत होत्या, सुंदर बशांनी आणि थाळ्यांनी सजलेल्या भिंती व योग्य जागी लावलेल्या ब्राँझच्या वस्तू दिसत होत्या. अशा वस्तूंची आवड असलेल्या आपल्या बायकोला आणि मुलीला हे सर्व पाहून किती आनंद होईल अशा कल्पनेने ते प्रसन्न बनत

होते. त्यांच्या पुढ्यात काय वाढून ठेवले होते याची त्या दोघींना कल्पनासुद्धा नव्हती. सुदैवाने जुने फर्निचर त्यांना खूप स्वस्तात मिळाले होते. त्या सामानामुळे एकूण घराचा डौल वाढला होता. अंतिम परिणाम वाढविण्याच्या हेतूने ते पत्रांमधून मुद्दामच वस्तूंची वाईट वर्णने करीत होते. घर सजविण्यामध्ये ते एवढे रमून गेले होते की, नवीन नोकरीतील काम मनासारखे असूनही अपेक्षेपेक्षा कमी प्रमाणात ते त्यात गुंतत होते. कोर्टात काम चालू असताना काहीवेळा त्यांचे चित्त विचलित होत असे आणि भिंतीवरचा झालरीचा पडदा कसा असावा याबाबत त्यांचे मन विचार करू लागे. ह्या घराचा त्यांना एवढा ध्यास लागला होता की, ते स्वतः फर्निचर हलवीत, पडदे टांगीत. एके दिवशी शिडीवर चढून एका कामगाराला पडदे कसे लावायचे ते दाखवीत असताना त्यांचा पाय घसरला आणि जवळ जवळ ते खाली कोसळलेच. पण मजबूत आणि चपळ असल्यामुळे त्यांनी स्वतःला वाचविले. फक्त खिडकीच्या चौकटीला घासल्यामुळे त्यांच्या कुशीत खरचटले. काही काळ त्यांची कूस दुखत राहिली, पण नंतर वेदना नाहीशी झाली. हा सारा काळ इवान इल्यिचना विशेष छान आणि उल्हसित वाटत होते. त्यांनी लिहिले: "मला पंधरा वर्षांनी तरुण झाल्यासारखे वाटतेय." सर्व काम सप्टेंबरात पूर्ण करण्याचा त्यांचा इरादा होता, पण ऑक्टोबरच्या मध्यापर्यंत काम रखडत गेले. मात्र निष्पत्ती संतोषकारक होत्या. केवळ त्यांनाच असे वाटत नव्हते. फ्लॅट पाहणाऱ्या प्रत्येकाची तीच प्रतिक्रिया होती.

वस्तुस्थिती अशी होती की, प्रत्यक्षात श्रीमंत नसलेली, पण श्रीमंतीचा आभास निर्माण करू पाहणारी सर्व माणसे

जे करतात तेच त्या फ्लॅटमध्ये केलेले होते. तसबिरी, हस्ती-दंती, फुले, गालिचे, ब्रॉंझ — प्रत्येक वस्तू गडद आणि चकचकीत केलेली. एका विशिष्ट वर्गातील माणसे ह्या वर्गामधील इतर सर्व माणसांसारखी दिसण्यासाठी जे काही करतात, नेमके तेच. इवान इल्यिचच्या फ्लॅटचे इतरांच्या घरांशी इतके साधर्म्य होते, की त्याचा मुळीच ठसा उमटला नाही. पण त्यांना स्वतःला मात्र तो असाधारण वाटला. जेव्हा ते आपल्या कुटुंबाला भेटायला स्टेशनवर गेले, चकचकीत प्रकाशित फ्लॅटमध्ये घरच्या लोकांना घेऊन आले, पांढरा नेकटाय बांधलेल्या नोकराने फुलांनी सजवलेल्या प्रवेश-दालनाचे दार उघडले, तेथून ते दिवाणखान्यात गेले, नंतर त्यांच्या अभ्यासिकेत गेले आणि जेव्हा त्यांच्या तोंडून आनंदाचे चीत्कार उमटले — ह्या सर्व गोष्टी जेव्हा घडल्या, तेव्हा इवान इल्यिचना कमालीचा आनंद झाला. त्यांनी घरच्या माणसांना सगळा फ्लॅट दाखविला, त्यांच्याकडून स्तुतीची अपेक्षा केली आणि समाधानाने त्यांचा चेहरा उजळून उठला. संध्याकाळी चहापानाच्या वेळी प्रास्कोव्या फ्योदरोवनाने ते कसे पडले याबद्दल पृच्छा केली तेव्हा ते हसले आणि आपल्या पडण्याचे व कामगाराला त्यांनी कसे घाबरविले त्याचे मनोरंजक प्रात्यक्षित त्यांनी करून दाखविले.

"कसरतींचा मला सराव होता म्हणून बरं! दुसऱ्या एखाद्याला गंभीर अपघात झाला असता, पण मी नुसता कुशीत खरचटण्यावर निभावलो. त्या जागी हात लावला तर अजूनही दुखतं, पण वेदना हळू हळू कमी होतेय. खरचटण्यापलिकडं दुसरं काही नाही."

अशा रीतीने त्यांनी नव्या घरात रहायला आरंभ केला.

आणि नेहमी जसे घडते त्याप्रमाणे घरात माणसांचा वावर सुरू झाल्यावर त्या घराला पूर्णत्व यायला एका खोलीची कमतरता भासू लागली. आणि नव्या मिळकतीमध्ये, नेहमी घडते तसेच, त्यांच्या सर्व गरजा पूर्ण व्हायला किंचित अधिक रकमेची – फक्त पाचशे रूबलची – उणीव भासू लागली. पण एकूण सारे छान होते. विशेषतः फ्लॅट पूर्ण सजवून होण्यापूर्वी, आरंभीच्या काळात सर्व काही छान होते अद्याप काही वस्तू विकत घ्यायच्या होत्या, अथवा मागवल्या होत्या, अथवा दुरुस्त करायच्या होत्या वा एका जागेवरून दुसऱ्या जागी ठेवायच्या होत्या, त्या काळात सर्व काही ठीक होते. अधून-मधून छोटे गैरसमज होते हे खरे, पण दोघेही नवरा आणि बायको एवढे खूष होते व कामात गुंतून रहायला एवढ्या गोष्टी होत्या, की त्या गैरसमजांचे प्रत्यक्ष भांडणांमध्ये रूपांतर होण्यापूर्वीच निराकरण होऊन जात होते. फ्लॅटची सजावट पूर्ण झाली तेव्हा आयुष्य किंचित कंटाळवाणे बनले आणि कशाची तरी उणीव भासू लागली. पण एव्हाना त्यांच्या नव्या ओळखी होऊ लागल्या व स्वतःला गुंतवून घ्यायला त्यांनी नव्या सवयी लावून घेतल्या.

सकाळचा वेळ इवान इल्यिच कोर्टात घालवीत आणि जेवणाच्या वेळी घरी परत येत. आरंभी ते खूप उल्हसित असत, तरीही घरापायी त्यांना थोडा त्रास होई (टेबल-क्लॉथ-वरील अगर फर्निचरच्या आच्छादनांवरील एखादा बारीकसा डाग, झालरीवरील ढिली दोरी त्यांच्या मनःस्तापाला कारणी-भूत ठरायची. काही झाले तरी ह्या वस्तूंची मांडणी करण्यात त्यांचे खूप श्रम खर्ची पडले होते व त्या वस्तूंची किंचित जरी नासधूस दृष्टीला पडली, तर त्यांना वेदना होत). पण

इवान इलियच यांचे एकूण आयुष्य मात्र त्यांच्या मनोधारणे-प्रमाणे, जसे असायला हवे होते तसे, बनले. सोपे, प्रसन्न आणि शिष्टसंमत. सकाळी नवाला ते उठत, कॉफी पीत, वर्तमानपत्र वाचत, मग ऑफिसचा पोषाख चढवीत आणि कोर्टात जात. तेथे त्यांच्या दैनंदिन कामाचे जोखड त्यांच्यासाठी सज्ज असे व ते सहजपणे त्यात आपली मान अडकवून घेत. तक्रारी घेऊन आलेले लोक, कचेरीला पाठविलेल्या चौकशा, खुद्द कचेरी, सार्वजनिक आणि प्राथमिक बैठका. कचेरीच्या कामात अडथळा आणणार नाही अशा सगळ्या जुनाट आणि बिनमहत्त्वाच्या गोष्टी त्यातून वगळण्याची हातोटी असणे आवश्यक होते; कामापुरताच लोकांशी संबंध ठेवणे जरूरीचे होते; केवळ कामापायीच असे संबंध ठेवणे आणि हे संबंध फक्त कामापुरतेच राखणे आवश्यक होते. उदाहरणार्थ, एखादा माणूस काही चौकशा करायला येतो. इवान इलियचचे आपल्या कामाच्या स्थानाबाहेर ह्या माणसाशी दुसरे काही व्यवहार असण्याची कदाचित शक्यता नाही, पण हा माणूस कोर्टाचा सदस्य ह्या नात्याने त्यांच्याशी संबंधित आहे (अधिकृत शीर्षक छापलेला कागद हा संबंध व्यक्त करतो), अशा वेळी ह्या संबंधाच्या मर्यादांमध्ये इवान इलियच त्या माणसासाठी शक्य ते सर्व काही करतील. अक्षरशः स्वतःच्या शक्तीनुसार सर्व काही करतील आणि त्या माणसाला आदरानेही वागवतील. इतकेच नव्हे तर मित्रत्वाच्या नात्यासमान. पण ज्या क्षणी कामाचे संबंध संपतात त्याच क्षणी इतरही संबंध संपतात. कामाचे संबंध अलग राखण्याची असाधारण हातोटी इवान इलियचना अवगत होती. प्रत्यक्ष जीवनापासून ह्या संबंधांना दूर राखण्याचे कसब त्यांना साध्य झाले होते. आपल्या बुद्धि-

मत्तेमुळे आणि अनुभवामुळे ते ह्या कलेत एवढे पारंगत बनले होते की, केवळ गंमत म्हणून मानवी आणि कामाच्या संबंधांचे अधूनमधून मिश्रण करण्याची करामत दाखविण्याच्या टप्प्या-पर्यंत ते पोहोचले होते. अशी करामत ते करू शकत, कारण गरज पडली तर कामाचे संबंध आणि मानवी नाते यांच्यात परत भेद करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी होते. इवान इल्यिच असे अगदी सहजपणे, प्रसन्नपणे व शिष्टसंमतपणे करीत; एवढेच नव्हे तर अत्यंत सफाईदारपणे करीत. दरम्यान-च्या काळात ते धूम्रपान करीत, चहा पीत, राजकारणाबद्दल थोडे बोलत, व्यावसायिक बाबींची थोडी चर्चा करीत, पत्त्यांविषयी थोड्या गप्पा मारीत आणि नेमणुकांविषयी खूप बोलत. सरतेशेवटी, वृंदवादनामधील पहिल्या व्हायोलिन-वादकाने आपल्या सुंदर कार्यक्रमावर खूष व्हावे तशा समाधानी कलावंताच्या वृत्तीने, किंचित थकल्या शरीराने ते घरी परतत. घरामध्ये त्यांची बायको आणि मुलगी संध्याकाळी कुठल्यातरी पार्टीला जाण्याची तयारी करण्यात गुंतलेल्या असत अथवा कुणा पाहुण्याच्या स्वागताच्या तयारीत असत. त्यांचा मुलगा अद्याप शाळेत असे, अगर आपल्या शिक्षकाबरोबर धडे शिकण्यात रमलेला असे. जिम्नाशियममध्ये शिकविलेल्या गोष्टींची मन:पूर्वक उजळणी करण्यात तो गुंतलेला असे. सर्व काही छान होते. जेवणानंतर जर पाहुणे नसतील तर काही वेळा चालू घडीचे एखादे पुस्तक इवान इल्यिच वाचायला घेत. मग ते कामाला बसत. दस्तऐवजांची तपासणी करीत, कायदे पहात, पुराव्यांचा अभ्यास करीत आणि कायद्याच्या दृष्टीने त्यांची छाननी करीत. ह्या कामाचा त्यांना कंटाळा येत नसे किंवा त्यामुळे त्यांचे मनोरंजनही होत नसे. जर पत्त्यांचा

मोडून काम करावे लागले तर त्यांना ते नीरस वाटे, पत्त्यांचा डाव पडणार नसला तर एकटे बसण्यापेक्षा त्यांच्या बायकोबरोबर बसण्यापेक्षा काम करीत बसणे अधिक श्रेयस्कर वाटायचे. चांगल्या सामाजिक दर्जावरील स्त्री-पुरुषांना निमंत्रण करून आपल्या घरी छोटचा मेजवान्या देणे, हा इवान इल्यिच यांचा सर्वात मोठा आनंद . आणि ही मंडळी मेजवानीची संध्याकाळ ज्या रीतीने करीत तीच रीत इवान इल्यिचची होती व इवान इल्यिचचा दिवाणखानाही त्या लोकांच्या दिवाणखान्यांप्रमाणे असायचा.

एकदा तर नृत्यासह सायंकालीन पार्टी त्यांनी साजरी केली. इवान इल्यिच मनस्वी आनंदी होते व सर्व काही उत्तमरीत्या पडले. फक्त केक आणि टॉफीवरून इवान इल्यिचचा बायकोशी मतभेद झाला. प्रास्कोव्या फ्योदरोवनाने ामंबंधी स्वतःच्या मनाशी वेगळा बेत केला होता, पण इवान इल्यिचनी हट्टाग्रहाने अत्यंत महागडचा मिठाईच्या नून वस्तू मागविल्या. त्यांनी खूप केक्स मागविल्या व बऱ्याच शिल्लक राहिल्या आणि पंचेचाळीस रूबल आले म्हणून भांडण उद्‌भवले. प्रास्कोव्या फ्योदरोवना "मूर्ख" आणि "कणा नसलेला" म्हणाली व त्यांनी डोके गच्च आवळून तोंडातल्या तोंडात घटस्फोटा- उच्चार केले, यावरून त्या भांडणाची गंभीरता व समजण्याजोगी होती. पण खुद्द पार्टी मात्र मजेत . सर्व उत्तम माणसे आली होती आणि इवान प्रिन्सेस त्रूफोनोवाबरोबर नाच केला. "माझं तुझ्या खांद्यावर घे" नांवाच्या परोपकारी संस्थेची

स्थापना करणाऱ्या त्रूफोनोवाची ही बहीण होती. इवान इल्यिचना आपल्या कचेरीच्या कामामधून मिळणारा आनंद त्यांच्या महत्त्वाकांक्षापूर्तीच्या आनंदात सामावला होता; सामाजिक जीवनामधून त्यांना लाभणारा आनंद त्यांच्या दिमाखाचा आनंद फुलवीत होता. पण पत्ते खेळण्यात त्यांना सर्वात खराखुरा आनंद लाभायचा. ते कबूल करीत की, काहीही घडले असले, कितीही घोर निराशा त्यांना सहन कराव्या लागल्या असल्या, तरी त्या सर्वांमधून तेजस्वी छोट्या मेणबत्तीप्रमाणे एक आनंद चमकत असायचा; तो म्हणजे आरडाओरडा न करणाऱ्या उत्तम चार भिडूंचा व्हिट डाव खेळणे (पाच भिडूंचा डाव खेळणे त्यांना आवडत नसे, कारण पाचव्या भिडूला बाजूला बसण्यात फार वेदना होत व इच्छा नसूनही नाराजी व्यक्त करता येत नसे), मग रात्रीचे भोजन घेणे व ग्लासभर मदिरा पिणे. पत्त्यांचा डाव खेळल्यानंतर आणि विशेषत: थोडे पैसे जिंकल्यानंतर (मोठ्या प्रमाणात त्यांनी पैसे जिंकले म्हणजे त्यांना अवघडल्याप्रमाणे वाटायचे) इवान इल्यिच खुषीत झोपायला जात.

अशा रीतीने त्यांचे आयुष्य चालले होते. उत्तम मंडळीं-मधून त्यांचा वावर होत होता; महत्त्वाची माणसे व तरुण मंडळी त्यांच्या घराला वारंवार भेटी देत होती.

कोणत्या प्रकारची माणसे आपल्या घरी बोलवावयाची याबाबत नवरा, बायको व मुलीमध्ये पूर्ण एकमत होते. एकमेकांचा सल्ला न घेताही सर्व प्रकारचे अप्रिय मित्र आणि नातेवाईक टाळण्यात ती तिघेही कुशल होती. आपल्या प्रतिष्ठेला ह्या लोकांमुळे काळिमा येतो असे त्यांना वाटायचे. भिंतींवर जपानी थाळ्या लावलेल्या त्यांच्या दिवाणखान्यात

-ट्रेला येण्याचा ही माणसे निष्कारण आग्रह धरायची. लौकरच ह नकोसे असणारे प्राणी यायचे थांबले आणि गोलोविन कुटुंब समाजामधील फक्त सर्वोत्तम माणसांबरोबर वावरू लागले. अनेकरु तरुण लिझाचा अनुनय करू लागले. पेत्रीश्चेव नांवाचा एक तरुण तपासणी मॅजिस्ट्रेट विशेष उत्साहाने तिचे प्रणयाराधन करीत होता. द्मित्री इवानोविचचा हा एकुलता एक पुत्र त्यांच्या संपूर्ण इस्टेटीचा एकमेव वारस होता. इवान इल्यिचनी याबाबत प्रास्कोव्या फ्योदरोवनाशी बोलणे केले व घसरगाडीतून सहलीला जाण्याची किंवा नाटकाची तिकीटे त्या तरुण मंडळींना मिळवून देण्याची सूचना केली.

असे त्यांचे आयुष्य चालले होते. काहीही बदल न घडता दिवसामागून दिवस उलटत होते आणि सर्व काही झकास होते.

४

त्या सर्वांच्या तब्येती छान होत्या. काहीवेळा मात्र तोंडात विचित्र कडवट चव आल्याची तक्रार इवान इल्यिच करीत आणि त्यांच्या डाव्या कुशीत काहीतरी ठीक नव्हते. पण ह्याला आजार म्हणून संबोधणे शक्य नव्हते.

परंतु कुशीत काहीतरी ठीक नसल्याची परिस्थिती अधिक बिघडली. अद्याप जरी तेथे वेदना ठणकत नव्हती, तरी इवान इल्यिचना आपल्या कुशीत असह्य दाब जाणवू लागला व त्यामुळे सतत ते निराश मनःस्थितीत वावरू लागले. ही निराश मनःस्थिती अधिक वाढली आणि गोलोविन कुटुंबाने पुन्हा प्राप्त केलेल्या सुगम आणि शिष्टसंमत जीवनाचा आनंद

नासू लागला. नवरा-बायकोमध्ये वारंवार भांडणे होऊ लागली. लौकरच आयुष्यामधील सहजता आणि आनंद अदृश्य झाले व शिष्टसंमतता मोठ्या कष्टाने राखण्यात आली. वारंवार वाद पेटू लागले. पुन्हा एकदा केवळ बेटे अस्तित्वात आली व स्फोटाविना नवरा-बायको एकत्र राहू शकतील अशी बेटे अगदी थोडी उरली.

आपल्या नवऱ्याचा स्वभाव अत्यंत अवघड होता असे आता प्रास्कोव्या फ्योदरोवना ठामपणे म्हणू शकत होती. अतिशयोक्ती करण्याच्या स्वतःच्या वैशिष्ट्यानुसार ती म्हणाली की, तिच्या नवऱ्याचा स्वभाव नेहमीच असा चमत्कारिक होता आणि केवळ तिच्यासारख्या देवदूतासमान स्वभावाच्या बाईलाच वीस वर्षे सहन करणे शक्य झाले होते. आता इवान इल्यिच वाद सुरू करीत हे खरे होते. जेवणाला बसण्यापूर्वी किंवा सूप घेत असताना ते काहीतरी खुसपट काढीत. कधी बशा घाणेरड्या ठरायच्या, तर कधी अन्न वाईट असायचे; किंवा मुलाने टेबलावर हाताचे कोपर टेकले अथवा मुलीने केस व्यवस्थित विंचरले नाहीत म्हणून ते चिडायचे. ह्या सर्व गोष्टींचे खापर ते प्रास्कोव्या फ्योदरोवनाच्या माथी मारीत. आरंभी प्रास्कोव्या फ्योदरोवना उलट उत्तरे करायची, त्यांना वाट्टेल त्या वाईट गोष्टी बोलायची. पण दोन वेळा जेवणाच्या अगदी आरंभीच इवान इल्यिच एवढे भयंकर संतापले की, खाण्यामुळे निर्माण होणाऱ्या आजारापायी इवान इल्यिच चिडचिडे बनत होते याची तिला जाणीव झाली. म्हणून तिने स्वतःला आवरले आणि प्रत्युत्तर केले नाही. फक्त लौकरात लौकर जेवण संपविण्याचा तिने प्रयत्न केला. अशा आत्म-संयमनाबद्दल प्रास्कोव्या फ्योदरोवनाने स्वतःची स्वतःच भरपूर

पाठ थोपटून घेतली. आपल्या नवऱ्याचा स्वभाव भयानक आहे आणि त्यामुळे तिचे आयुष्य दयनीय बनले होते असा समज करून घेतल्यानंतर, ती स्वतःची कीव करू लागली. आणि जेवढी अधिक ती स्वतःची कीव करी, तेवढी अधिक आपल्या नवऱ्याचा दुःस्वास करी. तो मरण पावेल अशी आशा ती मनातल्या मनात करू लागली, पण प्रत्यक्षात अशी आशा धरणे तिला शक्य नव्हते, कारण मग मिळकत थांबली असती. त्यामुळे तर तिला आपल्या नवऱ्याचा जास्तच राग येऊ लागला. आपल्या नवऱ्याच्या मृत्यूमुळे सुद्धा आपण वाचू शकणार नाही ह्याची जाणीव झाल्यानंतर तिची दुखरी भावना अधिकच तीव्र बनली. ती ह्यामुळे चिडायची, पण आपली चीड लपवून ठेवायची आणि तिच्या दबत्या चिडीमुळे त्याचा संताप वाढायचा.

अशाच एका भांडणानंतर इवान इल्यिचनी समझोत्याच्या वेळी कबूल केले की, त्यांनी केलेले आरोप अगदी अन्याय्य होते, पण रागाच्या भरात त्यांच्याकडून तसा प्रमाद घडला. आपल्या आजारपणापायी आपण चिडके बनल्याचे त्यांनी मान्य केले तेव्हा प्रास्कोव्या फ्योदरोवना म्हणाली की, जर ते आजारी होते तर आजारातून बरे होण्याच्या उपाययोजना त्यांनी अंमलात आणायला पाहिजे होत्या. एका नामवंत डॉक्टरकडे जाऊन इवान इल्यिचनी स्वतःला तपासून घ्यावे असा तिने आग्रह धरला.

इवान इल्यिच त्या डॉक्टरकडे गेले. ती भेट त्यांच्या अपेक्षेप्रमाणेच घडली. अशी भेट नेहमी जशी होते तशीच घडली: वाट पहात थांबणे, डॉक्टरांची महत्त्वाची ढब (ही ढब त्यांना खूप परिचयाची होती, कारण नेमकी हीच ढब

उचलून ते न्यायालयात प्रवेश करीत), बोटांच्या टिचक्या मारणे, कान छातीला लावून ऐकणे, उघड उघड खोटी प्रश्नोत्तरे, कारण विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे आधीच माहीत असत. मग एक सूचक दृष्टिक्षेप–ज्याचा अर्थ–डॉक्टरच्या हाती त्यांनी सर्व काही सोपविले तर सारे काही ठीक होईल, कारण काय करायला पाहिजे ते डॉक्टरना निर्विवादपणे माहीत होते. प्रत्येक पेशंट बाबतीत हीच वागणूक, मग तो कुणी का असेना. सर्व काही कोर्टातल्याप्रमाणेच. इवान इल्यिच आरोपींशी ज्या घमेंडीने वागत, नेमक्या त्याच रीतीने डॉक्टर आपल्या पेशंटांबरोबर वागत.

डॉक्टर म्हणायचे: अमूक अमूक गोष्ट दाखविते की, तुमच्यात अमूक अमूक बिघाड झालाय; पण अमूक अमूक चाचणीतून आमच्या निदानाला दुजोरा मिळाला नाही, तर तुम्हाला अमूक अमूक रोग झाल्याचा संशय धरावा लागेल. आम्ही असे गृहीत धरले की, तुम्हाला अमूक अमूक आहे... इत्यादी इत्यादी. इवान इल्यिचना फक्त एका प्रश्नाचे उत्तर हवे होते: त्यांचा आजार धोक्याच्या अवस्थेत होता अथवा नव्हता? पण डॉक्टरनी त्या प्रश्नाला क्षुल्लक समजून त्याकडे दुर्लक्ष केले. अशा प्रश्नाचा विचार करणेसुद्धा कमीपणाचे होते असे डॉक्टरांचे मत होते. केवळ तर्क चालू होते: मूत्रपिंडाचा विकार, कायम पडशाचे दुखणे अथवा अंधान्त्राचा विकार. इवान इल्यिचच्या आयुष्याचा विचार कुणी करीत नव्हते. मूत्रपिंडाचा विकार आणि अंधान्त्र यांच्यातच कुस्ती चालू होती. इवान इल्यिचच्या उपस्थितीमध्ये डॉक्टरांनी ह्या समस्येवर मोठ्या चातुर्याने उत्तर शोधले की, अंधान्त्राचा विकार इवान इल्यिचना झाला होता. मात्र ह्या निदानाला

ांनी पुस्ती जोडली की, मूत्राची तपासणी केल्यानंतर आजाराचे
च्याने निदान करणे शक्य होणार होते. इवान इलियचनी
हेच चातुर्य ह्याच पद्धतीने गुन्हेगार आरोपीच्या पिंजऱ्यात उभा
असताना हजार वेळा वापरले होते. आणि आता डॉक्टरांनी
आपल्या चष्म्याच्या काचांमधून आरोपीकडे विजयी मुद्रेने रोखून
पहात, किंचित गंमतीने चातुर्याने थोडक्यात गोषवारा जुळवून
सांगितला होता. डॉक्टरांचे निदान ऐकून इवान इलियचनी
निष्कर्ष काढला की, त्यांची परिस्थिती वाईट होती, पण
डॉक्टरांना अथवा इतर कुणालाच त्याचे किंचितही सोयरसुतक
नव्हते. ह्या निष्कर्षाप्रत आल्यानंतर इवान इलियचना कमालीचा
धक्का बसला व खूप दुःख झाले. त्यांना स्वतःची अतीव कीव
आली आणि एवढ्या महत्त्वाच्या बाबीकडे डॉक्टर दुर्लक्ष
करतात याचा विलक्षण राग आला. पण त्याबाबत त्यांनी
चकार शब्द काढला नाही. ते मुकाट उठले, डॉक्टरांच्या
टेबलावर त्यांनी फीचे पैसे ठेवले व उसासा टाकीत ते
म्हणाले :

"पेशंटांकडून मूर्ख प्रश्न ऐकून घ्यायची तुम्हाला सवय
असणार असं मी गृहीत धरून चालतो. पण तरीही
विचारतो: माझा आजार खूप गंभीर आहे असं वाटतं का
तुम्हाला?"

डॉक्टरांनी चष्म्याच्या काचांवरून इवान इलियचकडे एक
तिखट दृष्टिक्षेप टाकला. जणू त्यांना म्हणायचे होते:
"आरोपी, तू मर्यादेपलिकडचे प्रश्न विचारलेस तर तुला
कोर्टाबाहेर हाकलून देणं भाग पडेल."

"जे आवश्यक आणि योग्य ते मी तुम्हाला आधीच
सांगितलंय," डॉक्टर म्हणाले. "जास्त माहिती चाचणीमधून

मिळेल." आणि डॉक्टरांनी झुकून अभिवादन करीत त्यांना निरोप दिला.

इवान इल्यिच धीमेपणाने बाहेर गेले, निराश चेहऱ्याने आपल्या घसरगाडीत बसले आणि घरी गेले. वाटेत सारा वेळ ते मनातल्या मनात डॉक्टरांनी काय सांगितले त्याची उजळणी करीत होते. त्या संदिग्ध आणि गोंधळात पाडणाऱ्या शास्त्रीय शब्दांचा साध्या भाषेत अनुवाद करून आपल्या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करीत होते: "वाईट, खूप वाईट अथवा अजून तेवढी वाईट परिस्थिती नाही?" त्यांनी स्वतःची समजूत करून घेतली की, डॉक्टरांच्या बोलण्याचा एकूण आशय असा होता की परिस्थिती फारच वाईट होती. आता इवान इल्यिचना प्रत्येक गोष्ट उदास भासू लागली. गाडीवान उदास दिसू लागले, घरे उदास भासू लागली, रस्त्यावरची जाणारी-येणारी माणसे उदास दिसू लागली, दुकाने उदास वाटू लागली–सर्व काही भयाण, खिन्न दिसू लागले. डॉक्टरांच्या गूढ शेऱ्यांनंतर त्यांच्या कुशीमधील मंद ठणकत्या वेदनेने–जी त्यांचा क्षणभरही पाठपुरावा सोडत नव्हती–एक नवा आणि अधिक गंभीर आशय धारण केला. भीतीच्या एका नव्या जाणीवेने ते आपल्या वेदनेकडे लक्षपूर्वक पाहू लागले.

घरी गेल्यानंतर त्यांनी आपल्या बायकोला घडलेला सर्व वृत्तांत सांगितला. बायकोने ऐकून घेतले, पण कथनाच्या मध्येच त्यांची मुलगी डोक्यावर हॅट घालून आत आली. ती आणि तिची आई बाहेर जाण्याच्या तयारीत होत्या. मुलगी कशीबशी नाइलाजाने बसली व तो नीरस वृत्तांत तिने थोडा वेळपर्यंत मुकाट ऐकून घेतला. बायकोनेसुद्धा पुरती हकीकत ऐकली नाही.

"बरं झालं बाई," त्यांची बायको म्हणाली. "आता नियमितपणं औषध घे. तुझ्या औषधाचा कागद मला दे. गेरासिमला मी केमिस्टकडं धाडते." आणि कपडे बदलण्यासाठी ती बाहेर निघून गेली.

जोपर्यंत ती खोलीत होती तोपर्यंत इवान इल्यिचनी आपला श्वास रोखून धरला होता. मग त्यांनी एक खोल सुस्कारा टाकला.

"ठीक आहे," ते म्हणाले, "कदाचित परिस्थिती तेवढी गंभीर नसेल."

त्यांनी औषध घ्यायला आरंभ केला. त्यांच्या मूत्राच्या तपासणीनंतर डॉक्टरांनी आपल्या सूचना बदलल्या होत्या. त्या बदललेल्या सूचनांचे इवान इल्यिच काटेकोर पालन करू लागले. पण त्या तपासणीत काहीतरी घोटाळा होता अथवा तिच्यापासून काढलेल्या निदानात काहीतरी गैरसमज होता. अशा क्षुल्लक बाबतीत त्या ख्यातनाम डॉक्टरना काही सांगणे अशक्य होते, पण त्यांच्या सांगण्याप्रमाणे परिस्थितीमध्ये बदल घडत नव्हते. एक तर डॉक्टर काहीतरी सांगायला विसरले होते, अथवा पेशंटशी खोटे बोलले होते, किंवा त्यांनी पेशंटपासून काहीतरी लपवून ठेवले होते.

तरीसुद्धा, इवान इल्यिचनी डॉक्टरांचे आदेश तंतोतंत पाळले. आरंभी, केवळ तशा आज्ञापालनामुळे त्यांना थोडा आराम वाटला.

डॉक्टरांना भेट देऊन आल्यानंतर, स्वच्छतेविषयी आणि औषध घेण्याविषयी डॉक्टरांच्या आज्ञांचे तंतोतंत पालन करणे व आपल्या वेदनेमध्ये आणि इंद्रियांच्या कार्यामध्ये किंचित बदल घडला तरीही त्यांची नोंद करणे, हाच इवान इल्यिचचा

मुख्य उद्योग बनला. मानवी आजार आणि मानवी आरोग्य हेच इवान इल्यिचच्या जीवनातील मुख्य स्वारस्य ठरले. त्यांच्या उपस्थितीमध्ये जर कुणी एखाद्याच्या आजाराविषयी, अथवा मृत्यूविषयी, किंवा आजारामधून बरे होण्याविषयी बोलले—विशेषत: त्यांच्या आजाराशी साधर्म्य असलेल्या आजारासंबंधी—तर इवान इल्यिच ध्यान देऊन ऐकत, आपली बेचैनी लपविण्याचा प्रयत्न करीत, काही प्रश्न विचारीत आणि आपल्या स्वत:च्या परिस्थितीशी मनातल्या मनात तुलना करीत.

वेदना कमी झाली नव्हती, पण आपल्याला बरे वाटते असे इवान इल्यिच स्वत:चे बळजबरीनें समाधान करून घेत होते. सर्व काही ठीक चालत असे तोवर स्वत:ची फसवणूक करून घेण्यात त्यांना यश येई. पण ज्या क्षणी बायकोशी त्यांचे भांडण होई, अथवा कचेरीत काही अप्रिय प्रसंग घडे, किंवा पत्त्यांमध्ये त्यांचे नशीब दगा देई, त्या क्षणी त्यांना आपल्या आजाराची अत्यंत तीव्रतेने जाणीव होई. पूर्वी ते दुर्दैवाला धीराने सामोरे जात, त्या दुर्दैवावर आपण मात करू अशी त्यांना ठाम खात्री असे. आपण यशस्वी होऊ, शेवटी आपला "प्रचंड विजय" होणार अशा विश्वासाने ते प्रतिकार करीत. पण आता प्रत्येक दुर्घटनेसरशी त्यांच्या पायांखालची जमीन सरकत होती, निराशा त्यांना घेरत होती. ते स्वत:शी म्हणत: आत्ता कुठे बरा व्हायला लागलो होतो, औषधाचा आत्ता कुठे परिणाम घडू लागला होता आणि हे नतद्रष्ट दुर्दैव किंवा दुर्घटना आडवे आले.. ह्या दुर्दैवाच्या आपत्तीविरुद्ध अथवा त्यांच्यावर संकट आणून त्यांना ठार मारू पाहणाऱ्या लोकांविरुद्ध रागाने धुमसत. हा राग त्यांना कुरतडत होता. पण त्याबद्दल काहीही करणे त्यांना शक्य नव्हते.

लोकांवर आणि परिस्थितीवर चिडल्यास त्यामुळे फक्त आपला आजार बळावतो व म्हणून अशा अधूनमधून घडणाऱ्या क्लेशदायक गोष्टींकडे त्यांनी दुर्लक्ष करणे आवश्यक होते, ह्याची अर्थातच त्यांना जाणीव झाली असणार. पण त्यांच्या तर्कशुद्धतेने नेमकी उलटी दिशा धरली. आपल्याला केवळ शांततेची गरज आहे असे ते म्हणत आणि त्यांच्या शांतीला कुणी ढळवू नये म्हणून सतत सावध रहात. किंचित कारणावरूनही ते प्रक्षुब्ध बनत. वैद्यक विषयावरील पुस्तके वाचून आणि डॉक्टरांचे सल्ले घेऊन त्यांनी एकूण परिस्थिती अधिकच वाईट बनवून टाकली. त्यांचा आजार अत्यंत मंद गतीने बळावत गेल्यामुळे एका दिवसाची पुढच्या दिवसाबरोबर तुलना करून स्वतःची फसवणूक करून घेणे त्यांना सोपे गेले. दिवसा-दिवसामधील फरक जवळ जवळ न जाणवण्याइतपत होता. पण जेव्हा ते डॉक्टरांचा सल्ला घेत तेव्हा त्यांना वाटे की, त्यांचा आजार केवळ बळावला नाही, तर अत्यंत वेगाने वाईट स्थितीला जात आहे. असे असूनही डॉक्टरी सल्ले घेणे त्यांनी चालू ठेवले होते.

त्याच महिन्यात त्यांनी आणखी एका ख्यातनाम डॉक्टरांची भेट घेतली. ह्या नामवंत डॉक्टरांनी त्या पहिल्या नामवंता-प्रमाणेच जवळ जवळ तसेच सर्व काही सांगितले, मात्र समस्या किंचित वेगळ्या रीतीने मांडली. ह्या डॉक्टरांच्या सल्ल्यामुळे इवान इल्यिचच्या शंका आणि भीती तेवढ्या वाढल्या. त्यांच्या मित्राच्या एका मित्राने—एका उत्तम डॉक्टरने—अगदी वेगळेच रोगनिदान केले. इवान इल्यिच आजारातून बरे होतील असे जरी त्याने आश्वासन दिले, तरी त्याच्या प्रश्नांमुळे आणि निदानांमुळे इवान इल्यिचचा गोंधळ अधिकच वाढला व शंकाही

वाढल्या. एका होमिओपाथ डॉक्टरने आणखीच वेगळे निदान केले आणि दुसरेच औषध लिहून दिले. इवान इलियचनी इतर कुणाच्याही नकळत एक आठवडाभरपर्यंत ते नवीन औषध घेऊन पाहिले. कुठलाही आराम न पडता जेव्हा आठवडा उलटून गेला तेव्हा त्यांची सर्व उपचारांवरची श्रद्धा उडाली व ते पूर्वीपेक्षा जास्त निराश बनले.

एकदा त्यांच्या ओळखीच्या एका बाईने त्यांना देवाच्या तसबिरींच्या साह्याने बऱ्या झालेल्या आजारांच्या गोष्टी सांगितल्या. तिचे बोलणे आपण लक्षपूर्वक ऐकून घेतले आणि अशा चमत्कारांवर काही काळ आपला विश्वासही बसला, असे जेव्हा इवान इलियचना आढळले तेव्हा मात्र ते हादरले. "एवढा मी दुबळा बनलोय?" त्यांनी स्वतःला प्रश्न केला. "मूर्खपणा! घाबरटपणा मी सोडून दिला पाहिजे, एकाच डॉक्टरला धरून तो सांगेल ते उपचार काटेकोरपणं अंमलात आणले पाहिजेत. आता हेच मी करीन. बस्स झालं! स्वतःबद्दल विचार करणं बंद करून टाकीन आणि उन्हाळ्यापर्यंत डॉक्टरच्या आज्ञा काटेकोर पाळीन. मग पुढं बघू. आता इतःपर चंचलपणा बंद!"

हा निर्णय करणे सोपे होते, पण त्याची अंमलबजावणी अवघड होती. त्यांच्या कुशीमधील वेदना त्यांना शिणवून टाकत होती, दिवसागणिक ती वाढत चालली होती, त्यांना क्षणाचा विसावा देत नव्हती. त्यांच्या तोंडातील चवीला अधिक कडवटपणा आला होता, आपल्या तोंडाला उग्र दुर्गंध येतो याची त्यांना जाणीव झाली होती. त्यांची भूक मंदावली आणि ते अधिक अशक्त बनले. आता ते स्वतःला फसवू शकत नव्हते. इवान इलियच यांच्या बाबतीत काहीतरी महा-

भयानक घडत होते, काहीतरी नवीन घडत होते. आजवर कधी आली नव्हती अशी महान घडी त्यांच्या आयुष्यात आली होती. आणि ह्याची जाणीव त्यांना फक्त एकट्याला होती. त्यांच्या भोवतालच्या लोकांना हे समजत नव्हते, अथवा समजून घेण्याची त्यांना फारशी क्षिती नव्हती. जगात नेहमी-प्रमाणे सर्व काही सुरळीत चालले होते अशा भावनेने ती माणसे वावरत होती. ह्या वस्तुस्थितीचा इवान इल्यिचना विशेष मनः-स्ताप होत होता. त्यांच्या घरामधील माणसे — विशेषतः सामाजिक करमणुकीत रमलेली त्यांची बायको आणि मुलगी — काहीही पहात नव्हती, काहीही समजून घेत नव्हती. उलट इवान इल्यिचच्या खचून जाण्याबद्दल आणि काटेकोरपणाबद्दल बोल लावीत होती. जणू काही तसे वागणे हा त्यांचा अपराध होता. घरच्या लोकांनी कितीही लपविण्याचा प्रयत्न केला तरी इवान इल्यिचना स्पष्ट जाणवत होते की, घरच्या माण-सांना त्यांची कटकट वाटत होती. त्यांच्या आजारपणाबद्दल त्यांच्या पत्नीने एक विशिष्ट दृष्टिकोन बनवून घेतला होता. इवान इल्यिच काहीही बोलले अथवा कसेही वागले तरी ती आपल्या समजुतीला चिकटून रहात होती. आपल्या मित्र-मैत्रिणींना ती आपले मत सांगायची : "त्याचं असं आहे बघा, सगळ्या दयाळू अंतःकरणाच्या माणसांप्रमाणं इवान इल्यिचसुद्धा डॉक्टरांच्या सगळ्या आज्ञा तंतोतंत पाळू शकत नाही. आज डॉक्टरांनी सांगितल्याप्रमाणं तो औषधं घेतो, खातो-पितो; पण उद्या, जर मी त्याच्यावर लक्ष ठेवलं नाही तर, आपलं औषध घ्यायला तो विसरतो आणि स्टर्जन मासा खातो (जो त्याला मना आहे), आणि रात्री एक वाजेपर्यंत पत्ते खेळत बसतो."

"कधी वागलोय मी असा?" एकदा इवान इल्यिचनी चिडून तिला विचारले. "फक्त एकदा, प्योत्र इवानिचकडं!"

"आणि काल रात्री शेबेकबरोबर!"

"ते जमेत धरायचं नाही; ठणकेमुळं मला झोप लागत नव्हती."

"त्याचा संबंध नाही. जर तू तसाच वागत राहिलास तर कधीच बरा होणार नाहीस आणि आम्हा सर्वांचा छळ करत राहणार."

प्रास्कोव्या फ्योदरोवना आपल्या स्नेह्यांशी आणि खुद्द इवान इल्यिचशी ज्या पद्धतीने बोलत होती त्यावरून पाहता, तिच्या नवऱ्याच्या आजारपणाला तो स्वतःच जबाबदार होता आणि तिला केवळ त्रास देण्यासाठी हा सर्व प्रकार चालला होता, असे तिचे मत बनलेले दिसत होते. तिचा हा दृष्टिकोन बुद्धीपुरस्सर नव्हता असे इवान इल्यिचना वाटे, पण तरीही तो सोसणे त्यांना सोपे गेले नाही.

कामाच्या ठिकाणीही आपल्याकडे विचित्र दृष्टीकोनामधून सारे पाहतात असे इवान इल्यिचच्या ध्यानात आले, किंवा तसा त्यांना भास झाला. एखादा लौकरच आपली जागा रिकामी करणार असला म्हणजे त्याच्याकडे इतरजण जसे बघतात तसे त्यांचे सहकारी त्यांच्याकडे चोरटे कटाक्ष टाकू लागले होते. इतर वेळा त्यांचे मित्र त्यांच्या कल्पित आजाराविषयी त्यांची प्रेमाने हजेरी घेत. ती भीतीदायक, भयानक, अश्रुत अशी जी गोष्ट त्यांच्या शरीरात वाढत होती, त्यांच्या शरीरात रात्रंदिवस कुरतडत होती, त्यांना कुठेतरी ठामपणे फरफटत नेत होती, ती गोष्ट म्हणजे विनोदाचा जणू काही अत्यंत योग्य विषय होती. श्वार्त्झचा त्यांना विशेष राग येऊ

लागला, कारण त्याचा उत्साहीपणा, खेळकरपणा आणि नेहमी सुयोग्य राहण्याचा गुण पाहिला की, इवान इल्यिचना दहा वर्षांपूर्वीच्या स्वतःची आठवण व्हायची.

त्यांचे मित्र त्यांच्याबरोबर पत्ते खेळायला येत. ते टेबलाशी बसत, नवीन पत्ते पिसून वाटत, इवान इल्यिच स्वतःचा चौकटचा डाव बनवीत—एकूण सात. त्यांचा जोडीदार म्हणाला, "हुकमाची पानं नाहीत," आणि दोन चौकटची पाने त्याने खाली ठेवली. आणखी काय हवे? इवान इल्यिच-ना 'प्रचंड विजया'चा आनंद व्हायला हवा होता.

पण अचानक इवान इल्यिचना ठणकणारी वेदना जाणवते, तोंडातील कडवट चव जाणवते आणि अशा परिस्थितीत 'प्रचंड विजया'चा आनंद उपभोगणे वेडेपणाचे आहे असे त्यांना कळून चुकते. आपला जोडीदार, मिखाईल मिखाईलो-विच आपल्या गुबगुबीत पंजाने टेबलावर थाप कशी मारतो आणि इवान इल्यिचना पत्ते घेणे कष्टाचे जाऊ नये म्हणून त्यांच्या पुढ्यात तो पत्त्यांना कसे सारतो, हे इवान इल्यिच पाहतात. "मला हात लांबवायचे त्राण राहिले नाहीत असं वाटतं का याला?" इवान इल्यिच मनाशी विचार करतात आणि हुकूम कोणता हे विसरून आपल्याच जोडीदाराचे पान हुकमाने मारतात व तीनाने त्यांचा 'प्रचंड विजय' हुकतो. सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे मिखाईल मिखाईलोविच किती बिथरले हे त्यांना समजते, तरीही ते पर्वा करीत नाहीत. आणि ते का पर्वा करीत नाहीत याचा विचार करणे फार भयानक वाटते.

त्यांना किती वाईट वाटतेय हे प्रत्येकाला दिसते आणि ते त्यांना म्हणतात: "तुम्ही दमला असलात तर आपण खेळ

थांबवू. थोडी विश्रांती घ्या." विश्रांती? पण ते तर मुळीच दमलेले नाहीत आणि रबर पूर्ण करतील. सगळे दुर्मुखले आणि गप्प आहेत. त्या दुःखी वातावरणाला आपण जबाबदार आहोत याची इवान इल्यिचना जाणीव आहे, पण ती विषण्णता नाहीशी करण्यास ते असमर्थ आहेत. त्यांचे भोजन होते आणि पाहुणे आपापल्या घरी परततात. इवान इल्यिच एकटेच बसून राहतात. आपले जीवन विषारी बनलेय आणि इतरांचे जीवन आपण विषारी बनवतोय ही जाणीव उराशी धरून. ते वीष त्यांच्या शरीरात खोल खोल भिनत चालल्याची त्यांना कल्पना येतेय.

आणि ही जाणीव, शारीरिक वेदना व भीतीची भावना घेऊन त्यांना बिछान्यात पडून रहावे लागते. बऱ्याच वेळा वेदनेमुळे ते रात्र रात्र झोपत नाहीत. पण परत सकाळी त्यांना उठले पाहिजे, कपडे करून कोर्टात गेले पाहिजे, बोलले आणि लिहिले पाहिजे; आणि जर ते कोर्टात गेले नाही तर तेच चोवीस तास त्यांना घरात बसून काढले पाहिजेत. प्रत्येक तास म्हणजे मनस्वी छळवाद. आणि अशा रीतीने त्यांना जगत राहिले पाहिजे, अंतापर्यंत, एकट्याने, त्यांना समजून घेणाऱ्या आणि त्यांची कीव करणाऱ्या एकाही व्यक्तीविना.

## ५

अशा रीतीने एक महिना उलटला. आणखी एक महिना गेला. नव्या वर्षाच्या जरा आधी इवान इल्यिचचा मेहुणा भेटीला आला. तो आला तेव्हा इवान इल्यिच कोर्टात होते.

प्रास्कोव्या फ्योदरोवना खरेदीला बाहेर गेली होती. इवान इल्यिच घरी परतले तेव्हा त्यांचा तगडा, निकोप मेहुणा त्यांच्या अभ्यासिकेत आपली बॅग उघडत असलेला त्यांना आढळला. इवान इल्यिचच्या पावलांचा आवाज ऐकताच त्याने मान वर केली व क्षणभर मूकपणे इवान इल्यिचकडे टक लावून पाहिले. त्या टक लावून पाहण्यामधून इवान इल्यिचना सारे काही उमजून चुकले. त्यांच्या मेहुण्याने चकित होऊन तोंड वासले, पण पटकन स्वतःला सावरून आवाज न करता तोंड मिटले. त्याच्या ह्या कृतीमधून सर्व खुलासा झाला.

"काय, मी खूप बदललोय?"

"अं... अं... होय. खूप बदल झालाय तुमच्यात."

त्यानंतर मात्र इवान इल्यिचनी खूप प्रयत्न केले तरी त्यांच्या मेहुण्याने त्यांच्या बाह्य रूपाविषयी चकार शब्द काढला नाही. प्रास्कोव्या फ्योदोरोवना तेथे आली आणि मेहुणा तिच्याकडे गेला. इवान इल्यिचनी दार बंद केले आणि स्वतःला आरशात न्याहाळून पाहिले. प्रथम तिरप्या कोनामधून आणि नंतर पूर्ण समोरून. आपल्या बायकोबरोबर काढलेला स्वतःचा फोटो त्यांनी उचलला व आरशातील स्वतःच्या प्रतिबिंबाशी त्याला ताडून पाहिले. फरक महाभयानक होता. त्यांनी कोपरापर्यंत बाही वर सरकवून आपला हात निरखला, परत बाही खाली केली व बैठ्या स्टुलावर धपकन बसकण घालून अत्यंत निराश विचारांमध्ये ते गढून गेले.

"नको... नको," ते स्वतःशी म्हणाले. ताडकन उठून ते टेबलापाशी गेले आणि चालू खटल्यावरील टिपणे वाचायला त्यांनी आरंभ केला. पण त्यांना काहीही वाचता येईना. दार उघडून ते स्वागत-कक्षात गेले. दिवाणखान्याचे दार

अर्धवट उघडे होते. चोरपावलांनी त्या दारापर्यंत चालत जाऊन ते कान लावून ऐकू लागले.

"छेः छेः, तू अतिशयोक्ती करतो आहेस," प्रास्कोव्या फ्योदरोवना म्हणाली.

"अतिशयोक्ती? तुला स्वतःला दिसत नाही? तो प्रेतासारखा दिसतोय. त्याचे डोळे बघ. त्यांच्यात प्राण नाही. काय झालंय त्याला?"

"कुणालाच माहीत नाही. निकोलायेव" (दुसरा एक डॉक्टर) "काहीतरी म्हणाला, पण मला माहीत नाही... लेश्चेतीत्स्की" (नामवंत डॉक्टर) "त्याच्या अगदी उलट म्हणाले."

इवान इल्यिच दारापासून दूर झाले व आपल्या खोलीत जाऊन बिछान्यावर पडून विचार करू लागले: "मूत्रपिंडाचा विकार." डॉक्टरांनी त्यांना सांगितलेल्या सर्व गोष्टी त्यांनी आठवून पाहिल्या. त्यांचे मूत्रपिंड ढिले झाले होते असे त्यांना डॉक्टरनी सांगितले होते. आपल्या कल्पनेत त्यांनी त्या मूत्रपिंडाला पकडले व परत त्याच्या जागी बसविले. किती सोपे भासले होते ते काम. "खरंच, प्योत्र इवानोविचला जाऊन भेटलं पाहिजे" (डॉक्टर मित्र असलेला त्यांचा मित्र). घंटा वाजवून त्यांनी गाडीला घोडा जुंपायला सांगितले आणि मित्राच्या भेटीला जायला ते सज्ज झाले.

"कुठं चाललास ज्याँ?" त्यांच्या पत्नीने विशेष करुण आणि अतिशय प्रेमळ स्वरात विचारले.

तिच्या स्वरातील अति-प्रेमळपणा त्यांना खुपला. त्यांनी तिच्याकडे रागीट कटाक्ष फेकला.

"मला प्योत्र इवानोविचला जाऊन भेटणं आवश्यक आहे."

डॉक्टर मित्र असलेल्या आपल्या मित्राकडे ते गेले आणि

तिघेजण मिळून डॉक्टरला भेटायला गेले. डॉक्टर घरीच होते आणि इवान इल्यिचनी डॉक्टरांशी खूप वेळ बातचित केली.

आपल्या शरीरात कोणते शरीरशास्त्रीय आणि इंद्रियविज्ञानशास्त्रीय बदल घडत आहेत त्याची पूर्ण कल्पना डॉक्टरांशी चर्चा केल्यानंतर त्यांना आली.

त्यांच्या अंधान्त्रामध्ये अत्यंत सूक्ष्म असे काहीतरी होते. त्याच्यावर उपचार करणे शक्य होते. एका इंद्रियाच्या कार्याला बळकटी आणणे आवश्यक होते, दुसऱ्या इंद्रियाला दुबळे बनवायला पाहिजे होते, काहीतरी शोषून घ्यायला हवे होते आणि मग सगळे काही ठीक झाले असते.

जेवणाला यायला इवान इल्यिचना थोडा उशीर झाला. जेवणानंतर काही वेळपर्यंत त्यांनी मजेने गप्पा मारल्या. आपल्या अभ्यासिकेत जाऊन काम करावेसे त्यांना वाटत नव्हते. सरतेशेवटी ते उठले आणि कामाला बसले. काही खटल्यांचे कागदपत्र त्यांनी चाळले, आपल्या कामावर लक्ष केंद्रित केले. पण त्यांच्या मनाच्या कोपऱ्यात कुठेतरी एक बोचणी सतत सलत होती. काहीतरी वैयक्तिक, तातडीची बाब त्यांनी मनात दाबून टाकली होती आणि कामातून मोकळे होताच ते तिचा विचार करणार होते. काम संपविल्यानंतर त्या खाजगी गोष्टीची त्यांना आठवण झाली: त्यांच्या अंधान्त्रावर चिंतन. पण त्यावर चिंतन करीत ते बसले नाही. त्याऐवजी चहा प्यायला दिवाणखान्यात गेले. तेथे पाहुणे बसले होते. त्यांच्या गप्पा चालू होत्या, कुणी पियानो वाजवीत होते, कुणी गाणे गात होते. त्या पाहुण्यांमध्ये तपासणी मॅजिस्ट्रेट होता, त्यांच्या मुलीचा अपेक्षित वाग्दत्त वर. त्या सर्वांमध्ये इवान इल्यिच सर्वात जास्त मजेत होते असे प्रास्कोव्या

प्योदरोवनाच्या ध्यानात आले. पण आपल्या अंधान्त्रावरील महत्त्वाचे चिंतन आपण बाजूला सारले, ह्या गोष्टीचा इवान इल्यिचना एक मिनिटभरही विसर पडला नव्हता. अकरा वाजता त्यांनी सर्वांचा निरोप घेतला व ते आपल्या खोलीत गेले. आजारी झाल्यापासून आपल्या अभ्यासिकेलगतच्या छोटचा खोलीत ते एकटेच झोपत होते. खोलीत जाऊन त्यांनी कपडे उतरविले आणि झोलाची एक कादंबरी वाचायला घेतली. पण वाचनाऐवजी विचारांमध्ये त्यांचे मन रमले. त्यांनी कल्पना केली की, अंधान्त्रावरील दीर्घ-वांच्छित उपचार प्रभावी ठरला होता. सुरळीत कार्याचे शोषण, उत्क्षेपण आणि पुन:स्थापन घडले होते. ते स्वत:शी म्हणाले : "अर्थात आपण केवळ निसर्गाला मदत केली पाहिजे." त्यांना आपल्या औषधाची आठवण झाली. ते स्वत: उठले, त्यांनी औषध घेतले आणि औषधाचा किती हितकारक परिणाम घडला, वेदना किती कमी झाली अशा भावनेने उताणे निजले. "एकच केलं पाहिजे ते म्हणजे नियमितपणानं औषध घेतलं पाहिजे आणि वाईट गोष्टी टाळल्या पाहिजेत. एव्हाना मला खूप बरं वाटू लागलंय, कधी नव्हतं एवढं बरं वाटू लागलंय." त्यांनी आपल्या कुशीत बोटे खुपसून पाहिली. स्पर्शाची वेदना होत नव्हती. "मला काहीही होत नाही, मला खरंच खूप बरं वाटतंय." मेणबत्ती विझवून ते कुशीवर निजले. त्यांचे अंधान्त्र सुधारत होते, शोषण करीत होते. अचानक त्यांना जुनी, परिचित, कुरतडणारी वेदना जाणवली. शांत, गंभीर, सतत. तोंडात तीच वाईट चव. त्यांचे काळीज लकाकले, त्यांना चक्कर आली. "देवा रे देवा!" ते पुटपुटले. "पुन:पुन्हा आणि ती कधीही थांबणार नाही!" अचानक

त्यांना सर्व गोष्टी वेगळ्या दृष्टीकोनातून दिसू लागल्या. "अंधान्त्र. मूत्रापिंड," ते स्वतःशी म्हणाले. "ही केवळ अंधान्त्राची आणि मूत्रपिंडांची बाब नाही, ही आयुष्याची बाब आहे... आणि मृत्यूची! खरंच, एकेकाळी आयुष्य होतं आणि आता ते सरतंय, सरतंय आणि त्याला थोपवून धरण्यासाठी मी काहीही करू शकत नाही. कशाला मी स्वतःला फसवायचं? मी मरतोय, अवघ्या काही आठवड्यांचा, दिवसांचा किंवा तासांचा प्रश्न आहे हे माझ्याशिवाय प्रत्येकाला स्पष्ट माहीत नाही काय? जिथं प्रकाश होता तिथं आता अंधार आहे. मी इथं होतो, आता तिथं चाललोय. कुठं?" त्यांना दरदरून घाम फुटला आणि श्वासोच्छ्वास करण्यास अडथळा येऊ लागला. आपल्या काळजाच्या ठोक्यांविना त्यांना दुसरे काहीही ऐकू येईनासे झाले.

"मी इतःपर अस्तित्वात राहणार नाही. काय राहील अस्तित्वात? काहीही नाही. मी अस्तित्वात रहायचा थांबल्यानंतर कुठं असेन? खरंच का हा मृत्यू? नाही, मला मरायची इच्छा नाही!" मेणबत्ती पेटविण्यासाठी ते ताडकन उठले. थरथरत्या हातांनी त्यांनी मेणबत्ती चाचपडली. मेणबत्ती आणि शमादान त्यांच्या हाताच्या धक्क्याने खाली पडली. ते परत उशीवर आडवे झाले. "काय बिघडतं? सारं सारखंच," सताड उघड्या डोळ्यांनी अंधारात टक लावून पहात ते स्वतःशी म्हणाले. "मृत्यू. होय, मृत्यू. त्यांना तो माहीत नाही, त्याला माहीत करून घ्यायची इच्छा नाही आणि दया नाही. ते खेळताहेत." (गाण्याच्या लकेरी आणि पियानोची साथ बंद दारामधून त्यांना अस्पष्ट ऐकू आली.)

"आत्ता त्यांना कशाचीच पर्वा वाटत नाही, पण लौकरच तेसुद्धा मरतील. मूर्ख लेकाचे! प्रथम मी जाईन, नंतर ते; त्यांनासुद्धा मरण येईल. आत्ता आनंद साजरा करताहेत, पशू!" त्यांच्या संतापामुळे त्यांचा श्वास घुसमटला. त्यांची भयानक, असह्य दयनीय अवस्था झाली. प्रत्येकाची नेहमी ह्या संकटात अखेर झालीच पाहिजे हा विचार असह्य होता. ते कष्टाने उठून बसले.

"काहीतरी बिघडलंय. मी स्वत:ला शांत केलं पाहिजे आणि आरंभापासून विचार केला पाहिजे." आणि ते विचार करू लागले. "माझ्या आजाराची सुरुवात. माझ्या कुशीत दणका बसला, पण त्यावेळी आणि दुसऱ्या दिवशीसुद्धा काहीच जाणवलं नाही. थोडंसं दुखलं, पण नंतर वेदना वाढत गेली आणि मग मी डॉक्टरांकडं जाऊ लागलो. मग मला थकल्या-सारखं, निराश वाटू लागलं आणि मग आणखी डॉक्टर. आणि हा सारा वेळ मी कड्याच्या टोकाच्या जवळ जवळ जात होतो. माझी शक्ती आटली. आणखी जवळ जवळ. आणि असा मी तुटून पडलोय. माझ्या डोळ्यात जीव नाही. मृत्यू. आणि मी अजूनही माझ्या अंधान्त्राचा विचार करतोय. माझ्या आतड्यांची दुरुस्ती करण्याचा मी विचार करतोय आणि हा मृत्यू आहे. पण खरंच का हा मृत्यू आहे?" पुन्हा एकदा त्यांना भीतीने झपाटले. त्यांनी धाप टाकली, ते खाली वाकले, त्यांनी काड्यापेटी चाचपली आणि पलंगाशेजारच्या टेबलाला त्यांच्या हाताचे कोपर आपटले. ते टेबल वाटेत आडवे आले होते आणि कोपर आपटल्यावर त्यांना खूप दुखले. त्यांना टेबलाचा राग आला व दुसऱ्यांदा त्याच्यावर जोरात धक्का मारून त्यांनी टेबलाला खाली पाडले. आटो-

कष्टाने श्वास घेण्याचा प्रयत्न करीत ते उताणे निजले आणि त्या क्षणीच मृत्यू येण्याची वाट पाहू लागले.

पाहुणे आपापल्या घरी जात होते. त्यांना निरोप देणाऱ्या प्रास्कोव्या फ्योदरोवनाला टेबल खाली पडल्याचा आवाज ऐकू आला आणि ती खोलीत आली.

"काय झालं?"

"काही नाही. चुकून मी त्याला धक्का मारला."

ती बाहेर गेली व मेणबत्ती घेऊन परत आली. तिच्यावर आपले डोळे रोखून, खूप धावून आलेल्या माणसाप्रमाणे जोरजोराने आवाज करीत व जलद श्वास घेत ते तेथे पडून होते.

"ज्याँ, काय झालं?"

"क्... काही नाही. मी धक्का... मारला." त्यांनी विचार केला, "कशाला सांगू तिला? काही समजणार नाही तिला."

आणि तिला समजले नाही. तिने टेबल उचलून नीट ठेवले, मेणबत्ती पेटवली आणि ती घाईघाईने निघून गेली. तिला पाहुण्यांना निरोप द्यायचा होता.

ती जेव्हा परत आली तेव्हा ते अजूनही उताणे निजून छताकडे टक लावून पहात होते.

"काय झालं? प्रकृती खूप बिघडली का?"

"हो."

मान हलवून ती खाली बसली.

"ज्याँ, आपण लेश्चेतीत्स्कींना बोलावून घेऊ या का?"

नामवंत डॉक्टरना बोलवायचे म्हणजे खूप खर्च आला. त्यांनी कडवट स्मित केले आणि नकार दिला. ती थोडा

वेळ बसून राहिली, मग त्यांच्यापाशी जाऊन तिने त्यांच्या कपाळाचे चुंबन घेतले.

तिने जेव्हा त्यांचे चुंबन घेतले तेव्हा त्यांना तिचा मन:-पूर्वक तिटकारा वाटला होता आणि तिला दूर ढकलून देण्याची अनावर ऊर्मी दाबून धरायला त्यांना बरेच सायास पडले होते.

"अच्छा. देव करो आणि तुला चांगली झोप लागो."

"हं!"

६

आपण मरतो आहोत याची इवान इल्यिचना जाणीव झाली होती व ते सतत निराश मन:स्थितीत होते. त्यांच्या अंतर्मनाला ठाऊक होते की, त्यांचे मरण जवळ आले होते, पण ही कल्पना त्यांना केवळ सोसवत नव्हती एवढेच नव्हे, तर आकलनही होत नव्हती. कदाचित तिचे आकलन होणे शक्य नव्हते.

कीसेवॉटरच्या तर्कशास्त्राचा अभ्यास करताना शिकलेले अनुमान, "काई मानव आहे, सर्व मानव मर्त्य आहेत, म्हणून काई मर्त्य आहे," फक्त काईलाच लागू होते, स्वत:ला नव्हते असे त्यांनी सबंध आयुष्यभर मानले होते. काई हा मानव होता, अमूर्त अर्थाने मानव होता आणि म्हणून अनुमान त्याला लागू करण्यात आले होते. पण इवान इल्यिच म्हणजे काई नव्हते आणि अमूर्त अर्थाने मानव नव्हते. ते नेहमीच इतर सर्व लोकांपेक्षा वेगळे होते, अगदी वेगळे होते. त्यांच्या आई-वडिलांच्या दृष्टीने, त्यांचे बंधू मीत्या आणि वालोद्या यांच्या दृष्टीने, त्यांचा कोचमन आणि दाई यांच्या दृष्टीने, त्यांच्या

खेळण्यांच्या दृष्टीने आणि कात्याच्या दृष्टीने ते छोटा वान्या होते. बालपणच्या, किशोरपणच्या आणि यौवनाच्या सर्व सुख-दु:खांचा व उन्मादांचा अनुभव घेतलेला वान्या! वान्याला अत्यंत प्रिय असलेल्या फूटबॉलच्या चामड्याच्या वासाला काईने कधी हुंगले होते? काईने कधी आपल्या आईच्या हाताचे भावभराने चुंबन घेतले होते अथवा तिच्या रेशमी झग्यांच्या सळसळीवर प्रेम केले होते? शाळेमध्ये काईने समोशांवरून कधी भांडण केले होते? किंवा तो कधी प्रेमात पडला होता? अथवा कोर्टाच्या बैठकीत त्याने बुद्धिमत्तेची चमक दाखवली होती?

काई हा खरोखरीच मर्त्य होता व त्याने मरावे हे अगदी बरोबर आणि योग्य होते. पण विचार आणि भावनांनी काठोकाठ भरलेला वान्या, इवान इल्यिच — त्यांची बाब अगदी वेगळी होती. त्यांनी मरावे हे बरोबर आणि योग्य ठरले नसते. मरणाचा विचार फार भयावह होता.

त्यांना असे वाटत होते.

"मला जर काईप्रमाणे मरायचे असते तर मला ते माहीत असते, कुठल्यातरी आतील आवाजाने मला सांगितले असते. पण तशा प्रकारचे काहीही कधीही मला ठाऊक नव्हते. मी काईसारखा नाही हे मला नेहमी ठाऊक होते आणि माझ्या सर्व मित्रांनाही ठाऊक होते. आणि आता अचानक असे कसे घडले!" ते स्वत:शी म्हणाले. "पण असे होणे शक्य नाही. शक्य नाही. ते शक्य नाही आणि तरीही तसे घडतेय. असे कसे शक्य आहे? हे कसे काय समजून घ्यायचे?"

त्यांना ते समजत नव्हते. तो विचार खोटा आहे, चुकीच्या मार्गाकडे नेणारा आहे व अहितकारक आहे असे मानून त्याला

मनातून काढून टाकण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्याच्या जागी खरे, हितकारक विचार निर्माण करण्याची त्यांनी शर्थ केली. पण तो विचार केवळ विचार नव्हता, तो खुद्द वास्तवता होता व परत परत त्यांच्या मनात तो उद्‌भवत राहिला.

त्या विचाराची जागा घेण्यासाठी त्यांनी एकामागून एक दुसऱ्या विचारांना आमंत्रित केले. त्यांच्याकडून आपल्याला पाठबळ मिळेल अशी त्यांना आशा वाटत होती. मृत्यूच्या विचारांपासून त्यांचे रक्षण करणाऱ्या पूर्वीच्या विचारसरणीला पुन्हा आणण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण आश्चर्य म्हणजे ज्या गोष्टींनी एके काळी मृत्यूची जाणीव झाकून टाकली होती, लपविली होती, पुसट केली होती, त्या गोष्टी आता तसे करण्यास असमर्थ ठरल्या होत्या. मृत्यूला आपल्यापासून झाकून टाकणाऱ्या पूर्वीच्या विचारपद्धतीला परत प्राप्त करण्यात इवान इल्यिच अलिकडे बराच वेळ खर्चत होते. उदाहरणार्थ ते म्हणायचे: "मला कामात हरवून गेलं पाहिजे. सरतेशेवटी, एकेकाळी काम हेच माझं संपूर्ण जीवन होतं." आणि मनातील सर्व शंका-कुशंकांची हकालपट्टी करीत ते कोर्टात जायचे. आपल्या मित्रांबरोबर ते संभाषणात भाग घ्यायचे, नेहमीप्रमाणे त्यांच्यात स्वतःच्या आसनावर जाऊन बसायचे, खाली बसताना कोर्टात जमलेल्या लोकांवर एक अस्पष्ट आणि विचारमग्न कटाक्ष फेकायचे, आपल्या बारकुळ्या हातांनी आपल्या ओक-च्या लाकडी खुर्चीचे हात पकडायचे, आपल्या शेजाऱ्याकडे किंचित झुकायचे, कागदपत्रांची चाळवाचाळव करायचे, कुजबुजत्या आवाजात बोलायचे, मग एकदम ताठ बसायचे आणि कामकाजाच्या आरंभीच्या सुप्रसिद्ध शब्दांचा उच्चार

करायला नजर वर उचलायचे. पण कोर्टाची बैठक चालू असताना, खटल्याचा कोणताही टप्पा पोहोचला असताना, त्यांच्या कुशीमधील वेदना ठणकू लागायची. इवान इल्यिच तिच्याकडे फारसे लक्ष देत नसत, आपल्या मनातून तिचा विचार काढून टाकायचा प्रयत्न करीत. पण ती ठणक ठसठसत रहायची, त्यांच्या थेट पुढ्यात उभी रहायची, त्यांच्या नजरेला नजर भिडवायची. ते गडबडून गेले, त्यांच्या डोळ्यांमधील चमक विझली आणि पुन्हा एकदा त्यांनी स्वतःला विचारले: "हेच केवळ सत्य आहे काय?" त्यांच्यासारखा बुद्धिमान आणि नम्र जज्ज आता गोंधळात पडतो व चुका करतो हे पाहून त्यांचे सहकारी आणि कनिष्ठ चकित होऊ लागले, दुःखी होऊ लागले. आपल्या डोक्याला एक झटका देऊन ते स्वतःला सावरण्याचा प्रयत्न करीत, कामकाज कसेबसे अखेरपर्यंत रेटत नेत आणि घरी परत येत. त्यांना जे लपवायचे होते ते कोर्टातील कामांमुळे लपून राहू शकत नव्हते ह्याची त्यांना सखेद जाणीव झाली. तिच्यापासून त्यांची सुटका करणे कुठल्याही कायद्याला शक्य नव्हते. आणि सर्वात वाईट म्हणजे ती त्यांचे सर्व अवधान वेधून घेत होती, त्यांना इतर काहीही करायला न सांगता केवळ तिच्याकडे टक लावून बघायला लावत होती; थेट तिच्याकडे टक लावून ते पहात, पण काहीही न करता मुकाट छळ सोसत.

मनाच्या ह्या भयानक अवस्थेपासून सुटका करून घेण्यासाठी इवान इल्यिचनी इतर सुखसोयींचा, इतर आडोशांचा आधार घेतला. त्यांना इतर आडोसे गवसले व काही काळ त्यांच्यामुळे थोडा विरंगुळाही लाभला. पण लौकरच ते कोलमडले किंवा पारदर्शी बनले. जणू सर्व गोष्टींचा भेद करण्याची तिला

शक्ती होती व जगातील कोणतीही ताकद तिला बंद करून ठेवू शकत नव्हती.

त्या नंतरच्या दिवसात काहीवेळा ते दिवाणखान्यात जात, ज्या दिवाणखान्याला सजविण्यात त्यांनी प्रचंड कष्ट घेतले होते, ह्याच दिवाणखान्यात ते पडले होते; ह्याच दिवाणखान्यासाठी आपण आपल्या आयुष्याचा बळी दिला अशा विचाराने त्यांच्या चेहऱ्यावर कडवट स्मित उमटायचे, कारण त्या अपघाती पडण्यापासून आपल्या आजारपणाला आरंभ झाला होता अशी त्यांची खात्री झाली होती. त्या दिवाणखान्यात ते गेले आणि आपल्या चकचकीत टेबलावर एक खोल चरा उमटलेला त्यांनी पाहिला. ह्या नुकसानीचे कारण शोधून काढण्याचा त्यांनी प्रयत्न केला आणि ब्राँझची नक्षीदार झालर असलेल्या अल्बमचे वाकलेले बकल त्याला कारणीभूत असल्याचे त्यांना आढळले. भारी किंमतीचा हा अल्बम त्यांनी स्वतःच अत्यंत काळजीपूर्वक भरला होता. आपल्या मुलीच्या आणि तिच्या स्नेह्यांच्या निष्काळजीपणाचा त्यांना संताप आला. त्यांनी तो अल्बम उचलला. त्यांचे बकल वाकडे झाले होते, आतील फोटो उलट-सुलट झाले होते. कष्टपूर्वक त्यांनी सर्व छायाचित्रे व्यवस्थित संगतवार लावली व बकल नीट केले.

नंतर त्या अल्बमसकट सगळा मामला उचलून खोलीच्या दुसऱ्या कोपऱ्यात, जेथे फुलांच्या कुंड्या होत्या, नेण्याची कल्पना त्यांच्या डोक्यात आली. त्यांनी नोकराला हाक मारली. त्यांची बायको मदतीला आली. त्यांचा मतभेद झाला. ह्या बदलाला तिने आक्षेप घेतला. त्यांनी वाद घातला व ते चिडले. पण ते सारे छान होते, कारण **तिला** विसरायला त्यांना मदत झाली. **तिला** दृष्टीआड ढकलण्यात आले होते.

पण जेव्हा ते स्वतःच टेबल सरकवू लागले तेव्हा त्यांची बायको म्हणाली : "नको, नोकरांना करूं दे ते काम. तू पुन्हा स्वतःला दुखापत करून घेशील." आणि अचानक **ती** पडद्याआडून बाहेर आली. त्यांच्या नजरेसमोर **ती** चमकली. परत **ती** अदृश्य होईल अशी त्यांना आशा वाटली, पण आपल्या कुशीमधील वेदनेची त्यांना नकळत जाणीव झाली. तेथे काहीतरी अद्याप होते, अद्याप कुरतडत होते, आणि ते तिला विसरू शकत नव्हते व फुलांमागून स्पष्टपणे **ती** त्यांच्याकडे रोखून पहात होती. मग एवढ्या गोंधळाचा उपयोग काय?

"किल्ल्यावर हल्ला चढवावा त्याप्रमाणं ह्या झालरींपाशी मी माझे प्राण गमावले हे खरं असेल काय? भलतंच! किती भयानक! किती विचित्र! तसं असणं शक्य नाही. शक्य नाही... पण तसंच आहे."

ते आपल्या अभ्यासिकेत गेले, बिछान्यावर आडवे झाले आणि पुन्हा एकदा **तिच्या** समवेत एकटे असल्याचे त्यांना आढळले. **तिच्या** अगदी समोरासमोर आणि त्यावर त्यांच्यापाशी कोणताही उपाय नव्हता. फक्त **तिला** पहात रहायचे आणि स्वतःचे रक्त गार पडत चालल्याचे अनुभवायचे.

७

हे कसे काय घडले ते सांगणे अवघड आहे. पण इवान इल्यिचच्या आजारपणाच्या तिसऱ्या महिन्यात त्यांच्या बायकोला, मुलीला, मुलाला, नोकरांना, मित्रांना, डॉक्टरांना आणि विशेषतः खुद्द त्यांना स्वतःला समजून चुकले की, किती लौकर ते आपले पद रिकामे करतील, आपल्या उपस्थितीच्या जाचा-

मधून इतर जिवंत माणसांना आणि स्वतःला स्वतःच्या यातनां-मधून मुक्त करतील, एवढ्यापुरतेच त्यांच्यात इतरांना स्वारस्य उरले होते.

त्यांची निद्रा कमी कमी होत गेली. त्यांना अफूचे डोस व मॉर्फिनची इंजेक्शने देण्यात येऊ लागली. पण त्यामुळे आराम पडेना. आरंभी त्यांच्या अर्धवट शुद्धीमधील बधीर यातना एका परीने आराम होता, कारण तो एक नवा अनुभव होता. पण लौकरच शमरहित वेदनेपेक्षा ती वेदना जास्त वाढली.

डॉक्टरांच्या सूचनांबरहुकूम त्यांच्यासाठी खास जेवण शिज-विण्यात येत होते; पण ते सगळे पदार्थ त्यांना बेचव वाटू लागले, त्यांना जेवणाची जास्त जास्त शिसारी येऊ लागली.

त्यांच्या मलमूत्रविधींसाठी वेगळी व्यवस्था करण्यात आली होती. तो रोजचा त्रास होता. त्रास म्हणण्याचे कारण अस्वच्छता, अशोभनीयता, दुर्गंधी आणि विधीसाठी दुसऱ्या व्यक्तीच्या मदतीची गरज. पण ह्या अप्रिय उद्योगामधून इवान इल्यिचना एक आराम लाभला. कोठीघरातील नोकर गेरासिम त्यांची स्वच्छता करू लागला.

गेरासिम हा ताजातवाना, स्वच्छ असा शेतकऱ्याचा पोरगा होता आणि शहरच्या अन्नावर तो चांगला पोसला जात होता. तो नेहमी उत्साही आणि आनंदी असे. हा रशियन धाटणीचे कपडे घातलेला स्वच्छ पोरगा आपले मलमूत्र साफ करण्याचे काम करीत असलेला पाहून प्रथम प्रथम इवान इल्यिचना शरमल्यासारखे झाले. एकदा, शौचपात्रावरून उठल्यानंतर, अशक्तपणापायी विजार न चढवता तसेच ते आरामखुर्चीत धप्पदिशी बसले व आपल्या उघड्या

ेऱ्यांच्या लिबलिबित स्नायूंकडे भीतीयुक्त नजरेने टक लावून पहात राहिले.

त्याच क्षणाला गेरासिम चटपट पावलांनी खोलीत आला. त्याच्याबरोबर हिवाळी हवेचा ताजा गंध आणि त्याच्या दणकट बूटांना फासलेल्या डांबराचा वास खोलीत दरवळला. हातमागाच्या कापडाचा स्वच्छ एप्रन त्याने अंगात चढवला होता, त्याच्या सुती सदऱ्याच्या बाह्या वर सरकवलेल्या होत्या, त्याचे बळकट तरुण हात स्पष्ट उठून दिसत होते. इवान इल्यिचकडे न पाहता (आपल्या मुद्रेवरून उजळणाऱ्या जीवनाच्या आनंदामुळे त्यांना चिडविल्यासारखे होईल अशी कदाचित भीती वाटून) सरळ तो शौचपात्राकडे गेला.

"गेरासिम," इवान इल्यिच दुबळ्या स्वरात म्हणाले.

गेरासिम थोडासा दचकला. आपले काहीतरी चुकले अशी त्याला भीती वाटली. आपला ताजातवाना, साधाभोळा, सुस्वभावी कोवळा चेहरा त्याने आजारी माणसाकडे गर्रकन वळविला. त्याच्या चेहऱ्यावर दाढी फुटू लागल्याच्या खुणा दिसत होत्या.

"काय पाहिजे आपल्याला?"

"तुला हे सगळं मुळीच आवडत नसेल. मला माफ कर. स्वतःचं स्वतःला निस्तरायला जमत नाही."

"असं काय म्हणता?" गेरासिमच्या डोळ्यांमधून आणि उघड्या दंतपक्तींमधून स्मित उमटले. "हे काम मी केलं म्हणून काय बिघडलं? तुम्ही आजारी आहात."

आपल्या बळकट, समर्थ हातांनी त्याने आपले नेहमीचे काम उरकले आणि हलक्या पावलांनी तो खोलीतून बाहेर गेला. पाच मिनिटांनंतर तो तशाच हलक्या पावलांनी परतला.

इवान इलियच अजूनही आरामखुर्चीत पडून होते.

"गेरासिम," त्या पोराने स्वच्छ पात्र खाली ठेवले तेव्हा ते म्हणाले. "मला जरा मदत कर बाबा, इकडं ये." गेरासिम त्यांच्या जवळ गेला. "मला वर उचल. माझं मला उठायला जमत नाही आणि द्मित्रीला मी बाहेर पाठवलंय."

गेरासिम खाली झुकला. आपल्या बळकट हातांनी आणि आपल्या पावलाप्रमाणेच हलक्या स्पर्शाने त्याने इवान इलियचना अलगद वर उचलले व एका हातावर त्यांना पेलून दुसऱ्या हाताने त्यांची विजार त्याने वर ओढली. त्यांना तो परत खुर्चीमध्ये ठेवायच्या बेतात होता, पण इवान इलियचनी स्वतःला दिवाणावर ठेवायला सांगितले. गेरासिमने त्यांना सहजपणे दिवाणावर ठेवले.

"आभारी आहे. किती समर्थ आहेस तू... सगळ्या गोष्टी किती छान करतोस."

गेरासिमने स्मित केले आणि तो बाहेर जाण्याच्या बेतात होता, पण इवान इलियचना त्याची सोबत एवढी आवडली, की त्यांनी त्याला जाऊ दिले नाही.

"ती खुर्ची जरा इकडं आण. ती नव्हे, दुसरी. माझ्या पायांखाली ठेव. माझे पाय वर असले की मला जास्त बरं वाटतं."

गेरासिमने खुर्ची उचलून आणली, एकाच झटक्यात खाली ठेवली व आवाज न करता योग्य जागी सरकवून इवान इलियचचे पाय तिच्यावर ठेवले. गेरासिमने इवान इलियचचे पाय उचलले तेव्हा त्यांना खूप बरे वाटल्याचा भास झाला.

"पाय वर ठेवलेले असले म्हणजे मला जास्त बरं वाटतं,"

इवान इल्यिच म्हणाले. "ती उशी आण आणि पायांखाली ठेव."

गेरासिमने त्याला सांगितलेले काम केले. त्याने आजाऱ्याचे पाय परत वर उचलले व त्यांच्याखाली उशी ठेवली. गेरासिमने इवान इल्यिचचे पाय वर उचलले तेव्हा परत त्यांना बरे वाटले. जेव्हा त्याने पाय खाली ठेवले तेव्हा त्यांना फार त्रास झाला.

"गेरासिम, आत्ता तू कामात आहेस का?" त्यांनी विचारले.

"नाही साहेब," गेरासिम उत्तरला. आपल्यापेक्षा मोठ्या माणसांना कसे संबोधायचे हे तो शहरच्या लोकांकडून शिकला होता.

"आणखी तुला काय करायचं आहे?"

"काहीही नाही. बाकी सर्व कामं मी पार पाडलीत. फक्त उद्यासाठी थोडी लाकडं फोडायची राहिली आहेत."

"थोडा वेळपर्यंत माझे पाय तसे वर उचलून धरशील का?"

"जरूर साहेब." गेरासिमने इवान इल्यिचचे पाय वर उचलून धरले आणि त्या अवस्थेत आपल्याला कोणतीही वेदना जाणवत नाही अशी इवान इल्यिचची कल्पना झाली.

"लाकडं केव्हा फोडणार?"

"साहेब, त्याची चिंता तुम्ही करू नका. त्यासाठी मला सवड सापडेल."

इवान इल्यिचनी गेरासिमला बसते केले व आपले पाय त्याला धरायला लावून त्याच्याशी गप्पा सुरू केल्या. आणि विचित्र वाटेल, पण त्यांची खरोखरीच कल्पना झाली की, गेरासिम जोवर त्यांचे पाय उचलून धरत होता तोवर त्यांना जास्त बरे वाटत होते.

त्यानंतर इवान इल्यिच अधून मधून गेरासिमला बोलावणे धाडू लागले. त्याच्या खांद्यांवर आपले पाय ठेवून त्या पोराशी गप्पा मारणे त्यांना आवडू लागले. गेरासिम सर्व गोष्टी स्वेच्छेने, सहजपणे, साधेपणाने आणि एवढ्या खेळकरपणे करायचा की इवान इल्यिचना गलबलून यायचे. गेरासिम सोडून कुणाचेही निरोगीपण, सामर्थ्य आणि आनंदीपण इवान इल्यिचना संताप आणायचे. पण गेरासिमची ठणठणीत प्रकृती आणि आनंदी वृत्ती मात्र त्यांना चीड आणण्याऐवजी शांत करायची.

इवान इल्यिचना सर्वात जास्त त्रास व्हायचा खोटेपणाचा. प्रत्येकाने काही ना काही कारणाने हे खोटेपण पत्करले होते व ते खोटेपण म्हणायचे की, इवान इल्यिच फक्त आजारी आहे आणि मरत नाही, जर ते गप्प बसले आणि डॉक्टरांच्या सांगण्याप्रमाणे वागले तर सर्व काही ठीक होईल. पण त्यांना स्वतःला उत्तम ठाऊक होते की, काहीही केले तरी कसलाही बदल घडणार नव्हता; फक्त त्यांच्या यातना वाढणार होत्या व ते मरणार आहेत. ह्या खोट्याचा त्यांना त्रास होत होता; कुणाचीही खोटे स्वीकारायची तयारी नव्हती याचा, त्यांना स्वतःला सत्य माहीत होते आणि इतर प्रत्येकाला सत्य माहीत होते याचा आणि त्यांच्या स्थितीच्या भीतीमुळे त्यांच्यावर खोटेपण लादले जात होते, त्या खोटेपणात त्यांना बळजबरीने सहभागी केले जात होते याचा त्यांना त्रास होत होता. हे खोटेपण त्यांच्या मृत्यूच्या वेधकाळी त्यांच्यावर लादण्यात आले होते. त्यांच्या मरणाच्या पवित्र, भीतीदायक कृतीला सामाजिक भेटींच्या, पडद्यांच्या, जेवणामधील कालवांच्या पातळीला खाली आणण्यात आले होते याचा इवान इल्यिचना अवर्णनीय

त्रास होत होता. आणि आश्चर्य म्हणजे ते लोक जेव्हा वारंवार ठरीव ठशाची वर्तणूक त्यांच्याशी करीत तेव्हा इवान इल्यिच अवघ्या एका केसाच्या अंतरावर ओरडायच्या बेतात असत: "थांबवा तुमचा खोटेपणा! तुम्हाला माहीत आहे आणि मलाही माहीत आहे की मी लौकरच मरणार आहे. निदान खोटं वागायचं थांबवा!" पण असे बोलण्याचे धैर्य त्यांना कधीही झाले नाही. त्यांना समजत होते की, त्यांच्या मरणाच्या भीतीदायक कृतीला त्यांच्या भोवतालच्या लोकांनी योगायोगाने अप्रिय घडणाऱ्या घटनेच्या पातळीला, खाली नेले होते. सारे आयुष्य ज्या "शिष्टसंमततेशी" ते गुलामासारखे जखडलेले होते तिचा जणू त्यांच्याकडून आचारभंग घडत होता (दिवाणखान्यात प्रवेश करणाऱ्या माणसाला दुर्गंध येत असला म्हणजे जसे इतर लोक वागतात त्याप्रमाणे ती माणसे वागत होती), त्यांच्याकडून शिष्टाचाराचा भंग घडत होता. त्यांनी पाहिले की त्यांच्याबद्दल कुणालाही वाईट वाटत नव्हते, कारण त्यांच्या स्थितीला समजून घेण्याची कुणी पर्वा करीत नव्हते. त्यांना समजून घेणारी आणि त्यांच्याबद्दल वाईट वाटून घेणारी एकच व्यक्ती होती — गेरासिम. म्हणून इवान इल्यिचना फक्त गेरासिमचा कळवळा येत होता. काही वेळा गेरासिम आख्खी रात्र त्यांचे पाय उचलून बसायचा आणि "इवान इल्यिच, तुम्ही काळजी करू नका; मी नंतर झोपेन," असे म्हणून झोपायला जायला नकार द्यायचा तेव्हा इवान इल्यिचना अपूर्व समाधान वाटायचे. अथवा जेव्हा गेरासिम अचानक त्यांना एकेरीत म्हणायचा: "तू आजारी आहेस म्हणून तुझी सेवा करतो. तर त्यात बिघडलं कुठं?" तेव्हा इवान इल्यिचना फार बरे वाटायचे. एकटा गेरासिम तेवढा खोटे बोलत

नव्हता. त्याच्या प्रत्येक कृतीवरून दिसून येत होते की, खरी परिस्थिती फक्त त्यानेच जाणली होती व ती लपवून ठेवण्याची गरज त्याला भासत नव्हती. आपल्या गरीब बिचाऱ्या क्षीण होत जाणाऱ्या मालकाची त्याला दया येत होती. एकदा इवान इल्यिचनी त्याला घालवून दिले तेव्हा तो अगदी प्रांजलपणे त्यांना म्हणाला: "कधीतरी आपण सगळेच मरणार आहोत. मग आत्ता मी तुम्हाला का मदत करू नये?" त्याच्या म्हणण्याचा अर्थ असा होता की, इवान इल्यिचजवळ बसून राहणे त्याला त्रासदायक वाटत नाही, कारण तो एका मरणाऱ्या माणसाची सेवा करीत आहे व जेव्हा त्याची स्वतःची मरणघटका येईल तेव्हा त्याची अशीच कुणी सेवा करील अशी त्याला आशा वाटत होती.

खोटेपणा आणि त्या अनुषंगाने येणाऱ्या गोष्टींशिवाय इवान इल्यिचना अत्यंत वेदनादायी वाटणारी बाब म्हणजे त्यांना हवे होते त्याप्रमाणे कुणालाही त्यांच्याविषयी करुणा वाटत नव्हती. प्रदीर्घ यातना सोसल्यानंतर असे काही क्षण येत ज्यावेळी त्यांना लहान आजारी बाळाप्रमाणे समजून कुणीतरी कुरवाळावे, त्यांची दया करावी असे त्यांना फार फार वाटायचे. मात्र तसे कबूल करायला त्यांना लाज वाटत होती. आजारी मुलांचे पापे घेऊन त्यांना जसे शांत करतात त्याप्रमाणे आपल्याला कुरवाळावे, आपले पापे घ्यावेत, आपल्यासाठी कुणी रडावे, अशी त्यांना इच्छा होई. न्यायालयाचे ते महत्त्वाचे सदस्य आहे, त्यांची दाढी पांढरी होऊ लागली आहे व म्हणून असे काही घडणे अशक्य आहे याची त्यांना जाणीव होती. पण तेच त्यांना नेमके हवे होते. गेरासिमबरोबरच्या त्यांच्या संबंधांमध्ये ह्याची कुठेतरी जवळीक येत होती आणि म्हणून

गेरासिमच्या संगतीत त्यांना आराम लाभत होता. इवान इल्यिचना रडावेसे वाटत आहे, त्यांना कुणीतरी लाडाने कुरवाळावे आणि त्यांच्यासाठी अश्रू ढाळावे असे वाटत आहे, पण तेवढ्यात शेबेक त्यांना भेटायला येतात, ते त्यांचे सहकारी आहेत, तेसुद्धा न्यायालयाचे सदस्य आहेत आणि रडण्याऐवजी व सांत्वन अपेक्षिण्याऐवजी इवान इल्यिच गंभीर, विचारी चेहरा करतात आणि निव्वळ निष्क्रियतेपायी अपील कोर्टाच्या निर्णयाच्या महत्त्वावर आपले मत व्यक्त करतात आणि हट्टाने त्याचे समर्थन करतात. इवान इल्यिचच्या अखेरच्या दिवसांमध्ये त्यांच्यातील ह्या खोटेपणाने आणि त्यांच्या सभोवतालच्या सर्वांच्या खोटेपणामुळे सर्वांत जास्त वीष कालविले.

## ८

सकाळ झाली होती. सकाळ झाल्याचा एकमेव पुरावा म्हणजे गेरासिम खोलीबाहेर निघून गेला व दुसरा नोकर प्योत्र आत आला, त्याने मेणबत्त्या मालवल्या, एका खिडकीवर झालरी ओढल्या व मुकाटपणे खोली स्वच्छ करायला सुरुवात केली. सकाळ असो वा रात्र असो, शुक्रवार असो वा रविवार असो – काहीही फरक पडत नव्हता. सर्व काही तेच – तीच कुरतडणारी वेदना, क्षणभरही विसावा न देणारी ठणक; आयुष्य कधीही परत न येण्यासाठी सरत होते पण अद्याप पुरते संपले नव्हते ही तीच ती जाणीव; एकमेव सत्य असलेला अनिवारणीय मृत्यू सावकाशपणे आणि दुराराध्यपणे त्यांच्यावर झेपटत येत होता ही जाणीव; आणि मग – तो खोटेपणा.

अशा स्थितीत दिवस, आठवडे, तास यांचा विचार कसा येणार ?

"आपण चहा घेणार का?"

"ह्या माणसाला शिस्तीची सवय असणार: सकाळी मालक लोकांनी चहा प्यायचा असतो," इवान इल्यिचच्या मनात विचार आला, पण प्रत्यक्षात ते एवढेच म्हणाले :

"नाही."

"दिवाणावर पडायला जास्त बरं वाटेल का?"

"त्याला खोली स्वच्छ करायची आहे आणि माझी त्यात अडचण होतेय, मी खोलीत पसारा करून ठेवतोय, घाण करतोय," इवान इल्यिचच्या मनात आले, पण ते एवढेच म्हणाले :

"नाही. मला एकट्याला राहू दे."

नोकर आणखी थोडा वेळ साफसूफ करीत राहिला. इवान इल्यिचनी आपला हात पुढे केला. प्योत्र तत्परतेने पुढे आला.

"काय आज्ञा आहे?"

"माझं घड्याळ."

इवान इल्यिचच्या आवाक्यात पडलेले घड्याळ प्योत्रने उचलले व त्यांच्या हाती दिले.

"साडेआठ. बाकीची माणसं उठली?"

"नाही साहेब. वासिली इवानोविच" (मुलगा) "शाळेला गेले आणि प्रास्कोव्या फ्योदरोवनानी हुकूम दिलाय की तुम्हाला त्या पाहिजे असल्या तर त्यांना हाक मारायची. त्यांना बोलावू का साहेब?"

"नको, काही गरज नाही." ("थोडा चहा प्यावा का?" त्यांच्या मनात आले.) "मला थोडा चहा आण."

प्योत्र दाराकडे निघाला. आपण एकटे राहणार ह्या विचाराने इवान इलियच खूप घाबरले. ("त्याला इथं ठेवण्यासाठी काय बरं करावं? अरे हो! माझं औषध.")

"प्योत्र, माझं औषध दे." ("काय हरकत आहे? त्याचा बराच उपयोग होईल.") त्यांनी चमचा भरून औषध घेतले. "छेः, त्याचा काही उपयोग होणार नाही. मूर्खपणा. आत्मवंचना," तोंडातील त्या परिचित गुळमट घाण चवीची जाणीव होताच त्यांनी निर्णय केला. "माझा इतःपर त्यावर विश्वास नाही. पण ही वेदना मी काय म्हणून सोसायची? एक मिनिटभर जर तिच्यापासून मुक्ती मिळाली तर किती बरं होईल!") ते कण्हले. प्योत्र परत आला.

"नाही, नाही. तू जा आणि चहा आण."

प्योत्र बाहेर गेला. इवान इलियच एकटे राहिले आणि विव्हळू लागले. कुशीतील वेदनेच्या यातनांपेक्षा आपल्या दैन्यमय अवस्थेचे त्यांना जास्त दुःख होत होते. "तीच ती गोष्ट पुनःपुन्हा. त्याच न संपणाऱ्या रात्री आणि न संपणारे दिवस. जर तो लौकर आला तर किती बरं होईल! काय लौकर येईल? मृत्यू, अंधार. नाही, नाही! मरणापेक्षा दुसरं काहीही चालेल!"

न्याहरी घेऊन प्योत्र जेव्हा परतला तेव्हा इवान इलियच थोडा वेळपर्यंत गोंधळून त्याच्याकडे पहात राहिले. तो कोण होता आणि त्याला काय पाहिजे होते याचे त्यांना आकलन होईना. त्यांच्या त्या तशा नजरेने प्योत्र बापडा बावरला. आणि प्योत्र जेव्हा बावरला तेव्हा इवान इलियच भानावर आले.

"अरे हो, चहा," ते म्हणाले. "छान. ठेव खाली.

तेवढं माझं तोंड धुवायला मला मदत कर आणि स्वच्छ सदरा दे."

इवान इल्यिचनी स्वतःचे तोंड धुवायला आरंभ केला. अधूनमधून विसाव्यासाठी थांबत त्यांनी आपले हात-तोंड धुतले, दात घासले, केस विंचरले व स्वतःचा चेहरा आरशात पाहिला. आपले लुळे पडलेले केस आपल्या फिकट कपाळावर चिकटलेले दृष्टीस पडताच ते दचकले. सदरा बदलत असताना त्यांना माहीत होते की, जर त्यांनी आपल्या शरीराकडे नजर टाकली असती तर ते अधिक दचकले असते, म्हणून त्यांनी स्वतःच्या देहाकडे पाहिले नाही. अखेर सर्व काही पार पडले. त्यांनी ड्रेसिंग-गाऊन अंगात चढविला, आपल्या पायांवर ब्लँकेट टाकले व चहा पिण्यासाठी ते आरामखुर्चीत बसले. एकच क्षण त्यांना ताजेतवाने वाटले, पण चहा प्यायला सुरुवात करताच आपल्या वेदनेची आणि तोंडातील चवीची त्यांना जाणीव झाली. कसाबसा चहा पिऊन ते आडवे झाले आणि त्यांनी पाय पसरले. प्योत्रला त्यांनी जायला सांगितले.

पुन्हा फिरून तेच सारे. क्षणात थेंबभर आशेचा किरण चमचमायचा, तर दुसऱ्याच क्षणी निराशेचा सागर उसळायचा. सतत ही वेदना, ठसठसणारी असह्य वेदना, ही केविलवाणी अवस्था. एकटे असताना यातना असह्य होते. कुणाला तरी हाक मारावीशी त्यांना वाटते, पण त्यामुळे दुःख जास्तच वाढेल याची आधीच जाणीव होते. "त्यांनी मला परत मॉर्फिन दिलं तर निदान मला विसर पडेल. काहीतरी करा असं डॉक्टरना सांगितलं पाहिजे. हे असं अगदी अशक्य आहे."

अशा रीतीने एक तास उलटला. आणखी एक तास गेला.

प्रवेश दालनामधील घंटा वाजली. बहुतेक डॉक्टर आले. होय, डॉक्टरच होते. ताजे टवटवीत, लठ्ठ, जोमदार, आनंदी. त्यांच्या मुद्रेवरील भाव सांगत होता: "अस्सं, कशाला तरी तुम्ही भ्यायले आहात, पण आपण चुटकीसरशी ती भीती पळवून लावू." अशी मुद्रा या ठिकाणी अयोग्य होती हे डॉक्टरना माहीत होते, पण त्यांनी कायमचा हा भाव मुद्रेवर आणला होता आणि सकाळी व्हिजिटना निघण्या-पूर्वी अंगात घातलेला फ्रॉक-कोट जसा काढता येत नाही, त्याप्रमाणेच मुद्रेवरील तो भाव त्यांना बदलणे शक्य नव्हते.

डॉक्टरनी आपल्या हातांचे पंजे जोरजोराने, समाधानाने चोळले.

"मी गारठलोय. बाहेर भयानक गारठा आहे. माझ्या अंगात ऊब येईपर्यंत जरा थांबा," त्यांच्या बोलण्यात सूचकता होती की, त्यांना ऊब येईपर्यंत मिनिटभर थांबणे आवश्यक होते आणि मग ते सर्व काही सुरळीत व्यवस्था लावतील.

"हं, कसं वाटतंय?"

इवान इल्यिचना खात्री होती की, "आपला पोटोबा कसा आहे?" असा प्रश्न विचारायला डॉक्टरना आवडले असते, पण तसे बोलणे इष्ट नव्हे अशा विचाराने सौम्यपणे त्यांनी विचारले होते: "रात्र कशी गेली?"

इवान इल्यिचनी डॉक्टरांकडे अशा नजरेने पाहिले की जणू त्यांना म्हणायचे होते: "खोटं वागायची तुम्हाला कधीच शरम वाटत नाही का?" पण त्या नजरेचा अर्थ समजून घेण्याची डॉक्टरांची इच्छा नव्हती.

"नेहमीच्याच भयानक रीतीनं," इवान इल्यिच म्हणाले.

"वेदना कधीही थांबत नाही आणि कधीही कमी होत नाही. तुम्ही मला काही दिलं तर बरं होईल."

"छेः बुवा, तुम्ही सारे पेशंट एका माळेचे मणी. आता माझ्या अंगात ऊब आली. काटेकोर वागणाऱ्या प्रास्कोव्या फ्योदरोवनांना सुद्धा माझ्या तपमानात आता खोड दाखवता येणार नाही. तर, नमस्ते," आणि डॉक्टरांनी इवान इल्यिचशी हस्तांदोलन केले.

आपला खेळकरपणा एकदम थांबवून डॉक्टरनी चेहरा गंभीर केला आणि पेशंटला तपासायला सुरुवात केली. त्यांनी पेशंटची नाडी तपासली, त्याच्या छातीवर टिचक्या मारल्या, काळजाचे ठोके ऐकले.

हा सारा मूर्खपणा होता, पोकळ फसवेपणा होता ह्याची इवान इल्यिचना ठाम व निःशंक जाणीव होती. पण डॉक्टर जेव्हा त्यांच्यासमोर गुडघ्यावर बसले, खाली-वर कान लावून ऐकू लागले, अत्यंत गंभीर मुद्रेने शरीराच्या वेड्यावाकड्या हालचाली करू लागले तेव्हा इवान इल्यिचवर त्यांचा पगडा बसला. जसा वकीलांची भाषणे ऐकताना त्यांचा पगडा बसायचा तसा. ती भाषणे खोटी असायची आणि तसा खोटेपणा ते का करायचे हे इवान इल्यिचना माहीत असूनही.

अजूनही गुडघे दिवाणावर टेकवून डॉक्टर आपल्या पेशंटच्या छातीवर बोटांनी ठोके मारून चाचपत होते तेवढ्यात दारातून रेशमी सळसळ झाली आणि डॉक्टरांचे आगमन झाल्याची वर्दी आपल्याला न दिल्याबद्दल प्रास्कोव्या फ्योदरोवना प्योत्रची हजेरी घेत असल्याचे ऐकू आले.

ती आत आली आणि आपल्या नवऱ्याचे तिने चुंबन घेतले व तात्काळ खुलासा करायला आरंभ केला की, ती केव्हाची

उठली होती आणि केवळ गैरसमजुतीपायी डॉक्टरांचे आगमन झाले तरी तिची आजारी माणसाच्या खोलीत उपस्थिती नव्हती.

इवान इल्यिचनी तिच्याकडे पाहिले, तिच्या व्यक्तिमत्वाचा प्रत्येक तपशील न्याहाळला. तिची शुभ्र कांती, तिचा स्थूलपणा, तिचे नितळ हात आणि मान, जीवनाचे चैतन्य दाखविणारी तिच्या केसांची आभा व डोळ्यांमधील चमक—या सर्व गोष्टींचा त्यांना मनस्वी तिटकारा वाटत होता. आपल्या देहाच्या कणाकणामधून ते तिचा द्वेष करीत होते. दर वेळी तिने त्यांना स्पर्श केला, की त्यांच्यात तिरस्काराची लाट उमळून येत होती.

त्यांच्याविषयी आणि त्यांच्या आजाराविषयी तिचा दृष्टिकोन बदलला नव्हता. डॉक्टरने आपल्या रुग्णांविषयी बनविलेला दृष्टिकोन ज्याप्रमाणे तो बदलू शकत नाही, त्याप्रमाणे तिने आपला ठाम दृष्टिकोन बनविला होता—की इवान इल्यिच जे करू नये ते करीत आहेत, म्हणून त्यांच्या अवस्थेला ते स्वतःच कारणीभूत आहेत आणि त्याबद्दल त्यांची प्रेमळ हजेरी घेणे एवढेच तिला शक्य होते—आणि हा दृष्टिकोन ती बदलू शकत नाही.

"तो मुळीच ऐकत नाही! आपलं औषध नियमितपणानं घेत नाही. आणि सर्वांत वाईट म्हणजे ज्या रीतीनं झोपणं त्याला त्रासदायक आहे—पाय वर करून—तशा रीतीनं झोपायचा तो हट्ट धरतो."

गेरासिमला इवान इल्यिच आपले पाय कसे धरायला लावतात ते तिने सांगितले.

डॉक्टरांनी एक प्रेमळ, गहन स्मित केले. "काय करणार

त्याबद्दल ? आपले हे पेशंट नेहमी काहीतरी विचित्र वागतात, पण आपण त्यांना क्षमा केली पाहिजे."

डॉक्टरांनी आपली तपासणी संपविल्यानंतर आपल्या मनगटावरील घड्याळाकडे एक दृष्टिक्षेप टाकला. मग प्रास्कोव्या फ्योदरोवनाने इवान इल्यिचना सांगितले की, त्यांना आवडो वा न आवडो, पण तिने एका मोठ्या नामवंत डॉक्टरना आज बोलाविले होते आणि ते नामवंत डॉक्टर व मिखाईल दानिलोविच (साध्या डॉक्टरचे नांव) असे दोघे मिळून इवान इल्यिचना तपासणार होते आणि रोगाचे निदान करणार होते.

"कृपा करून विरोध करू नको. मी माझ्या समाधानासाठी हे करतेय," ती उपहासाच्या स्वरात म्हणाली. वस्तुत: आपण हे त्यांच्यासाठीच करतो आहोत हे त्यांना समजावे असा तिच्या उपरोधाचा हेतू होता. केवळ त्यांनी विरोध करू नये म्हणून ती असे म्हणाली होती. त्यांनी कपाळाला आठ्या घातल्या. ते काहीच बोलले नाही. खोट्या गोष्टींच्या जाळ्यात आपण असे काही फसलो आहोत, की खऱ्या-खोट्यामधील भेद ओळखणे अशक्य होते, ह्याची त्यांना जाणीव झाली होती. त्यांच्यासाठी म्हणून ती करीत असलेली प्रत्येक गोष्ट प्रत्यक्षात पूर्णत: ती स्वत:साठी करीत होती. आणि जेव्हा ती त्यांना सांगत होती की, ती स्वत:साठी करीत होती, तेव्हा खरोखरीच ती स्वत:साठी करीत होती, पण ते इतके विचित्र भासत होते की, तिच्या बोलण्याचा ते नेमका उलटा अर्थ घेत होते.

खरोखरीच साडेअकरा वाजता नामवंत डॉक्टरांचे आगमन झाले. पुन्हा एकदा इवान इल्यिचसमोर दुसऱ्या खोलीत मूत्र-

-ंडांविषयी व अंधान्त्राविषयी भारदस्त भाषेत चर्चा झडल्या. इवान इल्यिचसमोर आता फक्त जीवन-मृत्यूचा एकमेव खरा प्रश्न उभा होता. पण नेमक्या त्याच प्रश्नाला डावलून अत्यंत गंभीर स्वरूपात मूत्रपिंडांचा आणि अंधान्त्राचा प्रश्न चर्चिला जात होता. जणू मूत्रपिंडे व अंधान्त्र योग्य वागत नव्हती आणि म्हणून त्यांना ठिकाणावर आणण्यासाठी मिखाईल दानिलोविच व नामवंत डॉक्टरांनी आपल्या कंबरा कसल्या होत्या.

नामवंत डॉक्टरनी इवान इल्यिचचा गंभीर निरोप घेतला. मात्र त्यांच्या मुद्रेवर निराशा नव्हती. आपण आजारातून बरे होण्याची शक्यता आहे अथवा नाही असे इवान इल्यिचनी घाबरट आवाजात व भीती-आशायुक्त नजरेने त्यांना विचारले तेव्हा डॉक्टर म्हणाले की, त्यांना खात्री देता येत नाही, पण शक्यता आहे. दारापर्यंत डॉक्टरांचा पाठलाग करणाऱ्या इवान इल्यिचच्या डोळ्यांमधील आशेची चमक एवढी हृदयस्पर्शी होती की, अभ्यासिकेमध्ये नामवंत डॉक्टरांची फी द्यायला गेलेल्या प्रास्कोव्या फ्योदरोवनाला रडू कोसळले.

डॉक्टरांच्या प्रोत्साहनामुळे इवान इल्यिचच्या चित्तवृत्ती फुलल्या, पण फार थोडा काळपर्यंत. पुन्हा एकदा तीच खोली, तीच चित्रे, त्याच झालरी, तोच भिंतींवरील कागद, कलावस्तू आणि तोच दुखरा, यातना भोगणारा देह. इवान इल्यिच कण्हू लागले. त्यांना इंजेक्शन देण्यात आले आणि ते भ्रमामध्ये गेले.

ते जागे झाले तेव्हा संधिप्रकाश पसरला होता. त्यांचे जेवण आणण्यात आले. मोठ्या कष्टाने त्यांनी सार घेतले. पुन्हा सर्व काही तेच; पुन्हा एकदा रात्रीचे आगमन.

जेवणानंतर, सात वाजता, प्रास्कोव्या फ्योदरोवना बाहेर जाण्याच्या खास सायंकालीन पोषाखात खोलीत आली. तिच्या

उभार वक्षःस्थळांभोवती लेसची किनार होती आणि पावडरचे ठिपके तिच्या चेहऱ्यावर राहिले होते. सकाळीच तिने इवान इल्यिचना आठवण करून दिली होती की, ती आज नाटकाला जाणार आहे. सारा बेर्नार शहरात आली होती आणि इवान इल्यिचच्या आग्रहापायीच त्यांनी बॉक्सची तिकीटे काढली होती. इवान इल्यिच हे सर्व विसरून गेले होते आणि तिचे भडक सौंदर्यप्रसाधन पाहून ते मनातल्या मनात दुखावले होते. पण त्यांनी आपल्या भावना लपविल्या, कारण सौंदर्यवादी करमणूक मुलांच्या दृष्टीने शैक्षणिक मोलाची असते अशा दृष्टिकोनामधून आपण स्वतःच आग्रह करून त्यांना बॉक्सची तिकीटे खरेदी करायला लावली होती, याची त्यांना आठवण झाली.

स्वतःवर खूष असलेल्या मनःस्थितीत प्रास्कोव्या फ्योदरोवना आत आली. तरीही तिला थोडेसे अपराधी वाटत होते. ती खाली बसली आणि त्यांना कसे वाटते असे तिने विचारले. इवान इल्यिचना समजत होते की, केवळ विचारायचे म्हणून ती विचारत होती, तिला काही समजून घ्यायचे होते म्हणून नाही, कारण समजून घेण्यासारखे काहीच नव्हते. मग जे सांगणे आवश्यक होते ते तिने सांगितले: की जर बॉक्सची तिकीटे आधीच घेतली नसती तर नाटकाला जाण्याचा विचारच तिने केला नसता, एलन, त्यांची मुलगी आणि पेत्रीश्चेव (तपासणी मॅजिस्ट्रेट, त्यांच्या मुलीचा वाग्दत्त पती) नाटकाला जात आहेत, त्यांना कुणाच्या सोबतीविना एकट्यांना जाऊ देणे तिला शक्य नाही, पण बाहेर जाण्यापेक्षा इवान इल्यिच-शेजारी घरात बसून राहणे तिने अधिक पसंत केले असते आणि ती बाहेर असताना कृपा करून त्यांनी डॉक्टरांच्या सर्व सूचना काटेकोर पाळाव्यात.

"आणि फ्योदर पेत्रोविच" (भावी जावई) "तुला भेटू इच्छितोय. येऊ दे त्याला आत? आणि लिझालासुद्धा."

"खुशाल येऊ देत."

त्यांची मुलगी नटूनथटून आत आली. तिचा तरुण देह बराचसा उघडा होता. त्यांचा देह त्यांना खूप छळत असताना ती मात्र आपल्या देहाचे प्रदर्शन करण्यात दंग होती. ती भक्कम बांध्याची आणि निकोप होती. ती प्रेमात पडली होती हे उघड दिसत होते व त्यांच्या आजारपणामुळे, यातनांमुळे आणि मृत्यूमुळे आपल्या सुखावर सावट पडावे याचा तिला संताप आलेला होता.

फ्योदर पेत्रोविच सायंकालीन पोषाखात आत आला. त्याने अत्याधुनिक केशरचना केली होती, त्याच्या भक्कम मानेभोवती कडक पांढऱ्या कॉलरचा वेढा बसलेला होता, त्याच्या रुंद छातीला पांढऱ्या सदऱ्याने झाकून टाकले होते, त्याच्या पुष्ट पोटऱ्या निरुंद काळ्या तुमानीत अवगुंठित होत्या, त्याच्या एका हातात पांढरा मोजा होता आणि दुसऱ्यामध्ये टोपी होती.

त्याच्या पाठोपाठ इवान इल्यिचचा शाळकरी मुलगा गुपचुप आत आला. त्याच्या अंगात नवा गणवेष होता, हातांवर मोजे चढविलेले होते. त्या बापड्या पोराच्या डोळ्यांखाली भयानक काळी वर्तुळे उमटलेली होती आणि त्यांचा अर्थ इवान इल्यिचना ठाऊक होता.

आपल्या मुलाबद्दल त्यांना नेहमीच वाईट वाटत आले होते. आता त्या मुलाच्या भेदरलेल्या, केविलवाण्या नजरेत काहीतरी भयानक होते. गेरासिमशिवाय आपल्याला समजून घेणारा आणि आपल्याविषयी दया वाटणारा असा फक्त एकटा वास्या होता, असे इवान इल्यिचना वाटले.

ते सर्व खाली बसले आणि पुन्हा एकदा त्यांनी इवान इल्यिचच्या प्रकृतीची चौकशी केली. स्तब्धता. लिझाने आपल्या आईला ऑपेरा पाहण्याच्या दुर्बीणीबद्दल विचारले. दुर्बीण कुणी कुठे गहाळ केली यावरून माय-लेकीमध्ये एक छोटासा संघर्ष झडला. अप्रिय प्रसंग.

सारा बेर्नारला कधी पाहिलेत का असे फ्योदर पेत्रोविचने इवान इल्यिचना विचारले. प्रथम इवान इल्यिचना प्रश्न समजला नाही. मग ते म्हणाले :

"नाही. तुम्ही पाहिलंत?"

"हो. «Adrienne Lecouvreur» मध्ये."

प्रास्कोव्या फ्योदरोवना म्हणाली की, अमुक एका गोष्टीत ती खूप मोहक दिसते. मुलीने आक्षेप घेतला. त्यावरून तिच्या अभिनयाच्या मोहकतेविषयी आणि स्वाभाविकतेविषयी चर्चा सुरू झाली. अशा प्रकारच्या चर्चेत नेहमी ज्या गोष्टी बोलल्या जातात त्याच परत बोलण्यात आल्या.

संभाषण चालू असताना मध्येच फ्योदर पेत्रोविचने इवान इल्यिचकडे एक दृष्टिक्षेप टाकला व बोलणे थांबविले. इतरांनीही त्यांच्याकडे नजर टाकली व ते बोलायचे थांबले. इवान इल्यिच आपल्या नाकासमोर चमकत्या डोळ्यांनी टक लावून पहात होते. आपला तिरस्कार लपविणे त्यांना अशक्य ठरले होते. काहीतरी करायला हवे होते, पण काहीही करणे शक्य नव्हते. शांततेचा भंग करायला हवा होता, पण तसे करण्याचे कुणालाही धैर्य झाले नाही. सभ्यतेपायी लपवून ठेवलेल्या खोटेपणाला काहीतरी कारणाने वाचा फुटेल व अचानक वास्तव दृष्टीमधून सर्व काही दिसू लागेल अशी त्या सर्वांना भीती वाटू लागली. लिझाने प्रथम धीर गोळा केला.

तिने शांतता मोडली. प्रत्येकाला जे वाटत होते ते लपविण्या-च्या उद्देशाने ती तसे वागली, पण घडले उलटेच.

"जर आपण जाणार असलो, तर आता जायला पाहिजे," आपल्या घड्याळाकडे कटाक्ष टाकत ती म्हणाली. ते घड्याळ तिला वडिलांकडून भेट मिळालेले होते. आपल्या भावी पतीकडे पाहून सूचकपणे, पण कुणाला दिसेल न दिसेल असे स्मित तिने केले. त्याचा अर्थ केवळ त्या दोघांनाच ठाऊक असावा. मग रेशमी सळसळ करीत ती उठली.

ते सर्व उठले, त्यांनी इवान इल्यिचचा निरोप घेतला व निघून गेले.

ते निघून गेले तेव्हा आपल्याला अधिक बरे वाटले असा इवान इल्यिचना भास झाला. निदान खोटेपणाही निघून गेला होता — त्या लोकांबरोबरच!

पण वेदना राहिली होती. तीच जुनी वेदना, तीच जुनी भीती. त्यांच्यामुळे काहीही जास्त अवघड अथवा जास्त सोपे घडत नव्हते. ती वेदना वाढत चालली होती.

पुन्हा काळ रखडू लागला, मिनिटामागून मिनिट, तासा-मागून तास, सारे तेच, अंताविना, मात्र विशिष्ट अंताविषयीची भीती त्यांच्या मनात वाढत चालली होती.

"हो, गेरासिमला पाठवून दे," प्योत्रच्या प्रश्नाला ते उत्तरले.

## ९

त्यांची बायको परतली तेव्हा खूप उशीर झाला होता. ती चोरपावलांनी खोलीत आली, पण त्यांनी ती आलेल्याचे ऐकले. त्यांनी आपले डोळे उघडले आणि परत पटकन मिटले.

गेरासिमला बाहेर पाठवून स्वतःच त्यांच्यापाशी बसण्याची तिची इच्छा होती. पण डोळे उघडून ते म्हणाले :

"नको. तू जा."

"तुला खूप त्रास होतोय का?"

"काही फरक पडत नाही त्यामुळं."

"थोडी अफू घे."

त्यांनी होकार दिला व घोट घेतला. ती बाहेर गेली.

पहाटे तीनपर्यंत ते अर्धवट शुद्धीत यातनांपायी तळमळत होते. एका अरुंद तोंडाच्या काळ्या पोत्यात आपल्याला कोंबण्याचा ते प्रयत्न करीत होते, त्यांना अधिकाधिक आत लोटत होते, पण तळापर्यंत लोटणे जमत नव्हते असा इवान इल्यिचना भास झाला. ह्या भयानक उद्योगापायी त्यांना त्रास होत होता. ते घाबरत होते, पण तरीही त्या पोत्यात जाऊन बसण्याची त्यांना इच्छा होती. एकाचवेळी ते विरोध करीत होते आणि आत जाण्याचा प्रयत्न करीत होते. अचानक ते मोकळे सुटले, खाली पडले आणि त्यांना जाग आली. गेरासिम अजूनही पलंगाच्या पायाशी बसून होता. तो शांतपणे, चिकाटीने पेंगत होता. आणि इवान इल्यिच आपले पायमोजांमधील हडकुळे पाय त्या पोराच्या खांद्यांवर ठेवून निजले होते. आडोशामागे मेणबत्ती अजूनही जळत होती आणि त्यांच्या कुशीत वेदना अजूनही ठसठसत होती.

"गेरासिम, जा झोपायला," ते हळूच म्हणाले.

"नाही, ठीक आहे साहेब. आणखी थोडा वेळ थांबतो."

"नको. जा आता."

त्यांनी आपले पाय खाली घेतले, ते एका कुशीवर वळले आणि गालाखाली हात धरून स्वतःची कीव करू लागले.

गेन्नामिम शेजारच्या खोलीत जाईपर्यंत ते वाट पहात राहिले आणि मग मात्र एखाद्या अर्भकाप्रमाणे ते रडले. आपल्या अगतिकतेपायी, आपल्या भयानक एकलेपणापायी, देवाच्या आणि लोकांच्या निष्ठुरतेपायी व देवाच्या गैरहजेरीपायी त्यांना रडू कोसळले होते.

"कशाला केलंस तू हे सारं? ह्या जगात तू मला का आणलंस? असं मी काय केलंय म्हणून तू माझा असा छळवाद करतोस?"

उत्तराची अपेक्षा त्यांना नव्हती आणि ते रडले कारण त्यांच्या प्रश्नाला उत्तर नव्हते आणि असणे शक्य नव्हते. परत वेदना सुरू झाली, पण ते जागचे हलले नाही, त्यांनी कुणाला हाक मारली नाही. स्वतःशी ते एवढेच म्हणाले: "ठीक आहे. दे आणखी एक दणका. आणखी जोरानं! पण कशासाठी? तुझं मी कधी काय वाकडं केलं होतं?"

मग ते शांत झाले. ते केवळ रडायचेच थांबले नाही, तर श्वासोच्छवास करायचेही थांबले. सर्व लक्ष एकवटून ते ऐकू लागले: कुणाच्या बोलण्याचा आवाज ते ऐकत नसावेत; तर आपल्या आत्म्याचा आवाज, त्यांच्यामधून वाहणाऱ्या विचार-धारेला ऐकत असावेत.

"तुला काय पाहिजे?" पहिली संकल्पना पुरेशा ठळकपणे शब्दांमध्ये त्यांना ऐकू आली. "तुला काय पाहिजे? तुला काय पाहिजे?" स्वतःशी त्यांनी पुनरुच्चार केला. "यातना नकोत. जगायला हवं," ते उत्तरले.

पुन्हा एकदा त्यांनी पूर्ण अवधान एकवटले. हे एकवटणे एवढे तीव्र होते की, त्यांची वेदनासुद्धा त्यांना विचलित करू शकली नाही.

"जगायचंय? कसं जगायचंय?" त्यांच्या आत्म्याच्या आवाजाने विचारले.

"पूर्वी मी जगलो तसं जगायचंय. छान, प्रसन्न आयुष्य."

"तुझं आयुष्य पूर्वी छान आणि प्रसन्न होतं?" आवाजाने विचारले. आणि आपल्या प्रसन्न जीवनामधील सर्वोत्तम क्षणांची ते मनातल्या मनात उजळणी करू लागले. पण आश्चर्य म्हणजे त्यांच्या प्रसन्न जीवनातील ते सर्व सर्वोत्तम क्षण इत:पर त्यांना तसे वाटत नव्हते. फक्त आपल्या बालपणीच्या पहिल्या काळातील आठवणी सोडून. त्यांच्या बालपणात काहीतरी खरेच प्रसन्न होते, जगण्यालायक होते—जर ते परत आणता आले असते तर! पण ही प्रसन्नता अनुभवलेली व्यक्ती इत:पर नव्हती. दुसऱ्या कुणाच्या तरी आठवणी केल्यासारखे वाटत होते.

ज्या क्षणी त्यांच्या आठवणी ह्या सध्याच्या इवान इल्यिच नामक माणसाच्या होत्या असे आढळले त्या क्षणी त्यांच्या निश्चल अवधानामध्ये एकेकाळी भासलेला सर्व आनंद विरघळून गेला व त्याचे कसल्यातरी अर्थशून्य आणि किळसवाण्या गोष्टीत रूपांतर झाले.

आपल्या बालपणापासून जेवढे ते अधिक दूर गेले आणि वर्तमानाच्या जेवढे जास्त जवळ आले, तेवढा त्यांना त्यांचा आनंद अर्थहीन आणि शंकास्पद वाटू लागला. कायदेविद्यालयापासून हे सुरू झाले. तेथे खरोखर चांगल्या असलेल्या गोष्टी—आनंदीपणा, मैत्री, आशा—त्यांना माहीत होत्या. पण वरच्या वर्गांमध्ये जात असताना ह्या चांगल्या गोष्टी अधिक दुर्मिळ होत गेल्या. नंतर, गव्हर्नरांचा चिटणीस म्हणून आरंभीच्या काळात नोकरी करताना पुन्हा त्यांचा काही चांगल्या गोष्टींशी परिचय झाला होता. त्या बहुतेक प्रेमाशी निगडित होत्या.

मग त्यांचे आयुष्य गुंतागुंतीचे बनले आणि चांगल्या गोष्टी कमी झाल्या. नंतरसुद्धा चांगले कमीच होते आणि जेवढे पुढे ते गेले तेवढे चांगले कमी कमी होत गेले.

त्यांचा विवाह—अनपेक्षित आणि त्यातून झालेला भ्रमनिरास ... त्यांच्या पत्नीच्या तोंडाला येणारा दुर्गंध, आणि वैषयिकता, आणि बहाणे! आणि त्यांचा निर्जीव व्यवसाय, पैशाची विवंचना ... वर्षामागून वर्षांपर्यंत, एक वर्ष, दोन, दहा, वीस ... काहीही बदल नाही. जेवढी अधिक काळ ती राहिली तेवढी प्रत्येक गोष्ट अधिक निर्जीव बनली. "प्रत्यक्षात मी सतत घसरणीला लागलो होतो, तरी कल्पनेत मात्र उंचीवर चढत होतो. खरंच, तसंच होतं सारं. माझ्या मित्रांच्या मतानं मी शिखरावर चढत होतो, पण तेवढंच पायांखालून खुद्द आयुष्य निसटत होतं. आणि आता मी इथं मरतोय.

"काय घडतंय? का? अशक्य. माझं आयुष्य एवढं किळसवाणं आणि अर्थहीन असावं हे अशक्य. पण जरी ते एवढं किळसवाणं आणि अर्थहीन असलं तरी का म्हणून मी मरावं आणि एवढ्या यातनेत मरावं? काहीतरी चुकलं असलं पाहिजे.

"कदाचित मी जगायला पाहिजे होतं तसा जगलो नाही?" त्यांच्या डोक्यात कल्पना आली. "पण जसं जगायला पाहिजे होतं तसं मी जगलो नाही असं होणं शक्य नाही, कारण मी जे करायला हवं होतं ते सर्व काही केलं," ते स्वतःशी म्हणाले आणि जीवन-मरणाच्या एकूण समस्येला उत्तर देणे सर्वथा अशक्य होतं असे मानून त्यांनी ते एक उत्तर मनातून निपटून टाकले.

"आता तुला काय पाहिजे? जगायचंय? कसं जगायचंय?

"तू कोर्टात असतोस आणि शिपाई पुकारा करतो 'न्याया-

धीश महाराज येत आहेत!' तसं? न्यायाधीश महाराज येत आहेत! न्यायाधीश महाराज येत आहेत!" त्यांनी स्वत:शी पुनरुच्चार केला. "हा इथं न्यायाधीश आहे. पण मी दोषी नाही!" संतापाने ते ओरडले. "कशाबद्दल मला दोषी धरणार?" ते रडायचे थांबले आणि भिंतीकडे तोंड फिरवून त्याच त्या गोष्टीचा वारंवार विचार करीत राहिले: "का, कोणत्या कारणासाठी मला ह्या सर्व भयानकतेमधून गेलं पाहिजे?"

पण कितीही विचार केला तरी त्यांना उत्तर सापडेना. आणि जेव्हा जेव्हा त्यांच्या मनात विचार येई (वारंवार) की, त्यांनी जसे जगायला हवे होते तसे ते जगले नाही म्हणून हे सारे घडले, तेव्हा तेव्हा तात्काळ ते आपल्या जीवनातील सर्व योग्य कृत्यांची आठवण करीत आणि ह्या अयुक्त विचाराला पळवून लावीत.

## १०

दोन आठवडे उलटले. इवान इलियच आता दिवाणावरून उठत नव्हते. ते दिवाणावर निजून होते कारण बिछान्यावर पडून रहायची त्यांना इच्छा नव्हती. बहुतेक वेळ भिंतीकडे तोंड करून तेथे पडून राहताना ते एकटेच त्याच त्या अनाकलनीय यातना सोसत होते, त्याच त्या अनाकलनीय प्रश्नांचा विचार करीत होते: "हे काय आहे? खरंच का हा मृत्यू आहे?" आणि आतल्या आवाजाने उत्तर दिले: "होय, ह्यालाच मृत्यू म्हणतात." "पण मग ह्या यातना का?" आणि आतला आवाज उत्तरला, "काहीही कारण नाही." इतपतच सवाल-जबाब चालायचे. फक्त एवढेच.

इवान इल्यिच यांच्या आजाराच्या अगदी आरंभापासून, डॉक्टरकडे ते गेले त्या पहिल्या दिवसापासून, त्यांचे जीवन दोन परस्परविरुद्ध मनःस्थितींमध्ये विभागले गेले. ह्या मनःस्थिती आलटून पालटून त्यांच्यावर वर्चस्व गाजवीत होत्या: एक मनःस्थिती होती निराशेची आणि भयानक व अनाकलनीय मृत्यूची वाट पाहण्याची; दुसरी होती आशेची, त्यामुळे आपल्या शरीरामधील क्रियांचा ते कुतूहलाने अभ्यास करीत होते. क्षणात त्यांच्या नजरेसमोर तात्पुरते कार्य न करणारे मूत्रपिंड अथवा अंधान्त्र दिसायचे; तर क्षणात त्यांना केवळ मृत्यू दिसायचा; ज्याच्यापासून सुटका नव्हती असा भयानक आणि अगाध.

त्यांच्या आजाराच्या अगदी सुरुवातीपासून ह्या दोन मनःप्रवृत्तींचे आंदोलन चालू होते. पण आजार जसा बळावत गेला, तशा त्यांच्या मूत्रपिंडांविषयीच्या कल्पना अधिक अफाट व अवास्तव बनत गेल्या, तर आगामी मृत्यूची त्यांची जाणीव जास्त वास्तव बनत गेली.

तीन महिने आधी ते कसे होते आणि आता त्यांची अवस्था काय होती, याची नुसती आठवण केली, किती सातत्याने त्यांची घसरगुंडी होत गेली याची आठवण केली, तर सर्व आशा मावळून जात होती.

भिंतीकडे तोंड करून, दिवाणावर पडून इवान इल्यिचनी एकांतामध्ये अखेरचे जे दिवस काढले, गर्दीभरल्या शहरात, आपल्या अनेक मित्रांच्या आणि नातेवाईकांच्या गोतावळ्यात राहूनही जे एकलेपण अनुभवले, सागराच्या तळाशी किंवा पृथ्वीच्या गर्भात जो एकांतवास असेल अशा एकांतवासात जे दिवस काढले, त्या भयानक एकाकी अखेरच्या दिवसांमध्ये

इवान इल्यिच फक्त भूतकाळात राहिले. त्यांच्या मन:पटलावरून गतकालातील चित्रे एकामागून एक सरकत होती. त्यांचा आरंभ नेहमी नजीकच्या भूतकाळातील एखाद्या घटनेपासून होई व नंतर त्यांचे मन अधिक दूरच्या, बालपणातील काळाकडे धाव घेई व तेथे रेंगाळत राही. सकाळी त्यांना देण्यात आलेल्या आलुबुखाराच्या मुरंब्याची जर त्यांनी आठवण केली, तर त्यांच्या लहानपणीच्या चिकट, सुकलेल्या फ्रेंच मनुक्यांची, त्यांच्या विशिष्ट चवीची, त्यांना चोखल्यामुळे तोंडात निर्माण झालेल्या भरपूर लाळेची हमखास आठवण व्हायची. आणि ह्या चवीच्या आठवणीपाठोपाठ त्या काळातील आठवणींची आख्खी मालिका सुरू व्हायची: दाया, त्यांचा भाऊ, खेळणी. "त्यांचा विचार करणं बरं नव्हे... फार क्लेश होतात," इवान इल्यिच स्वत:शी म्हणत आणि पुन्हा आपल्या विचारांना वर्तमानाकडे वळवीत. दिवाणाच्या पाठीवरील बटण आणि बकऱ्याच्या उंची चामड्याला पडलेली सुरकुती. "चामडं खूप महाग आहे आणि लौकर फाटतंय. याच्यावरून मी भांडण केलं होतं. ज्यावेळी आम्ही पपांची ब्रीफ-केस फाडली होती तेव्हा चामडं वेगळं होतं आणि भांडणही वेगळं होतं, त्याबद्दल आम्हाला शिक्षा झाली होती आणि आईनं आम्हाला मिठाई घेऊन दिली होती." आणि पुन्हा त्यांचे विचार त्यांच्या बालपणावर केंद्रित झाले, पुन्हा त्यांना त्याबद्दल मनाला क्लेश झाले व दुसरा काहीतरी विचार करून त्या विचारांना पळवून लावण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

आणि आठवणींच्या ह्या मालिकेबरोबरच इतरही आठवणी त्यांच्या मनात दाटत होत्या ... त्यांचा आजार कसा झाला व बळावत गेला त्याच्या आठवणी. आणि त्यांना

जाणवले की, भूतकाळात जेवढे ते अधिक मागे जात होते, तेवढे त्यांचे आयुष्य अधिक जोमदार होते. त्यांच्या आधीच्या जीवनात अधिक चांगलेपणा, अधिक दमदारपणा होता. त्या दोन्हींचा मिलाफ घडला होता. "ज्याप्रमाणं माझ्या यातना अधिकाधिक वाढती आहेत, तसंच माझं संपूर्ण आयुष्य जास्त जास्त वाईट होत चाललंय," त्यांच्या मनात आले. एकच तेजस्वी ठिपका होता व तो त्यांच्या जीवनाच्या अगदी आरंभी होता. त्यानंतर गोष्टी काळवंडत गेल्या, वेगाने घडत गेल्या. "माझ्यापासून मृत्यू जेवढ्या चौरस अंतरावर उभा आहे त्याच्या उलट प्रमाणात," इवान इल्यिचच्या मनात विचार आला. आणि वाढत्या वेगाने खाली कोसळणाऱ्या दगडाचे रूपक क्षणात त्यांच्या मनात चमकून गेले. जीवन, वाढत्या प्रमाणातील यातनांची मालिका, अधिकाधिक वेगाने आपल्या उद्दिष्टाकडे कोसळतेय, अवर्णनीय यातनांसह. "मी कोसळतोय..." ते दचकले, शहारले, त्यांनी प्रतिकाराचा प्रयत्न केला. पण प्रतिकाराचा उपयोग नाही हे त्यांना माहीत होते. चिंतनामुळे थकून जाऊनही, आपल्यासमोर उभ्या राहणाऱ्या गोष्टींपासून आपली नजर बाजूला फिरविणे त्यांना अशक्य ठरले. दिवाणाच्या पाठीशी एकटक नजर लावून ते वाट पहात राहिले ... त्या भीतीदायक कोसळण्याची, अखेरच्या धक्क्याची, नाशाची वाट पहात राहिले. "प्रतिकार करण्यात अर्थ नाही," ते स्वतःशी म्हणाले. "असं का हे जर मला समजलं तर किती बरं होईल!" पण तेही अशक्य होते. "मी जसं जगायला हवं होतं तसा जगलो नसतो तर एक वेळ समजण्यासारखं होतं. पण तसं कबूल करणं अशक्य आहे," आपल्या जीवनातील सर्व अचूकपणा, शिष्टसंमतता, योग्यता आठवून ते

स्वतःशी म्हणाले. "अशी गोष्ट मी कबूल करू शकत नाही," ते स्वतःशी म्हणाले आणि त्यांनी आपले ओठ विलग केले. जणू कुणीतरी त्यांचे स्मित पाहिले असते व त्यामुळे त्या व्यक्तीची फसवणूक झाली असती. "त्यात काही अर्थ नाही. यातना. मृत्यू. कशाला?"

## ११

आणखी एक पंधरवडा असाच लोटला. ह्या काळात त्यांनी आणि त्यांच्या बायकोने ज्या घटनेची आशा धरली होती ती घटना घडली. पेत्रीश्चेवने रीतसर मागणी घातली. संध्याकाळच्या सुमारास हे घडले. दुसऱ्या दिवशी सकाळी प्रास्कोव्या फ्योदरोवना आपल्या नवऱ्याच्या खोलीत आली तेव्हा मागणी घातल्याची बातमी आपण कशी जाहीर करावी याबद्दलचे विचार तिच्या डोक्यात घोळत होते. पण रात्रीदरम्यान इवान इल्यिचची प्रकृती फारच बिघडली होती. प्रास्कोव्या फ्योदरोवनाला ते त्याच दिवाणावर, परंतु वेगळ्या स्थितीत आढळले. ते पालथे पडले होते, कण्हत होते आणि स्वतःच्या नाकासमोर त्यांची नजर स्थिरावली होती.

त्यांच्या औषधाचा विषय तिने सुरू केला. त्यांनी आपले डोळे तिच्याकडे फिरविले. त्या डोळयांमध्ये एवढा प्रचंड तिरस्कार भरलेला होता की, तिने आपले बोलणे अर्ध्यातच थांबविले. त्यांच्या डोळयांमध्ये तिने स्वतःविषयीचा तिटकारा स्पष्ट पाहिला.

"कृपा करून मला शांतपणं मरूं दे," ते म्हणाले.

ती जाण्यासाठी म्हणून वळली, पण तेवढ्यात त्यांची मुलगी आत आली आणि बापापाशी अभिवादन करायला गेली. त्यांनी तिच्याकडेसुद्धा आपल्या बायकोकडे ज्या नजरेने पाहिले होते त्याच नजरेने पाहिले. तिने त्यांच्या प्रकृतीची चौकशी केली तेव्हा शुष्कपणे ते उत्तरले की, लौकरच त्यांच्या कटकटीमधून त्या दोघी मुक्त होतील. दोघीही गप्प राहिल्या, क्षणभर बसल्या आणि नंतर बाहेर निघून गेल्या.

"आपली काय चूक?" लिझाने आपल्या आईला विचारले. "हा जणू आपला दोष. पपांबद्दल मला वाईट वाटतं, पण त्यांनी आपल्याला असं का छळावं?"

नेहमीच्या वेळेला डॉक्टर आले. आपले जळजळते डोळे त्यांच्यावर सतत रोखून इवान इल्यिचनी "हो" आणि "नाही" अशी उत्तरे दिली व अखेरीस ते म्हणाले:

"कशाचाही काहीही उपयोग होणार नाही हे तुम्हाला उत्तम ठाऊक आहे. नका मला त्रास देऊ."

"मी वेदना कमी करू शकतो," डॉक्टर म्हणाले.

"हेही तुम्हाला जमत नाही, मला स्वस्थ पडू द्या."

डॉक्टर दिवाणखान्यात गेले आणि प्रास्कोव्या फ्योदरोवनाला त्यांनी सांगितले की, पेशंटची परिस्थिती अत्यंत वाईट आहे, आता एकच गोष्ट उरली आहे—अफू देणे, कारण भयानक यातना त्यामुळेच थोड्या कमी झाल्या असत्या.

इवान इल्यिचच्या शारीरिक यातना महाभयानक असणार असे डॉक्टर म्हणाले होते आणि वस्तुस्थिती तशीच होती. पण शारीरिक यातनांपेक्षा त्यांच्या नैतिक यातना अधिक भयानक होत्या. त्यात त्यांचे खरे हाल होत होते.

त्या रात्री, झोपेने घेरलेल्या, सुस्वभावी गेरासिमच्या रुंद

चेहऱ्याकडे टक लावून पहात असताना त्यांच्या नैतिक यातना सुरू झाल्या होत्या. त्यांच्या मनात विचार आला होता: "माझं सर्व आयुष्य, माझं सर्व जाणतं जीवन, जसं असायला हवं होतं तसं नव्हतं, असं असलं तर काय?"

पूर्वी त्यांना जे पूर्णतः अशक्य वाटले होते (की त्यांनी आयुष्य जसे जगायला हवे होते तसे ते जगले नव्हते) ते कदाचित खरे असेल असा विचार त्यांच्या मनात उमटला. उच्च पदावरील माणसे क्वचित जाणवणाऱ्या ऊर्मींना दाबून टाकणे चांगले मानीत व त्यानुसार क्वचित जाणवलेल्या ऊर्मींना त्यांनी दाबून टाकले होते, पण त्याच ऊर्मी कदाचित खरे जीवन असतील आणि बाकी सारे खोटे असेल, असा विचार त्यांच्या मनात चमकला. त्यांची ऑफिसची कामे, त्यांची जीवनपद्धती, त्यांचे कुटुंब, त्यांचे सामाजिक आणि व्यावसायिक हितसंबंध – ह्या सर्व गोष्टी कदाचित खऱ्या नसतील. ह्या गोष्टींच्या खरेपणाचे समर्थन करण्याचा त्यांनी प्रयत्न केला, पण अचानक त्यांना त्या समर्थनाच्या फोलपणाची जाणीव झाली. समर्थन करण्यासारखे काही नव्हतेच.

"तसं जर असेल," ते स्वतःशी म्हणाले, "आणि मला जे दिलं होतं ते सारं मी उधळून टाकलं व त्याबाबतीत काही करायला आता खूप अशीर झालाय, अशा भावनेनं मी आयुष्याचा निरोप घेत असेन – तर काय?" पालथे पडून आपल्या जीवनाचा अगदी वेगळ्या दृष्टिकोनातून आढावा घ्यायला त्यांनी आरंभ केला.

सकाळच्या प्रहरी जेव्हा त्यांनी प्रथम नोकराला पाहिले, नंतर आपल्या बायकोला, आपल्या मुलीला व सरतेशेवटी डॉक्टरना पाहिले, त्यांच्या प्रत्येक हालचालीचे, त्यांच्या प्रत्येक शब्दाचे अवलोकन केले, तेव्हा रात्री उमजलेल्या भयानक

त्याचा खरेपणा त्यांना पटला. त्या लोकांमधून त्यांना स्वतःचे दर्शन घडले, ज्या गोष्टींनी त्यांचे जीवन बनले होते त्यांना पाहिले; आणि त्यांना स्पष्ट जाणवले ते सर्व काही वास्तवापासून दूर होते, जीवन आणि मृत्यू यांच्या सत्यांना लपवून ठेवणारी ती भयानिक व प्रचंड फसवणूक होती. ह्या जाणीवेमुळे त्यांच्या शारीरिक वेदना वाढल्या, दहापटींनी वाढल्या. ते विव्हळू लागले, कण्हू लागले, आपल्या अंगावरील कपड्यांना ओरबाडू लागले. त्यांचे कपडे त्यांना पिळताहेत, घुसमटून टाकीत आहेत असे त्यांना भासू लागले आणि त्या कपड्यांचा त्यांना तिटकारा वाटू लागला.

त्यांना अफूचा मोठा डोस देण्यात आल्यामुळे ह्या सर्व गोष्टींचा त्यांना काही काळ विसर पडला. पण जेवणाच्या वेळी परत सर्व सुरू झाले. त्यांनी सर्वांना खोलीमधून बाहेर पाठविले व ते बिछान्यात तळमळत पडले. त्यांची पत्नी त्यांच्यापाशी येऊन म्हणाली :

"ज्याँ, लाडक्या, माझ्यासाठी एवढं कर." (माझ्यासाठी?) "त्यानं काही अपाय होत नाही आणि अनेकदा मदतच होते. नसं त्यात विशेष काही नाही. धडधाकट माणसंही काही वेळा..."

त्यांनी तिच्याकडे डोळे फाड-फाडून पाहिले.

"काय? बाप्तिस्मा? कशाला? मला नको. आणि तरीही..."

ती रडू लागली.

"घेणार नाहीस का लाडक्या? मी आपल्या धर्मगुरूंना बोलावणं धाडते. फार चांगले आहेत ते."

"ठीक. उत्तम," ते म्हणाले.

जेव्हा धर्मगुरू आले आणि त्यांनी कबुलीजबाब ऐकला तेव्हा इवान इलियचचे अंतःकरण हलके झाले, त्यांना आपले शंकानिरसन झाल्याचा भास झाला व त्यामुळे त्यांच्या प्रकृतीला थोडा आराम पडला. क्षणभर त्यांना आशा वाटू लागली. पुन्हा एकदा स्वतःच्या अंधान्त्राविषयी व त्याला बरे करण्याविषयी ते विचार करू लागले. बाप्तिस्मा घेताना त्यांच्या डोळ्यांमध्ये अश्रू तरारले होते.

बाप्तिस्म्यानंतर जेव्हा त्यांना परत निजविण्यात आले तेव्हा क्षणभर त्यांना बरे वाटले आणि पुन्हा एकदा बरे होण्याची आशा त्यांच्या मनात पालवली.

डॉक्टरांनी एकदा सुचविलेल्या शस्त्रक्रियेबाबत ते विचार करू लागले. "मला जगायचंय, मला जगायचंय," ते स्वतःशी म्हणाले. त्यांची पत्नी त्यांचे अभिनंदन करायला आत आली. नेहमीच्या विषयांवर बोलून ती पुढे म्हणाली:

"तुला आता खरंच बरं वाटू लागलंय, होय ना?"

"हो," तिच्याकडे न पाहता ते उत्तरले.

तिचा पोषाख, तिची आकृती, तिच्या मुद्रेवरील भाव, तिच्या आवाजाचा स्वर – ह्या सर्व गोष्टींमधून त्यांना जाणवले: "वास्तवापासून दूर. जे काही होतं आणि आहे, तुझं आयुष्य म्हणजे एक खोटेपणा आहे, जीवन आणि मृत्यू यांची वास्तवता तुझ्यापासून लपवून ठेवणारी फसवणूक आहे." आणि ज्या क्षणी हा विचार त्यांच्या मनात आला, त्या क्षणी त्यांच्या मनात तिरस्कार उसळला. आणि त्या तिरस्काराबरोबर शारीरिक यातना सुरू झाल्या. आणि त्या यातनांबरोबर त्यांना आपल्या समीप आलेल्या अटळ मरणाची जाणीव झाली. नव्या संवेदना जाणवू लागल्या. त्यांच्या आतमध्ये काहीतरी

तुटू लागले, पिळवटू लागले आणि त्यांचा श्वास घुसमटू लागला.

जेव्हा ते "हो" म्हणाले तेव्हा त्यांच्या मुद्रेवरील भाव भयानक होता. आणि तो शब्द उच्चारल्यानंतर, तिच्या थेट नजरेला नजर भिडवून, त्यांच्या दुबळ्या अवस्थेला चकित करणाऱ्या वेगाने ते पालथे झाले व किंचाळले :

"चालती हो! चालती हो! मला एकट्याला राहू दे!"

## १२

त्या क्षणापासून तीन दिवसपर्यंत भयानक आणि अखंड किंचाळ्या सुरू झाल्या. दोन खोल्यांपलिकडील अंतरावरही त्या किंचाळ्या ऐकणारा शहारून जात होता. आपल्या पत्नीच्या प्रश्नाला इवान इल्यिचनी उत्तर दिले त्याच क्षणाला त्यांना समजले की, सर्व काही संपले होते, आता कोणतीही आशा उरली नव्हती, अंत, प्रत्यक्ष अंत अगदी जवळ आला होता, त्यांच्या सर्व शंका तशाच राहिल्या होत्या व त्यांना कधीही उत्तर मिळणार नव्हते.

"ऊ:! ऊ: ऊ:!" वेगवेगळ्या स्वरांमध्ये ते किंचाळत होते. "मला नको ऽऽऽ" त्यांनी ओरडायला आरंभ केला व "ऊ:! ऊ:!" करणेही चालू ठेवले.

ते तीन दिवस त्यांना काळाचे भान नव्हते. कुठलीतरी अदृश्य आणि दुर्दम्य शक्ती त्यांना त्या काळ्या पोत्यामध्ये कोंबू पहात होती व ते निकराने तिचा प्रतिकार करीत होते. देहदंडाची शिक्षा झालेला माणूस जसा स्वतःच्या सुटकेची शक्यता नाही हे माहीत असूनही वध करणाऱ्याच्या पकडीमध्ये धडपडत

राहतो, तशी त्यांची धडपड चालली होती. आणि त्यांना समजत होते की, त्यांनी जिवाच्या आकांताने धडपड करूनही, दर मिनिटागणिक, त्यांना धडकी भरविणाऱ्या त्या गोष्टीच्या ते अधिकाधिक नजीक चालले होते. त्या काळ्या भोकामध्ये त्यांना ढकलण्यात येत असल्यामुळे त्यांना यातना होत होत्या, पण त्याहीपेक्षा जास्त हाल होत होते त्यांना स्वतःलाच त्या भोकात सरपटत जाता येत नव्हते म्हणून. त्यांचे आयुष्य चांगले होते ह्या विश्वासापायी त्यांना त्या बिळात सरपटत जायला प्रतिबंध घडत होता. त्यांनी जगलेल्या आयुष्याचे हे समर्थन त्यांना पुढे सरकायला अडथळा आणीत होते व त्याचा त्यांना सर्वांत जास्त त्रास होत होता.

अचानक कुठल्यातरी शक्तीने त्यांच्या छातीत आणि कुशीत प्रहार केले व त्यांचा श्वास तोडला. ते थेट त्या विवरात कोसळले आणि त्या विवराच्या तळाशी त्यांना एक प्रकाशकिरण चमकताना दिसला. एकेकाळी आगगाडीच्या डब्यातून प्रवास करताना त्यांनी अनुभवलेली संवेदना त्यांना परत जाणवली. त्यावेळी त्यांना वाटले होते की, ते पुढे जात होते, पण प्रत्यक्षात मागे जात होते व अचानक खऱ्या दिशेची त्यांना जाणीव झाली होती.

"खरंच, वास्तवापासून हे सगळं दूर आहे," ते स्वतःशी म्हणाले. "पण ठीक आहे. अजूनही मी सत्याला प्राप्त करीन. पण सत्य आहे कसं?" त्यांनी स्वतःला प्रश्न केला व एकदम ते गप्प झाले.

हे तिसऱ्या दिवसाच्या अखेरी, त्यांच्या मृत्यूच्या तासभर आधी घडले. तेवढ्यात त्यांचा मुलगा हळूच खोलीत शिरला आणि त्यांच्या बिछान्यापाशी गेला. मरणाच्या पंथाला लागलेले इवान इल्यिच अजूनही प्रचंड किंचाळ्या फोडीत होते आणि

हात झटकीत होते. त्यांचा एक हात त्यांच्या मुलाच्या डोक्यावर पडला. मुलाने तो हात पकडला, आपल्या ओठांशी दाबला व तो रडू लागला.

नेमक्या याच क्षणाला इवान इल्यिचनी विवरात उडी मारली होती व त्यांना प्रकाश दिसला होता. आपले आयुष्य जसे असायला हवे होते तसे ते नव्हते याची त्यांना जाणीव झाली होती, पण अजूनही ते दुरुस्ती करू शकतील असे त्यांना वाटले होते. "सत्य म्हणजे काय?" त्यांनी स्वतःला प्रश्न केला व गप्प राहून ते ऐकू लागले. तेव्हा त्यांना समजले की, कुणीतरी त्यांच्या हाताचे चुंबन घेत होते. त्यांनी डोळे उघडले व आपल्या मुलाकडे पाहिले. त्यांना त्याची दया आली. त्यांची पत्नी आत आली. त्यांनी तिच्याकडे कटाक्ष टाकला. तोंडाचा आ वासून ती त्यांच्याकडे पहात उभी राहिली, तिच्या नाकावरून व गालांवरून अश्रू ओघळत होते, तिच्या मुद्रेवर निराशा पसरली होती. त्यांना तिचीही दया आली.

"मी त्यांना छळतोय," त्यांना वाटले. "त्यांना माझ्याबद्दल वाईट वाटतंय, पण मी निघून गेल्यानंतर त्यांचं आयुष्य अधिक चांगलं होईल." इवान इल्यिचना हे बोलावेसे वाटत होते, पण त्यांच्यात तेवढी ताकद उरली नव्हती. "पण बोलून तरी उपयोग काय? मी काहीतरी केलं पाहिजे," त्यांच्या मनात विचार आला. आपल्या पत्नीकडे ते वळले व आपल्या डोळ्यांनी त्यांनी आपल्या मुलाकडे इशारा केला.

"त्याला घेऊन जा," ते म्हणाले. "बिचारं पोर... आणि तू..." त्यांना पुढे म्हणायचे होते, "क्षमा कर," पण प्रत्यक्षात शब्द उमटला "विसर", मात्र स्वतःची चूक दुरुस्त करण्याचे बळ त्यांच्यात राहिले नव्हते. त्यांनी केवळ

आपला हात किंचित हलविला. ज्याला समजायचे तो समजून घेईल असा त्याचा अर्थ होता.

आणि आता त्यांना स्पष्ट जाणीव झाली की, ज्या गोष्टींनी त्यांचा छळ केला होता व ज्यांना बाजूला फेकून देणे त्यांना शक्य झाले नव्हते, त्या गोष्टी आपोआपच कोसळून पडत होत्या, दोन्ही बाजूंना कोसळत होत्या, एकाच वेळी दश-दिशांना कोसळून पडत होत्या. त्यांच्याबद्दल त्यांना वाईट वाटले. त्यांची वेदना हलकी करण्यासाठी काहीतरी केले पाहिजे असे वाटले. ह्या यातनेमधून त्यांची आणि स्वतःची मुक्तता केली पाहिजे असे वाटले. "किती छान आणि किती साधं!" त्यांच्या मनात आले. "आणि वेदना?" त्यांनी स्वतःला प्रश्न केला. "तिची मी कशी वासलात लावणार? ए वेदने, तू कुठं आहेस?"

त्यांनी वेदनेला चाचपडले.

"अरेच्चा! इथं आहे. मग काय? असू दे!"

"आणि मृत्यू? मृत्यू कुठं आहे?"

आपल्या सवयीच्या मृत्यूच्या धास्तीचा त्यांनी शोध घेतला, पण त्यांनी ती सापडेना. मृत्यू कुठे होता? मृत्यू म्हणजे काय होते? तेथे भीती नव्हती, कारण तेथे मृत्यू नव्हता.

मृत्यूऐवजी तेथे प्रकाश होता.

"अच्छा, म्हणजे हेच ते!" अचानक ते मोठ्यांदा उद्गारले. "केवढं सुख!"

हे सर्व काही निमिषार्धात घडले, पण त्या निमिषार्धाचे महत्त्व चिरंतन होते. त्यांच्या मृत्यूसमयी हजर असलेल्यांच्या दृष्टीने आणखी दोन तास मरणयातना चालू होत्या. त्यांच्या छातीत काहीतरी खडखडत होते; त्यांच्या क्षीण देहाला आचके

चेन होते ; पण हळूहळू घरघर आणि खडखड थांबली.

"संपलं सगळं," कुणीतरी म्हणाले.

त्यांनी हे शब्द ऐकले व अंतरात्म्यात त्यांचा पुन्हा उच्चार केला.

"मृत्यू संपला," ते स्वतःशी म्हणाले. "आता आणखी मृत्यू नाही."

त्यांनी एक खोल श्वास घेतला, त्याच्या अर्ध्यातच त्यांचा श्वास तुटला, त्यांनी आपले अवयव ताठ केले आणि ते मेले.

१८८६

# शापित संगीत

"जो बाईकडे वासनामय दृष्टीने पाहतो त्याने मनाने आधीच तिच्याशी व्यभिचार केलेला असतो" (मातफेया ५ ; २८).

"त्याचे शिष्य त्याला म्हणाले: माणसाची जर आपल्या बायकोप्रती असली जबाबदारी असेल तर लग्न न करणं चांगलं.

"पण तो त्यांना म्हणाला: सर्व पुरुष ह्या वचनाचा स्वीकार करू शकणार नाहीत, ज्यांना दिले आहे ते सोडून.

"कारण काही लोक आपल्या मातेच्या गर्भातून बाहेर येतानाच षंढ असतात, तर काहींना पुरुष षंढ बनवितात; आणि काही लोक स्वर्गप्राप्तीसाठी स्वतःला षंढ बनवून घेतात. ज्याला हे स्वीकारणे शक्य आहे त्याने ते खुशाल स्वीकारावे." (मातफेया १९ ; १०, ११, १२)

## १

वसंताच्या आरंभीचे दिवस. आम्ही जवळ जवळ दोन दिवस प्रवास करीत होतो. कमी अंतरावर जाणाऱ्या प्रवाशांची

डब्यामध्ये जा-ये चालू होती. पण माझ्यासारखे तीन प्रवासी मात्र आगगाडी निघाल्यापासून सतत प्रवास करीत होते. त्यांपैकी एक अनाकर्षक, मध्यमवयीन, भकास चेहऱ्याची स्त्री होती. ती सिगारेटी ओढत होती व तिने पुरुषी कोट-टोपी घातली होती. दुसरा प्रवासी तिच्या ओळखीचा होता. सुमारे चाळीशीचा तो गृहस्थ खूप बडबड्या होता. त्याचा बाड-बिस्तरा नीटनेटका आणि नवा होता. तिसरा सद्गृहस्थ स्वतःला अलिप्त ठेवीत होता. त्याची उंची मध्यम होती, त्याच्या हालचाली लहरी होत्या. अद्याप तो म्हातारा नव्हता, पण त्याचे कुरळे केस अकाली पांढरे बनले होते. त्याच्या डोळयां-मध्ये एक असाधारण चमक होती आणि एका वस्तूकडून दुसऱ्या वस्तूकडे त्याची नजर सतत भिरीभिरी फिरत होती. त्याने अस्त्राखानी टोपी घातली होती व अस्त्राखानी कॉलर लावलेला जुना कोट चढविला होता. तो कोट महागड्या शिंप्याकडून बनविलेला होता हे स्पष्ट दिसत होते. त्याने कोटाची बटणे मोकळी सोडली तेव्हा त्याच्या अंगात रशियन जाकीट आणि कशीदाकाम केलेल्या कॉलरचा रशियन पोलकेवजा सदरा दिसला. ह्या सद्गृहस्थाचे वैशिष्ट्य म्हणजे मधून मधून तो काही तरी विचित्र आवाज करीत होता. एखाद्याने घसा खाकरावा अथवा फुटणारे हसू एकदम दाबून टाकावे, तसे ते आवाज भासत होते.

सबंध प्रवासात हा भला माणूस इतर प्रवाशांशी बोलण्याचे आणि संपर्क ठेवण्याचे कटाक्षाने टाळीत होता. जर कुणी त्याच्याशी बोलले तर तो तुटक, उर्मट उत्तरे देई. वाचन करीत, खिडकीमधून बाहेरचे दृश्य पहात, धूम्रपान करीत अथवा आपल्या जुन्या थैलीमधून खाद्यपदार्थ धुंडाळून चहाचा किंवा फराळाचा समाचार घेत तो वेळ घालवीत होता.

त्याच्या एकाकीपणामुळे तो उदास दिसत होता अशा कल्पनेने मी त्याच्याशी बोलण्याचे अनेकवार प्रयत्न केले, पण दर वेळी आमचे डोळे एकमेकांशी भिडले (आणि असे सतत घडले, कारण आम्ही एकमेकांच्या अगदी समोरासमोर बसलो होतो) म्हणजे तो मान फिरवायचा आणि एक तर पुस्तक उचलायचा अथवा खिडकीबाहेर पाहू लागायचा.

दुसऱ्या दिवसाची संध्याकाळ. एका मोठ्या स्टेशनवर आगगाडी बराच वेळपर्यंत थांबली होती. हा अस्वस्थ सद्गृहस्थ बाहेर जाऊन उकळलेले पाणी घेऊन आला व त्याने स्वतःसाठी चहा बनविला. चकचकीत सामानवाला माणूस (नंतर मला समजले की तो वकील होता) आणि धूम्रपान करणारी व पुरुषी कोट घालणारी त्याची मैत्रीण चहा पिण्यासाठी स्टेशनवरील रेस्तराँमध्ये गेली होती.

त्या बाईच्या व सद्गृहस्थाच्या अनुपस्थितीत आमच्या डब्यात अनेक नवे प्रवासी आले होते. त्यांच्यात एक उंच, गुळगुळीत दाढी केलेला, सुरकुतल्या चेहऱ्याचा म्हातारा होता. तो व्यापारी असावा. केसाळ कातडीचे अस्तर लावलेला कोट त्याच्या अंगात होता व प्रचंड मोठा पुढचा भाग असलेली कापडी टोपी त्याच्या डोक्यावर होती. ह्या व्यापाऱ्याने वकीलाच्या व बाईच्या समोरची जागा धरली आणि ताबडतोब एका तरुण माणसाबरोबर संभाषण सुरू केले. हा तरुण माणूसही नुकताच डब्यात शिरला होता आणि त्याच्या एकूण अवतारावरून तो दुकानात विक्रेत्याचे काम करीत असावा असे दिसत होते.

मी त्यांच्यासमोर तिरप्या रेषेत बसलो होतो. आगगाडी थांबलेली असल्यामुळे, जेव्हा माणसांची ये-जा घडत नव्हती

तेव्हा त्यांच्या संभाषणातील काही भाग माझ्या कानांवर पडत होता. व्यापाऱ्याने सांगितले की, अवघ्या एका स्टेशन-च्या अंतरावर असलेल्या त्याच्या खेड्यातील घराकडे तो निघाला होता. मग त्यांनी व्यापार आणि किंमती या विषया-वरील आपली नेहमीची चर्चा सुरू केली. मॉस्कोतील बाजारपेठ आणि नीझ्नी-नवगोरदच्या जत्रेतील व्यापार, ह्यांबद्दलची आपली मते मांडली. तरुण विक्रेत्याने जत्रेमधील एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या बाहेरख्यालीच्या कथा सांगायला आरंभ केला. तो बदफैली माणूस त्या म्हाताऱ्यालाही माहीत होता असे दिसले. मग त्याने त्या तरुणाचे बोलणे मध्येच थांबविले आणि कुनाविनो येथे स्वत: केलेल्या रंगेलपणाची हकीकत तो म्हातारा सांगू लागला.

आपल्या बाहेरख्यालीविषयी सांगताना त्याला अभिमान वाटत होता असे दिसले. त्या श्रीमंत बदफैली व्यापाऱ्याबरोबर खूप झिंगेपर्यंत दारू पिऊन आपण काय केले ते त्याने हळूच त्या तरुणाच्या कानात सांगितले. तरुण विक्रेता एवढ्या जोराने हसला की त्याच्या हसण्याच्या आवाजाने सबंध डबा भरून गेला. त्याच्याबरोबर तो म्हाताराही हसला तेव्हा त्याचे दोन लांबट पिवळे दात दिसले.

फारसे काही रंजक ऐकायला मिळणार नाही या जाणीवेने मी उठलो व आगगाडी सुटेपर्यंत फलाटावर फिरावे अशा इराद्याने दाराकडे निघालो. दारातच मला वकील आणि बाई भेटली. ती दोघेही जोरदार संभाषणात गुंतली होती.

"आता फिरायला वेळ उरला नाही," तो मनमिळाऊ वकील मला म्हणाला. "कुठल्याही क्षणी दुसरी घंटा वाजेल."

आणि खरेच, आगगाडीच्या शेवटच्या टोकापर्यंत मी

जाण्याआधीच शेवटची घंटा वाजली. मी परतलो तेव्हाही वकील आणि बाई जोरदार संभाषणात रंगलेली होती. म्हातारा व्यापारी त्यांच्या पुढ्यात गप्प बसला होता. त्याने आपली नजर स्थिर ठेवली होती व आपले दोन पिवळे दात मधून मधून चावून तो आपली नापसंती व्यक्त करीत होता.

"तर तिनं आपल्या नवऱ्याला चक्क सांगून टाकलं," मी माझ्या जागेकडे जात होतो तेव्हा सस्मित चेहऱ्याने वकील म्हणत होता, "की त्याच्याबरोबर इतःपर राहू शकत नव्हती आणि राहण्याची इच्छा नाही, कारण..."

पण पुढचे शब्द ऐकू आले नाही. माझ्या पाठोपाठ इतर प्रवासी आत आले, गाडीचा कंडक्टर आत आला, एक कारागीर मधून धावत गेला. काही वेळपर्यंत तेथे एवढी गडबड उडाली आणि गोंगाट माजला, की त्यांचे बोलणे मला ऐकू आले नाही.

जेव्हा शांतता प्रस्थापित झाली व वकीलाचा आवाज माझ्यापर्यंत ऐकू येऊ लागला तेव्हा त्याने त्या विशिष्ट खटल्याची हकीकत संपविली होती व त्यावरून एकूण परिस्थिती-कडे चर्चेचा ओघ वळला होता.

वकील म्हणत होता की, घटस्फोटाच्या प्रश्नाने युरोपातील लोकांची मने ग्रासली होती आणि रशियामध्ये घटस्फोटाचे खटले आता सर्वसामान्य बाब बनू लागले होते. आपल्या एकट्याचाच आवाज ऐकू येत होता असे वकीलाच्या ध्यानात येताच तो म्हाताऱ्याकडे वळला.

"जुन्या काळी असं नव्हतं, होय ना?" प्रसन्न स्मित करीत तो म्हणाला.

म्हातारा उत्तर द्यायच्या बेतात होता, तेवढ्यात आगगाडी

सुरू झाली. त्याने तात्काळ डोक्यावरील टोपी काढली, स्वतः-समोर क्रूस-चिन्ह केले आणि प्रार्थना पुटपुटायला आरंभ केला. वकीलाने सभ्यपणे आपली नजर दुसरीकडे वळविली आणि म्हाताऱ्याची प्रार्थना संपण्याची तो वाट पाहू लागला. म्हाताऱ्याने प्रार्थना संपल्यानंतर तीनदा स्वतःसमोर क्रूसचिन्ह केले, डोक्यावर अगदी सरळ टोपी ठेवली, तिला घट्ट खाली खेचले, ऐसपैस आसन जमविले आणि बोलायला सुरुवात केली.

"अशा गोष्टी जुन्या काळी घडायच्या, पण फार तुरळक," तो म्हणाला. "पण आज असं घडणं अगदी स्वाभाविक आहे. लोकांना अतिशिक्षण मिळायला लागलंय."

रूळांच्या सांध्यांवरून खडखड आवाज करीत आगगाडीने वेग घेतला. त्यामुळे मला ऐकण्यात व्यत्यय येऊ लागला. ह्या विषयामध्ये स्वारस्य उत्पन्न झाले होते, म्हणून मी बोलणाऱ्या मंडळींच्या अधिक जवळ सरकलो.

अस्वस्थ वागणारा, चमकदार डोळ्यांचा माझा सहप्रवासी-सुद्धा ह्या संभाषणात रस घेऊ लागला होता असे दिसले, कारण आपली जागा न सोडताच तो ऐकण्यासाठी पुढे झुकला.

"शिकणं वाईट आहे का?" मंद स्मित करीत बाई म्हणाली. "प्रत्यक्ष लग्नापर्यंत नवरा नवरीनं एकमेकांचं तोंडही न पाहता पूर्वी माणसं लग्न करायची ते चांगलं होतं असं वाटतं तुम्हाला?" अनेक बायका ज्या पद्धतीने अशा प्रश्नांना उत्तरे देतात त्या पद्धतीने ती उत्तरे देत गेली. म्हणजे दुसरा माणूस काय म्हणाला ते न ऐकता, तो काय म्हणाला असे तिला वाटले होते त्यानुसार! "जो कुणी भेटला त्याच्याशी त्यांनी लग्नं केली. आपण एकमेकांवर प्रेम करतो किंवा नाही, अथवा एकमेकांवर कधी प्रेम करू वा नाही, ह्याचा त्यांनी विचारच

केला नाही. मग उरलेल्या आयुष्यभर यातना भोगत राहिले. हे जास्त चांगलं होतं असं वाटतं?" त्या म्हाताऱ्यापेक्षा मला आणि वकीलाला उद्देशून ती बोलली होती हे उघड होते.

"आज-काल त्यांना फार शिक्षण मिळायला लागलंय," बाईकडे तिरस्काराने पहात व तिच्या प्रश्नाला अनुत्तरीत ठेवीत म्हातारा पुन्हा म्हणाला.

"शिक्षण आणि असुखी विवाह यांच्यात कुठला दुवा आढळतो तुम्हाला?" फिकट स्मित करीत वकीलाने विचारले.

व्यापारी काहीतरी उत्तरणार होता, तेवढ्यात बाई मध्येच बोलली.

"छे:! ती परिस्थिती कायमची संपलीय," ती म्हणाली.

"थांबा! त्यांना काय वाटतंय ते बोलू द्या," वकील म्हणाला.

"शिक्षणाबरोबर खूपसा मूर्खपणा येतो," म्हातारा ठामपणे म्हणाला.

"एकमेकांवर प्रेम न करणाऱ्या लोकांना ते लग्न करायला लावतात आणि मग त्यांना दु:खी जीवन जगताना पाहून चकित होतात," घाईघाईने बाई म्हणाली. माझ्याकडे, वकीलाकडे आणि दुकानातील विक्रेत्याकडेही तिने कटाक्ष टाकला. तो विक्रेता आता उठून उभा राहिला होता व आसनाच्या पाठीशी रेलून हसऱ्या मुद्रेने संभाषण ऐकत होता. "केवळ जनावरांचा त्यांच्या मालकाच्या इच्छेनुसार लैंगिक संबंध घडवता येतो. माणसांच्या स्वत:च्या आवडीनिवडी असतात," म्हाताऱ्याला हाणून पाडण्याच्या उद्देशाने बाई म्हणाली.

"भल्या बाई, तुम्ही म्हणता ते योग्य नाही," म्हातारा म्हणाला. "जनावरं ही पशू आहेत. माणसांना कायद्याप्रमाणं जगावं लागतं."

"पण ज्या व्यक्तीवर एखाद्याचं प्रेम नाही तिच्याबरोबर तिनं रहावं असं कसं म्हणता?" बाईने सवाल केला. आपले विचार अगदी नवीन आहेत अशी तिची समजूत होती व ते प्रकट करण्याची तिला घाई झाली होती.

"पूर्वी असे काही भेद केले जात नव्हते," म्हातारा दमदारपणे म्हणाला. "हे अगदी नवीन खूळ आहे. 'मी तुला सोडून जाते' असं बाईच्या तोंडातून कधी निघायचं नाही. पण सध्या शेतकऱ्यांमध्येसुद्धा हे नवं वेड पसरलंय. शेतकऱ्याची बाई खुशाल म्हणते 'घे तुझे सदरे आणि विजारी; मी चालले वान्याबरोबर. त्याचे केस जास्त कुरळे आहेत.' मामला खलास. बाईला भीती असली पाहिजे."

विक्रेत्याने वकीलापासून माझ्याकडे आणि माझ्यापासून बाईकडे नजर टाकली. त्याने हसू दाबून धरले होते. व्यापाऱ्याच्या विचारांना कसे घेतले जाते त्यानुसार मान डोलवायला अगर हसायला तो सज्ज होता.

"कशाची भीती?" बाईने विचारले.

"कशाची? अर्थात तिच्या नवऱ्याची! आणखी कुणाची!"

"भल्या माणसा, तो काळ आता संपला," बाई तिखटपणे म्हणाली.

"नाही बरं बाईसाहेब, तो काळ कधीच संपणार नाही. ईव्ह पुरुषाच्या बरगडीपासून बनवण्यात आली आणि काळाच्या अंतापर्यंत ती तशीच राहणार," म्हातारा एवढ्या खंबीरपणे व मानेला एवढा जोरदार झटका देऊन म्हणाला, की विक्रेत्याने तात्काळ मोठ्यांदा हसून म्हाताऱ्याचा विजय मान्य केला.

"तुम्ही पुरुष फक्त तसा विचार करता," आपण वाद सोडलेला नाही असा दृष्टिक्षेप टाकीत बाई म्हणाली. "तुम्ही

स्वतःला हवं ते सर्व स्वातंत्र्य घेतलंत आणि आम्हा बायकांना तुरुंगात डांबून ठेवायला पाहता आहात. तुम्हाला हवं ते करण्याचा हक्क तुम्ही घेतलात."

"कुणीही आम्हाला हक्क देत नाही. पण पुरुष जे करतो त्यापासून घरात काही वाढत नाही, पण बाई ह्या प्राण्याला सांभाळून हाताळावं लागतं," म्हातारा त्याच आवेशात बोलत राहिला.

त्याच्या ह्या स्वरामुळे त्याने आपल्या श्रोत्यांची खात्री पटविली. आपल्या कार्याची नुकसानी झाली असे त्या बाईला वाटले, पण तरीही ती शरण गेली नाही.

"पण बाईसुद्धा माणूस आहे आणि तिलाही पुरुषाप्रमाणं भावना आहेत, हे तर तुम्ही नक्की मान्य कराल. जर तिचं आपल्या नवऱ्यावर प्रेम नसेल तर तिनं काय करायचं?"

"नवऱ्यावर प्रेम करत नाही?" भुवया व ओठ यांना मुरड घालीत व्यापारी गंभीरपणे गरजला. "तिनं त्याच्यावर प्रेम करायला शिकलं पाहिजे."

ह्या अनपेक्षित उत्तराने विक्रेत्याला विशेष गुदगुल्या झाल्या व त्याने संमतीदर्शक आरोळी ठोकली.

"असं तिनं मुळीच करू नये," बाई म्हणाली. "जर तिचं त्याच्यावर प्रेम नसेल, तर तिच्यावर बळजबरी करता येणार नाही."

"आणि बायको जर नवऱ्याशी प्रामाणिक नसेल तर?" वकीलाने विचारले.

"अशा गोष्टीला परवानगी देऊ नये," म्हातारा म्हणाला. "त्यासाठी कडक नजर ठेवली पाहिजे."

"पण तरीही तसं घडलं तर? कारण तसं घडतंय."

"कदाचित काही लोकांमध्ये असं घडत असेल, पण आमच्या वर्गात नाही," म्हातारा म्हणाला.

कुणीही एक शब्द उच्चारला नाही. विक्रेत्याने पायांची चाळवाचाळव केली, तो अधिक जवळ सरकला व आपणही संभाषणात मागे पडू नये अशा विचाराने त्याने बोलायला सुरुवात केली.

"माझ्या मालकाच्या कुटुंबात एकदा एक भानगड झाली. पण ठपका ठेवणं मोठं कठीण होतं. मुलाची बायको ढिल्या वर्तनाची निघली होती. तिनं आपले खेळ सुरू केले. तो प्रतिष्ठित, समर्थ तरुण होता. पहिल्यांदा तिनं दिवाणजीशी चोरटं प्रेमप्रकरण केलं. त्यानं बोलून तिला ताळ्यावर आणू पाहिलं. पण उपयोग झाला नाही. ती खटयाळ होती. त्याचे पैसे चोरू लागली. त्यानं तिला झोडपली. पण परिणाम उलटाच झाला. तिनं एका बिनबाप्तिस्मावाल्याशी, म्हणजे यहुद्याशी भानगड केली. मग नवरा शेवटी काय करणार? त्यानं तिला टाकली. आजही एकटा ब्रह्मचारी म्हणून राहतोय आणि ती रस्त्यांवर फिरतेय."

"तो मूर्ख होता," म्हातारा म्हणाला. "त्यानं पहिल्यांदाच तिला वाव दिला नसता आणि तिच्यावर व्यवस्थित वचक ठेवला असता, तर आजपर्यंत ती त्याच्याबरोबरच नांदली असती यात संशय नाही. पहिल्यापासूनच त्यांच्या कलानं त्यांना वागायला देणं चुकीचं आहे. कुरणातल्या घोड्यावर आणि घरातल्या बाईवर कधीही विश्वास टाकू नये!"

तेवढ्यात पुढील स्टेशनची तिकीटे गोळा करायला कंडक्टर आला. म्हाताऱ्याने आपले तिकीट त्याच्या हाती दिले.

"खरंच, बायकांना पहिल्यापासूनच मुठीत ठेवलं पाहिजे, नाही तर सगळं गमावतं!"

"पण तुम्हा विवाहित पुरुषांनी कुनाविनोच्या जत्रेत जे काही केलं त्याची मघाशी गोष्ट सांगितलीत, त्याचं काय?" मला बोलल्याविना राहवले नाही.

"ती गोष्ट वेगळी आहे," व्यापारी म्हणाला आणि शिंपल्यातल्या माशाप्रमाणे गप्प राहिला.

शिटी वाजली तेव्हा म्हातारा उठला, बाकाखालून त्याने आपले पोते ओढून काढले, अंगाभोवती ग्रेटकोट गुंडाळला, टोपी उचलली आणि तो निघून गेला.

## २

तो गेला न गेला तोच अनेक आवाज एकाच वेळी बोलले.

"जन्या पठडीतला माणूस," विक्रेता म्हणाला.

"जुलमी कुटुंबप्रमुख," बाई म्हणाली. "स्त्रियांविषयी आणि विवाहाविषयी किती प्राथमिक विचार आहेत त्याचे!"

"हं! विवाहाबद्दलच्या युरोपीय कल्पनांपासून अजून आपण खूप मागं आहोत!" वकील म्हणाला.

"प्रेमाविना लग्न हे लग्नच नव्हे, केवळ प्रेमामुळंच लग्नाला पावित्र्य लाभतं आणि खरं लग्न तेच ज्याला प्रेमानं पवित्र केलेलं असतं, ही गोष्ट समजून घ्यायला अशी माणसं असमर्थ ठरतात हे मुख्य आहे," बाई म्हणाली.

विक्रेता ऐकत असताना स्मित करीत होता. भविष्यकाळात कुठेतरी वापरता यावेत म्हणून हे पंडिती विचार जास्तीत जास्त स्मरणात ठेवण्याचा प्रयत्न करीत होता.

ती बाई बोलत होती तेव्हा मध्येच माझ्या पाठीशी मी तो विचित्र आवाज ऐकला. दबलेल्या हसण्यासारखा किंवा रडण्यासारखा. मी मागे वळून पाहिले तेव्हा तो एकाकी, पांढऱ्या केसांचा, चमकदार डोळ्यांचा माझा सहप्रवासी मला दिसला. आमच्या संभाषणाच्या दरम्यान तो आमच्या अधिक जवळ सरकल्याचे आमच्या ध्यानात आले नव्हते. आमच्या चर्चेत त्याला रस निर्माण झाला होता हे उघड होते. आपल्या आसनाच्या पाठीशी टेकून तो उभा होता. त्याच्या मनात खूप चलबिचल माजल्याचे दिसत होते. त्याचा चेहरा लाल झाला होता व त्याच्या गालांचे स्नायू थरथरत होते.

"ते प्रेम ... लग्नाला पावित्र्य देणारं ते प्रेम ... ते प्रेम कोणतं?" तो अडखळत म्हणाला.

त्याची अस्वस्थता पाहून त्या बाईने सौम्य व गंभीर स्वरात उत्तर दिले.

"खरं प्रेम. जर स्त्री-पुरुषात असं प्रेम अस्तित्वात असेल तरच लग्न शक्य आहे," ती म्हणाली.

"ते ठीक. पण खरं प्रेम आपण कशाला समजायचं?" चमकत्या डोळ्यांचा तो माणूस, कृत्रिम स्मित करीत, बिचकत म्हणाला.

"खरं प्रेम प्रत्येकाला माहीत आहे," बाई म्हणाली. हे संभाषण मिटविण्यास ती उत्सुक दिसत होती.

"मला माहीत नाही," तो सद्‌गृहस्थ म्हणाला. "तुमच्या मनात काय आहे ते रीतसर समजावून सांगा."

"अगदी सोपं आहे," बाई म्हणाली. पण एकदम ती बोलायची थांबली आणि विचारात पडली. "प्रेम? प्रेम म्हणजे इतरांपेक्षा एका व्यक्तीची प्राधान्यानं निवड करणं!"

"ही निवड किती काळ टिकेल? महिनाभर? दोन दिवस? अर्धा तास?" पांढरे केसवाला गृहस्थ हसून म्हणाला.

"थांबा. कदाचित तुम्ही अगदी वेगळ्या गोष्टीचा विचार करताहात."

"नाही. मी त्याच गोष्टीचा विचार करतोय."

"त्यांना असं म्हणायचंय," वकील मध्येच बोलला, "की लग्न हे सर्वप्रथम निष्ठेतून—म्हणजे प्रेमातून—घडावं. आणि असं असेल तरच लग्नाला... अं... पवित्र मानता येईल. शिवाय, ह्या परस्पर निष्ठेवर—म्हणजे प्रेमावर—जर एखादा विवाह आधारला नसेल, तर त्यात नैतिक जबाबदाऱ्या येत नाहीत. तुम्हाला मी बरोबर समजून घेतलं ना?" बाईकडे वळून वकील म्हणाला.

बाईने मान डोलावली.

"आणि मग..." वकील पुढे बोलू लागला, पण त्याला त्या गृहस्थाने मध्येच अडविले. आता त्याचे डोळे निखाऱ्यां-सारखे फुलले होते. त्याची अस्वस्थता शिगेला पोहोचली होती व त्याला इतःपर स्वतःवर संयम राखणे अशक्य ठरले होते.

"नेमकं त्याचविषयी मी बोलतोय—इतर सर्व लोकांना सोडून एका पुरुषाला अथवा स्त्रीला प्राधान्य द्यायचं! पण मी विचारतोय—हे प्राधान्य किती काळपर्यंत?"

"किती काळपर्यंत? खूप काळपर्यंत, काही वेळा तर सबंध आयुष्यभर," खांदे उडवीत बाई म्हणाली.

"पण तसं कदाचित फक्त कादंबऱ्यांमध्ये घडतं. प्रत्यक्ष आयुष्यात कधीच नाही. प्रत्यक्ष जीवनात एका व्यक्तीविषयीचं प्राधान्य क्वचित काही बाबतीत वर्षानुवर्षं टिकतं. बहुधा ते

काही महिने, आणि काहीवेळा तर फक्त काही आठवडे किंवा काही दिवस अथवा काही तासांपुरतं टिकतं," तो माणूस म्हणाला. आपल्या मतामुळे प्रत्येकाला धक्का बसत आहे याची त्याला जाणीव होती व तसे करताना त्याला आनंद वाटत होता.

"अहो तुम्ही बोलता काय हे! असं मुळीच नाही. ऐका—" आम्ही तिघांनी एका आवाजात विरोध केला. विक्रेतासुद्धा नापसंतीदर्शक खाकरला.

"ठाऊक आहे मला," पांढरे केसवाला गृहस्थ आम्हा सर्वांच्या आवाजांना बुडवून टाकणाऱ्या उंच स्वरात ओरडला. "तुम्ही बोलता आहात जे अस्तित्वात आहे असं मानलं जातं त्याविषयी. आणि मी बोलतोय जे प्रत्यक्ष अस्तित्वात आहे त्याविषयी! तुम्ही ज्याला प्रम म्हणता ती भावना प्रत्येक पुरुष अनुभवतो—जेव्हा तो एखाद्या सुंदर स्त्रीला पाहतो!"

"पण तुम्ही जे काही म्हणता ते अगदी भयानक आहे. काही झालं तरी लोकांमध्ये प्रेम नांवाची एक भावना असते आणि ती केवळ काही महिने—काही वर्षं नव्हे, तर सबंध आयुष्यभर टिकते!"

"नाही, नाही! असं काहीही नाही! आपण जर मान्य केलं की, एखादा पुरुष सबंध आयुष्यभर एका विशिष्ट स्त्रीला स्वतःच्या जीवनात प्राधान्य देणं शक्य आहे, तर ती स्त्री दुसऱ्याच कुणाला तरी प्राधान्य देत असण्याची त्याहून जास्त शक्यता आहे. परिस्थिती ही अशी आहे आणि तशीच ती नेहमी असते," सिगारेट पेटवीत तो म्हणाला.

"पण दोन्ही बाजूंकडून भावना असणं शक्य आहे," वकील म्हणाला.

“नाही”, तो पटकन उत्तरला. “सबंध गाडी वाटाण्यांनी भरत असताना, आधीच निवडलेले दोन वाटाणे नेमके एकमेकां-शेजारी पडण्याची शक्यता जेवढी कमी तेवढीच ह्या बाबतीतही! शिवाय, स्त्री आणि पुरुषाच्या बाबतीत शक्यतेच्या नियमापेक्षा टिकाऊपणाचा नियम गोष्टी निर्णित करतो. एखाद्या स्त्रीवर अथवा पुरुषावर सबंध आयुष्यभर प्रेम करायचं? म्हणजे एकच मेणबत्ती सबंध आयुष्यभर जळत रहावी अशी अपेक्षा ठेवण्यासारखं आहे,” आपल्या सिगारेटचे जोरजोरात झुरके घेत तो म्हणाला.

“पण तुम्ही फक्त वैषयिक प्रेमाविषयी बोलताहात. वैचारिक ऐक्यावर, आत्मिक मिलाफावर प्रेम आधारलेलं असू शकतं, हे तुम्हाला मान्य नाही?” बाईने विचारले.

“आत्मिक मिलाफ! वैचारिक ऐक्य!” त्याने हे शब्द पुन्हा उच्चारले व यापूर्वी माझ्या ध्यानी आलेला तो विचित्र आवाज केला. “मग अशा बाबतीत एकत्र झोपण्याची गरज नाही (माझ्या स्पष्टवक्तेपणाला क्षमा करा). वैचारिक ऐक्यापायी माणसं एकत्र झोपायला लागल्याचं कुणी कधी ऐकलंय?” घाबरट हसत तो म्हणाला.

“थांबा,” वकील म्हणाला. “वस्तुस्थिती तुमच्या युक्ति-वादाला खोडून काढते. आपण पाहतो की वैवाहिक नाती अस्तित्वात आहेत, सर्व मानवजात किंवा निदान बहुतांश मानवजात याच पद्धतीनं जगते आणि अनेकजण आपल्या आयुष्यांच्या अखेरीपर्यंत प्रामाणिक वैवाहिक जीवन जगतात.”

पांढरे केसवाला गृहस्थ परत हसला.

“प्रथम तुम्ही म्हणता की प्रेमावर विवाह आधारलेला आहे आणि वैषयिक प्रेमाविना दुसरं कुठलं प्रेम असू शकतं

ना अशी शंका मी विचारली, तेव्हा विवाहाचं अस्तित्व ठाखवून तुम्ही प्रेमाचं अस्तित्व सिद्ध करू पाहता! आजकाल लग्न म्हणजे निव्वळ फसवणूक!"

"मुळीच नाही. माझा ह्याला विरोध आहे," वकील म्हणाला. "मी एवढंच म्हणालो की विवाह अस्तित्वात आहेत आणि ते नेहमीच अस्तित्वात होते."

"खरं आहे. पण कोणत्या आधारावर ते अस्तित्वात आहेत? ज्या लोकांना विवाहामध्ये काही पवित्र दिसतं, ज्या पावित्र्यात काही कर्तव्यं गुंतलेली आहेत आणि त्यांच्या पालनार्थ त्यांना देवापुढं जाब द्यायचा आहे, अशा लोकांमध्ये विवाह अस्तित्वात आहेत आणि ते नेहमी अस्तित्वात होते. अशा लोकांमध्ये विवाह अस्तित्वात आहेत, पण आपल्या वर्गातल्या लोकांमध्ये नाहीत. आपल्यात लोक लग्न करतात ते केवळ विषयसुख मिळविण्यासाठी. म्हणून त्यांची लग्नं एकतर हिंसक ठरतात किंवा फसवी ठरतात. ह्या दोन वाईटांमध्ये फसवणूक ही कमी वाईट. नवरा आणि बायको एकमेकांना फसवून अशा भ्रमात ठेवतात की ती एकमेकांशी निष्ठावंत राहतात, पण प्रत्यक्षात मात्र व्यभिचारी जीवन जगतात. हे योग्य नाही, पण चालवून घेण्यासारखं आहे. पण नवरा आणि बायको जेव्हा सबंध आयुष्यभर एकत्र राहण्याची जबाबदारी स्वतःवर ओढवून घेतात — जे सर्वसाधारणपणं घडतं — आणि पहिल्याच महिन्यानंतर एकमेकांचा तिटकारा करू लागतात, एकमेकांपासून विभक्त होण्याची इच्छा मनात धरूनही एकत्र जगत राहतात, तेव्हा तो विलक्षण छळवाद सुरू होतो. त्यातून सुटण्यासाठी माणस मद्याच्या आहारी जातात, आत्महत्या करतात, स्वतःला आणि एकमेकांना ठार करतात, विषप्रयोग करतात," तो

अधिकाधिक वेगाने बोलत होता, त्याचा भावनावेग कमालीचा तीव्र बनला होता. जणू मध्येच कुणीतरी काही बोलून अडथळा आणील अशी त्याला भीती वाटत होती. जेव्हा त्याचे बोलणे संपले तेव्हा एक चमत्कारिक शांतता पसरली.

"खरं आहे. वैवाहिक जीवनात कसोटीचे क्षण येतात यात काही वाद नाही," ह्या उत्तेजक, अयोग्य चर्चेला विराम देण्याच्या हेतूने वकील म्हणाला.

"मला तुम्ही ओळखलंत?" पांढऱ्या केसाच्या गृहस्थाने हळूच विचारले. त्याने स्वतःचा तोल सावरल्याचे भासले.

"नाही. आपली ओळख होण्याचं भाग्य– "

"त्यात भाग्य मुळीच नाही. मी पोझ्दनीशेव. तुम्ही उल्लेखलेल्या त्या कसोटीच्या क्षणामधून मी गेलोय आणि त्या वेळी माझ्या बायकोला मी ठार मारलंय," आम्हा सर्वांकडे झर्रकन एक कटाक्ष टाकीत तो म्हणाला.

बोलण्यासारखे काहीच न सुचल्यामुळे आम्ही सगळे गप्प बसलो.

"काही बिघडत नाही," तो विचित्र आवाज परत करीत तो म्हणाला. "पण मला तुमची क्षमा मागितली पाहिजे. मी ... अं ... तुम्हाला गोंधळात टाकण्याचा माझा इरादा नव्हता."

"जाऊ द्या ही, मी म्हणतो..." वकीलाने मध्येच म्हटले. पण "मी म्हणतो" याचा अर्थ त्याचा त्यालाच समजला नव्हता.

त्याच्याकडे दुर्लक्ष करून पोझ्दनीशेव चटकन वळला आणि खाली बसला. वकील आणि बाई एकमेकांशी कुजबुजू लागले. मी पोझ्दनीशेवच्या शेजारीच बसलो होतो. मी काहीही बोललो

नाही. वाचायला पुरेसा उजेड नव्हता, म्हणून डोळे मिटून मी झोपण्याचा बहाणा केला. अशा पद्धतीने पुढच्या स्टेशन-पर्यंतचा प्रवास आम्ही केला.

पुढच्या स्टेशनवर वकीलाने व बाईने कंडक्टरशी आधीच ठरविल्याप्रमाणे डबा बदलला. विक्रेता बाकावर आडवा होऊन झोपी गेला. पोझ्दनीशेव अखंड धूम्रपान करीत होता व स्टेशनात गाडी उभी असताना बनविलेला चहा पीत होता.

जेव्हा मी डोळे उघडले आणि त्याच्याकडे कटाक्ष टाकला तेव्हा अचानकपणे चिडक्या, ठाम स्वरात तो मला उद्देशून बोलला :

"मी कोण आहे हे समजल्यानंतर कदाचित आता तुम्हालाही माझी संगत नकोशी झाली असेल? तसं असेल तर मी जातो."

"छे: छे:, मुळीच नाही."

"मग थोडा चहा पिणार? मात्र खूप कडक आहे," माझ्यासाठी चहा ओतीत तो म्हणाला.

"नुसती बडबड ... सगळा खोटेपणा," तो म्हणाला.

"कशाबद्दल म्हणताय?" मी विचारले.

"त्याच! त्यांच्या प्रेमाबद्दल! खरं ते काय आहे त्याबद्दल! तुम्ही खूप दमलात काय?"

"अजिबात नाही."

"मग तुमची इच्छा असेल तर सांगतो—त्याच प्रेमाच्या पोटी पुढं ते कृत्य माझ्या हातून कसं घडलं ते!"

"जर तुम्हाला त्यामुळं त्रास होणार नसेल तर!"

"काही न बोलण्याचा मला जास्त त्रास होतो. तुमचा चहा प्या. फार कडक आहे का?"

तो चहा खरेच बीयरप्रमाणे लागत होता, पण मी ग्लास

रिचविला. तेवढ्यात कंडक्टर समोरून गेला. माझ्या सह-प्रवाशाने त्या कंडक्टरच्या पाठमोऱ्या आकृतीकडे जळत्या नजरेने पाहिले व कंडक्टर निघून जाईपर्यंत त्याने आपल्या कहाणीला आरंभ केला नाही.

३

"ठीक आहे तर. मी सांगतो तुम्हाला सारी हकीकत. पण खरंच तुमची ऐकायची इच्छा आहे ना?"

मी पुन्हा एकदा होकार दिला. एक मिनिटभर तो थांबला. आपल्या हातांनी त्याने स्वतःचा चेहरा खसाखसा चोळला व कथनाला प्रारंभ केला.

"आता जर हकीकत सांगायची तर अगदी सुरुवातीपासून सर्व काही सांगणं भाग आहे. मी लग्न का केलं आणि लग्नापूर्वी मी कसा होतो हे तुम्हाला प्रथम सांगतो.

"लग्नापूर्वी मी इतर चार-चौघांसारखा, म्हणजे आमच्या वर्गामधल्या प्रत्येकासारखा रहात होतो. मी जमीनदार आहे. विद्यापीठाचा पदव्युत्तर अभ्यासक्रम मी पार पाडलाय आणि उमरावांमधील मार्शल पदाचा मी मानकरी होतो. माझ्या लग्नापूर्वी मी इतर प्रत्येकासारखा जगत होतो. म्हणजे स्वैर आयुष्य जगत होतो. आणि आमच्या वर्गातील सर्व लोकांप्रमाणं माझीही खात्री होती की, तसं जगण्यात मी योग्य तेच करत होतो. मी स्वतःला चांगला, सभ्य माणूस समजायचा. मी कुणाला फूस लावत नव्हतो, माझ्या वाईट आवडी-निवडी नव्हत्या आणि माझ्या वयाच्या इतर अनेक माणसांप्रमाणं केवळ स्वैराचारात रमणं हा काही माझ्या आयुष्याचा मूळ

हेतू नव्हता. वैषयिक बाबतीत मी सभ्य रीतीनं, खानदानी रीतीनं वागायचा. केवळ आरोग्य चांगलं रहावं इतपतच. मूल निर्माण करून किंवा माझ्यावर फार जीव लावून मला पुढे त्रासदायक ठरतील अशा स्त्रियांना मी टाळत असे. वस्तुतः माझ्यापासून कुणाला मुलं झालीही असतील, किंवा कुणाचे माझ्यावर जीव जडलेलेही असतील. पण मी तिकडं काणाडोळा केला. ही गोष्ट मला केवळ उच्च नैतिक वाटत होती एवढंच नव्हे, तर तिचा मला अभिमान होता."

तो थांबला आणि त्याने तो विचित्र आवाज केला. जेव्हा जेव्हा त्याच्या मनात नवा विचार येई तेव्हा तेव्हा तो असा आवाज करायचा असे मला दिसून आले.

"आणि ती सर्वांत वाईट गोष्ट आहे," तो म्हणाला. "शारीरिक कृतीमध्ये नीतीभ्रष्टता नाही. शारीरिक कृतीमध्ये नीतीभ्रष्ट असं काहीच नाही. पण ज्या स्त्रीबरोबर तुम्ही लैंगिक संबंध ठेवता, तिच्या बाबतीत सर्व नैतिक जबाबदारी झटकून देणं, ह्यात सगळी नीतीभ्रष्टता सामावली आहे. आणि ही नैतिक जबाबदारी झटकून टाकण्यास मी समर्थ होतो, ह्याचाच डौल मी मिरवत होतो. एक स्त्री माझ्या प्रेमात पडली होती आणि तिनं मला सर्वस्व अर्पण केलं होतं. पण तिला मी पैसे द्यायला विसरलो तेव्हा माझ्या सद्सद्विवेक-बुद्धीला किती टोचणी लागली होती ते मला आठवतं. जेव्हा मी तिला पैसे पाठवले आणि अशा रीतीनं तिच्या संबंधातल्या सर्व नैतिक जबाबदारीतून मी मुक्त झालो, तेव्हा कुठं माझं मन शांत झालं. तुम्ही माझ्याशी सहमत असल्याप्रमाणं उगीच मान डोलावू नका," अचानक तो ओरडला. "मला जास्त चांगलं ठाऊक आहे. तुम्ही, तुम्ही सगळे—तुम्ही सारे सारे

सारखेच आहात. अगदीच दुर्मीळ अपवाद असला तर गोष्ट वेगळी. तुमचं छान चाललेलं असतं तेव्हा माझे होते तसेच तुमचे विचार असतात. पण त्याचं काय? मला माफ करा," तो म्हणाला. "माझा इलाज नाही. हे सगळं फार फार भयंकर आहे. फारच भयंकर."

"एवढं काय भयंकर आहे?" मी विचारले.

"बायका आणि त्यांच्याशी आपले संबंध ह्या बाबतीत चुकांच्या खोल खड्डयात आपण जगतो ते. छे:, ह्या विषयावर शांतपणं मी बोलू शकत नाही. त्या माणसानं उल्लेखलेला तो 'अवघड क्षण' माझ्या जीवनात घडला म्हणून नव्हे, तर तो क्षण घडून गेल्यानंतर माझे डोळे उघडलेत आणि सर्व गोष्टी आता मी अगदी वेगळ्या दृष्टीकोनामधून पाहतोय. प्रत्येक गोष्ट अगदी आतून-बाहेरून मला वेगळी दिसतेय."

त्याने सिगारेट पेटवली. आपल्या गुडघ्यांवर आपले हाताचे कोपर टेकवून तो खाली झुकला आणि परत बोलू लागला. अंधारात त्याचा चेहरा मला दिसू शकत नव्हता; पण आग-गाडीच्या डब्याच्या खडखडाटापलिकडेही त्याचा प्रामाणिक, प्रसन्न आवाज मी ऐकू शकत होतो.

## ४

"तर सर्व यातना भोगून झाल्यानंतर मला समजलं—आणि त्या यातना भोगल्या म्हणूनच मला समजू शकलं की, वाईटाची मुळं कशात रुजली आहेत. गोष्टी कशा असाव्यात त्याची जाणीव झाली आणि भयानक गोष्टींची भयानकता स्पष्ट दिसू लागली.

"आता त्या कसोटीच्या क्षणापर्यंत मला नेणाऱ्या घडामोडींचा आरंभ कसा आणि केव्हा झाला ते सांगतो. मला सोळावं वर्ष होतं तेव्हा त्याची सुरुवात झाली. तेव्हा मी जिम्नाशियममध्ये शिकत होतो आणि माझा मोठा भाऊ विद्यापीठाच्या पहिल्या वर्षाला होता. मी अद्याप स्त्री-संग केला नव्हता, पण आमच्या वर्गामधल्या सर्व दुर्दैवी मुलांप्रमाणंच, मीसुद्धा निष्पाप भाबडा नव्हतो. एव्हाना इतर मुलांच्या वाईट संगतीचा दोन वर्षं माझ्यावर प्रभाव पडत होता. बायकांमुळं माझा एव्हाना छळ होत होता. एखाद्या विशिष्ट बाईची नव्हे, पण एकूणच बायकांची मला आसक्ती वाटू लागली होती. प्रत्येक बाई पाहताच, स्त्रीची नग्नता मनात आणताच, अंगात गोड झिणझिण्या येत होत्या. एकलेपणात मी विशुद्ध नव्हतो. आमच्यातली नव्याण्णव टक्के मुलं ज्या यातना भोगतात त्या मी भोगत होतो. मी घाबरायचा, यातना सोसायचा, मनोमन प्रार्थना करायचा, मोहाला बळी पडायचा. मी प्रत्यक्षात आणि कल्पनेत पाप करत होतो. पण शेवटचे पाऊल अद्याप मी टाकले नव्हते. मी एकटाच मरणयातना सोसत होतो. पण दुसऱ्या कुणा व्यक्तीवर मी अजून हात टाकला नव्हता. मात्र एके दिवशी संध्याकाळी माझ्या भावाचा एक विद्यार्थी मित्र आला. हा मित्र मोठा आनंदी स्वभावाचा होता. इतरांना दारू प्यायला, पत्ते खेळायला शिकवणाऱ्या, पहिल्या प्रतीच्या डांबीस पोरांपैकी तो एक होता. दारूच्या मैफलीनंतर ह्या भावाच्या मित्रानं सुचवलं की 'तिकडं' जाऊ या. आम्ही गेलो. माझा भाऊही तोपर्यंत ब्रह्मचारी होता. त्याच्या ब्रह्मचर्याचंही त्याच रात्री पतन झालं. मी पंधरा वर्षांचा पोरगा होतो. मी स्वतःला कलंक लावून घेतला. मी काय करत होतो त्याचं धड आकलन-

ही होत नसताना एका बाईकडून मी भ्रष्ट झालो. मी जे करत होतो ते चुकीचं होतं असं माझ्या वडीलधाऱ्यांकडून मी कधीही ऐकलं नव्हतं. आणि आजही तसं कुणाला ऐकू येत नाही. एवढं खरं–बायबलमधल्या दहा आज्ञा आपल्याला सांगतात की, असं करणं चुकीचं आहे. पण ह्या दहा आज्ञा आपल्याला एवढ्याचकरता माहीत असाव्या लागतात की, बायबलच्या अभ्यासाच्या परीक्षेवेळी पाद्र्याला अचूक उत्तरं देता यावीत. तरीही हे ज्ञान फारसं महत्त्वाचं नाही.

"तर ज्यांच्या मताचा मी मान राखत होतो अशा माझ्या वडीलधाऱ्यांपैकी एकानंही मला असं सांगितलं नाही, की मी जे काही करत होतो ते चूक होतं. उलट ज्यांचा मी आदर करीत होतो ते तर म्हणायचे की, ते योग्यच होतं. मी ते केल्यानंतर माझी उलघाल आणि माझ्या यातना कमी होतील असं ते म्हणताना मी ऐकायचा. मी हे ऐकलं, वाचलं. आरोग्याला ते चांगलं असतं असं माझे वडीलधारे म्हणताना मी ऐकायचा. तसं करणं अगदी योग्य होतं आणि ती गोष्ट करण्यात रुबाब होता, अशी माझ्या मित्रांची मतं मी ऐकायचा. तर एकूण मला त्यात वाईट काहीच दिसलं नाही. रोगाचा धोका? त्याबद्दल आधीच काळजी घेतलेली होती. काळजीवाहू सरकारनं ह्या बाबतीत उपाय योजलेले होते. कुंटणखान्यांवर सक्त नजर ठेवण्यात आलेली होती. शाळकरी मुलांनी सुरक्षितपणं आपल्या वासना भागवाव्या म्हणून. आणि डॉक्टर पैसे घेऊन त्यांचं निरीक्षण करतात. हे स्वाभाविक होतं. स्वैराचार आरोग्याला चांगला असं मानलं जात होतं, तर छान, स्वच्छ बाहेरख्यालीसाठी सोयी निर्माण करणं आवश्यक होतं. आपल्या

मुलांची ही सोय लावून देणाऱ्या माता मी पाहिल्या होत्या. वृद्ध शास्त्रच तरुणांना कुंटणखान्यांकडं पाठवतं."

"शास्त्र?" मी विचारलं.

"डॉक्टर हे शास्त्रज्ञ नाहीत का? शास्त्राचे पाद्री. तुमच्या आरोग्याची गरज आहे असं सांगून तुमच्या तारुण्याला भ्रष्ट कोण करतं? तेच करतात. आणि मग गंभीर चेहऱ्यांनी तुमचा सिफिलिस बरा करायला आरंभ करतात!"

"त्यांनी सिफिलिस का बरा करू नये?"

"कारण सिफिलिस बरा करण्यासाठी जे प्रयत्न होतात त्याच्या एक-दशांशाने जरी स्वैराचार नष्ट करण्याचे प्रयत्न झाले असते, तर सिफिलिस केव्हाचा नाहीसा झाला असता. आपले प्रयत्न स्वैराचार नष्ट करण्यासाठी खर्च होत नाहीत, तर त्याला उत्तेजन देण्यासाठी, त्याला सुरक्षित करण्यासाठी होतात. पण मुद्दा तो नाही. मुद्दा असा आहे की, माझ्यासारखे नऊ-दशांश (किंवा त्याहून जास्त) तरुण, केवळ माझ्या स्तरातले नव्हे तर किसानांसकट सर्व वर्गांमधले तरुण, पाप करतात ते केवळ एखाद्या स्त्रीच्या अनावर मोहाला भुलून नव्हे, मला भ्रष्ट करायला कुणा स्त्रीनं फूस लावली नव्हती. मी पाप केलं त्याला जबाबदार मी रहात होतो तो समाज. मी पाप केलं कारण माझ्या भोवतीचे काही लोक माझ्या पापाकडं माझ्या आरोग्याला सुरक्षित राखण्याचा उपाय म्हणून पहात होते. आणि दुसऱ्यांचा दृष्टिकोन होता की, तरुण मुलाला मनोरंजनाचा तो स्वाभाविक प्रकार होता. तेव्हा माझं कृत्य केवळ क्षम्यच नव्हे तर अगदी निष्पाप होतं असं त्यांना वाटत होतं. मी स्वतः त्याला पाप मानत नव्हतो. मी त्यात रमू लागलो कारण अंशतः मला सुख लाभत होतं

आणि अंशतः माझ्या विशिष्ट वयाची गरज भागत होती (निदान तसं मला सांगण्यात आलं होतं). त्याआधी मी जसा धूम्रपानात आणि मद्यपानात रमू लागलो होतो तसा आता वैषयिक सुखात रमू लागलो. तरीही ह्या पहिल्या पतनात काहीतरी हृदयस्पर्शी आणि अपवादात्मक होतं. मला आठवतं की त्या वेळी, खोलीमधून बाहेर पडायच्या आतच, माझ्या मनात विलक्षण खिन्नता दाटून आली होती आणि मला रडावंसं वाटत होतं. माझ्या गमावलेल्या निष्पापतेसाठी, बायकां-बरोबरच्या कायम गमावलेल्या नात्यासाठी, मला खूप रडावंसं वाटत होतं. ते साधं, स्वाभाविक नातं कायमचं संपलं होतं. इतःपर ते विशुद्ध नव्हतं, तसं राहणं शक्य नव्हतं. मी इष्कबाज बनलो. आणि इष्कबाज होणं म्हणजे दारुड्यासारखी, धूम्रपान करणाऱ्यासारखी किंवा अफीमबाजासारखी अवस्था असणं. एखादा दारुडा, धूम्रपानवेडा किंवा अफूबाज जसा सामान्य माणूस नसतो, तसाच स्वतःच्या सुखासाठी अनेक स्त्रियांना भोगणारा पुरुषही सामान्य माणूस रहात नाही. रंडीबाज माणूस हा कायमचा बिघडलेला असतो. दारुडा किंवा अफूबाज माणूस जसा त्याच्या चेहऱ्यावरून आणि वागण्यावरून ओळखता येतो, तसा रंडीबाज माणूसही ओळखता येतो. रंडीबाज माणूस आपल्या पापापासून परावृत्त होण्याचा प्रयत्न करील, वासनेला आवरून धरू पाहील; पण बायकांशी तो पुन्हा कधीही शुद्ध, तेजस्वी, साधं नातं—भावाचं नातं—प्रस्थापित करू शकणार नाही. रंडीबाज पुरुष तरुण बाईकडं ज्या रीतीनं पाहतो, त्यावरून पटकन त्याला ओळखता येतं. मी रंडीबाज बनलो, तसाच राहिलो आहे आणि त्यातूनच माझा नाश घडला."

"काही काळपर्यंत अशाच गोष्टी घडत राहिल्या. दरम्यान त्याच त्या अनुभवाचे नवनवे पैलू मी पाहिले. बापरे! माझ्या पाशवी वागण्याची नुसती आठवण झाली तरी अंगावर काटा उभा राहतो. माझ्या तथाकथित निष्पापतेविषयी माझे साथी मला कसे हसत ते मला आठवते. आणि मुलामा दिलेले यौवन! अंमलदार! पॅरीसनिवासी! ही सर्व मंडळी आणि मी स्वतः—अशा सगळ्यांच्या मला आठवणी आहेत. तीस वयाचे आम्ही बाहेरख्याली लोक बायकांविरुद्ध अत्यंत भयानक आणि विविध प्रकारचे शेकडो गुन्हे करीत होतो. तीस वयाचे आम्ही बदफैली लोक लखलखीत आंघोळी करून, तुळतुळीत दाढ्या घोटून, स्वच्छ अंतर्वस्त्रं घालून, सुगंधी द्रव्यं माखून, फ्रॉककोट आणि गणवेष चढवून देखणेपणानं दिवाणखान्यांमधून आणि बॉलनृत्याच्या दालनांमधून कसे ऐटीत मिरवीत होतो ते मला आठवतं. विशुद्धतेचे आम्ही जणू प्रतीक भासत होतो.

"गोष्टी कशा असल्या पाहिजेत आणि त्या कशा आहेत याचा क्षणभर विचार करा. अशा प्रकारचा गृहस्थ जेव्हा माझ्या बहिणीला किंवा मुलीला भेटायला येतो तेव्हा मी त्याला एका बाजूला घेतलं पाहिजे आणि शांतपणं सांगितलं पाहिजे: 'ऐक भल्या माणसा, तू कशा प्रकारचं आयुष्य जगतोस ते मला माहीत आहे. तुझ्या रात्री कुठं आणि कुणाबरोबर जातात तेही मला ठाऊक आहे. ही जागा तुझ्यासारख्यासाठी नाही. इथं अगदी शुद्ध चारित्र्याच्या आणि निष्पाप मुली राहतात. जा इथून.' हे असं असलं पाहिजे. पण प्रत्यक्षात जेव्हा असा माणूस उगवतो आणि माझ्या बहिणीच्या किंवा मुलीच्या

कमरेभोवती हाताचा विळखा टाकून नाचू लागतो तेव्हा तो जर धनवान आणि वरच्यांच्या ओळखीपाळखी असलेला माणूस असेल तर ह्या सलगीचा आम्ही आनंदच मानतो. कुठेतरी रंगेल रात्र घालवूनही परत तो माझ्या मुलीचा अनुनय करू शकतो. तो कलंकित किंवा रोगी असला तरी काहीही बिघडत नाही. अशा गोष्टी उपचारांनी कशा बऱ्या करायच्या ते आजकाल माहीत आहे. एवढंच कशाला, मोठ्या कुटुंबांमधल्या अशा कित्येक मुली मला माहीत आहेत, ज्यांच्या आई-बापांनी अत्यंत आनंदानं त्यांची सिफिलिसवाल्या पुरुषांशी लग्नं लावून दिली आहेत! किती नीचपणा! किती किळसवाणा प्रकार! हा नीचपणा आणि फसवेपणा उघडकीला येईल असा काळ केव्हातरी खात्रीनं येईल."

त्याने आपला विचित्र आवाज अनेकवेळा केला व चहा प्यायला आरंभ केला. तो चहा कमालीचा कडक होता आणि कडकपणा कमी करायला पाणी नव्हते. मी दोन ग्लास चहा प्यायलो होतो त्याचा परिणाम मला निश्चितपणे जाणवत होता. त्यालाही तसाच परिणाम जाणवला असावा, कारण तो जास्त जास्त उत्तेजित बनला. त्याचा आवाज अधिक सूचक बनला व त्यातून हेल उमटू लागले. बसल्या जागी त्याची चाळवाचाळव सुरू झाली. कधी तो डोक्यावरची टोपी काढून ठेवायचा, तर कधी परत डोक्यावर घालायचा. आम्ही अर्धवट अंधारात बसलो होतो आणि त्याच्या चेहऱ्यावर विचित्र भाव उमटून जात होते.

"अशा रीतीनं मी वयाच्या तिशीपर्यंत जगलो. मात्र लग्न करून अत्यंत विशुद्ध आणि उच्च कौटुंबिक जीवन जगण्याचा विचार सदैव माझ्या मनात घोळत होता. त्यामुळं योग्य मुलीसाठी माझी नजर सतत शोध घेत होती," तो बोलू

लागला. “ज्यावेळी मी व्यभिचाराच्या कर्दमात लोळत होतो, त्याचवेळी माझी पत्नी व्हायला लायक ठरेल अशा शुद्ध मुलीला मी शोधत होतो. अनेक मुलींना मी नाकारलं, कारण त्या माझ्या दृष्टीनं पुरेशा शुद्ध नव्हत्या. शेवटी लायक अशी एक मुलगी मला आढळली. पेन्झाच्या एका जमीनदाराच्या दोन मुलींपैकी ती एक होती. हा जमीनदार एकेकाळी श्रीमंत होता, पण त्यानं बहुतेक पैसा गमावला होता.

“दिवसभर नौकाविहार करून एके चांदण्या रात्री आम्ही घरी परतत होतो. घट्ट लोकरी कुडत्यामध्ये अवगुंठलेल्या तिच्या कमनीय देहाकडं आणि तिच्या कुरळ्या केसांकडं मी कौतुकानं टक लावून पहात होतो. अचानक मी निर्णय घेतला की, मला जी हवी तीच ही! तिनं माझ्या अत्यंत उच्च पातळीवरच्या सर्व विचारांना आणि भावनांना जाणून घेतलं असा त्या रात्री मला आभास झाला. खरं म्हणजे तिचे कुडते आणि तिचे कुरळे केस तिला खूप शोभून दिसत होते. दिवसभर तिच्या निकट सहवासात राहिल्यानंतर मला अधिक निकट जावंसं वाटत होतं.

“सुंदर स्त्री चांगली असते हा भ्रम किती आश्चर्यकारक असतो. सुंदर स्त्री अत्यंत फालतू बोलू शकते आणि तुम्हाला ऐकत असताना भ्रम होतो की, ती काहीतरी खूप चतुर बोलते आहे. अत्यंत नीच गोष्टी ती बोलते आणि करते, तर तुम्हाला त्या मोहक भासतात. आणि चुकून कधी फालतू आणि नीच बडबडीऐवजी ती सुंदर गोष्टी बोलली, तर तुमची तात्काळ खात्री पटते की, चांगुलपणाची आणि शहाणपणाची ती मूर्तिमंत पुतळी आहे.

“उन्मादक मनःस्थितीत मी घरी परतलो. नैतिक परि-

पूर्णतेचा ती आदर्श होती अशी माझी खात्री पटली होती आणि म्हणून ती माझी पत्नी व्हायला लायक होती. दुसऱ्याच दिवशी मी तिला लग्नाची मागणी घातली.

"पण ह्या सगळ्यातला खोटेपणा पहा! लग्न करणाऱ्या हजार पुरुषांपैकी (दुर्दैवानं केवळ आमच्याच वर्गातल्या नव्हे तर खालच्या वर्गांमधील पुरुषांपैकीही) क्वचितच एखादा असा आढळेल, ज्यानं किमान दहा वेळा पूर्वी लग्न केलेलं नसेल अथवा डॉन जुआनप्रमाणं कदाचित शंभर वा हजार वेळा लग्न केलेलं नसेल. हे मात्र खरं, मी ऐकलंय आणि पाहिलंय की, आजकाल काही शुद्ध पुरुष आहेत आणि त्यांना ही बाब क्षुल्लक वाटत नाही, तर खूप महत्त्वाची आणि सघन वाटते. देव त्यांचं कल्याण करो! पण माझ्या काळी दहा हजारात असा एकही नव्हता. प्रत्येकाला हे माहीत असतं आणि माहीत नसल्याचा तो बहाणा करतो. सर्व कादंबऱ्यां-मधून नायकाच्या भावनांचं, ज्या फुलांजवळून आणि तळ्यां-जवळून तो फिरत असतो त्या स्थळांचं अगदी तपशीलवार वर्णन केलेलं असतं. पण ह्या देखण्या नायकाला एखाद्या तरुणीविषयी वाटणाऱ्या प्रेमभावनांचं वर्णन करताना मात्र त्यानं पूर्वी आपला वेळ कसा घालवला याचा चकार शब्दानं उल्लेख नसतो. वेश्यागृहे, मोलकरणी, स्वयंपाकिणी, इतर पुरुषांच्या बायका — यांपैकी कुणाचाही निर्देश नसतो. आणि जेव्हा अशा अश्लील कादंबऱ्या लिहिल्या जातात, तेव्हा ज्यांनी ह्या गोष्टी वाचणं आणि त्यांची माहिती जाणून घेणं आवश्यक आहे त्यांच्या हाती — म्हणजे निष्पाप तरुणींच्या हाती — ह्या पुस्तकांना दिलं जात नाही. पहिली गोष्ट म्हणजे आपल्या शहरांमधलं आणि खेड्यांमधलं अर्धं जीवन व्यभिचारानं भरलेलं आहे याची

माहितीच आपली वडीलधारी माणसं तरुण मुलींना करून देत नाहीत. पुढं ह्या बहाण्याचीच त्या वडीलधाऱ्यांना एवढी सवय होते की, इंग्रज माणसांप्रमाणं त्याचीही अखेरीस धारणा होते: आपण अत्यंत उच्च नैतिक तत्त्वं पाळणारी आणि अत्यंत उच्च नैतिक जगांत राहणारी माणसं आहोत. बिचाऱ्या तरुण मुलींचा ह्यावर खरंच विश्वास बसतो. माझी दुर्दैवी पत्नी अशाच मुलींपैकी होती. मी तिचा वाग्दत्त वर बनल्यानंतर माझी दैनंदिनी तिला दाखवल्याचं मला आठवतं. ह्या दैनंदिनीमधून तिला माझ्या भूतकाळाची झलक पहायला मिळाली असती. निदान माझ्या शेवटच्या भानगडीची तिला माहिती व्हावी असा माझा उद्देश होता. इतर लोकांनी तिला कदाचित त्याबद्दल सांगितलं असतं आणि म्हणून मीच तिला स्वत: सांगून टाकावं असं मला वाटलं. जेव्हा तिला ते समजलं तेव्हा ती किती घाबरली, बावरली, निराश झाली ते मला आठवतं. तिथल्या तिथं माझ्याबरोबरचे संबंध तोडून टाकण्याची तिला तीव्र इच्छा झाल्याचं मला स्पष्ट दिसत होतं. तसं ती वागली असती तर किती बरं झालं असतं!"

त्याने परत तो आवाज केला, बोलणे थांबविले आणि चहाचा घोट घेतला.

६

"पण नाही! जे होतं तेच जास्त चांगलं होतं!" तो उद्गारला "मला योग्य तेच शासन मिळालं! पण मूळ कथेपासून तो वेगळा विषय आहे. मला म्हणायचं होतं की, दुर्दैवी मुलीच तेवढ्या एकट्या फसवल्या जातात. त्यांच्या मातांना सर्व माहीत असतं. विशेषत: आपल्या स्वत:च्या नवऱ्यांकडून ज्या शिकलेल्या असतात अशा मातांना. पुरुषांच्या

शुद्धतेवर विश्वास ठेवल्याचा त्या बहाणा करतात, पण वागतात मात्र अगदी उलट. स्वतःसाठी आणि आपल्या मुलींसाठी पुरुषांना गळात अडकवायला कोणतं आमीष वापरायचं हे त्यांना चांगलं ठाऊक असतं.

"आम्हा पुरुषांनाच तेवढं ते ठाऊक नसतं आणि आपल्याला ठाऊक नसतं याचं कारण ठाऊक करून घ्यायची आपली इच्छा नसते. बायकांना चांगलं ठाऊक असतं की, तथाकथित अत्यंत उदात्त आणि काव्यात्म प्रेम नैतिक गुणांपायी स्फुरत नसतं, तर शारीरिक जवळिकीमधून, केशरचनांमार्फत, फ्रॉकच्या रंगामधून आणि शिवणीमधून निर्माण होतं. एखाद्या पुरुषाला जाळ्यात पकडण्यासाठी सज्ज झालेल्या एखाद्या अनुभवी नखरेल बाईला विचारा, की कोणता धोका ती पत्करील. त्या पुरुषाच्या उपस्थितीत तिच्यावर क्रौर्याचा, फसवणुकीचा किंवा अनीतीचा आरोप होणं, अथवा त्याच्यासमोर एका गबाळ, भोंगळ गाऊनमध्ये उभं राहणं. ती नक्की पहिला पर्याय निवडील. उदात्त भावनांबद्दल आपण पुरुष बोलतो तेव्हा चक्क खोटेपणा करीत असतो हे तिला माहीत असतं. आपल्याला हवं असतं तिचं शरीर! म्हणून आपण तिच्या पापांना क्षमा करू, पण गबाळ्या, भोंगळ, रुचीहीन गाऊनमध्ये तिला पाहणं कधीही सहन करणार नाही. नखरेल बाईला ह्याची उत्तम जाणीव असतेच, पण एखाद्या जनावराप्रमाणं कोणत्याही निष्पाप तरुण मुलीलासुद्धा हे अंतर्ज्ञानानं समजतं.

"तिटकारा आणणारी त्यांची ती कुडती, त्यांच्या पार्श्वभागावरील कपड्यांची सळसळ, त्यांचे उघडे खांदे, उघडे बाहू आणि जवळ जवळ उघडीच पडलेली वक्षःस्थळं – ह्या गोष्टी कारणीभूत ठरतात. बायकांना, विशेषतः पुरुषांपासून ज्ञान

मिळविलेल्या बायकांना, अतिशय छान माहीत असतं की, उदात्त विषयांवरील चर्चा ही निव्वळ चर्चा असते. पुरुषाला हवा असतो स्त्रीचा देह आणि देहाला अधिक आकर्षक बनवणाऱ्या गोष्टी. म्हणून या पद्धतीनं त्या पुरुषाला सामोऱ्या जातात. आपल्या सवयीच्या दृष्टिकोनाच्या भिंगामधून वरच्या वर्गाचं जीवन न पाहता जर आपण त्याला खऱ्या उजेडात पाहिलं तर तो खरोखरीचा कुंटणखाना असल्याचं आढळून येईल. तुम्हाला पटत नाही? मी तुम्हाला माझं विधान सिद्ध करून दाखवतो," मला बोलायला वावच न देता तो म्हणाला. "तुम्ही म्हणाल की, आमच्या वर्गामधल्या बायकांचे हेतू कुंटणखान्यामधल्या बायकांपेक्षा वेगळे असतात. पण हे तुमचं म्हणणं चुकीचं आहे आणि तुमची चूक मी सिद्ध करून दाखवीन. लोकांचे जीवनामधले हेतू जर भिन्न असतात, त्यांची अंतर्गत जीवनं जर भिन्न असतात, तर त्यांच्या आयुष्यांचे बाह्य प्रकारही वेगळे असले पाहिजेत. पण ज्यांचा आपण तिटकारा करतो त्या अभागी स्त्रियांकडं पहा आणि मग अत्यंत वरच्या समाजातल्या तरुणींकडं पहा. तीच सौंदर्यप्रसाधनं त्याच फॅशन, तीच अत्तरं, तेच उघडे खांदे, बाहू आणि स्तन, तेच अतिफुलारलेले पार्श्वभाग, हिऱ्या-माणकांची आणि भारी किंमतीच्या झगमगणाऱ्या दागिन्यांची तीच हाव; करमणुकीचे प्रकारही तेच: नाच, गाणी आणि संगीत. पुरुषांना मोहित करण्याचे मार्गही सारखेच. काहीही फरक नाही. त्यांच्यात अगदी काटेकोर फरक दाखवायचाच झाला तर आपण एवढंच म्हणू शकू की, तात्पुरत्या काळाच्या वेश्यांचा सर्वसाधारणपणं तिटकारा केला जातो, पण दीर्घ काळच्या वेश्यांचा आदर होतो."

"तर कुडती, कुरळ्या बटा आणि पार्श्वभागांची सळसळ यांच्या जाळ्यात मी अडकलो होतो. मला अडकवणं सोपं होतं कारण उष्णतागृहात जशी काकड्यांची पैदास करतात तशी तरुणांमध्ये प्रेम-प्रवृत्तीची जोपासना करणाऱ्या खास वातावरणात माझं पोषण झालं होतं. उत्तेजक खाद्य-पेयांची विपुलता आणि त्याच्या जोडीला संपूर्ण शारीरिक निष्क्रियता, यांच्यामुळं आमच्यात पद्धतशीरपणं वासना जोपासल्या जातात. हे अगदी सत्य आहे. मग त्याचं तुम्हाला आश्चर्य वाटो अगर न वाटो. मलासुद्धा अगदी अलिकडंपर्यंत याची जाणीव झाली नव्हती. पण आता मला ते जाणवलंय. म्हणून आजच्या त्या बाईप्रमाणं, माणसांना जेव्हा काहीही समजत नाही आणि ती उगाच बाष्कळ बडबडू लागतात तेव्हा मला बेचैन व्हायला होतं.

"माझ्या ठिकाणापासून जवळच, यंदाच्या वसंतात काही शेतकरी रेलमार्गावर काम करीत होते. तरुण शेतकऱ्याचा नेहमीचा आहार म्हणजे पाव, क्वास* आणि कांदे. हा आहार शेतकऱ्याला शेतातलं हलकं काम करताना जोम देतो, आनंदी राखतो. रेलमार्गावर काम करायला तो जातो तेव्हा पेज आणि पौंडभर मटण असा त्याचा आहार असतो. पण तीस पूड वजनाची हातगाडी दिवसाचे सोळा तास ढकलून हे पौंडभर मटण तो जिरवतो. त्याचा आहार त्याला अगदी योग्य आहे. पण आमचं काय? दोन पौंड

---

*पाव आंबवून बनवलेले एक रशियन पेय — अनु.

मटण, कोंबडी, कॅलरीयुक्त इतर पक्वान्नं फस्त करणाऱ्या आणि दारू ढोसणाऱ्यांचं? आम्ही ते सगळं कसं जिरवतो? वैषयिक अतिरेकांमध्ये! ती ताकद आम्ही खरंच जिरवली तर सगळं ठीक आहे. कारण सुरक्षा झडप उघडी आहे. पण ती जर बंद असली—जशी माझी मधून मधून बंद असायची—तर तिची परिणती लैंगिक उत्तेजनेत होते. म्हणजे आमच्या कृत्रिम जीवनाच्या लोलकामधून पसार होताना अति-सुसंस्कृत अशा प्रेमामध्ये ती व्यक्त होते. काहीवेळा तर अशरीरी प्रेमातसुद्धा. इतर प्रत्येकाप्रमाणं मीही प्रेमात पडलो. उन्माद, आदर, काव्य ही प्रेमाची सर्व वैशिष्ट्यं माझ्या प्रेमात होती... खरं म्हणजे माझ्या ह्या प्रेमाची निर्मिती एका बाजूनं तिच्या आईनं आणि शिंपीणीनं केली होती; तर दुसऱ्या बाजूनं माझ्या अतिरेकी खाण्यातून, माझ्या आळशी जगण्यातून ते प्रेम निर्माण झालं होतं. जर एका बाजूनं नौकाविहार नसता, तिची कंबर आणि देहाचे इतर अवयव यांना उठाव देणारी शिंपीण नसती, जर माझी भावी पत्नी गबाळा गाऊन घालून घरात बसणारी असती आणि दुसऱ्या बाजूनं, जर मी सर्वसामान्य माणसाप्रमाणं स्वतःच्या कामानुसार आहार घेत असतो, जर माझी सुरक्षा झडप उघडी असती (त्यावेळी ती बंद होती), तर मी प्रेमात पडलो नसतो आणि पुढचे परिणामही घडले नसते."

## ८

"पण त्या संध्याकाळी सगळ्याच गोष्टी योगायोगानं जमून आल्या: माझी शारीरिक अवस्था, तिची सौंदर्यप्रसाधना आणि

नौकाविहार. पूर्वी वीस वेळा असं काही जमलं नव्हतं, पण यावेळी जमलं. सापळयात अडकावं त्याप्रमाणं. मी चेष्टा करीत नाही. आमच्या काळात लग्नं आधी ठरवीत, सापळे लावावे त्याप्रमाणं. स्वाभाविक काय आहे? मुलगी वयात आली म्हणजे तिचं लग्न करून टाकलं पाहिजे. अगदी साधी गोष्ट भासते. मुलगी जर राक्षसी रूपाची नसली आणि लग्न करण्याची इच्छा बाळगणारे पुरुष असले म्हणजे पुरं. पूर्वीच्या काळी असं करायचे. मुलगी वयात आली म्हणजे तिचे आई-बाप तिला नवरा शोधून द्यायचे. चिनी, हिंदुस्थानी, मुसल-मानी आणि आपल्या शेतकरी लोकांमध्ये ही अशी रीत होती, अजूनही आहे. जगामधल्या किमान नव्याण्णव टक्के लोकांमध्ये असंच घडतं. पण आमच्यासारख्या एक टक्का बदफैली लोकांनी ठरवलं की हे चुकीचं आहे आणि नव्या रूढीचा विचार केला. ही नवी रूढी कशी आहे? ह्या नव्या रूढीत मुली बसून राहतात आणि जत्रेत फिरावं त्याप्रमाणं पुरुष त्यांच्या समोरून फिरत फिरत हव्या त्या मुलीची निवड करतात. मुली तिथं बसून असतात आणि मोठ्यांदा बोलायचं धाडस होत नसलं तरी मनातल्या मनात म्हणत असतात: 'अरे घे मला! मला! तिला नको, तर मला! बघ माझे खांदे किती सुरेख आहेत... अं... आणखीही काही गोष्टी माझ्यापाशी आहेत!' आम्ही पुरुष त्यांच्या मागं-पुढं फिरत राहतो, त्यांना नखशिखांत न्याहाळतो. आम-च्या फायद्यासाठी मांडलेल्या ह्या प्रदर्शनाला पाहून खूष होतो. आम्ही टक लावून पाहात असतो आणि जर सावधगिरी बाळगली नाही–तर–फट्ट! आम्ही अडकतो!"

"हे दुसऱ्या कोणत्या पद्धतीनं घडायला हवं?" मी

विचारले. "स्त्रियांनी पुरुषांना मागणी घालावी असं वाटतं?"

"दुसरी कोणती पद्धत असावी ते मला माहीत नाही. पण जर समानता राखायची असेल तर खरीखुरी समता असावी. आई-बापांनी लग्नं ठरवणं हे जर खालच्या पातळी-वरचं मानलं जात असेल, तर हा प्रकार हजार पटींनी नीच आहे. पहिल्या बाबतीत हक्क आणि संधी किमान समान असतात, पण ह्या बाबतीत बाईला एक तर गुलामाप्रमाणं बाजारात विकतात, किंवा सापळ्यात अमीष म्हणून ठेवतात. मात्र एखाद्या मुलीला (किंवा तिच्या आईला) सांगायचं तुम्ही धाडस केलंत की, नवरा पकडणं एवढ्या एकाच व्यवधानात ती गुंतलेली आहे, तर बापरे! केवढा अपमान मानला जातो! प्रत्यक्षात खरोखरी ती एवढ्याच एका उद्योगात गुंतलेली असते. दुसरं करण्यासारखं तिच्यापाशी काही नसतंच. तरुण आणि निष्पाप जीव अशा उद्योगात अडकलेले पहायला भयानक वाटतं. त्यात पुन्हा हे सर्व उघडपणं केलं जात नाही, तर लपूनछपून. 'ओहो! दी ओरिजिन ऑफ स्पेसीज! कित्ती छान आहे! माझ्या लिझाला चित्रकला फार आवडते! प्रदर्शन बघायला तुम्हीही जाणार आहात काय? कित्ती बोधक! बर्फावरच्या घसरगाडीतून सहल, नाटक, संगीत मैफली? व्वा! व्वा! माझी लिझा संगीता-ची वेडी आहे! तिचे-तुमचे विचार सारखे नाहीत हे कसं काय? आणि नौकाविहार...' आणि सारा वेळ तिच्या मनात एकच विचार असतो. 'मला घे, मला, किंवा माझ्या लिझाला! नाही, मला! अनुभवासाठी!' छे:! खोटेपणा! भयानक!" असे म्हणून त्याने उरलेला चहा पिऊन टाकला व ग्लास बाजूला सारून ठेवले.

चहा आणि साखर आपल्या थैलीत ठेवून तो पुढे बोलू लागला: "तुम्हाला कदाचित याची कल्पना असेल की, हे सर्व बाईच्या वर्चस्वामधून निर्माण होतं. बाई हा जगामधल्या अकथित संकटाचा उगम आहे."

"बाईचं वर्चस्व म्हणजे काय म्हणायचंय तुम्हाला?" मी विचारले. "कायदा तर पुरुषाला वरचष्मा गाजवायला वाव देतो."

"तेच तेच," मला अडवीत तो म्हणाला. "तेच नेमकं मी तुम्हाला सांगू इच्छितोय. बाईचा जरी अत्यंत खालच्या पातळीवरून अपमान होत असला तरी वर्चस्व गाजवण्याची आगळी शक्ती तिला लाभत असते. एका गोष्टीची भरपाई दुसऱ्या गोष्टीनं केली जाते. ज्याप्रमाणं ज्यू लोकांना दडपशाहीचा छळ सोसावा लागतो, पण पैशाच्या रूपानं त्यांच्या हाती सत्ता राहते. ज्यू म्हणतात: 'आम्ही केवळ सावकारी करावी अशी तुमची इच्छा आहे काय? ठीक आहे. तर सावकार म्हणून आम्ही तुमच्यावर सत्ता गाजवू!' त्याचप्रमाणं बायका म्हणतात: 'आम्ही फक्त इंद्रियसुखाचे विषय म्हणून रहावं अशी तुमची इच्छा आहे ना? ठीक आहे. तर इंद्रियसुख देणारे प्राणी ह्या नात्यानं आम्ही तुम्हाला आमचे गुलाम बनवू.' मत देण्याचा किंवा न्यायाधीश होण्याचा स्त्रीला हक्क नाही ह्यात तिची हक्कविहीनता सामावलेली नाही. ह्या कार्यांची अंमलबजावणी हा मुळी हक्कच नव्हे. लैंगिक जीवनात ती पुरुषाच्या समान नाही, तिच्या आवडीनुसार तिनं पुरुषाला रतिक्रीडेचा होकार अथवा नकार

देण्याचा तिला अधिकार नाही, तिला पुरुषानं निवडण्याऐवजी तिनं पुरुषाला निवडण्याचा तिला हक्क नाही – ह्या गोष्टीं-मध्ये तिची हक्कविहीनता सामावली आहे.

"तुम्ही म्हणाल हा जुलूम झाला. ठीक! मग पुरुषालाही हा हक्क असू नये. सध्या पुरुष जो हक्क भोगतो त्याला स्त्री वंचित आहे. आणि ह्या हक्कविहीनतेची भरपाई करून घेण्यासाठी ती माणसाच्या चेतनाशक्तीवर परिणाम करते; त्याच्या चेतनाशक्तीवर परिणाम घडवून त्याला ती एवढी आपल्या आधीन बनवते, की त्यानं निवड करणं हा निव्वळ उपचार ठरतो. खरी निवड तीच करीत असते. आपल्या वांच्छित गोष्टी मिळवण्याचं हे साधन एकदा तिला सापडलं म्हणजे सर्व लोकांवर भयंकर सत्ता गाजवण्यासाठी त्याचा ती फायदा घेते."

"ही भयानक सत्ता कशात असते?" मी विचारले.

"कशात? प्रत्येक गोष्टीत! सर्वत्र! कुठल्याही मोठ्या शहरातल्या दुकानांमधून फेरी मारा. तिथं मांडलेल्या गोष्टी बनवण्यासाठी लक्षावधी हात राबलेले आहेत. आणि पहा! ह्या दुकानांपैकी नऊ-दशांश दुकानांमधून पुरुषांच्या उपयोगी काही सापडेल? जीवनातील सर्व चैनीच्या गोष्टींची स्त्रिया मागणी करतात. आणि त्यांचा उपभोग घेतात. कारखान्यांची गोष्ट घ्या. बायकांसाठी निरुपयोगी दागिने, वाहनं, फर्निचर आणि सटरफटर वस्तू बनवण्यात ते गुंतलेले असतात. बायकां-च्या लहरी पूर्ण करण्यासाठी लक्षावधी लोक, गुलामांच्या पिढ्यान्‌पिढ्या ह्या क्रूर कारखान्यांच्या श्रमात पिळून निघत असतात. राण्यांप्रमाणं बायकांनी नऊ-दशांश मानवजातीला स्वत:साठी गुलामांप्रमाणं राबायला लावलंय. आणि ह्या सर्वांचं

कारण काय, तर त्यांचा अपमान घडतो आणि पुरुषाबरोबर त्यांना समान हक्क लाभत नाहीत म्हणून! यासाठी आपल्या चेतनाशक्तीवर परिणाम घडवून, त्यांच्या सापळ्यात आपल्याला अडकवून, त्या आपल्यावर सूड उगवतात. होय, केवळ ह्यापायी! पुरुषांच्या चैतन्यशक्तीवर परिणाम घडविणारं प्रभावी उपकरण म्हणून स्त्रियांनी स्वतःला एवढं समर्थ बनवलंय, की त्यांच्या सहवासात पुरुष आपल्या मनाचा समतोलपणा राखूच शकत नाहीत. ज्या क्षणी पुरुष एखाद्या स्त्रीच्या सहवासात येतो त्या क्षणी अंमली पदार्थ सेवन करणाऱ्याप्रमाणं तो झपाटतो. बॉलनृत्यासाठी सजूनधजून आलेली एखादी रमणी पूर्वी मी पाहिली म्हणजे तिच्या पुढ्यात मी लाळ घोटू लागायचा. पण आता मी घाबरतो, कारण मला तिच्यात धोका दिसतो, काहीतरी कायदाबाह्य दिसतं. मदतीसाठी पोलिसाला हाक मारण्याची जोरदार इच्छा होते. ह्या धोक्याला ताबडतोब इथून न्या आणि कडी-कुलूपात बंदिस्त करा, अशी मागणी करावीशी वाटते.

"हसताय?" तो माझ्यावर ओरडला. "ह्यात हसण्या-सारखं काहीही नाही. लोक ह्या गोष्टीला समजून घेतील असा काळ नक्की आणि लौकरच येईल अशी माझी खात्री आहे. चेतनाशक्तीला चाळविण्याच्या थेट हेतूनं स्त्री-देहाला नटवून शांतता ढळवण्याची परवानगी देणारा समाज अस्तित्वात कसा होता, याबद्दल लोक आश्चर्य करतील असा काळ लौकरच येईल. पुरुष ज्या मार्गांवरून चालतात त्यांच्यावर सापळे लावून ठेवण्यासारखंच हे आहे. त्याहून वाईट! जुगारावर मात्र बंदी! पण माणसाच्या भावना चाळविण्याच्या

उद्देशानं बायकांनी वेश्यांप्रमाणं नटायला बंदी का नाही? ही गोष्ट तर हजारपटींनी जास्त धोक्याची आहे!"

१०

"तर मी म्हणतो तसा पकडला गेलो. ज्याला माणसं प्रेम म्हणतात त्या "प्रेमात" मी होतो. माझ्या वाङ्‌निश्चया-च्या काळात मला तीच केवळ परिपूर्णतेचं शिखर भासली असं नाही, तर मी स्वतःलासुद्धा परिपूर्णतेचा कळस मानीत होतो. सरतेशेवटी, कुणीतरी आपल्यापेक्षा कसल्यातरी बाबतीत जास्त वाईट आहे असं शोधून काढल्याशिवाय हराम-खोर माणसाला अस्तित्वात राहणं शक्य नसतं. तशी उणीव सापडली म्हणजे त्याला स्वतःचा अभिमान बाळगायला आणि स्वतःवर खूष व्हायला कारण सापडतं. माझ्या बाबतीत तसंच होतं. मी पैशासाठी लग्न करीत नव्हतो; माझ्या ओळखीचे बहुतेक लोक पैशासाठी किंवा वशील्यांसाठी लग्न करीत, पण माझा मात्र लग्न करण्यात लोभी हेतू नव्हता. मी श्रीमंत होतो आणि ती गरीब होती. ही एक बाब होती. दुसरी म्हणजे इतरांना लग्नानंतरही पूर्वीप्रमाणंच बाहेरख्याली जीवन जगायची इच्छा होती. पण मी मात्र लग्नानंतर माझ्या पत्नीशी संपूर्ण निष्ठावंत राहण्याचा पक्का निर्णय केला होता. माझ्या ह्या निश्चयामुळे मला स्वतःचा अमर्याद अभिमान वाटत होता. खरं म्हणजे मी किळसवाणा डुक्कर होतो, पण स्वतःला संत समजू लागलो होतो.

"आमच्या वाङ्‌निश्चयाचा काळ अगदी छोटा ठरला. मला तो काळ आठवला म्हणजे शरमेनं लाजायला होतं. हा कालखंड

लैंगिक प्रेमाचा नव्हे तर आत्मिक प्रेमाचा असतो असं आपण गृहीत धरतो. पण हे जर आत्मिक प्रेम असेल, हा जर आत्मिक संबंध असेल, तर आपल्या शब्दांमधून, आपल्या चर्चांमधून, आपल्या संभाषणांमधून ह्या आत्मिक दळणवळणाचं प्रतिबिंब घडलं पाहिजे. पण तसं नव्हतं. जेव्हा जेव्हा आम्ही एकटे असू तेव्हा तेव्हा बोलणंच फार अवघड जायचं. त्या-साठी केलेला सर्व खटाटोप व्यर्थ जायचा. काहीतरी बोलण्या-साठी विषय सुचायला मला खूप वेळ लागायचा. मग सुचलेलं तेवढं बोलायचा, परत गप्प रहायचा आणि आणखी काहीतरी बोलायला विषय धुंडाळत रहायचा. बोलण्यासारखं काहीच नव्हतं. आम्ही भावी एकत्र जीवनाविषयी, आमच्या योजनां-विषयी आणि व्यवस्थांविषयी, आधीच सारं बोलून झालं होतं. आणखी होतं तरी काय? आम्ही जर जनावरं असतो तर आमच्याकडून बोलण्याची अपेक्षा नाही हे आम्हाला समजलं असतं. पण माणसं ह्या नात्यानं आम्ही बोलावं अशी अपेक्षा होती आणि बोलण्यासारखं तर काहीच नव्हतं, कारण जो विषय आमच्या डोक्यात घोळत होता तो संभाषणाला योग्य नव्हता. त्याच्या जोडीला किळसवाण्या परंपरा. म्हणजे चॉकलेटं, वेगवेगळी पक्वान्नं हादडणं. घर लावणं, शय्यागृह सजवणं, बिछाने बनवणं, कपडे, अंतर्वस्त्रं घेणं, इ. लग्नाची कळकट पूर्वतयारी होतीच. त्या म्हाताऱ्यानं जिचा हिरीरीनं पुरस्कार केला त्या पुरुषप्रधान कुटुंबव्यवस्थेत हुंडा, बिछाने, पिसांच्या गाद्या-गिरद्या ह्या सगळ्या गोष्टी रहस्याचा तपशील होत्या असं तुम्हाला वाटत नाही का? पण आजकाल, लग्नेच्छु दहा माणसांपैकी एकजणसुद्धा ह्या रहस्यावर विश्वास ठेवीत नाही, किंवा तो जे करणार आहे त्यात काही

जबाबदाऱ्या अंतर्भूत आहेत ह्याचा विचार करीत नाही. कारण शंभरातला एक माणूससुद्धा त्याच्या लग्नाआधी लग्न न झालेला सापडत नाही आणि पहिल्याच संधीला आपल्या बायकोला फसवू न इच्छिणारा तर पन्नासात एक सापडत नाही. विवाह करणाऱ्यांपैकी बहुसंख्य असं मानतात की, चर्चमधील विधी हे एखाद्या विशिष्ट स्त्रीची मालकी मिळविण्यासाठी केवळ आवश्यक असतात. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे ह्या सगळ्या पूर्वतयारींचा भयानक अर्थ स्पष्ट होतो. त्यांची मर्यादा कळून चुकते. ती एक प्रकारची विक्री असते. एका निष्पाप मुलीची एका दुराचारी पुरुषाला विक्री करण्यात येते आणि त्या विक्रीला अनुरूप विधींची जोड देण्यात येते."

## ११

"तर प्रत्येकजण अशा रीतीनं लग्न करतो आणि मीही त्याच पद्धतीनं लग्न केलं. बराच गाजावाजा करण्यात येणाऱ्या मधुचंद्राच्या सफरीवर आम्ही निघालो. खरं म्हणजे हे नांव किती ग्राम्य आहे!" तो कडवटपणे पुटपुटला. "पॅरिस-मध्ये एकदा मी एक राक्षसी प्रदर्शन पहायला गेलो होतो. तिथं एक दाढीवाली बाई आणि अर्धं शरीर माशाचं असलेला कुत्रा मी पाहिला. असं आढळून आलं की, ती दाढीवाली बाई म्हणजे केवळ स्त्रीवेष घातलेला पुरुष होता आणि कुत्र्याला सील माशाचं कातडं पांघरून टबात पोहायला लावलं होतं. तिथं पाहण्यासारखं असं काहीच नव्हतं, पण मी बाहेर जात होतो तेव्हा तिथला दलाल माझ्याकडं बोट दाखवीत लोकांना

उद्देशून म्हणाला: 'ह्या सद्गृहस्थांना विचारा, प्रदर्शन पाहण्यायोग्य आहे किंवा नाही! तिकीटं विकत घ्या! लौकर! फक्त एक फँकला प्रवेश!' ते प्रदर्शन मुळीच पाहण्यालायक नाही असं सांगायला मला लाज वाटली आणि दलालानं नेमकं हेच हेरलं होतं. मला वाटतं की, मधुचंद्राचा किळसवाणा अनुभव आलेल्या लोकांच्या बाबतीत असंच घडत असावं. दुसऱ्यांचा भ्रमनिरास करायला त्यांना लाज वाटत असावी. मीसुद्धा इतरांचा भ्रमनिरास करण्याचं टाळलं होतं, पण सत्य दडवून ठेवण्यात काही अर्थ नाही असं आता मला वाटतं. उलट सत्य सांगणं हे माझं कर्तव्य आहे असं मी समजतो. माझा मधुचंद्र अगदी लज्जास्पद, किळसवाणा, केविलवाणा आणि त्याहूनही वाईट म्हणजे कंटाळवाणा झाला. वर्णन करणं अशक्य ठरेल एवढा कंटाळवाणा. हा अनुभव माझ्या धूम्रपानाच्या पहिल्या खेपेशी साधर्म्य राखणारा होता. तेव्हा माझ्या तोंडाला लाळ सुटली होती, मला ती थुंकावीशी वाटली होती, पण लाळ गिळून मी आनंदाचा देखावा केला होता. धूम्रपानापासून जर खरोखर आनंद मिळत असेल तर तो खूप उशीरा मिळायला आरंभ होतो. तेच ह्या बाबतीत लागू पडतं. ह्या पापाचा जोडप्यानं खूप सराव केला तरच त्यातून त्याला काही आनंद लाभू शकेल."

"ह्याला तुम्ही पाप म्हणता?" मी मध्येच विचारले. "पण हा तर अत्यंत नैसर्गिक मानवी धर्म आहे."

"नैसर्गिक?" त्याने विचारले. "नैसर्गिक? नाही. उलट मी तर अगदी विरुद्ध निष्कर्षाला येऊन पोहोचलो आहे. ही अगदी अनैसर्गिक बाब आहे. मुलांना विचारा, निष्पाप तरुण मुलींना विचारा. माझी बहीण वयानं खूप लहान होती

आणि तिच्यापेक्षा दुप्पट वयाच्या दुर्गुणी माणसाशी तिचं लग्न झालं. तिच्या लग्नाच्या पहिल्या रात्री ती फिकट मुद्रेनं, आसवं डबडबलेल्या डोळ्यांनी धावत, ओरडत बाहेर आली होती – 'मुळीच नाही!' काय वाट्टेल ते झालं तरी नाही!' आम्ही सारे चकित झालो होतो. पण त्याला तिच्यापासून काय हवं होतं ते सांगायला तिला शब्दसुद्धा सापडत नव्हते.

"आणि तुम्ही ह्याला नैसर्गिक म्हणता! नैसर्गिक अशा गोष्टी आहेत. प्रसन्न, आनंददायी आणि आरंभापासून लज्जास्पद नसलेल्या अशा गोष्टी आहेत. पण त्यात हिचा समावेश नाही. ही बाब तिरस्कारक, लज्जास्पद आणि पीडादायक आहे. नाही! ती मुळीच स्वाभाविक नाही! निष्पाप तरुणीला तिचा नेहमी तिरस्कार वाटतो अशी माझी खात्री पटलीय."

"पण मग मानववंशाची परंपरा पुढं चालू कशी रहायची?" मी विचारले.

"मानववंशाची परंपरा पुढं चालू कशी रहायची?" त्याने माझेच शब्द उपहासाच्या सुरात परत उच्चारले. जणू हा नित्याचा आणि निर्लज्ज प्रश्न तो अपेक्षित होता. "इंग्रज लॉर्डांना आकंठ खाता यावं म्हणून संततीनियमनाचा प्रचार केलेला चालतो; कुठलेही अप्रिय परिणाम भोगावे न लागता एखाद्याला आनंद लुटता यावा म्हणून संततीनियमनाचा प्रचार केलेला चालतो; पण नीतिमत्तेच्या नांवाखाली कुणी संतती-नियमनाचा प्रचार करायला तोंड उघडलं रे उघडलं – बापरे! केवढा गदारोळ माजतो! डझन दोन डझन व्यक्तींनी जर इतःपर डुकरांसारखं वागायचं नाही असं ठरवलं तर काय

मानववंश ताबडतोब खंडित होतोय? माफ करा. त्या उजेडाचा मला त्रास होतोय. मी त्यावर आच्छादन टाकलं तर तुमची काही हरकत नाही ना?" दिव्याकडे बोट दाखवीत तो म्हणाला.

माझी काहीच हरकत नसल्याचे मी त्याला सांगितले. त्याच्या इतर सवयींप्रमाणेच तो लगबगीने थरथरत बाकावर चढला आणि त्याने प्रकाशावर पडदा ओढला.

"तरीसुद्धा, जर प्रत्येकानं तुमच्या विचारांचा स्वीकार केला, तर मानवी वंश नाहीसा होईल!"

त्याचे उत्तर तात्काळ तयार होते.

"मानवी वंशाच्या सातत्याबद्दल तुम्हाला काळजी पडलीय?" माझ्यासमोर परत बसत तो म्हणाला. त्याने आपले पाय फताडे पसरले आणि आपल्या गुडघ्यांवर हाताचे कोपर टेकवीत तो झुकला. "पण मानवी वंशाचं सातत्य टिकवायची गरज काय?"

"असं का विचारता? अन्यथा तुम्ही किंवा मी अस्तित्वात नसतो!"

"पण आपण कशाला अस्तित्वात रहायचं?"

"जगण्यासाठी!"

"पण आपण कशासाठी जगायचं? आयुष्यात जर काही उद्दिष्ट नसेल, नुसतं जगणं हेच जर ध्येय असेल, तर जगण्यासारखं काहीच नाही. आणि हे जर खरं असेल तर शॉपेनहॉवर, हार्टमान्न आणि बुद्धधर्मीय अगदी बरोबर आहेत. पण आयुष्यात जर ध्येय असेल तर त्या ध्येयपूर्तीबरोबरच आयुष्य संपणं हे अगदी योग्य ठरेल. केवळ हाच निष्कर्ष निघतो," ह्या विचारावर खूप जोर देत तो भावनावेगाने

म्हणाला. "केवळ हाच निष्कर्ष निघतो. हे बघा: जर चांगुलपणा, दयाळूपणा, प्रेम हे मानवी जीवनाचं ध्येय असेल; धर्मवेत्त्यांनी सांगितल्याप्रमाणं सर्व लोकांना प्रेमानं एकवटावं, तलवारीऐवजी नांगर हाती घ्यावा, आणि आणखी बऱ्याच भल्या गोष्टी कराव्या, हे जर मानवी जीवनाचं ध्येय असेल, तर हे ध्येय साध्य करण्यास आपल्याला कशाचा अडथळा होतो? आपल्या वासनांचा! आणि सर्व वासनांमध्ये अत्यंत सामर्थ्यवान, अत्यंत दुष्ट आणि चिवट असते ती लैंगिक वासना! वैषयिक प्रेम! म्हणून वासनांना काबूत ठेवलं, विशेषत: सर्वांत प्रभावी अशा वैषयिक प्रेमाला जर संयमात राखलं, तर सर्व धर्मतत्त्वांचं पूर्णत्वानं आचरण घडेल, मानवजात एकत्र येईल, मानवी जीवनाचं ध्येय गाठलं जाईल आणि जगण्यासारखं काहीही उरणार नाही. मानवजात जोवर अस्तित्वात आहे तोवर ती ध्येयानं झपाटलेली असते. पण जास्तीत जास्त पिल्लावळ निर्माण करण्याचं डुकरांचं आणि उंदरांचं ध्येय मात्र ती खचितच बाळगत नाही. लैंगिक गोष्टींमधून जास्तीत जास्त सुरेख सुख मिळवण्याचं माकडांचं आणि पॅरिसनिवासींचं ध्येयही मानवजात बाळगत नाही. संयमन आणि विशुद्धता यांच्यामार्फत साध्य करण्याच्या चांगुलपणाचं ते ध्येय आहे. मानवाचं हे नेहमीच ध्येय होतं व त्याच्या पूर्तीसाठी तो नेहमी प्रयत्नशील राहील. पण त्यातून काय निष्पन्न होतं पहा.

"त्यातून हे निष्पन्न होतं: वैषयिक प्रेम ही सुरक्षा झडप आहे असं भासतं. सध्याच्या पिढीनं मानवजातीचं ध्येय साध्य केलेलं नाही आणि त्याचं कारण केवळ एक आहे—वासना! त्यातल्या त्यात सर्वांत प्रभावी, लैंगिक वासना! लैंगिक

वासना अस्तित्वात आहे, ती नव्या पिढीला निर्माण करतेय आणि नव्या पिढीला मानवजातीचं ध्येय साध्य करण्याची संधी मिळतेय. पण नवी पिढीही हे ध्येय साध्य करीत नाही आणि पुढच्या पिढीला, त्यापुढच्या पिढीला, त्यापुढच्या पुढल्या पिढीला संधी दिली जाते. ध्येय साध्य होईपर्यंत, धर्मतत्त्वांची संपूर्ण अंमलबजावणी होईपर्यंत, अखिल मानवजात एकवटेपर्यंत ही संधी दिली जाणार. दुसरा उपायच काय? अशी कल्पना करू या की, विशिष्ट ध्येयपूर्तीसाठी देवानं माणसांना निर्माण केलं. पण त्यानं त्यांना एक तर मर्त्य आणि लैंगिक भावनाविहीन बनवलं, किंवा अमर बनवलं. जर त्यांना मर्त्य आणि लैंगिक भावनाविहीन बनवलं असलं तर निष्पत्ती काय? आपलं ध्येय साध्य न करता ते जगतील आणि नंतर मरतील. म्हणजे ध्येयसिद्धीसाठी देवाला पुन्हा नवी माणसं निर्माण केली पाहिजेत. जर त्यानं माणसांना अजरामर बनवलं तर शक्य आहे की, हजारो वर्षांनंतर ती माणसं आपलं ध्येय साध्य करतील (तरीसुद्धा त्याच त्या माणसांनी आपल्या चुकांची दुरुस्ती करणं फार फार अवघड आहे. त्यापेक्षा, आपल्या पूर्वजांच्या चुकांची दुरुस्ती करून परिपूर्णतेकडं जाणं नव्या पिढीला जास्त सोपं जातं). पण नंतर ह्या अमर माणसांचा उपयोग काय? त्यांचं करायचं काय? तेव्हा सध्या गोष्टी जशा आहेत तशाच असणं अधिक चांगलं. कदाचित ह्याला तुमचा आक्षेप आहे? उत्क्रांती तत्त्वाचे तुम्ही पुरस्कर्ते आहात? पण निष्पत्ती एकच. इतर प्राण्यांविरोधी संघर्षात टिकून राहण्यासाठी प्राणीजीवनाच्या सर्वोच्च प्रकारानं – माणसांनी – मधमाशांच्या झुंडीसारखं एकवटलं पाहिजे. अमर्याद पुनरुत्पादनात त्यांनी गुंतून जाऊ

नये. मधमाशांप्रमाणं काही लैंगिक भावनाविहीन व्यक्ती निर्माण कराव्या. आपल्या समाजात केवळ लैंगिक व्यवहारात गुंतण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारी माणसं आहेत. त्याऐवजी विशुद्ध जीवनाची महत्त्वाकांक्षा असलेली माणसं तयार करावीत." क्षणभर तो थांबला. "मानवी वंशाची अखेर? पण कुणाचे कसलेही विचार असले तरी ह्या प्रश्नाच्या अपरिहार्यतेवर शंका घेणं शक्य आहे का? मृत्यूइतकीच ती निश्चित आहे. सर्व पवित्र शिकवणींमधून भाकित केलंय की, जगाची अखेर होणार! आणि सर्व शास्त्रशुद्ध शिकवणी-सुद्धा तेच सांगतात. मग नैतिक शिकवणींनी तीच अखेर दाखवली तर त्यात आश्चर्य काय?"

ह्यानंतर खूप वेळपर्यंत तो गप्प राहिला. तो आणखी चहा प्यायला, त्याने सिगारेट ओढून संपविली. मग थैलीमधून त्याने नव्या सिगारेटींचा साठा बाहेर काढला आणि आपल्या जुन्या, डागाळलेल्या सिगारेट-केसमध्ये त्या सिगारेटी भरल्या.

"मला तुमचा विचार समजला," मी म्हणालो. "अमेरिकेतल्या शेकर ह्या ब्रह्मचारी पंथाच्या अनुयायांच्या अशाच कल्पना आहेत."

"त्यांचे विचार अगदी बरोबर आहेत," तो म्हणाला. "कोणत्याही प्रकारात सादर केलेली लैंगिक वासना ही वाईट आहे, भयानक वाईट आहे. तिच्या विरोधी सामना केला पाहिजे. आपल्यात तिला उत्तेजन देतात ते चूक आहे. ज्यानं कुणी स्त्रीकडं वासनामय नजरेनं पाहिलं त्यानं आधीच तिच्याशी व्यभिचार केल्यासारखा आहे, हे बायबलमधले शब्द केवळ इतर पुरुषांच्या पत्नींना लागू पडतात असं नाही, तर प्रथमतः आपल्या स्वतःच्या पत्नींनाही लागू पडतात."

## १२

"आपल्या जगात प्रत्येक गोष्ट अगदी उलट आहे. जर एखादा माणूस अविवाहित असताना संयम पाळीत असला तर ज्या क्षणी तो लग्न करतो त्या क्षणापासून संयमनाची जरूरी नाही अशी त्याची समजून होते. खरं म्हणजे विवाह-समारंभानंतर केलेल्या त्या सफरी, आपल्या पालकांच्या संमतीनं तरुण मंडळींनी भोगलेला तो एकांतवास, म्हणजे दुसरं तिसरं काही नव्हे तर स्वैराचाराला मिळालेली मुभा होय. पण नैतिक नियमांचं उल्लंघन केलं तर ते सुद्धा आपली स्वतःची शिक्षा देतात. आमच्या मधुचंद्राला सुटीचं रूप देण्याचा मी खूप प्रयत्न केला. पण अगदी आरंभापासून तो सगळा मामला लाजिरवाणा, किळसवाणा आणि कंटाळवाणा ठरला. लौकरच त्याला अधिक त्रासदायक स्वरूप प्राप्त झालं. फार लौकर! तिसऱ्या अथवा चौथ्या दिवशी माझी पत्नी दुःखी झालेली मला आढळली. मी तिला कारण विचारलं आणि तिला लाड करून हवे असतील अशा विचारानं कुरवाळू लागलो. पण तिनं माझा हात झिडकारला आणि रडायला सुरुवात केली. का? कारण ती मला सांगू शकेना. पण ती दुःखी होती, केविलवाणी होती. आमचे संबंध किती किळसवाणे होते हे कदाचित तिच्या ताणलेल्या मनःस्थितीनं तिला सांगितलं असावं, पण आपल्या विचारांना ती व्यक्त करू शकत नव्हती. मी फार आग्रह केला तेव्हा आपल्याला आईची आठवण येतेय, असं काहीसं ती पुटपुटली. ते खरं कारण नव्हतं असं मला जाणवलं. तिनं आपल्या आईविषयी जे सांगितलं त्याकडं दुर्लक्ष करून मी तिची मनधरणी करू लागलो. ती केवळ

दुःखी बनली होती आणि आईचं तिनं निमित्त सांगितलं हे मला समजलं नाही. पण तिच्या आईच्या कारणाकडं दुर्लक्ष करून मी तिच्यावर अविश्वास दाखविला आणि तिचा अपमान केला असा समज तिनं करून घेतला. मी तिच्यावर प्रेम करीत नाही अशी आपली खात्री पटल्याचं ती म्हणाली. मी तिच्यावर लहरीपणाचा आरोप केला. अचानक तिची मुद्रा पालटली. दुःखाच्या जागी चीड उमटली आणि अत्यंत बोचऱ्या शब्दांमध्ये ती माझ्यावर स्वार्थीपणाचे आणि क्रौर्याचे आरोप करू लागली. मी तिच्याकडं पाहिलं. तिच्या संपूर्ण चेहऱ्यावर आत्यंतिक थंडपणा आणि शत्रुत्व उमटलं होतं. माझ्याबद्दलचा तिरस्कार काठोकाठ भरलेला होता. मला त्या गोष्टीचा किती धक्का बसला होता ते आठवतं. 'हे कसं काय?' मी मनाशी म्हटलं. 'प्रेम हे आत्म्याचे मीलन. पण ह्या ऐवजी हे? अशक्य! तिचा केवळ स्वतःवरचा ताबा सुटलाय!' मी तिला शांत करण्याचा प्रयत्न केला. पण एका थंडगार, दाहक वैरभावनेच्या अभेद्य भिंतीशी मी टक्कर देतोय याची जाणीव होताच नकळतपणं माझ्या रागाचा भडका उडाला आणि आम्ही एकमेकांना अनेक वाईट दूषणं दिली. त्या पहिल्या भांडणाचा माझ्यावर फार भयानक परिणाम घडला. मी त्याला भांडण म्हणतो, पण खरं म्हणजे ते भांडण नव्हतं. आम्हा दोघांमध्ये किती प्रचंड दरी होती त्याचं ते केवळ दर्शन होतं. आमची इच्छा पूर्ण होताच आमचं प्रेम संपलं होतं आणि आता आम्ही एकमेकांसमोर आमच्या खऱ्या नात्यात उभे होतो. आम्ही दोघं एकमेकांना पूर्णतया परके होतो. एकमेकांपासून जास्तीत जास्त समाधान ओरबाडून घेण्याची इच्छा धरलेल्या दोन पूर्णतया स्वार्थी व्यक्ती होतो.

"जे काही घडलं होतं त्याला मी भांडण म्हटलं होतं, पण ते भांडण नव्हतं. आमच्या इंद्रियगम्य इच्छा संपल्यानंतर आमच्यामधील खरं नातं त्या घटनेनं उघडकीला आणलं होतं. थंडचा वैराचा हा दृष्टिकोन म्हणजे आमच्यामधील सामान्य नातं होतं हे मला उमगलं नाही आणि हे मला न उमगण्याचं कारण म्हणजे वैषयिक लालसेच्या नव्या लाटेमागं, प्रेमात पडण्याच्या नव्या ऊर्मीमुळं, हा वैरभाव दृष्टिआड झाला होता.

"मला वाटलं की, आमचं भांडण झालं होतं आणि आमच्यात परत समझोता झाला होता. असं पुन्हा कधीही आम्ही वागणार नाही अशी माझी समजूत झाली होती. पण मधुचंद्राच्या ह्या पहिल्याच महिन्यात आम्ही परत एकदा अतिरेक होण्याच्या कालखंडात जाऊन पोहोचलो. आम्हाला एकमेकांची गरज उरली नव्हती आणि त्यातून दुसरं भांडण उद्भवलं. हे दुसरं भांडण पहिल्यापेक्षा जास्त पीडादायी होतं असं मला आढळलं. 'म्हणजे आमचं पहिलं भांडण योगायोग नव्हते,' मी मनाशी म्हटलं; 'तसं घडणं केवळ अपेक्षितच होतं आणि त्याची नक्की पुनरावृत्ती होणार होती.' दुसऱ्या भांडणाचा मला विशेष धक्का बसला, कारण अत्यंत क्षुल्लक गोष्टीतून ते उद्भवलं. ती काहीतरी पैशाची बाब होती. मी कधीही हात राखून खर्च करीत नव्हतो आणि पैशाबाबतीत माझ्या बायकोचा कदाचित मी कधीही हेवा केला नसता. मला एवढंच आठवतं की, माझ्या बोलण्याचा काही तरी विपर्यास करून तिनं त्यातून असा अर्थ काढला होता की, पैशामुळं माझा तिच्यावर वरचष्मा झाला होता आणि माझे पैसे खर्च करण्याचा केवळ मलाच तेवढा अधिकार होता, वगैरे वगैरे. आम्हा दोघांनाही शोभणार नाही असं तत्सम मूर्खपणाचं आणखी

ती बरंच काही बोलली. मी रागावलो आणि तिला अक्कल नाही असं म्हटलं. तिनं त्यावर प्रत्युत्तर केलं आणि पुन्हा आमचं भांडण जुंपलं. तिच्या शब्दांमधून, तिच्या मुद्रेवरील आणि डोळ्यांमधील भावावरून मला पुन्हा एकदा त्या थंड, क्रूर शत्रुत्वभावनेचं दर्शन घडलं. ह्या दर्शनानंच मला पहिल्या वेळी धक्का बसला होता. माझ्या भावाशी, माझ्या मित्रांशी, एवढंच नव्हे तर माझ्या वडिलांशी भांडल्याचं मला आठवतं. पण इथं दिसणारी विशिष्ट विषारी दुष्टबुद्धी मी कधीही पाहिली नव्हती.

"काळाच्या ओघाबरोबर ह्या परस्पर तिटकाऱ्यावर परत एकदा प्रेमाच्या अवस्थेचा पडदा पडला. म्हणजे परत आम्ही विषयसुखाच्या लाटेवर आरूढ झालो. पुन्हा एकदा मी स्वतःची समजूत घातली की, ही दोन भांडणं म्हणजे चुका होत्या आणि त्या चुकांची दुरुस्ती करणं शक्य होतं. पण तिसरं आणि चौथं भांडण झालं. माझी पक्की खात्री पटली की ते अपघात नाहीत, त्यांना तेव्हा टाळणं शक्य नाही आणि भविष्यातही टाळणं शक्य नाही. ह्या वस्तुस्थितीनं मी हादरलो. केवळ माझंच लग्न असं अपयशी ठरलं होतं आणि इतर विवाह यशस्वी होते ह्या विचारापायी माझा आणखी छळवाद झाला. त्यावेळी मला कल्पना नव्हती की, प्रत्येकाच्या नशीबी हेच असतं आणि त्यावेळी मला वाटत होतं तसं प्रत्येकाला वाटतं की, त्याचं दुर्दैव हा अपवाद आहे. हे अपवादात्मक आणि लाजिरवाणं दुर्दैव केवळ इतरांपासूनच नव्हे, तर स्वतःपासूनही लपविण्याचा तो प्रयत्न करतो. त्या दुर्दैवाला मान्य करायलाच तो तयार होत नाही.

"आमचा विवाह झाला त्याच क्षणी आमच्यात वैराचा प्रादुर्भाव झाला आणि ते वैर पुढं जास्त जास्त स्वैरपणं पसरत

गेलं. पहिल्याच आठवड्यात मला अंतःकरणात जाणवलं की, मी **पकडला गेलो होतो**. अशा गोष्टीची मी मुळीच अपेक्षा केली नव्हती. विवाह म्हणजे परमसुख ठरण्याऐवजी आत्यंतिक दुर्दैव ठरलं होतं. पण इतर प्रत्येकाप्रमाणंच मीही ते मान्य करायला तयार नव्हतो (त्यातून काही घडलं नसतं तर मी ते कधीही मान्य केलं नसतं) आणि केवळ इतरांपासूनच नव्हे, तर माझ्यापासूनही मी ते लपवून ठेवलं. मी ह्यावर मागं फिरून विचार करतो तेव्हा माझं मलाच आश्चर्य वाटतं की, किती दीर्घ काळपर्यंत मी वास्तवाला समजून घेऊ शकलो नाही. आमच्या भांडणांची सुरुवात एवढ्या किरकोळ गोष्टींवरून व्हायची, की पुढं भांडणांची कारणंसुद्धा आम्हाला आठवत नसत. ह्या वस्तुस्थितीवरून मला सर्व काही स्पष्ट व्हायला हवं होतं. ज्या सतत वैरभावनेमध्ये आम्ही गुरफटलेले होतो त्या स्थितीला वजनदार हेतू जोडण्यास, सबळ कारणं पुरविण्यास, आमच्या तर्काला वावच मिळत नव्हता. पण त्याहीपेक्षा धक्कादायक होते आमच्या समेटामागील ढोंगी हेतू. काहीवेळा शब्द, खुलासे, अश्रूसुद्धा! पण एरवी तो समेट किती किळसवाणा असायचा! एकमेकांना अत्यंत क्रूर शब्दांनी बोचकारल्यानंतर आम्ही चोरटे कटाक्ष टाकायला आरंभ करीत असू, स्मितहास्यं करीत असू, चुंबनं-आलिंगनं घेत असू. शीः! किती नीचपणा! ह्या सगळ्यामधील अधमपणा मला कसा काय दिसला नाही?"

## १३

दोन प्रवासी आत आले आणि डब्याच्या अगदी दुसऱ्या टोकाशी बसले. ते आपापल्या जागी स्थिरस्थावर होईपर्यंत

तो बोलायचा थांबला. मग त्याने निवेदन पुढे सुरू केले. त्याची विचारमालिका क्षणभरही तुटली नव्हती.

"त्यातला सर्वात किळसवाणा भाग म्हणजे," तो बोलू लागला, "प्रेम हे आदर्श असावं, काहीतरी उच्च असावं असं अपेक्षिलं जातं. पण प्रत्यक्षात ते इतकं नीच आणि पाशवी असतं की, त्याबद्दल बोलणं किंवा विचार करणंसुद्धा अधमपणाचं आणि लाजिरवाणं ठरतं. निसर्गाने ते नीच आणि लाजिरवाणं केलं आहे. पण जे नीच आणि लाजिरवाणं आहे तेच सुंदर आणि उदात्त आहे असा लोक त्याऐवजी बहाणा करतात. माझ्या प्रेमाची पहिली लक्षणं काय होती? किंचितही न शरमता मी पाशवी अतिरेकात रमलो होतो, माझ्या अतिरेकाचा मला अभिमान वाटत होता व तसं वागताना तिच्या मनाच्या किंवा शरीराच्याही कल्याणाचा मी मुळीच विचार केला नव्हता. आमचं एकमेकांशी वाकडं का आलं होतं हे मला समजत नव्हतं. पण कारण स्पष्ट होतं: आमच्या मानवी स्वभावावर पाशवी स्वभावानं जे वर्चस्व स्थापलं होतं त्याचा निषेध आमच्या वैमनस्यात परिणत झाला होता.

"आम्हाला एकमेकांविषयी वाटणारा तिटकारा पाहून मी चकित झालो. पण दुसरं काही अपेक्षिणं शक्यच नव्हतं. गुन्ह्याला प्रवृत्त करून गुन्हा घडवल्याबद्दल उभय पक्षांना एकमेकांविषयी वाटणारा तो तिटकारा होता. तो गुन्हाच नव्हता काय? ती बिचारी पहिल्याच महिन्यात गरोदर राहिली आणि आमचे पाशवी संबंध चालूच राहिले! हे सर्व कहाणीशी संबंधित नाही असं वाटतं तुम्हाला? तुमची चूक होतेय. माझ्या पत्नीला मी कसं ठार मारलं ह्या कहाणीचा हा सर्व एक भाग आहे. खटल्याच्या वेळी त्यांनी मला विचारलं होतं

की, मी तिला कसं ठार मारलं आणि कशानं ठार मारलं. मूर्ख लेकाचे! त्यांना वाटलं की, ५ ऑक्टोबरला मी तिला सुऱ्यानं ठार मारलं. वस्तुतः त्यावेळी नव्हे तर त्याच्या खूप आधी मी तिला ठार मारलं होतं. आणि इतर सर्व ज्या पद्धतीनं ते कृत्य करतात त्याच पद्धतीनं मीही ते कृत्य केलं होतं. सर्वांच्याच पद्धतीनं!"

"काय म्हणायचंय तुम्हाला?" मी विचारले.

"ही एक आश्चर्यकारक बाब आहे. हे अगदी साधं आणि सोपं सत्य, जे सत्य डॉक्टरांना माहीत असलं पाहिजे आणि त्याचा त्यांनी प्रचार केला पाहिजे पण ज्याबद्दल ते गप्प राहतात, अशा ह्या सत्याला स्वीकारायला कुणीही तयार होत नाही. जनावरांप्रमाणंच स्त्री आणि पुरुष लैंगिक प्रेमात अडकले म्हणजे त्यातून स्त्री गरोदर राहते, बाळाची जोपासना करावी लागते आणि तशा शारीरिक अवस्थेत वैषयिक प्रेम मातेला आणि बाळाला असं दोघांनाही हानीकारक असतं. पुरुष आणि स्त्रिया यांची संख्या समान आहे. हे काय दर्शविते? मला वाटतं हे अगदी स्पष्ट आहे. प्राणीसुद्धा जो निष्कर्ष काढतात तो निष्कर्ष काढायला फार मोठ्या शहाणपणाची जरूरी नाही. संयमन केलं पाहिजे. पण ते घडत नाही. रक्तामध्ये श्वेत रक्तकण तरंगत असतात ह्यासारख्या निरुपयोगी शोधांमध्ये शास्त्रज्ञ आपली हुशारी वापरतात, पण ह्या गोष्टीचा शोध लावण्याइतपत शहाणपण मात्र त्यांच्यापाशी नाही. निदान ह्याचा त्यांनी उल्लेख केलेला मी तरी कधी ऐकला नाही.

"तर स्त्रीला फक्त दोनच मार्ग मोकळे राहतात. एक म्हणजे तात्काळ अगर टप्प्या-टप्प्यानं स्वतःच्या स्त्रीत्वाची, मातृत्वाची, काटछाट करून घेऊन नवऱ्याच्या इच्छेनुसार त्याची

वासनापूर्ती करीत रहायचं; आणि दुसरा मार्ग म्हणजे मार्ग नव्हे तर ते निसर्गनियमांचं रांगडं आणि थेट उल्लंघन आहे. आपल्या तथाकथित सर्व नेक कुटुंबांमध्ये हे घडतं. म्हणजे माता होऊ घातलेली अगर बाळाला अंगावर पाजणारी स्त्री ही त्याचवेळी आपल्या नवऱ्याची प्रेमिकाही असली पाहिजे. हा बोजा एकही जनावर सहन करणार नाही. आणि स्त्रीलाही तो सोसण्याची ताकद नसते. म्हणून आमच्या वर्गामधल्या स्त्रिया घाबरट आणि भ्रमिष्ट बनतात. शेतकरी वर्गामधल्या बायका क्लिकूशा* बनतात. निरीक्षण केलं तर असं दिसेल की, तरुणी, निष्पाप तरुण मुली कधीही क्लिकूशा नसतात. फक्त ज्या बायकांना नवरे आहेत त्याच तशा बनतात. आमच्या लोकांमध्ये असं घडतं. युरोपीयनांमध्येही असं घडतं. निसर्गाच्या नियमांचं उल्लंघन केल्यामुळं भ्रमिष्ट बनलेल्या बायकांनी सर्व इस्पितळं गच्च भरलेली आहेत. पण क्लिकूशा आणि शार्कोचे पेशंट म्हणजे पुरत्या वेड्या बनलेल्या बायका. तो टप्पा अद्याप न गाठलेल्या बायका जगात भरपूर आहेत.

"आपल्या गर्भात फलधारणा करण्याची आणि जन्माला घातलेल्या मुलाची जोपासना करण्याची स्त्रीची कृती केवढी धाक घालणारी आहे! आपल्या वारसांना, मानवजातीचं सातत्य राखणाऱ्यांना ती निर्माण करते. आणि ह्या पवित्र कृतीला कशानं खंड पडतो? नुसता विचारसुद्धा भयानक आहे. तरीही ते महिलांच्या विमोचनाची, त्यांच्या हक्कांची भाषा करतात. कत्तलीसाठी आपल्या बळींना पुष्ट करणारे नरभक्षक

---

*भांडकुदळ, भ्रमिष्ट शेतकरी बायकांना मिळालेले संबोधन—अनु.

ज्याप्रमाणं त्या बळींच्या हक्कांची आणि स्वातंत्र्याची खोटी काळजी वाहतात, तोच प्रकार महिलांबाबत घडतो."

त्याचे विचार मला नवे आणि धक्कादायी वाटले.

"पण काय केलं पाहिजे?" मी विचारले. "तुम्ही जे म्हणता ते खरं असेल तर पुरुष आपल्या पत्नीशी दोन वर्षातून एकदाच संग करू शकेल. पण पुरुष–"

"पण पुरुष त्याशिवाय जगू शकत नाहीत," तो मध्येच म्हणाला. "पुन्हा एकदा शास्त्राच्या मान्यवर पाद्रचांनी प्रत्येकाला हे पटवून दिलंय. पुरुषांना बायका अत्यंत आवश्यक आहेत असा दावा करणाऱ्या ह्या पंडितांना जर बायकांची कार्यं पार पाडायला भाग पाडलं तर ते काय म्हणतील हे ऐकायची माझी फार इच्छा आहे. वोदका, तंबाखू आणि अफू ह्या गोष्टी पुरुषाला आवश्यक आहेत असं त्याच्यावर ठसवा. तात्काळ त्या त्याच्या आवश्यक गरजा बनतील. जणू काही देवानं सगळ्या गोष्टी चुकीच्या निर्माण केल्या, कारण आवश्यक काय होतं ते त्याला माहीत नव्हतं आणि ह्या पंडितांचा त्यानं सल्ला घेतला नव्हता. गोष्टी नीट सांधलेल्या नसतात. आपली वासना पूर्ण केल्याशिवाय जगणं शक्य नाही असं पुरुषांनी ठरविलं, पण त्यांच्या वासनापूर्तीमध्ये बालजन्माचा आणि संगोपनाचा अडथळा आला. काय करायचं? पंडितांना आवाहन करा. ते सर्व काही व्यवस्था करतील. आणि ते करतात. ह्या डॉक्टरांना आणि त्यांच्या खोटेपणाला केव्हा उघडकीला आणणार? ती वेळ येऊन ठेपलीय! ह्यापायी लोकांना वेड लागण्याचा आणि त्यांनी आत्महत्या करण्याचा टप्पा येऊन पोहोचलाय! दुसरं काय असू शकेल? संतती ही आपली जातीची परंपरा पुढं चालविण्यासाठी असते ह्याची प्राण्यांना

जाणीव असावी, म्हणून ते ह्या बाबतीतील नियम पाळतात. फक्त माणसाला ते नियम माहीत नाहीत आणि त्यांना जाणून घेण्याची त्याची इच्छा नाही. जास्तीत जास्त मौज लुटणं एवढंच तो जाणतो. आणि तो कोण आहे? माणूस! विश्वाचा राजा! जरा विचार करा—जेव्हा संतती निर्माण करणं शक्य असतं तेव्हाच प्राणी समागम करतात. पण विश्वाचा हा गलिच्छ राजा जेव्हा शक्य होईल तेव्हा आणि केवळ सुखासाठी समागम करतो. एवढंच नव्हे तर अत्यंत उदात्त भावनेशी-प्रेमाशी-तो ह्या समागमक्रियेचे साधर्म्य दाखविण्याचा प्रयत्न करतो. आणि ह्या प्रेमाच्या नांवाखाली, म्हणजे ह्या नीचपणापायी. अर्ध्या मानवजातीचा तो बळी देतो. स्वतःच्या सुखासाठी तो स्त्रीला आपली वैरीण बनवितो. वस्तुतः मानवजातीला भलेपणाचं आणि सत्याचं आकलन घडविण्यात स्त्री ही पुरुषाची मदत करणारी साथीदार असली पाहिजे. मला हे सांगा: मानवजातीला पुढं जायला कोण अडवतं? स्त्री. आणि ती अशी का बनलीय? केवळ ह्याच कारणापायी. होय, होय," सिगारेट चाचपताना तो हे शब्द वारंवार बोलत राहिला. मग त्याने धूम्रपान सुरू केले. स्वतःचा तोल सावरण्याचा तो प्रयत्न करीत होता हे उघड होते.

## १४

"तर अशा तऱ्हेचं पाशवी जीवन मी जगत होतो," त्याच स्वरात तो बोलत राहिला. "त्यातला सर्वात वाईट भाग म्हणजे तसं आयुष्य जगताना मी अशी कल्पना करून घेतली होती की, ज्याअर्थी इतर स्त्रियांच्या मोहाला मी बळी पडत

नव्हतो आणि माझ्या पत्नीशी मी एकनिष्ठ होतो, त्याअर्थी मी नीतीतत्त्व पाळणारा माणूस होतो, निर्दोष माणूस होतो आणि जर आमचं भांडण झालं तर तो दोष तिचा किंवा तिच्या स्वभावाचा होता.

"पण तिचा दोष नव्हता. इतर स्त्रियांपेक्षा, निदान बहुसंख्य स्त्रियांपेक्षा, ती काही वेगळी नव्हती. आपल्या समाजात, खास हक्क असलेल्या वर्गांमध्ये, ज्या रीतीनं महिलांना वाढवलं जातं, जी एकमेव रीत त्यांच्या संवर्धनासाठी स्वाभाविक मानली जाते, त्याच रीतीनं ती लहानाची मोठी झाली होती. महिलांच्या आधुनिक शिक्षणासंबंधी आपण खूप चर्चा ऐकतो. निव्वळ पोकळ शब्द. जोपर्यंत महिलांकडं पाहण्याचा आपला दृष्टिकोन पूर्वीचाच आहे (आपण जो भासवतो तो नव्हे), तोपर्यंत महिलांचं शिक्षण जे होतं तेच असावं.

"महिलांचं शिक्षण हे नेहमीच पुरुषांच्या त्यांच्याविषयीच्या दृष्टिकोनाशी सुसंगत राहील. पुरुष स्त्रियांकडं कशा दृष्टीनं पाहतात हे आपणा सर्वांना ठाऊक आहे. «Wein, Weiber, und Gesang»*—असं कवी गातात. प्रेमगीतं आणि नग्न व्हीनस, फ्रीन यांचे उदय व्हायला आरंभ झाल्यापासूनचं संपूर्ण काव्यशास्त्र, चित्रकला आणि शिल्पकला पहा. सर्वत्र स्त्रीला एक उपभोगाचं साधन म्हणून पाहिलं जातं. दरबारातील नृत्यसमारंभांपासून ते त्रूब्नाया चौकापर्यंत अगर ग्राचेवका रस्त्यापर्यंत. त्यातही सैतानी धूर्तता पहा. ती केवळ सुखाची आणि उपभोगाची, वस्तू असती, तर आपण तिला तसंच

---

*'मदिरा, मदिराक्षी आणि गाणी'

मुखाची आणि उपभोगाची वस्तू म्हणून स्वीकारलं असतं. स्त्री म्हणजे फक्त एक गोड घास आहे असं मानलं असतं. सर्वप्रथम सरदारांनी घोषित केलं की, स्त्री ही त्यांच्यापेक्षा उच्च दर्जाची असून तिची पूजा केली पाहिजे (त्यांनी तिची पूजा केली आणि तरीही तिला उपभोग्यवस्तू म्हणून पाहिलं). स्त्रीचा आदर करावा असा आजचे पुरुष पुरस्कार करतात. काही पुरुष आपल्या खुर्च्या तिला देतात, तिचा हातरुमाल उचलून देतात. शासकीय, कार्यकारी पद भूषविण्याचा तिला अधिकार आहे असं दुसरे काही पुरुष मान्य करतात. पण एका बाजूनं ते असा पुरस्कार करीत असले तरी दुसऱ्या बाजूनं त्यांचा तिच्याविषयीचा दृष्टिकोन मात्र तोच राहतो. ती उपभोगाचं एक साधन आहे. तिचा देह सुख देण्याचं साधन आहे. आणि याची तिला जाणीव आहे. गुलामगिरीचा हा एक प्रकार आहे.

"गुलामगिरी म्हणजे अशी एक अवस्था आहे जिच्यात काही लोक इतरांवर लादलेल्या बळजबरीच्या श्रमाची फळं चाखतात. इतरांवर लादलेल्या बळजबरीच्या श्रमाची फळं चाखणं पाप आहे किंवा लज्जास्पद आहे असं मानून लोक जेव्हा त्या फळांचा उपभोग घ्यायला नकार देतील, तेव्हाच गुलामगिरी नष्ट करणं शक्य आहे. पण प्रत्यक्षात असं घडतं की, गुलामांची विक्री करायला बंदी करून ते गुलामगिरीचे बाह्य प्रकार तेवढे बदलतात आणि कल्पना करतात (आणि स्वतःची खात्रीही पटवून घेतात) की गुलामगिरी नष्ट झाली आहे. पण इतरांच्या श्रमाची फळं चाखायची लोकांची इच्छा कायमच राहते, त्यांना तो आपला हक्क वाटतो आणि तसं करणं न्याय्य आहे असं त्यांना वाटत राहतं. त्यामुळं गुलाम-

गिरीचं अस्तित्व पुढं चालू राहतं. मात्र तिकडं लोक लक्ष देत नाहीत आणि तसं लक्ष देण्याची त्यांची इच्छा नसते. जोपर्यंत हे सर्व योग्य मानलं जातंय तोपर्यंत इतरांपेक्षा अधिक समार्थ्यवान आणि अधिक धूर्त लोक गुलामगिरीला अस्तित्वात ठेवतील.

"महिलांच्या विमोचनाची तीच अवस्था आहे. स्त्रीला आपल्या सुखासाठी वापरणं योग्य आणि इष्ट आहे, असं पुरुषानं मानण्यात स्त्रीची गुलामगिरी सामावली आहे. आणि मग ते तिच्या विमोचनासाठी सज्ज होतात. तिला ते पुरुषा-प्रमाणं समान हक्क देतात, पण तरीही तिला उपभोग्यवस्तू मानीत राहतात. लहानपणी तिला याच उद्देशानं प्रशिक्षित करतात, सार्वजनिक मताच्या साहाय्यानं शिकवितात. ती तशीच नीच स्तरावरची, दुराचारी गुलाम राहते आणि पुरुष तसेच दुराचारी गुलाम-मालक राहतात.

"महाविद्यालयांमध्ये आणि न्यायालयांमध्ये स्त्रीला ते मुक्त करतात, पण तरीही तिला उपभोग्यवस्तू मानीत राहतात. जोपर्यंत तिला स्वतःकडं अशा रीतीनं पहायला शिकविलं जातं (जसं आपण शिकवितो) तोपर्यंत ती तशीच खालच्या स्तरा-वरची राहणार. एक तर नामर्द डॉक्टरांच्या मदतीनं ती स्वतःला गरोदर होऊ देणार नाही; म्हणजे ती वेश्या बनेल. जनावरांच्या नव्हे तर वस्तूंच्या पातळीला खाली उतरील. किंवा बव्हंश बाबतीत जे घडतं तेच तिचं होईल. म्हणजे दुःखी, भ्रमिष्ट, मानसिक समतोल ढळलेली, आत्मिक विकासाला असमर्थ ठरलेली.

"शाळा आणि महाविद्यालयं ह्या बाबतीत काहीही करू शकत नाहीत. ही गोष्ट तेव्हाच बदलणं शक्य आहे जेव्हा

पुरुषाचा स्त्रीकडं पाहण्याचा दृष्टिकोन बदलेल आणि स्त्रीचा स्वतःकडं पाहण्याचा दृष्टिकोन बदलेल. कौमार्यावस्था ही महिलांना सध्या लाजिरवाणी आणि शरमेची वाटते. पण जेव्हा ह्या अवस्थेला त्या सर्वोच्च मानाची मानतील, तेव्हा ही परिस्थिती बदलेल. तोपर्यंत प्रत्येक मुलीची एकच महत्त्वाकांक्षा राहील—मग तिचं शिक्षण कितीही झालेलं असो—जास्तीत जास्त पुरुषांना स्वतःकडं आकर्षित करून घ्यायचं! म्हणजे त्यांच्यामधून निवड करायची तिला संधी लाभेल!

"तिला गणित येतं किंवा हार्प वाद्य वाजविता येतं म्हणून परिस्थितीत मुळीच बदल पडणार नाही. स्त्री जेव्हा पुरुषाला बंदिवान करते तेव्हा ती आनंदित होते. तिनं आपलं सर्वोच्च ध्येय साध्य केलेलं असतं. पुरुषांना पकडणं हेच तिचं आयुष्यामधलं मुख्य उद्दिष्ट. पूर्वी असंच होतं आणि भविष्यातही असंच राहील. अविवाहित मुलींना हे जेवढं लागू पडतं तेवढंच विवाहित स्त्रियांना हे लागू आहे. स्वतःला निवडीचा वाव मिळावा म्हणून अविवाहित मुलींना हे करता आलं पाहिजे, तर आपल्या नवऱ्यांवर हुकूमत गाजविता यावी म्हणून विवाहित स्त्रियांनी हे केलं पाहिजे.

"ह्या दिशेनं जाण्याला त्यांना प्रतिबंध होतो किंवा तात्पुरतं थोपविलं जातं एका गोष्टीमुळं—बाळंतपण. आणि जेव्हा ती आपल्या बाळांचं संगोपन स्वतःच करते तेव्हाच फक्त ती राक्षशीण नसते. पण तिथं डॉक्टर अधिक्षेप करतात.

"माझ्या पत्नीला स्वतःच्या मुलांचं संगोपन करण्याची इच्छा होती आणि तिनं पाच मुलांचं संगोपन केलं. पण तिच्या पहिल्या मुलाच्या जन्मानंतर तिची प्रकृती चांगली नव्हती.

तिला लाजिरवाणं विवस्त्र करून तिचं सर्वांग चाचपून पाहणारे डॉक्टर (ज्याबद्दल मला त्यांचे आभार मानून शिवाय त्यांना फी द्यावी लागते) – ह्या सन्मान्य डॉक्टरांना आढळलं की, तिनं आपल्या पहिल्या बाळाचं संगोपन करू नये. म्हणजे तिच्या छचोरपणातून सुटका होण्याच्या एकमेव साधनाला तिच्यापासून वंचित करण्यात आलं. बाळासाठी एक ओली दाई ठेवण्यात आली. याचा अर्थ एका तिऱ्हाईत बाईच्या गरीबीचा आणि अज्ञानाचा आम्ही फायदा घेतला. तिला तिच्या स्वतःच्या बाळापासून आम्ही दूर केलं आणि आमच्या बाळासाठी तिला वापरलं. त्यासाठी आम्ही तिच्या डोक्यावर वेणीसकट कडक खळीची टोपी घातली. पण हे विषयांतर झालं. मुद्दा असा की जेव्हा माझी पत्नी गरोदरपणातून मुक्त झाली आणि बाळाचं संगोपन करण्याची तिच्यावरची जबाबदारीही नाहीशी झाली, तेव्हा तिच्यामध्ये सुप्त अवस्थेत राहिलेला नखरा विशेष जोरानं वर उफाळून आला. आणि तिच्या नखऱ्याच्या प्रमाणात माझा मत्सरही वाढत गेला. माझ्या वैवाहिक जीवनाच्या अगदी पहिल्या दिवसापासून ह्या मत्सरानं मला क्षणाची शांतता लाभू दिली नव्हती. मी जसा माझ्या पत्नीबरोबर रहात होतो तसे जे नवरे आपल्या बायकांबरोबर राहतात – म्हणजे अनीतीनं – त्या सर्वांना ह्या मत्सराचा छळवाद अपरिहार्यपणं सोसावा लागतो."

## १५

"माझ्या संपूर्ण वैवाहिक जीवनात एक मिनिटभरही मी मत्सराच्या वेदनांपासून मुक्त नव्हतो. पण काही कालखंड

अतीव यातनांचे होते. त्यांपैकी एक कालखंड आमच्या पहिल्या अपत्याच्या जन्मानंतरचा होता. त्यावेळी डॉक्टरांनी माझ्या पत्नीला बाळाला अंगावर पाजायला मनाई केली होती. ह्यावेळी मी विशेष मत्सरी बनलो होतो. पहिली गोष्ट म्हणजे कुठल्याही मातेला कोणत्याही विशिष्ट चांगल्या उद्देशाविना निसर्गक्रमात बाधा आणल्यानंतर जी अस्वस्थता येते ती मन:स्थिती माझी पत्नी अनुभवीत होती. आणि दुसरी गोष्ट म्हणजे माता म्हणून असलेल्या नैतिक जबाबदाऱ्या तिने ज्या सहजतेनं झटकून दिलेल्या मी पाहिल्या होत्या, त्यावरून मी न्याय्यपणं (नकळतपणं) निष्कर्ष काढला होता की, तिच्या वैवाहिक जबाबदाऱ्यासुद्धा ती तितक्याच सहजपणं झुगारून देईल. विशेषत: तिची प्रकृती उत्तम होती आणि सन्मान्य डॉक्टरांच्या मनाईला न जुमानता तिनं आपल्या बाकीच्या अपत्यांचं संगोपन केलं होतं, त्याचे कोणतेही वाईट परिणाम घडलेले नव्हते."

"डॉक्टरांविषयी तुम्हाला ममत्व दिसत नाही," दरवेळी डॉक्टरांचा उल्लेख करताना त्याच्या नजरेत एक विशेष तिरस्काराची छटा उमटताना पाहून मी म्हटले.

"ते आवडण्याचा अगर न आवडण्याचा प्रश्न नाही. लक्षावधी लोकांचं जीवन जसं ते उध्वस्त करतात, तसंच त्यांनी माझं जीवन उध्वस्त केलं. मी कारणाला परिणामापासून अलग करू शकत नाही. वकील जसे अशीलांपासून पैसे उकळण्यास उत्सुक असतात, तसेच डॉक्टर आपल्या पेशंटांना पिळून काढण्यास अधीर असतात हे मला समजू शकतं. माझ्या उत्पन्नाचा अर्धा हिस्सा मी त्यांना आनंदानं दिला असता (खरी परिस्थिती जाणून घेणाऱ्या दुसऱ्या कुणीही हेच केलं असतं). मात्र एवढं केल्यानंतर त्यांना माझ्या कौटुंबिक

जीवनात ढवळाढवळ करण्यापासून मी अलिप्त ठेवू शकलो असतो तर! मी आकडेवारी गोळा केलेली नाही, पण मला अशी डझनावारी उदाहरणं ठाऊक आहेत (अशी असंख्य आहेत) जेव्हा माता मुलांना नऊ महिने उदरात पोसू शकणार नाही असं सांगून डॉक्टरांनी बाळाला गर्भातच ठार मारलं (जरी पुढं ती यशस्वीपणं अनेक मुलांना जन्म देऊ शकलीय), किंवा खुद्द मातेवर कसलीतरी शस्त्रक्रिया करून त्यांनी तिलाच ठार मारलंय. अशा मृत्यूंना कुणीही खून म्हणत नाही. ज्याप्रमाणं मध्ययुगात पाखंडी लोकांच्या कत्तलींना खून म्हणत नसत, कारण मानवी कल्याणासाठी तसं करण्यात येत होतं असं सांगण्यात येई. डॉक्टरांकडून घडणारे गुन्हे असंख्य आहेत. पण ह्या जगात भौतिकवादाचा नैतिक भ्रष्टाचार—विशेषतः स्त्रियांच्या माध्यमामार्फत—ते जेवढ्या प्रमाणात आणतात त्या तुलनेनं हे सर्व गुन्हे म्हणजे काहीच नव्हेत. शिवाय, जर आपण त्यांचा सल्ला मानायचा ठरवलं तर सर्वत्र आणि प्रत्येक बाबतीत आढळणाऱ्या संसर्गाचा धोका टाळण्यासाठी आपण एकमेकांना टाळून एकाकी राहण्याचे प्रयत्न करू; मानवी वंशाला एकत्र आणण्याचे प्रयत्न करण्याऐवजी! त्यांच्या शिकवणीनुसार, आपल्यापैकी प्रत्येकानं तोंडात कार्बोलिक ॲसिडच्या मिश्रणाची गुळणी धरून बसलं पाहिजे (जाता जाता सांगायचं तर ही पद्धत निःष्प्रभ असल्याचं अलिकडंच सिद्ध झालंय). पण तेसुद्धा काहीच नव्हे. मुख्य म्हणजे ते लोकांना भ्रष्ट करतात, विशेषतः बायकांना!

"आजकाल कुणी म्हणू शकत नाही, 'तुमचे मार्ग वाईट आहेत, तुम्ही त्यांना बदललं पाहिजे.' असं कुणीही स्वतःला अगर दुसऱ्याला म्हणू शकत नाही. जर तुमचे मार्ग वाईट

असतील तर त्याचं कारण तुमच्या मज्जासंस्थेच्या बिघाडात किंवा दुसऱ्या कशामध्ये तरी सामावलेलं असतं आणि त्यासाठी तुम्हाला डॉक्टरांकडं गेलं पाहिजे. ते तुम्हाला पस्तीस कोपेक किंमतीचं औषध लिहून देतील. ते औषध तुम्ही घेतलं पाहिजे. तुमची परिस्थिती जास्त बिघडते, तेव्हा तुम्ही आणखी डॉक्टरांकडं जायचं आणि आणखी औषध घ्यायचं झकास व्यवहार!

"पण मुद्दा तो नव्हे. मला एवढंच सांगायचं होतं की, तिच्या इतर मुलांचं संगोपन तिनं छान केलं. तिची गरोदरपणं आणि बालसंगोपनाचे कालखंड एवढ्याच गोष्टींनी मला मत्सराच्या यातनांपासून वाचविलं. जर ह्या गोष्टी नसत्या तर पुढं अनुषंगानं जे काही घडलं ते खूप आधीच घडलं असतं. मुलांनी तिला आणि मला वाचविलं. आठ वर्षांत तिला पाच मुलं झाली. आणि त्या पाचही मुलांचं संगोपन तिनं स्वतःच केलं."

"आता तुमची मुलं कुठं आहेत?" मी विचारले.

"माझी मुलं?" घाबरल्या नजरेने त्याने विचारले.

"माफ करा. त्यांची आठवण करून दिल्यामुळं कदाचित तुम्हाला त्रास झाला का?"

"नाही. काही विशेष नाही. माझ्या मेहुण्यानं आणि त्याच्या पत्नीनं माझ्या मुलांना आपल्या ताब्यात घेतलंय. मुलांना माझ्यापाशी ठेवायला ते तयार नाहीत. माझी सर्व मालमत्ता मी त्यांना दिली, पण मुलांना माझ्यापाशी ठेवायला ते तयार नाहीत. मला वेडा मानतात. मी आत्ताच त्यांना भेटून आलो. मी त्यांच्याशी बोललो, पण मुलांना माझ्यापाशी ठेवायची त्यांची तयारी नाही. त्यांच्या पालकांपेक्षा त्या मुलांना

मी वेगळ्या पद्धतीनं वाढवीन आणि तो वेगळी असून चालणार नाहीत. छे! काय करणार? अर्थातच ते मुलांना माझ्याकडं सोपवणार नाहीत आणि माझ्यावर विश्वास ठेवणार नाहीत. शिवाय त्यांना वाढवायची ताकद माझ्यात आहे अशी माझी खात्री नाही. मी त्यांना वाढवू शकणार नाही अशी भीती वाटते. मी उध्वस्त माणूस आहे, भंगलेला आहे. पण एक गोष्ट माझ्यापाशी आहे. ज्ञान! मला अशा गोष्टींचं ज्ञान आहे ज्यांचं आकलन करून घ्यायला इतरांना खूप काळ शिकावं लागेल.

"माझी मुलं जिवंत आहेत आणि इतर प्रत्येकाप्रमाणं तीसुद्धा मोठेपणी रानटी बनतील. मी त्यांना पाहिलं–तीन वेळा. त्यांच्यासाठी मी काहीही करू शकत नाही. काहीही नाही! मी दक्षिणेला चाललोय. तिथं माझं एक छोटं घर आणि बगीचा आहे.

"खरंच, मला जे माहीत आहे ते जाणून घ्यायला इतरांना प्रदीर्घ काळ लागेल. सूर्यामध्ये आणि ताऱ्यांमध्ये किती लोखंड आणि इतर धातू सामावले आहेत ते शोधून काढायला आपल्याला फारसा अवधी लागणार नाही. पण आपल्या पाशवी-पणाला उघड करणाऱ्या गोष्टी शोधून काढणं–ते खूप कठीण आहे, खूपच...

"मला जे काही सांगायचंय ते तुम्ही निदान ऐकून घेत आहात. त्याबद्दल मी तुमचा कृतज्ञ आहे."

१६

"तुम्ही माझ्या मुलांचा उल्लेख केलात. परत एकदा सांगायचं तर मुलांकडं किती चुकीच्या दृष्टिकोनातून पाहिलं जातं! मुलं म्हणजे आनंद! मुलं म्हणजे देवाचा कृपाप्रसाद! धादांत खोटं!

एकेकाळी हे खरं असेल, पण आता नाही. मुलं म्हणजे छळवाद. दुसरं काहीही नाही. बहुतेक मातांना ह्याची संपूर्ण जाणीव आहे आणि बेसावध क्षणी त्या हे कबूलही करतात. विशेष हक्क लाभलेल्या वर्गातील कुणाही मातेला विचारा, तुम्हाला ती सांगेल की, मुलं आजारी पडतात आणि मरतात ह्या भीतीपायी तिला मुलं जन्मावीत असं वाटत नाही. आणि जर तिनं अपत्याला जन्म दिला तर त्याचा आपल्याला खूप लळा लागेल आणि त्यापायी यातना सोसाव्या लागतील ह्या भीतीनं त्याचा प्रतिपाळ ती स्वत: करू इच्छित नाही. बाळाच्या सुंदरपणामध्ये जो आनंद मिळतो, त्याच्या इवल्या इवल्या हातापायांमध्ये आणि देहामध्ये जो आनंद मिळतो, एकूण बाळामध्ये जो आनंद मिळतो त्याच्या कितीतरी पटींनी जास्त दुःख त्याच्या आजारांपायी अगर मृत्यूपायी सोसावं लागतं. अन् त्याहूनही जास्त दुःख बाळ आजारी पडेल अगर मरेल ह्या भीतीपायी सहन करावं लागतं. मुलं असण्याच्या फायद्यांचा आणि तोटयांचा विचार केला तर तोटेच नेहमी जास्त असतात, म्हणून मुलं नसणंच चांगलं! मुलांविषयीच्या प्रेमामधून आपल्या ह्या भावना निर्माण होतात असा समज करून बायका हे विधान सरळपणं, धीटपणं मांडतात. मुलांविषयीची प्रेमभावना प्रशंसनीय, चांगली असून तिचा त्यांना अभिमानही वाटतो. पण अशा रीतीनं विचार करणं म्हणजे प्रेमाला नकार आणि स्वार्थाचा पुरस्कार आहे हे त्यांच्या ध्यानात येत नाही. मुला-मध्ये त्यांना लाभणाऱ्या आनंदापेक्षा यातनाच जास्त भोगाव्या लागतात, म्हणून त्यांना मूल नको असतं. प्रिय व्यक्तीसाठी त्या स्वार्थत्याग करीत नाहीत, तर स्वत:साठी त्या प्रिय व्यक्ती होऊ शकणारीचा त्या त्याग करतात.

"हे प्रेम नसून हा धडधडीत स्वार्थीपणा आहे. पण ह्या स्वार्थीपणाबद्दल श्रीमंत मातांना दोषी धरणं कठीण आहे. उच्चभ्रू समाजात मुलांच्या आरोग्यापायी स्त्रियांना केवढी किंमत मोजावी लागते (पुन्हा एकदा डॉक्टरांमुळं) याची दखल घेतल्यास निषेधाचा एक शब्दही उच्चारणं शक्य नाही. आरंभीच्या काळात घरात असलेली तीन-चार मुलं जेव्हा माझ्या पत्नीच्या वेळेतील प्रत्येक मिनिट व्यापत होती आणि तिच्या ताकदीचा प्रत्येक औंस त्यांच्यापायी खर्ची पडत होता, तेव्हाचं तिचं जीवन आणि तिची मनःस्थिती आठवली म्हणजे आजही मला शहारा येतो. माझ्यासाठी तिच्यापाशी वेळच नव्हता. धोक्याच्या सतत धास्तीखाली आम्ही जगत होतो. धोक्यातून सुटका, परत धोका, त्या धोक्याला टाळण्याची शर्थ, पुन्हा धोक्यातून सुटका – जणू काही बुडणाऱ्या जहाजात आम्ही बसलो होतो. काही वेळा मला असं वाटायचं की हे वातावरण बुद्ध्याच निर्माण केलं जात होतं. माझ्यावर विजय स्थापित करण्यासाठी माझी बायको मुलांच्या कल्याणाचा खोटा बाऊ करते असं वाटायचं. तिच्या बाजूनं सर्व प्रश्नांची सोड-वणूक करण्याचं ते अगदी साधं, मोह घालणारं साधन होतं. काही वेळा मला भासायचं की, जे काही ती करीत होती आणि बोलत होती ते सर्व ढोंगीपणानं केलं आणि बोललं जात होतं. पण ती माझी चूक होती. ती खरोखरीच भयानक त्रासलेली होती. मुलांविषयीच्या, त्यांच्या प्रकृतींविषयीच्या, त्यांच्या आजारविषयीच्या चिंतांनी ती सतत ग्रासलेली होती. तिचा आणि माझाही छळवाद होत होता. छळवाद सोसल्याविना तिला जमतच नव्हतं. बहुतेक बायकांना आपल्या मुलांविषयी जी काळजी वाटते ती तिलाही वाटत होती. मुलांना खाऊ-

पिऊ घालणं, त्यांचं सांत्वन करणं, त्यांचं रक्षण करणं ह्या सर्व प्राणीसुलभ चिंता इतर स्त्रियांप्रमाणं तिलाही जाणवत होत्या. पण प्राणी ज्यापासून मुक्त असतात अशा दोन गोष्टी तिच्यात होत्या: तर्कशक्ती आणि कल्पनाशक्ती. आपल्या पिल्लाचं काय होईल ह्याची कोंबडी चिंता करीत नाही. ते बळी पडू शकेल अशा अनेक रोगांची यादी तिला माहीत नसते किंवा रोगाला आणि मरणाला प्रतिबंध करू शकणाऱ्या उपचारांची तिला माणसांप्रमाणं कल्पना नसते. तेव्हा कोंबडीच्या दृष्टीनं अपत्यं छळवाद नसतात. तिनं त्यांच्यासाठी जे केलं पाहिजे ते ती करते आणि आनंदानं करते. तिच्या दृष्टीनं अपत्यं म्हणजे आनंद. जर तिचं पिल्लू आजारी पडलं तर नक्की काय करायचं हे तिला माहीत असतं. त्याला ती खाऊ घालते आणि ऊब देते. आणि हे करताना आवश्यक ते सर्व आपण करतो आहोत असं तिला माहीत असतं. जर पिल्लू मेलं तर ते का मेलं आणि कुठं गेलं असे प्रश्न ती स्वतःला विचारीत नाही. थोडासा खुटखुट आवाज ती करते, मग तो प्रसंग विसरून जाते आणि पूर्वीप्रमाणंच जगू लागते. पण आपल्या दुर्दैवी महिलांना, विशेषतः माझ्या पत्नीला, हे एवढं पुरेसं नाही. मुलांचं शिक्षण आणि संवर्धन ह्या विषयांवर तिनं अत्यंत विविध आणि बदलणारे अगणित नियम ऐकले आणि वाचून काढले होते. बालरोग आणि त्यांच्यावरील उपचार यांबाबत तर बोलायलाच नको. मुलांना हे खाऊ घातलं पाहिजे आणि ते नाही; अमूक नव्हे तर तमूक, वगैरे वगैरे. मुलांना खाऊ काय घालावं, कपडे कोणते घालावे, न्हाऊ कसं घालावं, केव्हा झोपवावं, फिरायला केव्हा न्यावं, त्यांना हवा खायला केव्हा द्यावं, इ. इ. गोष्टींविषयी दर आठवड्याला माझी

बायको काही तरी नवीनच शोधून काढायची. जणू काही काल-परवाच मुलं जन्माला यायला सुरुवात झाली होती! जर एखादं मूल आजारी पडलं तर त्याला योग्य आहार दिला नव्हता, किंवा नीट आंघोळ घातली नव्हती अथवा योग्य वेळी आंघोळ घातली नव्हती, अशी कारणपरंपरा सुरू व्हायची. थोडक्यात म्हणजे आजाराचा दोष माझ्या बायकोला लागायचा, कारण तिनं जे करायला हवं होते ते तिनं केलं नव्हतं म्हणून!

"मुलं बरी असायची तेव्हाही परिस्थिती पुरेशी वाईट होती. पण जर ती आजारी पडली तर आयुष्याचा अगदी नरक बनायचा. रोग बरे करता येतात, शास्त्राची एक विशिष्ट शाखा त्या कामात गुंतलेली आहे आणि ह्या उपचारांना कसं अंमलात आणायचं ते माहीत असलेले विशिष्ट लोक— डॉक्टर—आहेत, हे गृहीत धरण्यात आलंय. सगळ्याच डॉक्टरांना हे ज्ञान नसलं तरी त्यांच्यामधल्या उत्तमांना ते आहे. तर आपलं मूल आजारी पडलं म्हणजे उपचार करण्याचं ज्ञान असलेल्या त्या सर्वोत्तम डॉक्टरला आपण शोधलं पाहिजे, तर मूल नंतर वाचविलं जाईल. पण जर तो विशिष्ट डॉक्टर आपण शोधू शकलो नाही, अथवा आपण जिथं राहतो तिथं तो रहात नसेल, तर मुलाचा निकाल लागला! अशा गोष्टीवर विश्वास ठेवणारी माझी पत्नी काही एकटी नव्हती. आमच्या स्तरामधल्या सर्वच बायकांचा तसा समज होता. दर पावलाला माझ्या पत्नीच्या कानांवर बातम्या यायच्या: 'येकातेरीना सेम्योनोवनानं दोन मुलं गमावली कारण तिनं योग्य वेळी इवान झखारीचना बोलावलं नाही.' 'मारीया इवानोवनाच्या मोठ्या मुलीला इवान झखारीचनी वाचविलं.' 'डॉक्टरांच्या सल्ल्या-

नुसार पेत्रोव कुटुंब वेगळ्या हॉटेलांमध्ये रहायला गेलं आणि मुलं बचावली. तसं त्यांनी केलं नसतं तर मुलं मेली असती.' 'अमूक अमूक एकाचं मूल अगदी किरकोळ होतं. डॉक्टरांच्या मल्ल्यानुसार ते दक्षिणेला रहायला गेले आणि मूल बचावलं.' कुणाही प्राण्याप्रमाणं तिला आपल्या मुलांच्या कल्याणाची काळजी होती आणि एखाद्या विशिष्ट बाबतीत उशीर होण्या-पूर्वी इवान झखारीच यांचं मत घेणं तिला आवश्यक भासत होतं. अशा परिस्थितीत ती सतत चिंताग्रस्त आणि त्रासलेली राहिली तर नवल काय? पण इवान झखारीच काय सांगतील ते कुणालाच माहीत नसे. त्यांना स्वत:ला तर मुळीच नाही. कारण त्यांना उत्तम जाणीव आहे की, त्यांना काहीही माहीत नाही आणि काहीही करणं शक्य नाही. ज्ञानी डॉक्टर म्हणून लोकांचा त्यांच्यावरचा विश्वास उडू नये एवढ्यासाठी ते अंदाजानं उपचार करीत. जर ती पूर्णत: प्राणी असती तर ह्या यातना तिला सोसाव्या लागल्या नसत्या. जर ती पूर्णत: मानव असती तर तिनं परमेश्वरावर विश्वास ठेवला असता आणि श्रद्धाळू लोकांप्रमाणं ती म्हणाली असती, तसाच तिनं विचार केला असता: 'देवानं दिलं, देवानं हिरावून नेलं. सर्व काही देवाच्या इच्छेनं होतं.' तिनं मानलं असतं की, सर्व माणसांचे जीवन-मृत्यू, तिच्या स्वत:च्या मुलांचेसुद्धा, माणसाच्या हाती नसून देवाच्या हाती होते. आपल्या मुलांच्या आजारपणाला आणि मृत्यूला आपण प्रतिबंध करू शकलो असतो ह्या विचाराचा मग तिला त्रास झाला नसता, तशा प्रतिबंधाचा तिनं प्रयत्नही केला नसता. पण तिचा दृष्टिकोन हा असा होता: तिच्या हाती अत्यंत दुबळे आणि नाजुक जीव सोपविलेले होते. ते जीव असंख्य वाईटांच्या भक्ष्यस्थानी पडले असते. ह्या जीवां-

विषयी तिला प्राणीसुलभ तीव्र प्रेम वाटतं. त्यांच्या सुरक्षिततेला ती जबाबदार आहे. पण काही थोड्या पंडितांच्या सल्ल्याविना आणि सेवेविना त्या जीवांच्या रक्षणाची साधनं लपवलेली होती. केवळ पैशांच्या प्रचंड रकमा देऊनच ती सल्ला आणि ती सेवा प्राप्त करणं शक्य आहे व त्याचीही नेहमी खात्री नाही.

"माझ्या पत्नीचं तिच्या मुलांबरोबरचं आयुष्य आणि पर्यायानं माझंही आयुष्य म्हणजे आनंद नसून एक छळवाद होता. दुसरं काय असणार? ती सतत मानसिक पीडेमध्ये असायची. एखाद्या मत्सरी घटनेनंतर अथवा सर्वसामान्य भांडणानंतर मला विश्रांतीची इच्छा व्हायची, काही वाचावं, चिंतन करावं असं वाटायचं. पण एखाद्या गोष्टीत मी रमतो न रमतो तोच बातमी यायची की, वास्याला उलटी झाली, किंवा मारीयाला शौचातून रक्त पडायला लागलंय, अथवा आंद्रेईला पुरळ उमटलाय! माझे सगळे बेत जमीनदोस्त व्हायचे. कुठं गेलं पाहिजे? कुठल्या डॉक्टरला आणलं पाहिजे? मुलाला इतरांपासून वेगळं कसं ठेवायचं? आणि मग—औषधं, थर्मामीटर, एनीमा, डॉक्टर... एक वेढा संपतो न संपतो तोच दुसरा चालू व्हायचा. सुरळीत, सु-नियंत्रित कौटुंबिक जीवन नांवाची गोष्टच अस्तित्वात नव्हती. त्याऐवजी, मी सांगितल्याप्रमाणं, खऱ्या आणि काल्पनिक धोक्यांमधून सुटका करून घेण्याच्या सतत प्रयत्नांमध्ये आम्ही गुंतलेले असू. बहुतेक कुटुंबांमध्ये हीच परिस्थिती असते. माझ्या कुटुंबाच्या बाबतीत हें विशेषच खरं होतं, कारण माझी बायको अत्यंत भोळसट होती आणि मुलांची तिला फार आवड होती.

"अशा रीतीनं मुलांच्या आगमनानं आमच्या जीवनात सुधारणा होण्याऐवजी वीष कालवलं गेलं. शिवाय, मुलं ही

भांडणाला एक नवीन कारण ठरली, ज्या क्षणी ती अवतरली त्याच क्षणी हे स्पष्ट झालं आणि जशी ती मोठी होऊ लागली तशी वारंवार भांडणाचं कारण ठरू लागली. ती केवळ भांडणाचा विषय नव्हती, तर संघर्षाचं साधनही होती. आम-च्या मुलांना घेऊन आम्ही एकमेकांशी भांडत असू. आम्हा प्रत्येकाचं एक आवडतं मूल होतं आणि त्या मुलाला आम्ही आमचं शस्त्र बनवीत असू. माझा सगळा रोख सर्वसाधारणपणं आमच्या सर्वात मोठ्या मुलाविरुद्ध—वास्याविरुद्ध—असे. तिचा लिझाविरुद्ध असे. मुलं जशी वाढली आणि त्यांचे स्वभाव आकाराला आले, तशी ती संभाव्य दोस्त ठरली. आमच्यापैकी प्रत्येकजण त्यांना स्वतःच्या पक्षात खेचायचा प्रयत्न करू लागला. बिचारी मुलं धास्तावून जायची. पण आम्ही भांडणाच्या मनःस्थितीत इतके गुरफटलो होतो की, मुलांच्या मनाचा विचार करायला आम्हाला सवडच नव्हती. आमची मुलगी माझ्या बाजूची होती आणि आमचा सर्वात मोठा मुलगा (तो माझ्या बायकोसारखा दिसायचा आणि तिचा आवडता होता) तिच्या पक्षाचा. मला अनेकदा त्याचा तिटकारा वाटायचा."

## १७

"तर असं आम्ही जगत होतो. आमच्यामध्ये जास्त जास्त वितुष्ट येत होतं. सरतेशेवटी मतभेदांमधून वैमनस्य निर्माण होईनासं झालं, तर वैमनस्यातून मतभेद उद्भवू लागले. तिनं काही म्हणायच्या आतच मी तिला विरोध करायचा आणि तीसुद्धा तसंच वागायची.

"चौथ्या वर्षी उभय पक्षांनी स्वतंत्रपणं निष्कर्ष काढला

की, आम्ही एकमेकांना समजून घेऊ शकत नाही किंवा आमच्यात सुसंवादही निर्माण होत नाही. समझोता करण्याचे प्रयत्न आम्ही केव्हाच सोडून दिले होते. अगदी साध्या साध्या बाबींमध्ये, विशेषत: मुलांसंबंधात, आमच्यापैकी प्रत्येकजण आपलं ठाम मत धरून राही. आता आठवण केली म्हणजे जाणवतं की, ज्या मतांचा मी पुरस्कार करायचा ती काही मला फारशी प्रिय नव्हती आणि त्यांचा मी त्याग करू शकलो असतो. पण तिची मतं भिन्न होती आणि तिच्या मतांना संमती द्यायची म्हणजे तिच्यापुढं हार खाण्यासारखं होतं. हे करणं मला शक्य नव्हतं. तसंच तिलाही शक्य नव्हतं. कदाचित ती स्वत:ला बरोबर समजत होती. माझी खात्री होती की, माझंच बरोबर होतं. आम्ही जेव्हा दोघंच एकत्र असू तेव्हा गप्प बसत असू अथवा निव्वळ कामापुरतं संभाषण घडायचं: 'किती वाजले?' 'झोपायची वेळ झाली? 'आज जेवणाला काय आहे?' 'कुठं जायचं?' 'वर्तमानपत्रात कोणत्या बातम्या आहेत?' 'डॉक्टरना बोलावलं पाहिजे. मारीयाचा घसा दुखतोय.' ह्या कमालीच्या संकुचित विषयांवरील संभाषणापासून आम्ही तसूभर जरी बाजूला गेलो तरी तात्काळ आमच्यात ठिणगी पडायची. कॉफी, टेबल-क्लॉथ, गाडी, पत्त्याच्या डावामधली खेळी अशा क्षुल्लक गोष्टींवरून एकमेकांची निर्भर्त्सना सुरू व्हायची. वस्तुत: माझ्या किंवा तिच्या दृष्टीनं ह्या गोष्टींना काडीचंही महत्त्व नव्हतं. माझ्या बाबतीत सांगायचं तर काडीवेळा तिच्याविषयीचा माझ्या मनातला द्वेष पराकोटीला जायचा. काही काही वेळा मी तिच्याकडं टक लावून पहायचा: ती चहा ओतत असायची, पाय हलवीत असायची, तोंडाशी चमचा नेत असायची किंवा चहा पीत असायची आणि ती जणू

काही अतिभयानक गुन्हा करतेय अशा भावनेनं मी तिचा तिरस्कार करायचा. पण ह्या द्वेषभावनेच्या झटक्यांनंतर माझ्या मनात तेवढ्याच जोरानं प्रेमभावना उफाळून येत असत, हे मात्र माझ्या ध्यानात राहिलं नाही. प्रेमाचा कालखंड, द्वेषाचा कालखंड; प्रेमाचा दुबळा कालखंड, द्वेषाचा अल्प कालखंड; तीव्र प्रेमाचा कालखंड, द्वेषाचा प्रदीर्घ कालखंड. त्यावेळी आमच्या लक्षात आलं नाही की, हे प्रेम आणि द्वेष म्हणजे एकाच प्राणीसुलभ भावनेचे भिन्न पैलू आहेत.

"आम्ही जर वास्तव परिस्थिती जाणली असती तर आयुष्य म्हणजे एक भयानक दुःस्वप्न ठरलं असतं. पण ते आम्ही जाणलं नव्हतं. वास्तव परिस्थिती जशी होती तशी आम्ही ती पाहिली नव्हती. यातच माणसाची मुक्ती सामावलेली असते आणि यातच त्याला शासन घडत असते: माणसाच्या आयुष्याची तऱ्हा कितीही चुकीची असली तरी तो तिला स्वतःपासून लपवून ठेवू शकतो, आपल्या परिस्थितीची शोकांतिका लपवू शकतो. आम्ही तेच केलं. घरच्या ताणाच्या, गोंधळ-गडबडीच्या कामांमध्ये, खोल्या लावण्यात, स्वतःचं आणि मुलांचं प्रसाधन करण्यात, अभ्यास करण्यात, मुलांच्या तब्येतींची काळजी घेण्यात ती स्वतःला गुंतवून घेत होती. मला माझे स्वतःचे छंद होते. काम, शिकार आणि पत्ते यांच्यात मी स्वतःला रमवून घेत होतो. सारा वेळ आम्ही स्वतःला गुंतवून ठेवीत होतो. आम्हा दोघांचीही अशी समजूत झाली होती की, जेवढे अधिक गुंतलेले राहू तेवढे एकमेकांशी नाठाळ वागण्याचा आम्हाला हक्क आहे. मी मनातल्या मनात तिला उद्देशून म्हणायचा: 'असे चेहरे करून बसणं तुला ठीक आहे. तुझ्या धिंगाण्यापायी रात्रभर मला जागरण झालं आणि

आता मला परिषदेला हजर रहायचंय'. ती सरळ मोठ्यांदा म्हणायची: 'तुमचं सगळं ठीक आहे, पण बाळामुळं मला आख्खी रात्र जागरण झालंय.'

"अशा रीतीनं आम्ही आयुष्य कंठीत होतो. जणू धुक्यात असल्याप्रमाणं. त्या धुक्यापायी आम्हाला गोष्टी जशा होत्या तशा दिसत नव्हत्या. आणि पुढं जे घडलं ते कधी घडलंच नसतं तर अगदी म्हातारपणापर्यंत माझी अशी समजूत राहिली असती की, मी चांगलं आयुष्य जगलो—विशेष चांगलं नसलं तरी इतर चारचौघांप्रमाणं बरंच चांगलं जगलो. दु:खाच्या आणि खोटेपणाच्या केवढ्या खोल गर्तेत मी धडपडत होतो याची मला कधी जाणीवच झाली नसती.

"एकाच साखळदंडानं एकाच खुंटाला बांधलेल्या दोन कट्टर वैऱ्यांप्रमाणं आमची अवस्था होती. एकमेकांच्या आयुष्यात वीष कालवूनही आम्ही ते मान्य करायला तयार नव्हतो. नव्याण्णव टक्के नवरा-बायको असंच राहतात याची अद्याप मला कल्पना नव्हती. असं घडणं अपरिहार्य आहे हे मला माहीत नव्हतं. त्यावेळी मला स्वत:बद्दल आणि इतरांबद्दल हे ठाऊक नव्हतं.

"एखादी व्यक्ती बरोबर किंवा चुकीच्या अशा कोणत्याही मार्गानं जगत असली तरी आयुष्यात किती विलक्षण योगायोग घडतात! जगणं अशक्य होण्याच्या बिंदूपर्यंत पालक जेव्हा येऊन ठेपतात तेव्हा मुलांच्या शिक्षणासाठी शहरात रहायला जाणं आवश्यक ठरतं. आम्हाला सुद्धा ही गरज भासली."

तो गप्प झाला आणि दबल्या हुंदक्याप्रमाणे त्याने दोन्दा आवाज काढला. स्टेशन जवळ येत होते.

किती वाजलेत?" त्याने विचारले. मी पाहिले. दोन वाजले होते.

"थकवा नाही आला?" त्याने विचारले.

"नाही. पण तुम्ही थकला असाल."

"मला घुसमटल्यासारखं होतंय. मी जरा पाय मोकळे करतो आणि पाणी पितो."

लटपटत्या पायांनी तो कॉरीडॉरमधून चालत गेला. मी एकटाच तेथे बसून मनातल्या मनात त्याच्या हकीकतीची उजळणी करीत होतो. मी विचारात एवढा गर्क झालो की दुसऱ्या दाराने तो केव्हा डब्यात परत आला ते मला समजलेच नाही.

## १८

"मी शांतपणानं बोलू शकत नाही," तो बोलू लागला. "ह्या गोष्टींवर विचार करण्यात मी खूप काळ खर्च केलाय. अनेक गोष्टी मला आता वेगळ्या दिसू लागल्यात आणि माझे विचार दुसऱ्यांना सांगावेत असं वाटू लागलंय.

"तर आम्ही शहरात रहायला सुरुवात केली. असुखी माणसांना शहरात राहणं सोपं जातं. आपला मृत्यू केव्हाच घडलाय आणि फार पूर्वीच आपण धुळीत मिसळून गेलोय हे न समजता माणूस शहरामध्ये शंभर वर्षं राहू शकतो. 'स्वतःला ओळखून घ्यायला' वेळच नसतो. प्रत्येकजण खूप धावपळीत असतो. व्यावसायिक बाबी, सामाजिक अपेक्षा, आरोग्य, कला, मुलांच्या तब्येती, मुलांचं शिक्षण अशी हजार व्यवधानं. आज अमूक एकाचा पाहुणचार करायला पाहिजे,

उद्या अमूक एकाकडं पाहुणं म्हणून जायचंय. तुम्ही हे पाहिलं पाहिजे, ते ऐकलं पाहिजे. शहरात नेहमी एक, किंवा दोन अथवा तीनसुद्धा नामवंत व्यक्ती असतात आणि त्यांना दुर्लक्षून चालत नाही. ह्याला, स्वतःला किंवा त्याला उपचार घेतलेच पाहिजेत. शिवाय शिक्षक, ट्यूटर, गव्हर्नेस. एवढं होऊनही आयुष्य एखाद्या रिकाम्या पिंपासारखं.

"तर असं आम्ही जगत होतो आणि एकत्र राहण्याची आमची वेदना थोडी हलकी झाली होती. नव्या घरात, नव्या शहरात स्थिरावण्यात आणि शहराकडून खेड्याकडं, खेड्याकडून शहराकडं हेलपाटे मारण्यात पहिले काही महिने आम्ही गुंतलो होतो.

"एक हिवाळा उलटला आणि दुसऱ्या हिवाळ्यादरम्यान वरकरणी क्षुल्लक, किरकोळ भासणारी, पण पुढं जे घडलं त्याच्याशी थेट संबंध असणारी अशी एक घटना झाली. तिची प्रकृती बरी नव्हती आणि त्या हरामखोरांनी जाहीर केलं की, इतःपर तिला मुलं होणं इष्ट नाही. मुलं न होण्यासाठी काय करावं हेही त्यांनी तिला शिकविलं. मला हे किळसवाणं वाटलं. ह्या गोष्टीला प्रतिबंध करण्यासाठी मी शर्थ केली. पण ती मूर्खासारखी हट्टाला पेटली आणि मला नमतं घ्यावं लागलं. आमच्या पाशवी वर्तनाची शेवटची सबब – मुलं – आता नाहीशी करण्यात आली होती. त्यामुळं आयुष्याचा अधिकच वीट येऊ लागला.

"शेतकऱ्यांना आणि कामकरी लोकांना मुलांची गरज भासते. मुलांना पोसणं त्यांना कितीही जड जात असलं तरी त्यांना मुलांची गरज भासते. म्हणून त्यांचं वैवाहिक जीवन समर्थनीय ठरतं. पण वरच्या वर्गांमधल्या आमच्यासारख्या लोकांना गरज

नसतानाही मुलं होतात. खरं म्हणजे मुलं याचा अर्थ जादा काळजी आणि खर्च. वारसाहक्क सांगणारे नकोसे वाटणारे दावेदार. मुलं म्हणजे ओझं. त्यामुळं आमच्या पाशवीपणाला काही समर्थनच उरत नाही. एक तर मुलांच्या तावडीतून सुटण्यासाठी आम्ही कृत्रिम साधनांचा वापर करतो, किंवा सावधगिरी न बाळगण्याच्या परिणामी डोक्यावर कोसळलेली आपत्ती, एक घोडचूक म्हणून आम्ही मुलांकडं पाहतो. हे सगळयात जास्त किळसवाणं आहे. त्याला काही समर्थन नाही. पण आमचा एवढा अध:पात घडलाय, की समर्थन देण्याची काही गरज आहे असंही आम्हाला वाटत नाही. सदसद्विवेकबुद्धीला यत्किंचितही टोचणी न लावता बहुसंख्य सुशिक्षित लोक आज खुशाल बाहेरख्याली आयुष्य जगत आहेत.

"आणि इत:पर सदसद्विवेकबुद्धीच अस्तित्वात नसताना तिला टोचणी कुठून लागणार? सार्वजनिक मत अथवा क्रिमिनल कोड यांना आपण सदसद्विवेकबुद्धीचा एक प्रकार मानलं तर ठीक आहे. पण ह्या दोन्ही गोष्टींचा उपमर्द होत नाही. सार्वजनिक मत आक्षेप घेत नाही, कारण **प्रत्येकजणच** ते करतो! अगदी मारीया पावलोवना आणि इवान झखारीच. (काय? आम्ही काय भिकाऱ्यांचं लेंढार पैदा करायचं किंवा समाजात वावरण्याची आमची संधी गमावायची?) क्रिमिनल कोडच्या बाबतीत म्हणाल तर इथं घाबरण्यासारखं काहीच नाही. फक्त खालच्या स्तरातल्या बायका आणि सैनिकांच्या प्रेयसी आपल्या तान्ह्यांना तळयांमध्ये किंवा विहीरींमध्ये फेकून देतात. अर्थात त्यांना तुरुंगात टाकलं पाहिजे. पण आम्ही सर्व काही योग्य वेळी आणि जंतुविरहितपणं करतो.

"आणखी दोन वर्षं आम्ही अशा रीतीनं जगलो. त्या

हरामखोरांच्या पद्धती प्रभावी ठरल्या. तिला फुलवा आला, ती सुदृढ बनली, अधिक सुंदर दिसू लागली. ग्रीष्माच्या अखेरीच्या फुलासारखी टवटवीत. ह्याची जाणीव झाल्यामुळं ती स्वतःकडं जास्त लक्ष पुरवू लागली. तिच्या सौंदर्यात एक प्रकारचं आव्हान होतं. तिचं सौंदर्य पाहणाऱ्याला अस्वस्थ करून टाकणारं होतं. आता ती रसरसलेली, गरोदर न राहणारी, पुष्ट अशी तीस वर्षांची तरुणी होती. तिचं दर्शन घडताच काळजाची फडफड होई. पुरुषांमध्ये ती वावरायची तेव्हा त्यांच्या नजरा तिच्यावर खिळू लागल्या. एखाद्या धष्टपुष्ट, कष्ट नसलेल्या, खूप सजवलेल्या आणि अचानक लगाम सोडून दिलेल्या घोड्याप्रमाणं तिची अवस्था होती. तिच्यावर मुळीच लगाम नव्हता आणि आपल्या नव्याण्णव टक्के बायकांवर लगाम नसतो. मला याची जाणीव झाली आणि भीती वाटली."

## १९

अचानक तो उठला आणि खिडकीपाशी जाऊन बसला.

"मला माफ करा" चेहरा बाजूला फिरवीत तो म्हणाला. सुमारे तीन मिनिटेपर्यंत तो खिडकीमधून बाहेर पहात होता. मग त्याने एक सुस्कारा टाकला व तो परत माझ्याशेजारी येऊन बसला. त्याची मुद्रा अगदी वेगळी दिसत होती. त्याच्या डोळ्यांमध्ये केविलवाणा भाव होता. स्मित उमटावे तशी त्याच्या ओठांना मुरड पडली होती.

"मी थोडा दमलोय, पण तरीही पुढं सांगतो. अजून खूप वेळ शिल्लक आहे. पहाट फुटायला अवकाश आहे. हं तर..." सिगारेट पेटवीत त्याने आरंभ केला. "गरोदर राहणं थांबताच

ती जास्त सुंदर आणि पुष्ट बनली. आणि मुलांमुळं होणारा तो अखंड त्रास थांबल्यामुळं तिचा आजारही कमी झाला. अर्थात संपूर्ण नाहीसा झाला असं नाही, पण एखाद्या गुंगीतून बाहेर आलेल्या व्यक्तीसारखं तिला वाटत होतं. अचानक तिला भोवतालच्या जगामधील आनंद दिसू लागले होते. ज्या जगाचा तिला विसर पडला होता, ज्या जगाचं रसग्रहण करणं तिला अशक्य ठरलं होतं. ज्या जगाला ती समजू शकली नव्हती ते जग आता तिच्यासमोर पूर्ण सौंदर्यानं ओसंडून उभं होतं. 'मी हा क्षण निसटू देणार नाही! काळ उलटतोय! तो कधीच परतणार नाही!' ती असा विचार करीत होती किंवा निदान तसं तिला वाटत होतं असं मला भासलं. आणि दुसऱ्या रीतीनं तिला विचार करणं अथवा वाटणं शक्यच नव्हतं. प्रेम हीच केवळ जगण्यासारखी एक गोष्ट आहे असं तिच्या मनावर लहानपणापासून ठसविण्यात आलं होतं. तिचं लग्न झालं होतं आणि त्या प्रेमाचा काही भाग जरी तिला लाभला होता, तरी तिच्या अपेक्षेच्या मानानं ते काहीच नव्हतं. तिला देण्यात आलेल्या आश्वासनांच्या मानानं ते प्रेम अगदीच क्षुल्लक होतं. उलट त्या प्रेमानं तिची भरपूर निराशा केली होती. तिला दु:ख दिलं होतं. शिवाय एका अनपेक्षित रूपानं—मुलांच्या रूपानं—तिचा छळ केला होता. ह्या छळवादात ती शिणून गेली होती. आणि आता परोपकारी डॉक्टरांच्या कृपेमुळं तिला शोध लागला होता की, मुलांना टाळणं शक्य होतं. ती आनंद लुटत होती, नवी अनुभूती घेत होती. प्रेम हाच जीवनाचा एकमेव हेतू आहे अशी तिची धारणा होती आणि त्या प्रेमासाठी ती पुनर्जन्म घेत होती. मात्र मळकट, मत्सरी, तिरस्करणीय नवऱ्यावर तिला प्रेम करायचं नव्हतं. एका वेगळ्या

प्रकारच्या प्रेमाची, नव्या आणि विशुद्ध प्रेमाची ती स्वप्नं पाहू लागली. निदान माझी तशी कल्पना झाली होती. जणू कुणाची तरी वाट पहावी त्याप्रमाणं तिची नजर सभोवताली धुंडाळू लागली. मी हे पाहिलं आणि सावध बनलो. तिच्या रीतीनुसार ती इतरांच्या मार्फत माझ्याशी बोलायची. म्हणजे जरी ती इतरांशी बोलत असली तरी ते शब्द मला उद्देशून असायचे. आता ती धीटपणं आणि अर्धवट थट्टेच्या सुरात वारंवार म्हणू लागली (अवघ्या तासापूर्वी अगदी विरोधी विचार प्रकट केला होता हे विसरून) की मातेचं आपल्या मुलांविषयीचं प्रेम म्हणजे निव्वळ फसवणूक आहे, अद्याप तरुण असताना आणि जीवनाचा आनंद उपभोगण्याची क्षमता असताना मुलां-साठी आपल्या आयुष्याचा बळी देण्यात काही अर्थ नाही. तर आता ती मुलांकडं कमी ध्यान देऊ लागली आणि जे लक्ष पुरवीत होती त्यात पूर्वीची तीव्रता नव्हती. स्वतःसाठी आणि स्वतःच्या दिसण्यावर ती जास्त जास्त वेळ खर्चू लागली. ऐषआरामात राहून आणि स्वतःमध्ये सुधारणा घडविण्याची खटपट करून तिनं ही वस्तुस्थिती लपविली. पूर्वी तिनं अजिबात सोडून दिलेल्या पियानोकडं ती परत लक्ष देऊ लागली. आणि तिथूनच सगळी सुरुवात झाली."

त्याचे शिणलेले डोळे खिडकीच्या दिशेने भिरभिर फिरले. पण तात्काळ त्याने नजर आत वळविली. जणू पुढील हकीकत सांगण्याची तो स्वतःवर बळजबरी करीत होता.

"आणि नंतर तो माणूस आला."

तो थांबला आणि त्याने विचित्र ध्वनी दोन-तीनदा काढला. त्या इसमाचा उल्लेख करणे, त्याची आठवण करणे, त्याच्या-विषयी बोलणे त्याला पीडादायी जात होते हे मला दिसत

होते. पण त्याने स्वत:ला रेटा लावला. त्याच्या आवाजात निर्धार भरला होता. जणू सारे अडथळे तो फाडून काढीत होता.

"तो नीच प्राणी होता असं मला वाटलं. माझ्या आयुष्यात त्यानं जी भूमिका बजावली म्हणून नव्हे, पण तो खरंच नीच होता. तो नीच होता, ह्यावरून ती किती बेजबाबदार होती याचा पुरावा मिळतो. जर तो नसता, तर त्याच्या जागी दुसरा कुणीतरी आला असता! तसं घडायचंच होतं!" पुन्हा तो थांबला. "तो संगीतामधला जाणकार होता. व्हायोलिन-वादक. पण व्यावसायिक नव्हे. अर्धा संगीतकार, अर्धा लब्ध-प्रतिष्ठित.

त्याचे वडील जमीनदार होते. माझ्या वडिलांच्या शेजारीच रहात. त्याच्या वडिलांनी सगळा पैसा गमाविला आणि मुलं–तिघेही मुलगेच होते–काम करू लागली. सर्वात धाकटा तेवढा आपल्या धर्माच्या आईकडं पॅरिसला गेला. त्याला संगीताची जाण होती म्हणून तिथं तो संगीतविद्यालयात गेला. व्हायोलिनवादकाचा अभ्यासक्रम पुरा करून तो मैफलींमध्ये वाजवू लागला. माणूस म्हणून तो..." त्या माणसाविषयी तो काही पाशवी उद्गार काढायच्या बेतात होता, पण त्याने स्वत:ला आवरले आणि तो पुढे घाईघाईने म्हणाला, "तिथं तो कोणत्या प्रकारचं आयुष्य जगला हे मी काही सांगू शकत नाही. मला एवढंच ठाऊक आहे की, त्या वर्षी तो रशियात आला आणि माझ्या घरी आला होता.

"आर्द्र, बदामी आकाराचे डोळे, हसरे लाल ओठ, मेण लावलेल्या अक्कडबाज मिशा. अत्याधुनिक केशरचना, बायका ज्याला 'वाईट नाही' असं म्हणतात एवढा देखणा, दुबळा

पण कुरूप नसलेला, बायकांप्रमाणं किंवा हॉटेन्टॉट लोकांप्रमाणं डौलदार पृष्ठभाग. ही हॉटेन्टॉट माणसंही संगीताची जाणकार असतात असं मी ऐकलंय. संधी मिळताच तो मिळून-मिसळून वागायचा, पण फार संवेदनाक्षम असल्यामुळं जरासा फटका बसताच मागं सरायचा. मोठ्या डौलात तो वावरायचा. विशिष्ट पॅरिस छटेचे बटणवाले बूट वापरायचा, त्याचे नेकटाय भडक रंगाचे असत. पॅरिसमध्ये राहणारे परदेशी लोक ज्या गोष्टी आत्मसात करतात त्या त्यानं केल्या होत्या. अशा गोष्टी त्यांच्या नाविन्यापायी आणि अस्सलतेमुळं बायकांवर नेहमी छाप टाकतात. त्याची आनंदी प्रवृत्ती खोटी, कृत्रिम वाटायची. त्याचं बोलणं सूचक आणि तुटक असायचं. जणू त्याला काय म्हणायचं असे हे प्रत्येकाला ठाऊक आहे.

"तो आणि त्याचं संगीत सर्व गोष्टींना कारणीभूत ठरले. सर्व काही मत्सरापोटी घडलं असं खटल्याच्या वेळी भासविण्यात आलं. तसं मुळीच नव्हतं. म्हणजे अगदीच तसं नव्हतं असं नव्हे, पण तरीही — तसं नव्हतं. खटल्यात असं ठरविण्यात आलं की, माझ्या बायकोच्या अब्रूखातर मी तिला ठार करणारा दोषी नवरा होतो. (असं ते म्हणाले). म्हणून माझी सुटका झाली. खटल्याच्या वेळी मी खऱ्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न केला, पण मी माझ्या बायकोची बदनामी टाळू पाहतोय असा त्यांचा समज झाला.

"त्या संगीतकाराबरोबर तिचे जे काही संबंध होते त्यांना माझ्या किंवा तिच्या दृष्टीनंही काहीसुद्धा अर्थ नव्हता. माझी पाशवी वर्तणूक — मी आधी सांगितल्याप्रमाणं — एवढ्या एकच गोष्टीला महत्त्व होतं. आमच्यामधल्या त्या भयानक दरीमुळं सर्व काही घडलं. आमच्या परस्परद्वेषाचा ताण एवढा मोठा

होता की जराशा प्रक्षोभानं एकदम प्रचंड भडका उडायचा. आमची भांडणं भयानक स्वरूपाची बनली होती. त्यांना अधिक भयानक रूप यायचं कारण म्हणजे आत्यंतिक पाशवी वासनांच्या कालखंडांच्या दरम्यानच्या अवधीत ती घडायची.

"जर तो माणूस अवतरला नसता तर दुसरा कुणी तरी आला असता. जर मत्सर हा प्रेरकशक्ती ठरला नसता, तर दुसरं काहीतरी कारण घडलं असतं. माझा असा दावा आहे की, मी जसा जगलो तसं जगणाऱ्या सर्व पुरुषांनी एक तर पूर्णतया भ्रष्टाचारी बनलं पाहिजे, किंवा आपल्या बायकांना टाकलं पाहिजे, अथवा मी माझ्या बायकोला ठार मारलं तसं त्यांनी आपल्या बायकांना ठार मारलं पाहिजे. मी ज्या पद्धतीनं सर्व गोष्टींची अखेर केली तसं करण्यापूर्वी, अनेकवेळा मी आत्महत्येच्या टोकावर होतो आणि तिनंही वीष खाण्याचा प्रयत्न केला होता."

२०

"अखेरीआधीच्या काळात परिस्थिती अशी होती. एक प्रकारच्या शस्त्रसंधीच्या वातावरणात आम्ही रहात होतो आणि ते वातावरण टिकवायला पाहिजे होतं. पण एक दिवस मी सहज म्हटलं की, अमूक एका कुत्र्यानं प्रदर्शनात पदक मिळविलं होतं.

"'पदक नव्हे, शिफारसपत्र,' ती म्हणाली.

"आमचा वाद सुरू झाला. एका विषयावरून दुसऱ्या विषयावर आम्ही उड्या घेऊ लागलो. दूषणं देणं सुरू झालं:

"'हं! प्रत्येकाला ते माहीत आहे. नेहमीच असं होतं. तुम्ही म्हणालात...'

"'मी तसं काहीही म्हणालो नाही.'

"'म्हणजे मी खोटी असं म्हणायचंय?'

"ज्यावेळी तिला किंवा मला स्वत:ला ठार मारावं असं मला प्रकर्षानं वाटायचं अशा एका भयानक भांडणाच्या टोकाशी आम्ही पोहोचलो होतो असं मला जाणवलं. आम्ही त्या टोकाला गेलो होतो अशी माझी खात्री पटली होती. त्या गोष्टीची मला आगीप्रमाणं भीती वाटत होती. मी स्वत:ला काबूत ठेवू इच्छित होतो, पण माझं सर्वांग भडकलं होतं. तिचीसुद्धा तशीच, किंवा त्याहून वाईट अवस्था होती. माझ्या बोलण्याचा तिनं हेतूत: विपर्यास केला होता. माझ्या शब्दांचा चुकीचा अर्थ लावला होता. तिनं उच्चारलेला प्रत्येक शब्द विखारानं भरला होता. तिनं माझ्या मर्मांवर घाव घालायला सुरुवात केली. भांडण विकोपाला जात चाललं. शेवटी मी ओरडलो: 'जीभ आवर!' किंवा तत्सम काहीतरी. ती ताडकन उठली आणि मुलांच्या खोलीकडं निघाली. मला जे काही म्हणायचं होतं ते सांगून संपवावं अशा उद्देशानं मी तिला थांबवायचा प्रयत्न केला. तिचा दंड मी पकडला. तिनं दुखल्याचा कांगावा केला आणि ती ओरडली: 'मुलांनो! तुमचा बाप मला मारतोय!'

"'खोटं बोलू नको!' मी ओरडलो.

"'ही काही पहिलीच खेप नाही!' ती उलट किंचाळली.

"मुलं तिच्यापाशी धावत आली. तिनं त्यांना शांत करण्याचा प्रयत्न केला.

"'बहाणा करू नको,' मी म्हणालो.

"'तुझ्या दृष्टीनं प्रत्येक गोष्ट म्हणजे बहाणाच! एखाद्याला ठार मारशील आणि तो मेल्याचा बहाणा करतोय असा नंतर

त्याच्यावर आरोप करशील. आता मला सारं समजलं. तुला नेमकं तेच हवंय्!'

"'तुला मेलेली पहायची माझी इच्छा आहे!' मी तारस्वरात किंचाळलो.

"माझ्या स्वतःच्याच शब्दांची मला त्यावेळी किती भीती वाटली होती हे आत्तासुद्धा मला आठवतं. असे कठोर, भयानक शब्द उच्चारण्याची माझ्याठायी कुवत होती असं मला वाटलं नव्हतं आणि ते शब्द माझ्या तोंडून उमटले होते ह्यावर माझा विश्वासच बसत नव्हता. ते शब्द किंचाळल्यानंतर मी माझ्या अभ्यासिकेत धावत गेलो आणि तिथं बसून धूम्रपान करू लागलो. ती हॉलमध्ये गेल्याचं आणि तिनं कपडे चढविल्याचं मी ऐकलं. ती कुठं निघाली होती असं मी विचारलं. तिनं उत्तर दिलं नाही. 'मरो साली,' मी स्वतःशी म्हणालो. परत अभ्यासिकेत येऊन मी पहुडलो आणि परत धूम्रपानाला सुरुवात केली.

"तिचा सूड घेण्याच्या, तिच्या तावडीतून सुटका करून घेण्याच्या, जणू काही घडलंच नाही असं भासवून समझोता करण्याच्या हजार योजना माझ्या डोक्यात येऊन गेल्या. तिथं पडल्या पडल्या मी अखंड धूम्रपान करीत होतो, सतत विचार करीत होतो. तिच्यापासून दूर पळून जाण्याच्या, लपून राहण्याच्या, अमेरिकेला निघून जाण्याच्या कल्पना माझ्या मनात येत होत्या. तिच्याविना माझं आयुष्य कसं असेल असं कल्पनारंजन करण्यापर्यंत मी जाऊन ठेपलो. तिच्याशिवाय माझं आयुष्य किती सुंदर बनेल तिच्याशिवाय अगदी वेगळी अशी दुसरी एखादी अद्भुत स्त्री माझ्या जीवनात कशी येईल, अशा कल्पना करण्यात मी रमलो. माझ्या बायकोचा मृत्यू घडवून किंवा

तिला घटस्फोट देऊन तिच्यापासून माझी मुक्तता करून घ्यावी अशा विचारानं मी योजना तयार करू लागलो. ज्या गोष्टींचा विचार करणं इष्ट नव्हतं अशा गोष्टींचा मी विचार करीत होतो ह्याची मला जाणीव झाली. ह्या जाणीवेला टाळण्यासाठी मी धूम्रपान करीत राहिलो.

"घरातलं जीवन नेहमीप्रमाणं चाललं होतं. गव्हर्नेस आली आणि मालकीण कुठं गेली व केव्हा परत येईल अशी तिनं विचारणा केली. चहा द्यायचा का अशी हुजऱ्यानं पृच्छा केली. मी भोजनकक्षात गेलो. मुलं माझ्याकडं थंड चौकस कटाक्ष टाकीत होती. विशेषत: समजण्याइतपत वयानं मोठी असलेली लिझा. आम्ही मुकाटपणं चहा प्यायलो. ती परत आली नाही. संध्याकाळ सरली आणि तरीही ती परत आली नाही. माझ्या मनात दोन भावनांचा झगडा चालला होता: नक्की घरी परतणार याची जाणीव असूनही घराबाहेर राहून माझा आणि मुलांचा छळवाद चालविल्याबद्दल मला तिचा मनस्वी राग आला होता; आणि भीती वाटत होती की, ती घरी परत येणार नाही व स्वत:च्या जिवाचं काहीतरी बरं-वाईट करून घेईल. मी तिचा शोध घ्यायला गेलो असतो, पण जाणार कुठं? तिच्या बहिणीकडं? मी तिच्या बहिणीकडं जाऊन चौकशी केली असती तर मूर्ख ठरलो असतो आणि तिला नेमकं तेच हवं होतं. नायनाट होवो तिचा! कुणाला तरी छळण्याची जर तिची एवढी इच्छा असेल तर खुशाल स्वत:चाच छळवाद करूं दे! अन्यथा पुढचं भांडण याहून वाईट होईल. पण जर ती आपल्या बहिणीकडं नसली आणि स्वत:ला अपाय करून घेण्याचा तिचा इरादा असला, अथवा एव्हाना तिनं तसं काही केलं असलं तर?

“अकरा वाजले... बारा... मी वरती झोपायच्या खोलीत गेलो नाही. तिथं एकट्यानं पडून वाट पाहणं मूर्खपणाचं होतं. माझ्या अभ्यासिकेत पडून राहणंही मला जमेना. कशामध्ये तरी मन गुंतविण्याची माझी इच्छा होती. पत्रं लिहावी, वाचन करावं असं वाटत होतं. पण मी काहीही करू शकत नव्हतो. माझ्या अभ्यासिकेत मी एकटा बसून होतो. मी खूप चिडलो होतो, माझ्याच विचारांपायी त्रासलो होतो. खुट्ट आवाज झाला तरी कान टवकारीत होतो.

“तीन वाजले... चार... अजूनही ती आली नव्हती. सकाळच्या सुमाराला मला झोप लागली. जेव्हा मी जागा झालो तेव्हाही ती आलेली नव्हती.

“घरातील जीवन बिनबोभाट चालू होतं, पण प्रत्येकजण बावरला होता, माझ्याकडं चौकस आणि रागीट कटाक्ष टाकीत होता. जणू सारा दोष माझा एकट्याचाच होता. आणि माझ्या अंतरात तोच झगडा अद्याप चालू होता: तिच्याविषयीचा राग आणि तिच्याविषयीची काळजी.

“सुमारे अकरा वाजता तिची बहीण आली. तिची दूत म्हणून. तिनं नेहमीप्रमाणं सुरुवात केली: ‘ती फार भयानक मन:स्थितीत आहे. काय घडलं असावं?’

“‘काहीही घडलं नाही’ मी म्हणालो. पुढं मी तिला असंही सांगितलं की, माझ्या बायकोचा स्वभाव अत्यंत चमत्कारिक होता आणि मी काहीही केलेलं नव्हतं.

“‘पण आहे अशीच परिस्थिती ठेवून कसं चालेल?’ तिची बहीण म्हणाली.

“‘तो तिचा प्रश्न आहे, माझा नाही,’ मी म्हणालो. ‘पहिलं पाऊल टाकायला माझी तयारी नाही. जर आम्ही

विभक्त होणं आवश्यक असलं, तर विभक्त झालं पाहिजे.'

"माझी मेहुणी असमाधानी मनानं निघून गेली. मी पहिलं पाऊल टाकणार नाही असं मारे धीटपणं म्हणालो खरं! पण मेहुणी निघून गेल्यावर मी बाहेर आलो आणि पाहिलं तर मुलं एवढी घाबरलेली आणि केविलवाणी दिसली, की मी तात्काळ फेरविचाराला तयार झालो. पहिलं पाऊल उचलायला मी अगदी आनंदानं तयार झालो होतो, पण ते कसं टाकायचं तेच मला ठाऊक नव्हतं. पुन्हा एकदा मी फेऱ्या मारीत धूम्रपान करू लागलो. न्याहरीच्या वेळी मी वोदका आणि मदिरा घेतली. नकळतपणं ज्याची मी इच्छा धरली होती ते हळूहळू साध्य झालं! माझ्या भूमिकेचा नीचपणा आणि मूर्खपणा मला दिसेनासा झाला!

"सुमारे तीन वाजता ती घरी आली. मला पाहिल्यानंतर ती काहीही बोलली नाही. तिला पश्चात्ताप झालाय असा समज करून मी खुलासा करू लागलो की, तिच्या कुचक्या बोलण्यामुळं माझ्याही तोंडून चार वावगे शब्द बाहेर पडले होते. पण त्याच खंबीर आणि भकास मुद्रेनं ती म्हणाली की, माझे खुलासे ऐकण्यासाठी ती आली नसून मुलांना बरोबर घेऊन जाण्यासाठी आली होती. आमचं एकत्र राहणं यापुढं अशक्य होतं असं तिनं सांगितलं. तिनं मला अतिरेकाला नेलं, माझा काहीही दोष नव्हता असं सांगण्याचा मी प्रयत्न केला. एक क्षणभर तिनं माझ्याकडं कठोर, तिरस्काराच्या नजरेनं टक लावून पाहिलं. मग ती म्हणाली :

"'आणखी काही बोलू नको. त्याबद्दल फक्त पश्चात्ताप करावा लागेल.'

"मी फार काळ विनोद सहन करू शकत नाही असं म्हणालो. त्यासरशी ती काहीतरी दुर्बोध बोलली आणि वेगानं स्वतःच्या खोलीत निघून गेली. दारात किल्ली फिरल्याचा आवाज मी ऐकला. तिनं स्वतःला कोंडून घेतलं होतं. मी दार ठोठावलं, पण उत्तर मिळालं नाही. रागानं पाय आपटीत मी तिथून निघून गेलो. अर्ध्या तासानंतर अश्रुभरल्या डोळ्यांनी लिझा माझ्यापाशी धावत आली.

"'काय झालं? काही घडलं काय?'

"'आईच्या खोलीतून काहीच आवाज येत नाही.'

"आम्ही खोलीपाशी गेलो. माझ्या सर्व ताकदीनिशी मी दरवाजा खेचला. कुलूप टिकलं नाही आणि दाराच्या दोन्ही फळ्या खाडदिशी उघडल्या. मी पलंगापाशी गेलो. वेड्यावाकड्या अवस्थेत ती बेशुद्ध पडली होती. तिच्या अंगावर स्कर्ट आणि पायात बूट तसेच होते. जवळच्याच टेबलावर अफूची रिकामी बाटली होती. आम्ही तिला शुद्धीवर आणलं. पुन्हा एकदा अश्रुसिंचन आणि सरतेशेवटी समझोता. पण तो खरा-खुरा समझोता नव्हता. आम्हा प्रत्येकाच्या अंतःकरणात जुनी वैरभावना तशीच शिल्लक उरली. उलट ह्या भांडणापायी आम्हाला जो मनःस्ताप झाला होता त्याचा कडवटपणा त्या वैरभावनेत मिसळला गेला. ह्या मनःस्तापाबद्दल आम्ही एकमेकांना दोषी धरलं होतं. पण आमचा कडवटपणा कायम राखून जगणं शक्य नव्हतं. तेव्हा पूर्ववत जीवनक्रम सुरू झाला. ह्यासारखी आणि ह्याहून वाईट भांडणं सतत होत होती. महिन्यातून एकदा, आठवड्यातून एकदा, दिवसातून एकदा. तेच ते पुन्हा उगाळलं जात होतं. एकदा तर मी परदेशी जाण्यासाठी पासपोर्ट मिळवायला अर्ज केला (आमचं भांडण

दोन दिवस टिकलं होतं), पण नंतर अर्धा खुलासा, अर्धा समेट घडला आणि मी परदेशी गेलो नाही."

## २१

"तो माणूस जेव्हा अवतरला तेव्हा अशी परिस्थिती होती. ज्या क्षणी तो मॉस्कोत आला (त्याचं नांव होतं त्रूखाचेवस्की) त्याच क्षणी तो मला भेटायला आला. सकाळची वेळ होती. मी त्याचं स्वागत केलं. एकेकाळी त्याचे-माझे जिव्हाळ्याचे संबंध होते. आमच्या चर्चेच्या वेळी मला एकदा 'तू' तर दुसऱ्यांदा 'तुम्ही' असे संबोधले. पण मी सरळ 'तुम्ही'चाच अवलंब केला, तेव्हा तोसुद्धा 'तुम्ही' म्हणू लागला. त्याला पाहताच त्याच्याविषयी माझ्या मनात नावड उत्पन्न झाली. पण आश्चर्य म्हणजे त्याला परतवून लावण्याची, त्याला घालवून देण्याची ऊर्मी कुठल्यातरी अज्ञात शक्तीनं अडवून धरली. उलट त्या शक्तीनं मला त्याला उत्तेजन द्यायला प्रवृत्त केलं. त्याचं थंडपणं स्वागत करणं आणि माझ्या पत्नीशी त्याचा परिचय करून न देता त्याला घालवून देणं किती सोपं ठरलं असतं! पण नाही. त्याच्या वादनाबद्दल मी उल्लेख केला आणि त्यानं व्हायोलिन वाजविणं सोडून दिल्याचं कुणीतरी सांगितलं असं म्हटलं. त्यानं ती बातमी खोटी असल्याचं सांगितलं. उलट पूर्वीपेक्षाही आपण वादनामध्ये जास्त गुंतलो आहोत असं तो म्हणाला. एकेकाळी मी वाजवीत असे, याची त्यानं आठवण केली. मी म्हणालो की मी आता वाजवीत नाही, पण माझी बायको मात्र सुरेख वाजवीत आहे.

"एक आश्चर्याची गोष्ट! ह्या भेटीचा परिणाम काय

घडणार हे जर मला आधी समजलं असतं तर त्या पहिल्याच दिवशी, पहिल्याच तासामध्ये आमचे जसे संबंध होते तसेच ते राहिले असते. आमच्यात एक विशिष्ट तणाव होता. आम्हा दोघांपैकी प्रत्येकानं उच्चारलेल्या प्रत्येक शब्दाला विशिष्ट अर्थ होता असं माझ्या ध्यानात आलं होतं.

"माझ्या पत्नीची मी त्याच्याशी ओळख करून दिली. बोलण्याचा ओघ तात्काळ संगीताकडं वळला. तिच्याबरोबर वाजविण्याची त्यानं तयारी दाखविली. माझ्या बायकोनं अत्यंत देखणा आणि मोहक पोषाख केला होता (अलिकडं नेहमीच ती तशी सजलेली असायची). तिचं सौंदर्य कुणालाही विचलित करणारं होतं. आरंभापासूनच तो तिला आवडला होता असं भासलं. पियानो आणि व्हायोलिन यांची जुगलबंदी घडविण्याच्या भावी कल्पनेनं तीही खुलली होती. याचं कारण हा प्रकार तिला विशेष आवडत होता आणि थिएटरमधल्या व्हायोलिनवादकाला पैसे देऊन ती वारंवार बोलावीत असे. तिच्या मुद्रेवर आनंद पसरला होता. पण माझ्या चेहऱ्यावरील नाराजीचा भाव तिनं क्षणभरच टिपला आणि तात्काळ तिनं आपली मुद्रा पालटली. परस्परांना फसविण्याचा खेळ सुरू झाला. खूष झाल्याचा बहाणा करून मी ऐटदार स्मित केलं. सगळे इष्कबाज लोक बायकांकडं ज्या पद्धतीनं पाहतात त्या पद्धतीनं तो माझ्या पत्नीकडं पहात होता. पण बहाणा मात्र आमच्या चर्चेत गुंतल्याचा करीत होता. वास्तविक त्याला त्या चर्चेत काडीचाही रस नव्हता. तिनं बेफिकीरी दाखविण्याचा प्रयत्न केला. पण आपल्या मत्सरी नवऱ्याच्या खोट्या स्मिता-मुळं (हे स्मित तिच्या चांगलं परिचयाचं होतं) आणि आमच्या पाहुण्याच्या वासनाभरल्या कटाक्षांमुळं ती साहजिकच

अस्वस्थ झाली होती. पहिल्याप्रथम जेव्हा तिनं त्याला पाहिलं तेव्हा तिच्या डोळ्यात एक खास चमक उमटल्याचं माझ्या ध्यानात आलं. कदाचित माझ्या मत्सरापायी त्यांच्या दरम्यान विजेचा प्रवाह वाहू लागला होता; त्यांच्यामध्ये स्मितांची, कटाक्षांची, मुद्राभावांची देवघेव घडली होती. ती लाजली – तो लाजला; त्यानं स्मित केलं – तिनं स्मित केलं. संगीताबद्दल, पॅरिसबद्दल आणि इतर किरकोळ गोष्टींबद्दल बोलले. जाण्यासाठी तो उठला आणि आपल्या थरथरत्या पोटरीशी आपली हॅट टेकवून आम्हा दोघांकडं आळीपाळीनं कटाक्ष टाकीत सस्मित उभा राहिला. जणू आम्ही पुढं काय करणार ह्याची तो वाट पहात होता. तो क्षण माझ्या स्मरणात पक्का ठसलाय, कारण त्याला त्या क्षणाला परत निमंत्रण देण्याचं मी टाळलं असतं तर नंतर काहीही घडलं नसतं. पण मी त्याच्याकडं पाहिलं, मग तिच्याकडं पाहिलं आणि तिला उद्देशून मनाशी म्हणालो 'मी मत्सरी आहे असं समजू नकोस.' आणि त्याला उद्देशून मनाशी म्हणालो, 'मी घाबरतो असं समजू नकोस.' एखाद्या दिवशी स्वतःचं व्हायोलिन घेऊन या आणि माझ्या पत्नीच्या पियानोला साथ करा, असं मी त्याला आमंत्रण दिलं. तिनं चकित होऊन माझ्याकडं कटाक्ष टाकला, ती लाजली आणि जणू काही कशाची तरी भीती वाटल्याप्रमाणं विरोध करीत ती म्हणाली की, त्याच्यासारख्या पट्टीच्या वादकाबरोबर पियानो वाजविण्याएवढी तिची कुवत नव्हती. तिच्या ह्या नकारामुळं मी जास्तच त्रासलो आणि त्यानं आमच्याकडं यावंच असा आग्रह धरला. एखाद्या पक्ष्यानं उड्या मारीत जावं तशा दुडक्या चालीनं, मानेला मागं-पुढं झटके देत तो आमच्या खोलीतून बाहेर पडला. त्याच्या मानेच्या प्रत्येक झटक्याबरोबर त्याच्या

काळ्या केसांमधून त्याच्या मानेची पांढरी चीर डोकावीत होती तेव्हा माझ्या मनात निर्माण झालेली विचित्र भावना मला आठवते. त्याच्या उपस्थितीला सहन करणं अत्यंत क्लेशदायी होतं हे मला स्वतःशी कबूल करणं भाग होतं. 'त्याला मी पुन्हा कधी भेटेन अथवा नाही हे सारं माझ्यावर अवलंबून आहे,' मी स्वतःशी म्हणालो. पण त्याला न भेटणं म्हणजे मला त्याची भीती वाटत होती अशी कबुली देणं! नाही. मी त्याला भीत नव्हतो. तसं घडणं अत्यंत अपमानास्पद होतं असं मला वाटलं. माझ्या पत्नीला माझं बोलणं ऐकू जाईल अशा बेतानं हॉलमध्ये मी त्याला सांगितलं की, त्याच संध्याकाळी त्यानं आपल्या व्हायोलिनसह आमच्या घरी यावं. त्यानं येण्याचं आश्वासन दिलं आणि तो निघून गेला.

"त्या दिवशी संध्याकाळी तो आपलं व्हायोलिन घेऊन आला आणि त्या दोघांनी वादन केलं. पण त्यातून फारशी निष्पत्ती झाली नाही. त्यांच्यापाशी योग्य ते संगीताचे कागद नव्हते (त्यांच्यापाशी जे संगीत होतं ते सरावाविना माझी पत्नी वाजवू शकत नव्हती). मला संगीताची खूप आवड होती आणि माझ्या परीनं मी त्यांना खूप मदत केली. त्याच्यासाठी स्टँड उभा करून दिला, पानं उलटून दिली. त्यांनी काही गती वाजविल्या, शब्दांविना काही गाणी वाजविली आणि मोझार्टच्या वाद्यसंगीताची एक धुन वाजविली. आपल्या वाद्यामधून अत्यंत बहारदार सुरावट काढीत त्यानं छान वाजविलं. त्याच्या स्वभावाशी पूर्णतया विसंगत वाटणारी अशी उच्च प्रतीची आवड त्यानं दाखविली.

"अर्थातच त्याचं वाजविणं हे माझ्या पत्नीच्या वादनापेक्षा खूपच वरच्या प्रतीचं होतं. त्यानं तिला मदत केली आणि

काही ठिकाणी तर आदरपूर्वक दाद दिली. तो अत्यंत कौतुकास्पद वागला. माझी पत्नी केवळ संगीतातच रस घेत होती असं भासलं. तिचं वागणं अगदी साधं आणि स्वाभाविक होतं. मीसुद्धा फक्त संगीतात रस असल्याचा बहाणा केला, पण सारी संध्याकाळ मी मत्सरानं जळत होतो.

"ज्या मिनिटाला त्यांची दृष्टभेट झाली त्याच वेळी मी पाहिलं की त्या दोघांमध्ये लपलेल्या श्वापदानं त्यांच्या सामाजिक स्थानाच्या सर्व नियमांना धुडकावून, प्रश्न टाकला होता: 'चालेल?' आणि उत्तर दिलं होतं: 'अर्थात चालेल!' माझी पत्नी, मॉस्कोमधील एक स्त्री, एवढी मोहक असेल अशी त्याची अपेक्षा नसल्याचं मला दिसलं. साहजिकच तिची संगत त्याला आनंददायी वाटली. त्याचा ती स्वीकार करणार याबाबत त्याला सदैव खात्री होती. त्या दु:सह नवऱ्याला टाळून कसं भेटायचं एवढी एकच समस्या होती. मी जर पवित्र असतो तर हे मला समजलं नसतं, पण माझ्या लग्नापूर्वी मी स्वत:सुद्धा इतर अनेकांप्रमाणं स्त्रियांबाबत हाच दृष्टिकोन धारण केलेला होता. त्यामुळं एखाद्या पुस्तकाप्रमाणं त्याचं मन वाचणं मला शक्य झालं होतं. माझा छळवाद आणखी वाढण्याचं कारण म्हणजे विषयसुखाच्या काही थोड्या क्षणांपलिकडं माझ्याबद्दलची तिची भावना केवळ संतापाची होती, ह्याबद्दल मला तिळमात्र संदेह राहिलेला नव्हता. आणि हा माणूस त्याच्या नवेपणामुळं आणि ऐटबाज वागण्यामुळं, विशेषत: त्याच्या असाधारण संगीतगुणांमुळं, त्यांच्या वादनापायी निर्माण होणाऱ्या त्यांच्या निकटतेमुळं, त्यांच्या संवेदनाशील स्वभावांवर संगीताच्या ( खास करून व्हायोलिन संगीताच्या ) घडणाऱ्या परिणामामुळं – ह्या सर्व गोष्टींमुळं हा माणूस तिला केवळ आवडणार

आहे एवढंच नव्हे, तर क्षणाचाही विलंब न लावता तो तिला जिंकून घेणार आहे, तिला दिपवून टाकणार आहे, आपल्या करंगळीभोवती नाचविणार आहे, त्याला पाहिजे ते खेळ तो तिच्याशी खेळणार आहे. मला हे सारं स्पष्ट दिसत होतं आणि त्यामुळं अपरिमित यातना होत होत्या. एवढं असूनही, किंवा कदाचित असं होतं म्हणूनच, माझ्या इच्छेविरुद्ध कृती करणाऱ्या अज्ञात शक्तीनं मला त्याच्याकडं विशेष ध्यान द्यायला भाग पाडलं, त्याच्याशी सभ्य, हळुवारपणानं वागायला लावलं. मी त्याला भीत नव्हतो असं माझ्या बायकोला दाखविण्यासाठी मी तसा वागलो, अथवा स्वतःची फसवणूक करण्यासाठी माझा मीच तसा वागलो हे मला सांगता येत नाही, पण अगदी आरंभापासून त्याच्याशी साधं-सरळ आणि रोखठोक वागणं मला अशक्य ठरलं. त्याला जागच्या जागी ठार करण्याची इच्छा दाबून टाकण्यासाठी मी त्याच्याशी मृदु वागलो. रात्री-च्या जेवणावेळी मी त्याला उंची मद्यं देऊन त्याची सरबराई केली. त्याच्या वादनाच्या श्रवणानं मी बेहोष बनलो. त्याच्याशी बोलताना मी अदबीनं स्मित करीत होतो. पुढल्या रविवारी आमच्याकडं जेवायला येण्याचं आणि माझ्या पत्नीबरोबर परत व्हायोलिन वाजवण्याचं मी त्याला निमंत्रण दिलं. संगीताची आवड असलेल्या माझ्या आणखी काही मित्रांनाही त्याचं व्हायोलिन ऐकायला मी बोलावीन, असं त्याला सांगितलं. अशा प्रकारं ती संध्याकाळ संपली."

प्रक्षुब्ध मनःस्थितीत पोझ्दनीशेवने आपली बैठक बदलली आणि तो विशिष्ट ध्वनी काढला.

"त्या माणसाचा माझ्यावर किती विलक्षण परिणाम घडला होता ही आश्चर्याची बाब होती," स्वतःला महाप्रयासांनी

थाऱ्यावर आणण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला. "तीन किंवा चार दिवसांनंतर एक प्रदर्शन पाहून मी घरी परतलो तेव्हा माझं काळीज एकदम दगडासारखं जड बनलं. तसं का घडलं ते मला समजेना. पण त्याचं कारण असं होतं की, ओटीवरून जाताना माझ्या दृष्टीला काहीतरी ओळखीचं दिसलं होतं. जेव्हा मी अभ्यासिकेत प्रवेश केला तेव्हा माझ्या डोक्यात प्रकाश पडला आणि खात्री करून घेण्यासाठी मी परत ओटीवर गेलो. नाही, माझी चूक झाली नव्हती. तिथं त्याचा ऐटदार कोट टांगलेला होता. (त्याच्या प्रत्येक वस्तूची मी नकळत नोंद घेतलेली होती.) मी चौकशा केल्या. होय, तो तिथं होता. मी स्वागतकक्षात गेलो. पण दिवाणखान्यामधून न जाता मुलांच्या अभ्यासाच्या खोलीतून गेलो. माझी मुलगी लिझा पुस्तकात डोकं खुपसून बसली होती आणि दाई सर्वात छोट्या बाळाला जवळ घेऊन टेबलाशी काहीतरी खुडबुडत होती. स्वागतकक्षाचं दार बंद होतं. त्याचा आणि तिचा आवाज मला ऐकू येत होता. काही arpeggio कानी पडत होते. मी कान देऊन ऐकू लागलो, पण काही निष्कर्ष काढता येईना. पियानो वाजत होता. त्यांचे आवाज, कदाचित त्यांच्या चुंबनांचे आवाज त्याच्यात बुडून जावेत असा हेतू असावा. बापरे! त्यावेळी मला काय झालं! माझ्यातल्या पशूनं माझं सर्वांग शहारून टाकलं. माझं काळीज एक आकुंचन पावलं, संपूर्ण थांबलं आणि नंतर घणाचे घाव बसावेत तशी त्याची धडधड सुरू झाली. स्वतःबद्दलच्या कीवेनं माझा ऊर भरून आला होता (माणसाचं माथं फिरतं तेव्हा नेहमी असं घडतं). 'धडधडीत मुलांच्या देखत! दाईच्या देखत!' माझ्या मनात विचार आला. लिझा माझ्याकडं ज्या विचित्र नजरेनं

पहात होती त्यावरून मी फार भयानक दिसत असावा. 'आता मी काय करायचं?' मी स्वत:ला विचारलं. 'आत जायचं? माझी हिंमत नाही. मी काय करू शकतो हे केवळ देवालाच माहीत.' पण तिथून माझा पायही निघत नव्हता. माझ्या भावना जाणल्याच्या नजरेनं दाई माझ्याकडं पहात होती. 'मला आत गेलंच पाहिजे' मी स्वत:शी म्हणालो आणि झटकन दार उघडलं. तो पियानोपाशी बसला होता आणि आपले पांढरे अंगठे वर धरून arpeggio वाजवीत होता. पियानोच्या बाकदार कडेशी ती उभी होती आणि संगीताची काही पानं चाळत होती. मी आत आल्याचं तिनंच प्रथम पाहिलं किंवा ऐकलं. तिची नजर वर झाली. कदाचित ती घाबरली होती, पण न घाबरल्याचा तिनं आव आणला. किंवा ती मुळीच घाबरलीही नसेल. ते काही असलं तरी ती दचकली नाही किंवा तिची चुळबूळही झाली नाही. ती फक्त लाजली, पण ते सुद्धा तात्काळ नव्हे.

"'किती छान झालं तू आलास ते! रविवारी काय वाजवावं याचा निर्णयच होत नव्हता आमच्यानं!' ती मार्दवी सुरात मला म्हणाली. आम्ही दोघं एकांतात असतो तर ह्या स्वरात ती माझ्याशी कधीच बोलली नसती. तिनं स्वत:ला आणि त्याला उद्देशून 'आम्ही' असा शब्द वापरला, त्याचा मला राग आला होता. मी मूकपणं त्याला अभिवादन केलं. त्यानं माझ्याशी हस्तांदोलन केलं. त्याचं स्मित मला उपहासात्मक भासलं. रविवारसाठी तो संगीताचे काही कागद घेऊन आला होता, पण काय वाजवावं ह्यावर त्या दोघांचं एकमत होत नव्हतं, असं त्यानं मला सांगितलं. अवघड शास्त्रीय संगीत वाजवावं (व्हायोलिन आणि पियानोसाठी बीथोवननं रचलेली

वाद्यसंगीताची धुन) अथवा काही छोटे छोटे संगीताचे तुकडे वाजवावे, यावर त्यांचं एकमत होत नव्हतं. एवढ्या साधे-पणानं आणि स्वाभाविकपणानं तो बोलला, की त्यात मला वावगं काहीच सापडेना. पण तरीही माझी खात्री होती की, त्याचं सारं बोलणं खोटं होतं. माझी फसवणूक करण्याबाबत त्या दोघांनी गुप्तपणं संगनमत केलं होतं.

"आपल्या परंपरांनी मान्य केलेली स्त्री-पुरुषांची शारीरिक जवळीक हा मत्सरी लोकांच्या (आणि आपल्या प्रकारच्या समाजात सर्वच मत्सरी आहेत) आत्यंतिक छळवादाचा उगम आहे. बॉलनृत्यांच्या वेळेस शारीरिक जवळिकीला विरोध करण्याचा, डॉक्टर आणि त्यांचे पेशंट ह्यांच्या शारीरिक जवळिकीला विरोध करण्याचा, अथवा कला, चित्रकला आणि विशेषत: संगीत यांचा अभ्यास करणाऱ्यांच्या शारीरिक जवळि-कीला विरोध करण्याचा जर कुणी प्रयत्न केला, तर तो हास्यास्पद ठरेल. इथं दोन माणसं संगीताचा—एका अत्यंत उदात्त कलेचा—अभ्यास करीत होती. त्यांच्या अभ्यासाला शारीरिक सान्निध्य आवश्यक होतं आणि त्याबाबत दोषास्पद असं काहीच नव्हतं. केवळ अत्यंत मूर्ख आणि मत्सरी नवरे त्यात काहीतरी आक्षेपार्ह शोधू शकले असते. तरीही प्रत्येकाला माहीत आहे की, नेमक्या ह्याच अभ्यासांमधून, विशेषत: संगीताच्या अभ्यासामधून, आमच्या स्तरातल्या लोकांमध्ये व्यभिचाराचा उदय होतो.

"माझ्या मनातील गोंधळ त्यांना जाणवला असावा. काही वेळपर्यंत एक शब्द उच्चारणं मला अशक्य ठरलं. एखाद्या गच्च भरलेल्या बाटलीला उलटं धरलं तर ती जशी सांडू शकत नाही, त्याप्रमाणं माझी अवस्था झाली होती. त्याची

निर्भर्त्सना करावी, त्याला घरामधून हाकलून द्यावं असं मला वाटत होतं. पण मी सभ्य वागलं पाहिजे याची मला जाणीव झाली. तसाच मी वागलो. प्रत्येक गोष्टीला मी मान्यता दाखविली. ह्या खोट्या सभ्य वागण्यापायी त्याची उपस्थिती मला अधिकच पीडादायी वाटली. मी त्याला सांगितलं की, त्याचा निर्णय मला पूर्ण मान्य आहे आणि तिनंही तसंच वागावं असा मी तिला सल्ला दिला. माझ्या अचानक आगमनानं निर्माण झालेला गैरसमज आणि ताणलेली शांतता नाहीशी होईल एवढ्याच वेळेपर्यंत तो तिथं थांबला. नंतर त्यानं रजा घेतली. सरतेशेवटी दुसऱ्या दिवशी काय वाजवायचं ह्याचा निर्णय लागल्याबद्दल समाधान वाटल्याचा त्यानं बहाणा केला. माझी खात्री होती की ती दोघं काय वाजवीत होती याबद्दल त्या दोघांना मुळीच क्षिती नव्हती, कारण दुसऱ्याच कशात तरी ती दोघं खोल गुरफटली होती.

"त्याला निरोप देताना मी विशेष अगत्य दाखविलं (एखाद्याच्या घरातल्या शांतीला आणि सुखाला नष्ट करायला आलेल्या माणसाला दुसऱ्या कोणत्या तऱ्हेनं निरोप द्यायचा!). विशेष प्रेमळपणानं मी त्याचा मऊ पांढरा पंजा दाबला."

## २२

"उरलेल्या दिवसभरात मी तिच्यापाशी अवाक्षर काढलं नाही. मला तिच्याशी बोलणं शक्यच झालं नाही. तिच्या उपस्थितीनं माझ्या मनात एवढा जोरदार तिरस्कार निर्माण झाला होता, की त्याचे फार वाईट परिणाम घडतील अशी मला भीती वाटत होती. जेवणाच्या वेळी मुलांदेखत तिनं

मला विचारलं की, केव्हा जाण्याचा माझा इरादा होता (पुढल्या आठवड्यात एका प्रादेशिक बैठकीला मला हजर रहायचं होतं). मी केव्हा जाणार होतो ते तिला सांगितलं. माझी काही तयारी करून द्यायची का, असं तिनं विचारलं. मी काहीच उत्तर दिलं नाही. थोडा वेळ काहीच न बोलता मी टेबलापाशी बसून राहिलो आणि नंतर तसाच मुकाटपणं माझ्या अभ्यासिकेत गेलो. अलिकडं माझ्या अभ्यासिकेत येणं, विशेषत: अशा वेळेला, तिनं बंद केलं होतं. माझ्या रागाला गोंजारीत मी तिथं पडून राहिलो. अचानक तिच्या पावलांचा आवाज मी ऐकला. माझ्या मनात भयानक, हिडीस विचार आला. ऊरीहच्या बायकोप्रमाणं ह्या आडवेळेला माझ्याकडं येऊन ती आपलं पाप लपवू पहात होती. 'खरंच ती माझ्याशी बोलायला येत आहे?' तिच्या जवळ येणाऱ्या पावलांचा आवाज ऐकताना माझ्या मनात येत होतं. 'जर तशी ती येत असेल, तर माझं बरोबर आहे.' तिच्याबद्दलच्या विलक्षण तिटकाऱ्यानं माझं काळीज भरून गेलं. पावलं जवळ जवळ येत होती. दाराजवळूनच ती स्वागतकक्षात निघून जाणार तर नाही? नाही. दार करकरलं आणि उंबरठ्याशी ती उभी राहिली— उंच, देखणी. आपल्या डोळ्यांमधला भित्रा भाव ती लपवू पहात होती, पण मी तो हेरला होता आणि त्याचा अर्थ जाणला होता. मी एवढा वेळपर्यंत माझा श्वास कोंडून धरला होता की जवळ जवळ घुसमटलो. तिच्याकडं टक लावून पहात मी सिगारेट-केस उचलली आणि एक सिगारेट पेटविली.

"'मी तुझ्याशी बोलायला आल्ये असताना सिगारेट ओढणं चांगलं का?' सोफ्यावर माझ्या शेजारी बसत आणि माझ्या दिशेनं झुकत ती म्हणाली.

"तिचा स्पर्श होऊ नये म्हणून मी दूर सरलो.

"'रविवारी मी पियानो वाजवणार हे तुला आवडलेलं दिसत नाही,' ती म्हणाली.

"'तसं मुळीच नाही,' मी म्हणालो.

"'जणू काही मला डोळे नाहीत!'

"'तसं असेल तर आनंद आहे. पण माझ्या डोळ्यांना मात्र तुझं वागणं छिनाल बाईसारखं दिसतंय...'

"'जर एखाद्या गाडीवानाप्रमाणं तू शिवीगाळ करणार असलास तर मी इथून जाते.'

"'जा. मात्र एक आठवण ठेव, घराण्याच्या अब्रूची चाड तुला नसली तरी मला आहे. मला तुझी मुळीच पर्वा वाटत नाही. कुठं मसणात का जाईनास! पण घराण्याच्या अब्रूची मी पर्वा करतो!'

"'काय? काय म्हणतोस?"

"'चालती हो! कृपा करून चालती हो!'

"जणू काहीच न समजल्याचा आव आणून (किंवा कदाचित खरंच काही न समजल्यामुळं) ती उठली. ती दुखावली होती, चिडली होती. पण बाहेर निघून न जाता ती खोलीच्या मध्यभागी उभी राहिली.

"'तुझ्याशी कसं वागावं ते खरंच समजेनासं झालंय,' ती बोलू लागली. 'देवदूतसुद्धा, तुझ्याबरोबर राहू शकणार नाही. माझ्या अत्यंत मर्मावर घाव घालण्याचा नेहमीप्रमाणं प्रयत्न करीत तिनं माझ्या बहिणीबरोबरच्या प्रसंगाची आठवण करून दिली (त्यावेळी रागाच्या भरात मी माझ्या बहिणीला अद्वातद्वा बोललो होतो. ती एक कडू आठवण होती आणि

माझ्या बायकोला ते माहीत होतं. म्हणून ह्या क्षणी तिनं मुद्दाम ती आठवण उकरून काढली होती). 'त्यानंतर, तुझं कुठलंही वागणं मला चकित करीत नाही,' ती म्हणाली.

"'माझा प्रथम अपमान करायचा, माझी मानहानी करायची, बेअब्रू करायची आणि परत माझ्यावरच ठपका ठेवायचा असा तुझा बेत आहे,' मी स्वतःशी म्हणालो. पूर्वी कधीही नव्हे एवढ्या प्रकर्षानं अचानक मला द्वेषानं झपाटलं. माझ्या द्वेषाला शारीरिक रूपानं व्यक्त करण्याची प्रथमच मला इच्छा झाली. मी ताडदिशी उठलो आणि तिच्या दिशेनं झेपावलो. पण ज्या-क्षणी झेपावलो त्याच क्षणी माझ्या कृत्याची मला जाणीव झाली. माझ्या भावनांना अशा तऱ्हेनं वाट मोकळी करून देण्याचा मला अधिकार होता का, असं मी स्वतःला विचारलं आणि माझं मला होकारार्थी उत्तर मिळालं. कारण त्या तऱ्हेनं मी तिला घाबरवलं असतं. तेव्हा माझ्या द्वेषाला दाबून टाकण्याऐवजी मी त्याच्या आहारी गेलो. माझ्या अंतरात धुमाकूळ घालणाऱ्या त्या भावनेचा मी मनमुराद आनंद उपभोगू लागलो.

"'तुला मी ठार मारण्यापूर्वी चालती हो!' मी ओरडलो आणि धावत जाऊन तिचा दंड पकडला. माझ्या स्वरात मी मुद्दामच ओतःप्रोत तिरस्कार भरला होता. मी भयानक दिसत असावा, कारण घाबरून ती जागच्या जागी खिळून उभी होती.

"'वास्या!' ती म्हणाली. 'तुला झालंय तरी काय?'

"'चालती हो!' मी अधिकच जोरात गरजलो. 'तू माझं डोकं भडकवते आहेस. मग जे काही माझ्याकडून घडेल त्याला मी जबाबदार राहणार नाही.'

"संतापाच्या आहारी जाण्यात मी एक वेगळाच आनंद अनुभवीत होतो. माझ्या भावनांची आत्यंतिक तीव्रता व्यक्त करण्यासाठी काहीतरी अचाट करून दाखविण्याची मला खुमखुमी आली होती. तिला झोडपावं, ठार मारावं असं मला फार फार वाटत होतं. पण तसं करणं योग्य नाही हे मला ठाऊक होतं. माझ्या भावनावेगाला वाट मोकळी करून देण्यासाठी मी पेपरवेट उचलला आणि तिच्या मागं भिरकावून देत ओरडलो 'चालती हो!' माझा नेम चांगला होता आणि तिला इजा न होता तो पेपरवेट तिच्या मागं जाऊन आपटला. ती बाहेर गेली पण दारात थांबली. आणि ती तिथं उभी होती व मला पाहू शकत होती तोवरच (तिनं मला पहावा अशा खास हेतूनंच मी तसं केलं) माझ्या लेखनाच्या टेबलावरील शमादान, शाईची बाटली वगैरे वस्तू मी उचलल्या आणि जमिनीवर भिरकावून दिल्या.

"'चालती हो!' मी ओरडलो. 'चालती हो! माझ्या हातून जे घडेल त्याला मी जबाबदार राहणार नाही!'

"ती निघून गेली आणि मी तात्काळ शांत झालो.

"तासाभरानंतर दाई आली आणि माझ्या बायकोला फेपऱ्याचा झटका आल्याचं तिनं सांगितलं. मी माझ्या बायकोकडं गेलो. ती हुंदके देत होती, हसत होती. तिला काहीही बोलता येत नव्हत आणि तिच्या सर्वांगाला झटके बसत होते. ती बहाणा करीत नव्हती, तर खरोखरीच आजारी झाली होती.

"सकाळी तिला बरं वाटू लागलं. प्रेम नांवाच्या भावनेच्या प्रभावाखाली आमचा समेट झाला. त्यानंतर मी कबूल केलं की, त्रूखाचेवस्कीचा मला मत्सर वाटत होता. त्यावर ती मुळीच शरमली नाही. जगातलं अत्यंत नैसर्गिक प्रकारचं

हास्य तिनं केलं आणि तशा माणसाच्या ती प्रेमात पडेल असा समज करणं अगदी मूर्खपणाचं होतं, असं ती म्हणाली.

"'तशा माणसाबद्दल कुणा चांगल्या बाईला काही वाटणं शक्य आहे का? संगीतापासून मिळणाऱ्या आनंदाशिवाय दुसरं काहीही नाही. तुझी इच्छा असेल तर त्याला पुन्हा कधीही मी भेटणार नाही. पाहुण्यांना बोलावलंय हे खरं असलं तरी रविवारीसुद्धा त्याला भेटणार नाही. माझी प्रकृती बरी नाही असं त्याला लिही, म्हणजे संपलं! मला एकाच गोष्टीचा खेद होतो की, तो धोकेबाज आहे असं कुणी समजावं. विशेषतः त्यानं स्वतःला! मी कधीही ह्याच्याशी सहमत होणार नाही.'

"ती खोटं बोलत नव्हती. तिला जे वाटत होतं तेच ती बोलली होती. असं बोलून त्याच्याविषयी स्वतःच्या मनात तिटकारा निर्माण करावा आणि त्याच्याविरुद्ध तटबंदी उभारावी असा तिचा मानस होता. पण ती अपयशी ठरली. प्रत्येक गोष्ट तिच्या विरोधी होती. विशेषतः ते शापित संगीत. आम्ही त्याबद्दल अधिक चर्चा केली नाही. रविवारी आमच्याकडं पाहुणे आले आणि माझ्या बायकोनं व त्यानं त्यांच्यासाठी वादनाचा कार्यक्रम केला."

## २३

"मी बढाईखोर माणूस होतो हे सांगण्याची मुळीच आवश्यकता नाही असं मला वाटतं. एखाद्याला जर गर्व नसेल तर आपल्या समाजात राहण्यासारखं आहे काय? तेव्हा आम्हाला श्रेय मिळावं अशा हेतूनं भोजन आणि संगीताचा बेत मी

आखला होता. जेवणाचे सारे पदार्थ मी स्वत: जाऊन विकत आणले आणि पाहुण्यांना निमंत्रणं केली.

"संध्याकाळी सहा वाजता मंडळी आली. तोसुद्धा आला. त्याच्या सायंकालीन पोषाखावरल्या हिऱ्याच्या गुंड्या त्याची रुचीहीनता दाखवीत होत्या. त्यानं दिमाखदार आव आणला होता. कुणी त्याच्याशी बोललं तर नम्र स्मित करीत होता. जणू प्रत्येकजण त्याच्या अपेक्षांप्रमाणं बोलत आणि वागत होता. त्याच्यामधल्या वाईट संस्कारांची प्रत्येक खूण मी विशेष आनंदानं टिपून घेत होतो, कारण त्यामुळं माझ्या मनावर फुंकर बसत होती आणि ती म्हणाली होती त्याप्रमाणं त्याच्या प्रेमात पडणं हे तिच्या दृष्टीनं अत्यंत कमी प्रतीचं ठरलं असतं, ही गोष्ट सिद्ध करता आली असती. इत:पर मी स्वत:ला मत्सराचा स्पर्श होऊ देत नव्हतो. पहिली गोष्ट म्हणजे ह्या मत्सरापोटी याआधीच मी स्वत:ला खूप शिणवून घेतलं होतं आणि मला विश्रांतीची गरज होती. दुसरी गोष्ट म्हणजे माझ्या पत्नीच्या शपथपूर्वक बोलण्यावर विश्वास ठेवण्याची माझी इच्छा होती आणि तसा मी विश्वास ठेवला. पण मी जरी मत्सरानं जळत नव्हतो तरीही जेवणभराच्या सर्व काळात आणि संगीतमैफलीच्या आधीच्या वेळात मी स्वस्थ बसू शकलो नाही. त्या दोघांपैकी एकाही बरोबर मी नीट वागू शकलो नाही. त्यांच्या हालचालींवर आणि कटाक्षांवर माझा सतत पहारा चालला होता.

"बहुतेक भोजन समारंभांप्रमाणं आमचा भोजन समारंभही ताठरलेला आणि कंटाळवाणा झाला. संगीताला जरा आधीच सुरुवात झाली. त्या सायंकाळचा प्रत्येक तपशील माझ्या मनावर स्पष्ट कोरला गेलाय! त्यानं व्हायोलिन कसं उचललं, केस

कशी उघडली, कुणा स्त्रीनं त्याच्यासाठी कशीदाकाम करून दिलेलं आवरण त्यानं कसं बाजूला केलं, वाद्य बाहेर काढून त्यानं सूर कसा लावला, ह्या सर्व गोष्टी मला आठवतात. आपला लाजाळूपणा लपविण्यासाठी माझ्या बायकोनं तिऱ्हाईत-पणाचा आव कसा आणला होता (तिच्या वाजविण्यापायी तो लाजाळूपणा मुळात निर्माण झाला होता) आणि हा खोटा भाव चेहऱ्यावर ठेवून ती कशी बसली होती, हे मला आठवतं. मग मध्यमातले स्वर वाजू लागले, तारांचा टणत्कार ऐकू येऊ लागला, स्वरलिपीच्या कागदांची जुळणी होऊ लागली. त्यांची कटाक्षांची परस्पर देवघेव झाली, जमलेल्या लोकांवरून त्यांच्या नजरा फिरल्या, एकमेकांशी ती दोघं काहीतरी कुजबुज-ली आणि नंतर वादनाला आरंभ झाला, हे मला आठवतं. तिनं पहिली पट्टी वाजविली. आपल्या सुरासाठी ऐकताना त्याच्या चेहऱ्यावर किती गंभीर, ताणलेला सुरेख भाव उमटला होता ते मला आठवतं. पियानोला साथ देण्यासाठी त्यानं सावधगिरीनं व्हायोलिनच्या तारांवर आपली बोटं दाबली. त्यांच्या वादनाला सुरुवात झाली."

तो थांबला आणि ओळीनं अनेक वेळा त्यानं आपला विचित्र आवाज काढला. परत बोलण्याचा त्यानं प्रयत्न केला तेव्हा त्याच्या गळयातून फक्त घुसमटलेला ध्वनी उमटला, म्हणून तो थांबला. नंतर त्यानं सावकाश बोलायला आरंभ केला:

"त्यांनी बीथोवनचा 'क्रेईत्सर सोनाटा' वाजविला. त्याचा पहिला प्रेस्तो माहीत आहे तुम्हाला? माहीत आहे?" ओरडून त्याने विचारले. "हं! तो सोनाटा फार भयंकर आहे. विशेषेकरून पहिली गत. आणि एकूणच संगीत महाभयानक आहे. काय आहे ते? मला समजत नाही. संगीत म्हणजे

काय? माणसाला ते काय करतं? आणि कशाला ते तसं करतं? असं म्हणतात की, संगीताचा आत्म्याला वरच्या पातळीवर न्यायला उपयोग होतो. मूर्खपणा. धादांत असत्य. संगीताचा परिणाम घडतो आणि भयंकर परिणाम घडतो हे नक्कीच (माझ्यापुरतं मी बोलू शकतो). पण आत्म्याला उच्च पातळीवर ते नेत नाही. ना ते वरच्या पातळीवर नेतं ना खालच्या! ते केवळ उत्तेजित करतं. कसं सांगू? संगीत मला स्वत:चा आणि माझ्या खऱ्या अवस्थेचा विसर पाडतं. माझ्या स्वत:च्या नसलेल्या अशा दुसऱ्या अवस्थेत ते मला घेऊन जातं. संगीताच्या प्रभावाखाली मला न भासणाऱ्या गोष्टी भासतात, न समजणाऱ्या गोष्टी समजतात, अशक्य गोष्टी शक्य होतात. खुलासा करायचा तर मी उदाहरण देईन की, जांभईप्रमाणं किंवा हास्याप्रमाणं संगीत माझ्यावर परिणाम करतं. मला झोप आलेली नसते, पण दुसऱ्याला जांभई देताना पाहिलं की मला जांभई येते. हसण्यासारखं मला काहीही आढळत नाही, पण तरीही दुसऱ्याचं हसणं ऐकून मी हसतो.

"संगीत लिहिताना रचनाकार ज्या मन:स्थितीत असेल त्या मन:स्थितीत संगीत मला तात्काळ घेऊन जातं. रचनाकाराच्या आत्म्याशी माझा आत्मा एकजीव होतो, त्याच्याबरोबरच मी दुसऱ्या मन:स्थितीत ओढला जातो. पण त्याच्या मन:स्थितीं-मधून मी का जातो ते मात्र मला सांगता येत नाही. याउलट रचनाकाराला – उदाहरणार्थ 'क्रेईत्सर सोनाटा' रचणाऱ्या बीथोवनला – निश्चित माहीत होतं की त्या मन:स्थितीत तो का होता. त्या मन:स्थितीनं त्याला विशिष्ट कृती करण्यास प्रवृत्त केलं. म्हणजे ह्या मन:स्थितीला त्याच्या दृष्टीनं अर्थ आहे, पण माझ्या दृष्टीनं तिला काहीच अर्थ नाही. संगीत

निरुद्देश उत्तेजित करतं. एवढं खरं की, जर लष्करी संचलन संगीत वाजवलं तर शिपाई संचलन करीत जातात. याचा अर्थ संगीतानं आपलं उद्दिष्ट साध्य केलं. जर नृत्यसंगीत वाजविलं तर मी नाच करतो आणि पुन्हा इथंही संगीत आपलं उद्दिष्ट साध्य करतं. तसंच चर्चमध्ये प्रार्थनासंगीत वाजवितात तेव्हा मी बाप्तिस्मा घेतो. पण इतर वेळी संगीत केवळ उत्तेजित करतं, त्या उत्तेजनाला वाट मोकळी करून देण्याची तरतूद न पुरविता! म्हणून संगीताचा एवढा भयंकर, काही-वेळा अत्यंत भयावह असा प्रभाव पडतो. चीनमध्ये संगीतावर सरकारचं नियंत्रण आहे. आणि तसंच ते असावं. कुणाही योगायोगानं भेटलेल्या व्यक्तीनं दुसऱ्या माणसाला मंत्रमुग्ध करावं (किंवा अनेकांना) आणि त्याच्याशी स्वतःला हवं त्याप्रमाणं वागावं, ह्याला मुभा आहे का? सर्वात वाईट म्हणजे हा मोहिनीमंत्र घालणारी व्यक्ती अनेकदा नीतीतत्त्वहीन असते.

"योगायोगानं भेटलेल्या व्यक्तींच्या हाती हे शस्त्र फार भयानक आहे. 'क्रेईत्सर सोनाटा'मधल्या पहिल्या गतीचं उदाहरण घ्या. ज्या दिवाणखान्यात उघड्या गळ्यांच्या पोषा-खातील महिलागण बसला आहे तिथं presto वाजविण्याचं धाडस कोण करील? तो वाजवायचा, त्याला टाळ्या द्यायच्या आणि मग आईस्क्रीम खात ताज्या भानगडी चघळायच्या? असं संगीत फक्त निश्चित आणि अर्थपूर्ण परिस्थितीत वाजविलं पाहिजे. जेव्हा त्या संगीताला अनुरूप अशा निश्चित आणि अर्थपूर्ण कामगिऱ्या हाती घेण्यात येतात तेव्हा! एकदा ते वाजविल्यानंतर, मनःस्थितीतून स्फुरलेल्या कृती अंमलात आणल्या पाहिजेत. अन्यथा स्थळ आणि काळ यांच्याशी न जुळणाऱ्या दबलेल्या भावना व शक्ती नक्कीच गोंधळ माजवतील.

निदान माझ्यावर तरी ह्या संगीताचा विध्वंसक परिणाम घडला. ज्यांची मला मुळीच जाणीव नव्हती अशा पूर्णत: नव्या भावनांचं आणि क्षमतांचं त्यानं मला दर्शन घडविलं. 'हे असं आहे' जणू ते मला सांगत होतं; 'तुला विचार करायची आणि जगायची सवय आहे तसं नाही, पण हे असं!' हा नवा मार्ग कोणता होता ते मला सांगता येत नाही, पण नव्या अवस्थेच्या जाणीवेनं मला खूप आनंद झाला. त्याच सर्व लोकांना – ती आणि तो यांच्यासह – अगदी एका नव्या दृष्टिकोनामधून मी पाहिलं.

"त्यांनी presto वाजविल्यानंतर आनंददायी पण सर्वसामान्य andante वाजविला. त्याच्यातल्या हरकती सुमार होत्या आणि अंतिम स्वर दुबळे होते. पाहुण्यांच्या आग्रहाखातर त्यांनी आणखी काही संगीताचे तुकडे वाजविले. मला वाटतं एर्न्स्टची विराणी आणि दुसरं काहीतरी. ते सगळं काही छान होतं, पण पहिल्या तुकड्यानं माझ्यावर जो परिणाम घडविला होता त्याच्या एक-दशांशानंसुद्धा बाकी संगीताचा माझ्यावर परिणाम घडला नाही. पहिल्या संगीताच्या प्रभावाच्या पार्श्वभूमीवर मी बाकीचं संगीत ऐकलं. उरलेली सारी संध्याकाळ मी खूप मजेत आणि गंमतीत होतो. माझी बायको त्यावेळी जशी दिसली तशी पूर्वी कधीही मी पाहिली नव्हती. ती वाजवीत होती तेव्हा तिच्या डोळ्यांमध्ये दिसणारी चमक, तिच्या चेहऱ्यावरचा गंभीर आणि महत्त्वपूर्ण भाव, वादन संपल्यानंतर तिच्या देहाला आलेली शिथिलता, तिचं आनंदी तरीही करुण वाटणारं मंद स्मित. हे सर्व काही मी पाहिलं, पण त्यातून एवढाच अर्थ काढला की, माझ्याप्रमाणंच तिनंही आठवणींच्या

खोल कप्प्यांमधून निर्माण झालेल्या नव्या आणि अपरिचित भावना अनुभवल्या होत्या.

"संध्याकाळ यशस्वीरीत्या पार पडली आणि प्रत्येकजण आपापल्या घरी गेला.

"त्यानंतर दोन दिवसांनी मी परिषदेच्या बैठकीला जाणार होतो हे त्रूखाचेवस्कीला समजलं तेव्हा आमचा निरोप घेताना त्यानं आशा व्यक्त केली की, पुढील वेळी तो आमच्या शहरी येईल तेव्हा अशीच आणखी एक सुखद संध्याकाळ आमच्या सहवासात व्यतीत करण्याची त्याला संधी मिळेल. मी ह्याचा असा अर्थ घेतला की, मी दूर असताना माझ्या घरी येणं अशक्य होतं असं त्यानं मानलं होतं आणि ह्याचा मला आनंद झाला. तो शहर सोडून जाण्यापूर्वी मी बैठकीहून परत येणार नसल्यामुळं मी गृहीत धरलं की, मी त्याला परत भेटणार नाही.

"पहिल्या प्रथमच मी त्याच्याशी मनःपूर्वक हस्तांदोलन केलं आणि त्याचे आभार मानले. माझ्या पत्नीचाही त्यानं जणू दीर्घ काळासाठी निरोप घेतला. त्यांचं वागणं अत्यंत नैसर्गिक आणि सभ्य होतं असं मला भासलं. सर्व काही उत्कृष्ट होतं. त्या संध्याकाळवर माझी पत्नी आणि मी असे दोघंही खूप खूष होतो."

## २४

"दोन दिवसानंतर मी खेड्याकडं जायला निघालो. अगदी हलक्या अंतःकरणानं आणि छान मनःस्थितीत मी माझ्या बायकोचा निरोप घेतला.

"खेड्यात कामं संपता संपत नाहीत. तिथलं जग वेगळं

आहे. तिथल्या आयुष्याची वैशिष्टचं वेगळी आहेत. पहिले दोन दिवस सभेच्या बैठकीला मी सतत दहा दहा तास हजर राहिलो. दुसऱ्या दिवशी माझ्या बायकोचं पत्र मला आणून देण्यात आलं. मी ते ताबडतोब वाचलं. पत्रामध्ये तिनं मुलां-विषयी, आपल्या काकाविषयी, दाईविषयी लिहिलं होतं; तिनं विकत घेतलेल्या वस्तूंविषयी लिहिलं होतं आणि मग जणू काही सहज जाता जाता सांगावं त्याप्रमाणं उल्लेख केला होता की, त्रूखाचेवस्कीनं घरी येऊन कबूल केलेले संगीताचे काही कागद दिले होते. त्यानं वादनाची तयारी दाखविली होती, पण तिनं नकार दिला होता. त्यानं तिला कुठली संगीतरचना देण्याचं कबूल केलेलं मला तरी आठवत नव्हतं. माझी अशी समजूत झाली होती की, त्यानं तिचा कायमचा निरोप घेतला होता. म्हणून मला सखेद आश्चर्य वाटलं. पण संध्याकाळी निवासावर पोहोचेपर्यंत मी खूप कामात गुंतल्यामुळं ह्या विषयावर विचार करायला मला वेळ मिळाला नाही. संध्याकाळी निवासस्थानी आल्यानंतर ते पत्र मी पुन्हा वाचलं. त्यावेळी मला जाणवलं की, माझ्या अनुपस्थितीत त्रूखाचेवस्की घरी येऊन गेला होता ह्या अप्रिय बातमीच्या जोडीलाच, एकूण पत्राचा सूर ताणलेला होता. मत्सराच्या वेड्या पशूनं आपल्या गुहेमधून डरकाळी फोडली आणि बाहेर यायचा प्रयत्न केला. पण त्याच्या पाशवी शक्तीची मला एवढी भीती वाटत होती की, मी त्याला परत आत लोटलं. 'मत्सर ही किती नीच भावना आहे!' मी स्वतःशी म्हणालो. 'ती ज्या गोष्टी मला लिहिते त्याहून अधिक स्वाभाविक ते काय?'

"मी बिछान्यावर पडलो आणि दुसऱ्या दिवशीच्या कामांचा विचार करू लागलो. सर्वसाधारणपणं परक्या ठिकाणी मला

झोप लागणं कठीण जातं, पण त्या रात्री मला तात्काळ झोप लागली. मात्र काही वेळा घडतं त्याप्रमाणं मी अचानक जागा झालो. जणू विजेचा धक्का बसावा तसा! तिच्याविषयीचे, तिच्याबरोबरच्या माझ्या वैषयिक प्रेमाचे विचार मी जागा झालो तेव्हा माझ्या मनात होते. त्रूखाचेवस्कीला तिच्यापासून जे हवं होतं ते एव्हाना त्याला मिळालं असणार असा विचार मनात आला. संतापानं आणि भयानं मी ताठरलो. पण माझ्याशीच युक्तिवाद घालायला मी आरंभ केला: 'हा सगळा मूर्खपणा आहे,' मी स्वतःला बजावलं. 'असं वाटून घ्यायचं काही कारण नाही. त्या दोघांमध्ये काहीही नाही आणि कधीही काही नव्हतं. असं भयानक काहीतरी मनात आणून तू स्वतःला आणि तिला एवढ्या खालच्या पातळीवर कसा नेतोस? तो एक भाडोत्री फिडल वाजवणारा, बदनाम माणूस! आणि ती एक प्रतिष्ठित स्त्री, कुटुंबाची माता, तुझी स्वतःची पत्नी. केवढी विसंगती!' युक्तिवादाची ही एक बाजू होती. पण दुसरीही बाजू होती: 'त्या गोष्टीशिवाय दुसरं काय असू शकणार? ज्या गोष्टीसाठी मी तिच्याशी लग्न केलं, ज्या गोष्टीसाठी मी तिच्याबरोबर राहतो, त्या साध्या, सामान्य गोष्टीविना दुसरं काय असणार? एवढ्या एकाच गोष्टीची मी तिच्याकडून अपेक्षा करतो आणि ह्या संगीतकारासकट इतर सर्व पुरुषांची तेवढीच तिच्यापासून इच्छा आहे. तो एकटा आहे, त्याची प्रकृती चांगली आहे (मटणाचा तुकडा त्यानं दातांखाली कसा रगडला होता आणि आपल्या लाल ओठांनी मद्याचा प्याला कसा हावरटाप्रमाणं चाटून साफ केला होता ते मला आठवलं). तुकतुकीत, पुष्ट देहाचा हा माणूस एकच तत्त्व उराशी बाळगून जगत होता—आल्या संधीचा फायदा

घ्यायचा! तो आणि माझी बायको संगीताच्या धाग्यांनी एकत्र आले होते. वासना उत्तेजित करायला त्याहून उत्तम साधन नव्हतं. त्याला आवरायला तिथं काय होतं? काहीच नाही. उलट प्रत्येक गोष्ट त्याला प्रवृत्त करणारी होती. ती? कोण आहे ती? एक गूढ. नेहमीच ती एक गूढ राहिलीय. मी तिला जाणलेलं नाही. मला फक्त तिचा पाशवी स्वभाव माहीत आहे. आणि पशूला संयम माहीत नसतो; संयमाची त्याला गरज नसते.'

"तेव्हा कुठं मला आठवण झाली की, त्या संध्याकाळी 'क्रेईत्सर सोनाटा' वाजविल्यानंतर त्यांच्या मुद्रा बदलल्या होत्या आणि त्यांनी एक भावनावेगी संगीताचा तुकडा वाजविला होता. ते विकारी, उत्तेजक संगीत कुणी रचलंय हे मला आठवत नाही. 'कसा काय मी घर सोडून दूर निघून आलो?' त्यांच्या मुद्रांवरील भाव आठवीत मी स्वतःला प्रश्न केला. 'त्या दोघांमध्ये त्याच संध्याकाळी सर्व काही ठरून गेलं होतं हे स्पष्ट नाही का? त्या दोघांना विभक्त करणारे अडथळे राहिले नव्हते आणि त्यांच्यात जे घडून गेलं होतं त्याची त्या दोघांना, विशेषतः तिला, लाज वाटली होती हे स्पष्ट झालं नव्हतं का?' माझ्याकडं पाहून तिनं मंद, करुण, सुखद स्मित केल्याचं मला आठवलं. पियानोपाशी मी गेलो होतो तेव्हा तिनं आपला लालबुंद झालेला, घामाच्या धारा वाहणारा चेहरा कसा पुसला होता ते मला आठवलं. तेव्हासुद्धा त्या दोघांनी एकमेकांच्या नजरा टाळल्या होत्या. केवळ रात्रीच्या जेवणावेळी जेव्हा त्यानं तिच्या ग्लासात सोडा ओतला तेव्हा त्यांनी एकमेकांकडं सरळ पाहिलं आणि अगदी किंचित स्मित केलं. तो कटाक्ष आणि ते पुसट स्मित मी नेमकं हेरलं होतं त्याची

आठवण होताच भीतीनं शहारलो. 'सारं काही संपलंय,' एका आवाजानं मला सांगितलं. तर दुसरा आवाज काही वेगळंच म्हणाला: 'तुला काहीतरी झालंय! जे कदाचित खरं नाही अशा गोष्टीविषयी तू झुरतो आहेस.' तिथं अंधारात पडून राहणं मला असह्य झालं. मी काडी ओढली. भिंतींना पिवळा कागद लावलेल्या त्या छोटया खोलीत मला भीती वाटू लागली. मी सिगारेट पेटविली आणि धूम्रपान करू लागलो. एखाद्या कठीण समस्येभोवती मन घिरटया घालू लागलं म्हणजे मी नेहमी धूम्रपान करतो. एकामागून एक सिगारेटी मी ओढीत होतो. माझ्या समस्येच्या कठीणतेविषयीच्या माझ्या संवेदना बधीर करून टाकण्याचा तो प्रयत्न होता.

"त्या रात्री मला पुढं झोप लागली नाही. इतःपर ताण सहन करणं शक्य नाही आणि ताबडतोब घरी परतलं पाहिजे असा पहाटे पाच वाजता माझा निर्णय झाला. मी उठलो, तिथल्या वॉचमनला उठवलं आणि घोडे आणायला त्याला पाठविलं. माझ्या साथीदारांना मी चिठी पाठवून कळविलं की, तातडीच्या कामासाठी अनपेक्षितपणं मला मॉस्कोला बोलावण्यात आलं होतं आणि माझ्या जागी त्यांनी दुसऱ्या कुणाची तरी नेमणूक करावी.

"आठ वाजता मी घोडागाडीत बसलो आणि मॉस्कोला जायला निघालो."

२५

कंडक्टर आत आला. आमची मेणबत्ती जवळ जवळ जळून गेल्याचे पाहून त्याने ती विझवून टाकली, पण नवी मेणबत्ती तेथे लावली नाही. बाहेर उजाडू लागले होते. पोझ्दनीशेवने

खोल उसासा टाकला, परंतु कंडक्टर आमच्या डब्यात होता तोवर तो अक्षरही बोलला नाही. जेव्हा कंडक्टर निघून गेला आणि अर्धवट अंधाऱ्या डब्यात दुकानविक्रेत्याच्या घोरण्याचा आवाज व डगडगणाऱ्या आगगाडीच्या खिडक्यांची खडखड यांशिवाय दुसरे काहीही ऐकू येईनासे झाले, तेव्हाच त्याने पुन्हा कहाणी सांगायला सुरुवात केली. पहाटेच्या अंधुक उजेडात मी त्याला पाहू शकत नव्हतो. मला फक्त त्याचा आवाज ऐकू येत होता. त्यात भावनावेग आणि यातना अधिकाधिक ठळकपणे जाणवू लागल्या होत्या.

"घोडागाडीतून पस्तीस वेर्स्ता आणि आगगाडीतून आठ तास एवढा प्रवास मला करावा लागला. घोडागाडीमधला प्रवास आनंददायक होता. शरदामधली गोठलेली सकाळ होती. चकचकीत ऊन पडलं होतं. अशा वेळी तेलकट रस्त्यावर चाकांच्या ठळक खुणा उमटतात हे तुम्हाला माहीत आहेच. रस्ता सरळ आहे, छान ऊन पडलंय आणि हवा जोमदार आहे. घोडागाडीतून प्रवास करायला मोठी मजा होती. सकाळ झाली आणि मी मार्गस्थ झालो तेव्हापासून मला अधिक बरं वाटू लागलं होतं. दौडणाऱ्या घोड्यांकडं पाहताना, शेतांना पाहताना, वाटेत भेटणाऱ्या लोकांना पाहताना, माझं भान हरपून गेलं. मी कुठं निघालो होतो हेच विसरून गेलो. काहीवेळा तर मला असा भास झाला की, मी मजेनं केवळ सफर करायला निघालो होतो आणि त्या सफरीचं कारण निव्वळ काल्पनिक होतं. त्या विसरण्यामध्ये मी विशेष आनंद अनुभवला. जेव्हा जेव्हा मला मी कुठं निघालोय ह्याची आठवण होई तेव्हा तेव्हा मी स्वतःला बजावीत होतो: 'विचार करू नको. योग्य वेळी सारं काही स्पष्ट होईल.' प्रवासात काहीतरी

घडलं आणि त्यामुळं मला उशीर झाला, माझं अवधान दुसरीकडं गेलं. घोडागाडी मोडली आणि तिला दुरुस्त करणं भाग पडलं. ह्या अपघातापायी प्रचंड परिणाम घडले. त्याच्या-पायी माझी एक्सप्रेस गाडी चुकली आणि मेलगाडीनं मला प्रवास करावा लागला. त्यामुळं मॉस्कोत अपेक्षेप्रमाणं संध्याकाळी पाचला न पोहोचता रात्री बारा वाजता मी पोहोचलो.

"घोडागाडीतला प्रवास, तिची दुरुस्ती, हिशेब चुकते करणं, एका पथिकाश्रमात दुपारचं भोजन, एका यार्ड पोर्टरबरोबर गप्पा मारणं, ह्या सर्व गोष्टींपायी माझं मन सतत गुंतून राहिलं होतं. संध्याकाळच्या दरम्यान सर्व काही तयार होतं आणि मी परत प्रवास सुरू केला. दिवसापेक्षा संध्यावेळेला प्रवास अधिक सुखकर होता. चंद्राची कोर चमकत होती, किंचित गारठा होता. रस्ता सुरेख होता, घोडे छान होते, गाडीवान गंमत्या होता. मी खूप मजेत होतो. कोणता प्रसंग माझी वाट पहात होता याबद्दल मी विचारच करीत नव्हतो. किंवा माझ्यापुढं काय वाढून ठेवलेलं होतं याची आधी कल्पना असल्यामुळंच कदाचित मी खूप मजा लुटीत होतो, जीवनाच्या आनंदांची शेवटची चव अनुभवीत होतो.

"पण मनाचा हा समतोल, माझ्या भावना दाबून ठेवण्याची ही क्षमता, घोडागाडीच्या प्रवासाबरोबरच संपली. आगगाडीच्या डब्यात प्रवेश केल्यापासून मला वेगळीच अनुभूती येऊ लागली. मी जिवंत असेपर्यंत त्या आठ तासांच्या रेलप्रवासात झालेल्या यातना विसरणं शक्य नाही. कदाचित आगगाडीच्या डब्यात प्रवेश करताच जवळ जवळ घरी पोहोचल्याचा भास झाला म्हणून असेल, अथवा रेलगाडीचा प्रवास नेहमीच मज्जा-संस्थेवर परिणाम करतो म्हणून असेल! कारण काहीही असले

तरी डब्यात माझी जागा घेतल्या क्षणापासून माझ्या कल्पना-शक्तीला आवर घालणं मला अशक्य ठरलं. मनःचक्षूंसमोर येणाऱ्या एकेका दृश्यागणिक माझा मत्सर जास्त पेटत होता. प्रत्येक पुढचं दृश्य पहिल्यापेक्षा जास्त बीभत्स होतं. माझ्या अनुपस्थितीत ती कशी वागत होती, मला ती कशी फसवीत होती ह्याबद्दलचीच ती कल्पनाचित्रं होती. चीड आणि संताप यांनी मी फुलून गेलो होतो. ह्या दृश्यांच्या कल्पनेपायी झालेल्या माझ्या मानहानीचा आनंद जणू मी लुटत होतो. त्या दृश्यांना मी बाजूला सारू शकत नव्हतो, त्यांच्यावरून नजर बाजूला करू शकत नव्हतो, कल्पनेनं त्यांना घडवणं थांबवू शकत नव्हतो. ही काल्पनिक चित्रं मी जेवढा जास्त वेळ मनात घोळविली, तेवढी ती मला अधिक खरी वाटू लागली. ज्या स्पष्टपणं ती माझ्या मनात उमटली होती, तो माझ्या कल्पना वास्तव असल्याचा पुरावा होता. माझ्या इच्छेविरुद्ध कुणी सैतान अत्यंत भयानक कल्पना शोधून काढीत होता आणि माझ्या कानात हळूच सांगत होता. त्याआधी कित्येक वर्षां-पूर्वी, त्रुखाचेवस्कीच्या भावाबरोबर झालेल्या एका बोलण्याची मला आठवण झाली. त्याचा संदर्भ संगीतकाराशी आणि माझ्या बायकोशी जोडून त्या बोलण्याच्या आठवणींनी माझ्या काळजाला दुखावून घेण्यात मला एक विकृत आनंद मिळत होता.

"अनेक वर्षांपूर्वी ते बोलणं घडलं होतं, पण मला ते स्पष्ट आठवत होतं. वेश्यागृहांना तुम्ही जाता किंवा नाही, ह्या माझ्या प्रश्नाला उत्तर देताना त्रुखाचेवस्कीचा भाऊ म्हणाला होता की, कुणीही भला माणूस जिथं संसर्ग बाधेल अशा ठिकाणी जाणार नाही. प्रतिष्ठित बाई मिळण्याची खात्री

नेहमी असताना तो तशा भाडोत्री आणि घाणेरड्या जागी जाणार नाही. आणि बघा! त्याच्या भावाला माझी बायको सापडली. 'आता ती तेवढी ताजीतवानी राहिलेली नाही हे खरं. तिचा डाव्या बाजूचा एक दात पडलाय आणि ती थोडीशी स्थूल आहे,' मी त्याच्या दृष्टीकोनातून युक्तिवाद करीत होतो, 'पण इलाज नाही; जे समोर मिळतं ते माण-सानं घेतलं पाहिजे.' 'खरं म्हणजे तिला आपली रखेली बनवून एका तऱ्हेनं तिच्यावर तो उपकारच करीत होता,' मी स्वतःशी म्हणालो. 'पण तिच्यापासून संसर्गाची बाधा होण्याचा धोका नाही.' 'हे तू काय म्हणतोस? असा विचार करणंच अशक्य आहे!' घाबरून मी स्वतःला म्हणालो. 'छेः छेः, तसलं काहीही घडलेलं नाही. असा तर्क करण्यास तुला मुळीच आधार नाही. अशा माणसाचा मत्सर करणं तुझ्यासारख्याला कमीपणाचं आहे असं तिनं स्वतःच तुला सांगितलं नाही का? हो, पण ती खोटं बोलत होती, खोटं सांगत होती!' मी आतल्या आत ओरडलो आणि मग पुन्हा ते सारं सुरू झालं...

"आमच्या डब्यात आणखी फक्त दोनच प्रवासी होते— एक म्हातारी आणि तिचा नवरा. दोघंही अबोल होती. मधल्या एका स्टेशनावर ती उतरून गेली आणि मी एकटा राहिलो. पिंजऱ्यामधल्या जनावरासारखी माझी अवस्था झाली होती. क्षणात मी उडी मारून खिडकीपाशी जायचा, तर दुसऱ्या क्षणी लटपटत उठा-बशा काढायचा. जणू त्यामुळं आगगाडीचा वेग वाढणार होता! पण आत्ता जशी आपली आगगाडी स्वतःच्या वेगानं हिंदकळत चाललीय, तशीच त्यावेळी ती आगगाडी आपल्या वेगानंच चालली होती."

पोझ्दनीशेव उडी मारून उठला आणि त्याने एक-दोन चकरा मारल्या. परत तो खाली बसला.

"आगगाडीच्या डब्यांमधून प्रवास करायची मला खूप खूप भीती वाटते. नेहमीच मला त्यांची धास्ती वाटते. खरंच धास्ती वाटते," तो पुढे बोलू लागला. "मी स्वतःला सारखा सांगत होतो, 'मी दुसऱ्या कसल्या तरी गोष्टीचा विचार केला पाहिजे... उदाहरणार्थ ज्या पथिकाश्रमात मी दुपारी जेवलो होतो तिथला.' माझ्या मनःचक्षूंसमोर दाढीवाला पोर्टर आणि माझ्या वास्याच्याच वयाचा त्याचा नातू दिसू लागे. 'माझा वास्या! एखाददिवशी संगीतकार त्याच्या आईचं चुंबन घेत असलेलं तो पाहणार! बिचाऱ्या पोराला किती त्रास होईल! पण त्याचं तिला काहीच नाही! ती प्रेमात आहे! ..' पुन्हा तीच गोष्ट. 'छेः! आमच्या स्थानिक इस्पितळाच्या पाहणीचा मी विचार करीन. काल तो पेशंट डॉक्टरबद्दल किती तक्रार करीत होता. डॉक्टरच्या मिशा त्रुखाचेवस्कीसारख्या होत्या. तो निघून जातोय असं धीटपणानं सांगून त्यानं आणि तिनंसुद्धा मला फसवलं!' आणि पुन्हा ते सुरू झालं. प्रत्येक गोष्ट, मी करीत असलेला प्रत्येक विचार मला परत परत त्याच्याचकडं नेत होता. मला विलक्षण त्रास झाला. माझ्या यातनांचं मुख्य कारण माझ्या अज्ञानामध्ये होतं, माझ्या संशयांमध्ये होतं, माझ्या डळमळतेपणात होतं. तिच्यावर प्रेम करावं अथवा तिचा तिटकारा करावा हेच मला उमगत नव्हतं. माझं दुःख एवढं तीव्र होतं की, आगगाडीच्या डब्यातून खाली उतरून रूळांवर पडून आपल्या जीवनाचा शेवट करावा, असा विचार मला स्वागतार्ह वाटल्याचं आठवतं. मग निदान संशयापायी आणि अनिश्चिततेपायी माझा पुढं छळ

झाला नसता. स्वत:बद्दलची कीव आणि पाठोपाठ अपरिहार्यपणं तिच्याबद्दल वाटणारा जोरदार तिरस्कार—या गोष्टीपायी आत्महत्येच्या विचारापासून मी परावृत्त झालो. त्याच्याबद्दल वाटणारा तिरस्कार माझ्या मानहानीच्या आणि त्याच्या दिग्विजयाच्या जाणीवेशी मिसळला गेला होता. तिच्याविषयी मला निव्वळ तिटकारा वाटत होता. 'आत्महत्या करून तिला मोकाट सोडणं इष्ट नाही. तिलाही यातना भोगायला लावल्या पाहिजेत. मी कसल्या दिव्यामधून गेलो हे तिलाही समजलं पाहिजे' मी स्वत:शी म्हणालो. माझ्या विचारांपासून चित्त दुसरीकडं नेण्यासाठी प्रत्येक स्टेशनवर मी खाली उतरत होतो. एका स्टेशनच्या रेस्तराँमध्ये काही माणसं मद्यपान करताना दिसली तेव्हा मीही स्वत:साठी थोडी वोदका मागविली. माझ्याशेजारी उभा असलेला एक ज्यू माणूसही पीत होता. त्यानं माझ्याशी गप्पा मारायला सुरुवात केली आणि माझ्या डब्यात एकट्यानं बसणं टाळण्यासाठी मी त्याच्या घाणेरड्या, धुरानं भरलेल्या, तिसऱ्या वर्गाच्या डब्यात गेलो. त्या डब्यात खाली सर्वत्र सूर्यफुलाच्या बियांच्या टरफलांचा सडा पडला होता. मी त्याच्याशेजारी बसलो. त्यानं अनेक गोष्टींविषयी वटवट केली आणि खूप विनोद ऐकविले. मी ऐकत होतो, पण तो काय बोलत होता ते मला समजत नव्हते. कारण माझं मन माझ्याच विचारांमध्ये व्यग्र होतं. त्याच्या हे लक्षात आलं. मी त्याच्या बोलण्याकडं जास्त लक्ष पुरवावं असा त्यानं आग्रह धरला. मी उठलो आणि माझ्या डब्यात परतलो. 'मला विचार केला पाहिजे,' मी स्वत:ला बजाविलं. 'मी जो विचार करतोय ते बरोबर आहे किंवा नाही आणि एवढ्या यातना सोसण्याचं मला खरोखरीच काही कारण आहे का,

हे मला समजलं पाहिजे.' शांतपणं विचार करण्यासाठी मी खाली बसलो, पण शांतपणं विचार करण्याऐवजी मी परत तसाच विचार करू लागलो. सुजाण विचारांऐवजी वेगवेगळी दृश्यं आणि भलभलत्या कल्पना तरळू लागल्या. 'गेल्या काही काळात किती वेळा माझा असा छळवाद झालाय!' मत्सराच्या इतर झटक्यांचा विचार करीत मी स्वतःशी म्हणालो. 'आणि दरवेळी काहीही निष्पन्न झालं नाही. यावेळीसुद्धा ती शांतपणं बिछान्यात झोपलेली आढळेल असं मला वाटतं. नव्हे खात्री वाटते! ती जागी होईल आणि मला पाहून तिला आनंद होईल. तिचे शब्द आणि तिचा चेहरा माझी खात्री पटवतील की, काहीही घडलं नव्हतं! सगळ्या माझ्याच पिसाट कल्पना होत्या. असं असलं तर किती छान होईल!' 'नाही! खूपदा तसा शेवट घडलाय. ह्यावेळी शेवट वेगळा असेल,' दुसरा आवाज बोलला आणि पुन्हा सर्व सुरू झालं. हीच मला मिळा-लेली शिक्षा होती. वासनांपासून मुक्त करण्यासाठी तरुणांना सिफिलिसच्या रोग्यांच्या इस्पितळात मी घेऊन गेलो असतो. त्यांना माझ्या आत्म्यात डोकावून बघायला सांगितलं असतं. तिथं सैतान त्या आत्म्याच्या चिंध्या करीत असलेला त्यांनी पाहिला असता. भयानक गोष्ट म्हणजे तिच्या देहाची संपूर्ण आणि निर्विवाद मालकी माझ्याकडं असावी असा दावा मी करीत होतो. जणू काही तो माझाच देह होता! मात्र त्याचवेळी मला जाणीव झाली होती की, तिच्या देहाचा मालक बनणं मला शक्य नव्हतं, तिचा देह हा माझा नव्हता; तिच्या इच्छेप्रमाणं आपल्या देहाची वासलात ती लावू शकत होती आणि ज्या पद्धतीनं ती वासलात लावीत होती त्या पद्धतीनं तिनं लावू नये असं मला वाटत होतं. आणि ह्या

बाबतीत त्याला किंवा तिला मी काहीच करू शकत नव्हतो. गाण्यातल्या वान्का वॉर्डरप्रमाणं फाशीच्या तख्ताकडं जाताना तिच्या चुंबनांविषयीचं गाणं तो गाणार होता. मृत्यूतसुद्धा तो माझ्याहून वरचढ ठरणार होता. हा गुन्हा जर अद्याप तिनं केला नसला तरी तो करण्याची तिची इच्छा होती. तिची तशी इच्छा होती हे मला ठाऊक होतं आणि त्यामुळं आणखीच वाईट घडलं होतं. तिनं एव्हाना तो गुन्हा केला असेल तर अधिक बरं ठरणार होतं, कारण मला ते माहीत होतं आणि इतःपर संशय राहणार नव्हता. माझ्या इच्छेप्रमाणं मी बोलू शकलो नसतो. ज्याची वांच्छा धरल्याविना ती राहू शकत नव्हती, त्याची इच्छा तिनं धरू नये असं मला वाटत होतं. एकूण सर्वच कमालीचा मूर्खपणा होता."

## २६

"शेवटच्या स्टेशनच्या आधीच्या स्टेशनावर कंडक्टर आमची तिकीटं गोळा करायला आला. मी बॅग उचलून डब्याच्या दाराशी जाऊन उभा राहिलो. आता निर्णयाचा क्षण जवळ येऊन ठेपला ह्या जाणीवेनं माझी हुरहुर अधिक वाढली. माझे हात-पाय गार पडले, सगळं शरीर थरथर कापू लागलं, दात कडाकडा वाजू लागले. यांत्रिकपणं मी गर्दीपाठोपाठ स्टेशनाबाहेर पडलो, एक गाडीवान ठरविला आणि घोडागाडीत बसून निघालो. रस्त्यांवर तुरळक माणसं दिसत होती, हमाल दिसत होते. रस्त्यांवरील दिव्यांच्या सावल्या कधी माझ्या गाडीच्या पुढं, तर कधी मागं नाचत होत्या. माझं डोकं सुन्न होतं. सुमारे अर्धा वेर्स्ता अंतर गेल्यानंतर माझे पाय गार पडल्याचं

माझ्या ध्यानात आलं. आगगाडीत मी पायातले लोकरी मोजे काढून टाकले होते आणि पेटीत ठेवले होते. माझी पेटी कुठं होती? इथं? इथं. आणि टोपली? माझ्या सामानाबद्दल मी पुरतं विसरून गेलो होतो. पण आता मला आठवण झाली होती. मी पावती शोधून काढली. परत मागं जाण्यात अर्थ नाही असा मी विचार केला आणि पुढचा मार्ग कापीत राहिलो.

"त्यावेळी मी कोणत्या मनःस्थितीत होतो हे प्रयत्न करूनही मला आठवत नाही. मी कशाचा विचार करीत होतो? मला काय हवं होतं? काहीतरी अत्यंत भयानक आणि खूप महत्त्वाची घटना घडणार अशी पूर्वजाणीव मनाला होत होती. त्या व्यतिरिक्त दुसरं काहीही मला आठवत नाही. ही खूप महत्त्वाची घटना माझ्या इराद्यांमुळं घडली अथवा माझ्या पूर्वजाणीवेमुळं घडली ते मला माहीत नाही. किंवा कदाचित माझं मन रितं होतं आणि नंतर केवळ मी कल्पना केली की, असे उदास विचार माझ्या मनात आले होते.

"प्रवेशद्वारापर्यंत मी घोडागाडी नेली. रात्री एकचा सुमार झाला होता. घरासमोर अनेक गाडीवान उभे होते, कारण घराच्या खिडक्यांमधून प्रकाश दिसत असल्यानं गिऱ्हाईकं मिळण्याची त्यांना आशा वाटत होती (प्रकाशित खिडक्या आमच्या घराच्या होत्या — दिवाणखान्याच्या आणि स्वागतकक्षाच्या खिडक्या!). एवढ्या उशीरा आमच्या घराच्या खिडक्यांमध्ये उजेड कसा, असा आश्चर्याचा विचारही मनात न आणता मी पायऱ्या चढलो आणि घंटा वाजविली. काहीतरी भयानक लौकरच घडणार असं मनात अजूनही जाणवत होतं. आमच्या हुजऱ्यानं — प्रेमळ, मूर्ख, कष्टाळू येगोरनं — दरवाजा उघडला. पहिली वस्तू माझ्या दृष्टीला पडली ती म्हणजे देवडीवर टांगलेला

त्याचा कोट! मी चकित व्हायला पाहिजे होतं. पण तसं काही वाटलं नाही. मला ही अपेक्षाच असावी. 'अच्छा, म्हणजे माझा तर्क खरा होता,' मी स्वतःशी म्हणालो. येगोरपाशी मी चौकशी केली तेव्हा त्रूखाचेवस्की घरात असल्याचं समजलं. आणखी कुणी आहे का, अशी मी विचारणा केली.

"'आणखी कुणी नाही, धनी,' येगोर उत्तरला.

"त्याच्या स्वरामधला आनंद मला आठवतो. दुसरं कुणी असेल ह्याबद्दलच्या माझ्या भीतीला घालवून टाकण्याची जणू त्याला घाई झाली होती. 'कुणीही नाही? अस्सं!' मी स्वतःशी म्हणालो.

"'मुलं?'

"'सगळी छान आहेत. देवाची कृपा. केव्हाच झोपलीत.'

"माझा श्वास घुसमटला होता. माझ्या ओठांची थरथर मला थांबविता येईना. 'म्हणजे यावेळी वेगळं आहे! इतर वेळांना मी दुर्दैवाची अपेक्षा केली होती, पण तसं घडलं नव्हतं. सारं काही ठीक होतं. ह्यावेळी काहीच ठीक नव्हतं. ते घडलं होतं. माझ्या समोर ठाकलं होतं...'

"माझं मन जवळ जवळ कोलमडलं होतं. पण कुणी सैतान माझ्या कानात कुजबुजला: 'काय? तू रडणार आणि दुबळ्या-सारखा बसणार? तोवर ती दोघं संभावितपणं एकमेकांचा निरोप घेतील आणि आपल्या पापाचा कोणताही पुरावा ठेवणार नाहीत. अशा शंकाकुल मनानं कायम छळवाद सोशीत बसणार तू?' क्षणात माझी स्वतःबद्दलची करुणा नाहीशी झाली आणि एका नव्या भावनेचा पगडा बसला. तुमचा विश्वास बसणार नाही, पण माझ्या यातना सरतेशेवटी संपल्याचा तो मनस्वी

आनंद मी अनुभवीत होतो. आता मी तिला शासन करणार, तिच्या तावडीतून मुक्त होणार, माझ्या संतापाला वाट मोकळी करून देणार, ह्याचा मला आनंद झाला होता. माझ्या संतापाला मी वाट मोकळी करून दिली! मी पशू बनलो! क्रुद्ध आणि धूर्त पशू!

"दिवाणखान्यात परतणाऱ्या येगोरला मी थांबविलं, 'अरे जरा थांब. ही पावती घे आणि स्टेशनावरून माझं सामान आण. दाराशी गाडीवान उभा आहे.'

"आपला कोट आणण्यासाठी तो हॉलमध्ये गेला. त्यांना तो दचकवील अशी भीती वाटून मी त्याला त्याच्या खोलीपर्यंत सोबत केली आणि तो कोट अंगात चढवीपर्यंत वाट पहात तिथंच उभा राहिलो. दिवाणखान्यापलिकडं असलेल्या स्वागत-कक्षामधून कुजबुजण्याचे आवाज येत होते; काटचा-सुऱ्यांची आणि बशांची किणकिण ऐकू येत होती. ती दोघं खाण्यात रमली होती आणि दारावरची मी वाजवलेली घंटी त्यांनी ऐकली नव्हती. 'आत्ता ती दोघं बाहेर आली नाहीत तर किती बरं होईल,' माझ्या मनात विचार आला. अस्त्राखान कॉलरचा कोट अंगात घालून येगोर बाहेर गेला. मी दारापर्यंत त्याला सोबत केली आणि त्याच्या पाठी दार बंद केलं. मी एकटा होतो आणि मला आता कृती करायची होती ह्या जाणीवेनं भीतीची भावना मनात उमटली. मी काय करायचं हे अजून ठरवलं नव्हतं. मला एवढंच माहीत होतं की, आता सर्व काही संपलं होतं. तिच्या निष्पापतेचा आता प्रश्नच उरला नव्हता. तिला शासन करण्याची आणि तिच्याबरोबरचे माझे संबंध संपविण्याची वेळ येऊन ठेपली होती.

"पूर्वी माझी नेहमी चलबिचल व्हायची. मी स्वतःला

सांगायचा : 'कदाचित हे खरं नाही. माझी बहुधा चूक होतेय.' आता मला तसं काहीही वाटत नव्हतं. माझी पूर्ण खात्री पटली होती. माझ्या गैरहजेरीत, रात्रीच्या वेळी त्याच्याबरोबर एकटी? सारा विवेक तिनं वाऱ्यावर उधळून दिला होता. त्याहून वाईट केलं होतं! गुन्हा करण्याचा हा धीटपणा, हा अविचारीपणा म्हणजे निष्पापता सिद्ध करण्यासाठी मुद्दाम आणलेली धिटाई होती. सर्व काही स्पष्ट होतं. शंकेला जागाच उरली नव्हती. फक्त एकाच गोष्टीची मला भीती वाटत होती : ती दोघं सुटून जातील! माझ्यापाशी पुरावा राहणार नाही अशी काहीतरी नवी युक्ती शोधून काढतील! त्यांना शासन करण्याची माझी संधी हिरावून घेतील! म्हणून लौकरात लौकर त्यांना पकडण्यासाठी मी चोरपावलांनी स्वागतकक्षाकडं निघालो. पण दिवाणखान्यातून न जाता हॉलमधून आणि मुलांच्या खोलीतून जाण्याचा मार्ग मी पत्करला.

"मुलं आपल्या खोलीत झोपली होती. दाईनं चुळबूळ केली आणि ती जवळ जवळ जागी झाली. सारं काही समजल्यानंतर तिला काय वाटेल, असा विचार माझ्या मनात आला. स्वतः-बद्दलच्या करुणेनं माझा ऊर एकदम भरून आला आणि अश्रू आवरणं अशक्य ठरलं. मुलं जागी होतील ह्या भीतीनं मी घाईघाईनं चोरपावलांनी हॉल ओलांडला आणि माझ्या अभ्यासिकेत शिरलो. तिथं सोफ्यावर मी स्वतःला झोकून दिलं आणि माझ्या भावनांना वाट मोकळी करून दिली.

"'मी नेक माणूस आहे... माझ्या आई-बापांचा मुलगा आहे... सुखी कुटुंबाचं स्वप्न मी सारं आयुष्यभर पाहिलंय. मी, तिचा नवरा, तिच्याशी कधीही अप्रामाणिक नव्हतो.

आणि तरीही ती, पाच मुलांची आई, एका संगीतकाराबरोबर शय्यासोबत करतेय! का? तर त्याचे ओठ लाल आहेत म्हणून! ती माणूस नाही! कुत्री आहे! किळसवाणी कुत्री! तिची मुलं शेजारच्या खोलीत निजलीत... तिची मुलं! ज्यांच्यावर खूप प्रेम असल्याचा तिनं नेहमी बहाणा केला. आणि मला लिहिलं तरी काय? आणि बेधडक स्वतःला त्याच्यावर झोकून दिलं! पण मला माहीत तरी काय आहे? कदाचित नेहमीच ती तसं वागली असेल. कदाचित दुसऱ्या-पासून तिला मुलं झाली असतील आणि त्यांना ती माझी मुलं म्हणून सांगत असेल. उद्या मी घरी आलो असतो तर उत्तम केशरचना करून, आपली बारीक कंबर हलवीत, नखरेबाज हावभाव करीत ती मला भेटली असती' (तिच्या सुंदर, तिरस्करणीय चेहऱ्याचा प्रत्येक तपशील मला दिसला), 'मग मत्सराचा पशू मागं फिरून माझ्या अंतःकरणात बंद होऊन बसला असता, माझ्या काळजाचे त्यानं कुरतडून तुकडे तुकडे केले असते. दाईला आणि येगोरला काय वाटेल? बिचारी छोटी लिझा! गोष्टी कशा आहेत ह्याची एव्हाना तिला जाणीव झालीय. ह्या बेशरमपणाची! खोटेपणाची! पाशवी वासनेची! जी मला उत्तम ठाऊक आहे!' मी स्वतःशी म्हणालो.

"मला उठायचे होते, पण उठवेना. काळीज एवढ्या जोरानं धडधडत होतं की, पायांवर स्वतःचा तोल सांभाळता येईना. मला अपस्माराचा झटका आला असता. ती मला ठार मारेल. तिला नेमकं तेच हवं होतं. मीच तिला ठार मारावं काय? नाही, नाही. ते फारच सोपं ठरेल. तिला सहजी सुटू देण्याची माझी इच्छा नाही. पण ते खात-पीत आहेत, खिदळत आहेत

आणि मी मुकाट बसून आहे. ती तेवढी ताजी नाही तरी तिचा उपभोग घेण्याबद्दल त्याला पश्चात्ताप नाही. काही झालं तरी ती आकर्षक आहे आणि सर्वात महत्त्वाचं म्हणजे त्याच्या मौल्यवान आरोग्याला काही धोका नाही! 'मग तिला मी ठार का मारलं नाही?' आदल्या आठवड्यात झालेल्या भांडणाची आठवण होऊन मी स्वत:ला विचारलं. तेव्हा मी तिला माझ्या अभ्यासिकेमधून हाकलून लावलं होतं. त्यावेळी मी कोणत्या मन:स्थितीत होतो त्याची मला ठळक आठवण होती. केवळ आठवणच नव्हे—आताही मला तीच इच्छा होत होती. वस्तू तोडून-मोडून नष्ट करायची. कृती करायची केवढी जबरदस्त ऊर्मी मी अनुभवली ते मला आठवतं. इतर सर्व विचार मनातून नाहीसे झाले होते. फक्त कृतीला मी उतावळा झालो होतो. धोक्याच्या संभाव्यतेमुळं ज्याच्या संवेदना तीव्र बनलेल्या असतात अशा प्राण्याच्या अथवा माणसाच्या अवस्थेत मी होतो. अशा अवस्थेत अचूकपणं, घाई न करता, एकही क्षण न गमाविता तो वागतो. एकच एक निश्चित हेतू त्याच्या-समोर असतो आणि इतर सर्व गोष्टी गौण ठरलेल्या असतात."

## २७

"पहिली गोष्ट मी केली म्हणजे पायातले बूट काढून नुसत्या मोज्यांमधल्या पायांनी सोफ्याकडं गेलो. तिथं भिंतीवर काही शस्त्रं टांगलेली होती. मी कधीही न वापरलेली आणि कमालीची धारदार अशी दमास्क जातीची वाकदार कटचार मी भिंतीवरून

काढून घेतली. कट्यारीचं म्यान वेगळं केलं. म्यान सोफ्यामागं पडलं आणि मी स्वतःशी म्हटलेलं आठवतंय: 'नंतर मला ते उचललं पाहिजे, नाही तर कुठंतरी हरवून जाईल! एवढा वेळपर्यंत माझ्या अंगातच असलेला कोट आता मी उतरवून ठेवला आणि नुसते मोजे पायात ठेवूनच चोरपावलांनी निघालो.

"दारापर्यंत मी सरपटत गेलो आणि अचानक ते सताड उघडलं. त्यांच्या चेहऱ्यांवरचा भाव मला आठवतो. त्यांच्या चेहऱ्यांवरचा भाव मला आठवतो, कारण त्यामुळं मला सुखद वेदनेची जोरदार कळ आली. तो भीतीचा भाव होता. मला नेमकं तेच पाहिजे होतं. मला पाहिल्याच्या पहिल्या क्षणी त्या दोघांच्या चेहऱ्यांवर उमटलेला भीतीचा आणि निराशेचा भाव माझ्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसांपर्यंत माझ्या आठवणीत राहील. तो टेबलापाशी बसलेला असावा, पण मी आवाज करताच झटकन उठला होता आणि पुस्तकाच्या फडताळाला पाठ टेकवून उभा झाला होता. त्याच्या चेहऱ्यावर साक्षात भीती पसरली होती. तिचाही चेहरा घाबरलेला होता, पण त्याशिवाय आणखी काहीतरी त्यात होतं. जर केवळ भीतीच असती तर कदाचित जे घडलं ते घडलं नसतं. तिच्या नजरेत निराशेचा भाव होता, तिच्या प्रेमलीलांमध्ये आणि सुखोपभोगामध्ये अडथळा आल्याबद्दल चीड उमटली होती (निदान त्या पहिल्या क्षणी मला तसं भासलं). जणू तिला त्या क्षणाच्या सुखाविना दुसरं काहीही नको होतं. पण त्या दोघांच्या चेहऱ्यावरचा तो भाव अगदी अल्पकाळ टिकला. त्याच्या चेहऱ्यावर भीतीऐवजी तात्काळ कुतूहल उमटलं होतं: 'त्याला खोटं सांगणं शक्य आहे का? जर शक्य असेल तर मला सुरुवात केली पाहिजे. जर नसेल तर काहीतरी घडणार.

पण काय?' त्यानं तिच्याकडंही चौकस दृष्टिक्षेप टाकला. त्याच्याशी नजरानजर होताच तिच्या चेहऱ्यावरची निराशा आणि चीड पळाली. किंवा मला तसं वाटलं की, त्याच्याबद्दल-ची चिंता तिच्या चेहऱ्यावर उमटली.

"कटयार पाठीशी धरून क्षणभर मी दारातच थांबलो. त्या क्षणी त्यानं स्मित केलं आणि जणू विनोदी भासावा इतक्या सहज सुरात तो म्हणाला :

"'आम्ही थोडा संगीताचा आस्वाद घेत होतो...'

"'हे एवढं अनपेक्षित आहे...' त्याच्याच सुरात सूर मिसळीत ती म्हणाली.

त्या दोघांपैकी कुणालाच बोलणे पुरे करण्याची संधी मिळाली नाही. आठवड्यापूर्वी माझी मन:स्थिती जशी प्रक्षुब्ध बनली होती, तशीच अवस्था मी आत्ता अनुभवत होतो. मी त्या प्रक्षोभाच्या परत आहारी गेलो.

"पण ना त्याला, ना तिला आपलं बोलणं पुरं करण्याची संधी मिळाली. जे घडेल अशी त्याला भीती वाटत होती तेच घडत होतं. त्याचं बोलणं तोडणारी घटना घडत होती. अजूनही कटयार लपवून ठेवून मी तिच्यावर झेपावलो. तिच्या डाव्या बाजूला, स्तनाच्या जरा खाली वार करण्यापासून तो मला अडवील, या विचारानं मी कटयार लपविली होती. अगदी पहिल्यापासून वार कुठं करायचा ते मी निश्चित केलं होतं. ज्या क्षणी मी तिच्यावर झेपावलो त्या क्षणी त्याला माझा हेतू समजला आणि त्यानं माझा हात धरला. तो असं काही करील अशी माझी अपेक्षा नव्हती.

"'अरे तुम्ही काय करताहात त्याचा जरा विचार करा!' तो ओरडला.

"मी माझा हात झटकला आणि त्याच्या अंगावर धावून गेलो. त्याची नजर माझ्या नजरेला भिडली. अचानक तो पांढराफटक पडला. त्याचे ओठसुद्धा पांढरे पडले. त्याच्या डोळ्यांमध्ये एक विशिष्ट चमक उमटली. पियानोखाली तो लपला आणि एकदम दाराकडं धावला. ही दुसरी गोष्टही मी त्याच्याकडून अपेक्षिली नव्हती. मी त्याचा पाठलाग केला असता, पण माझ्या डाव्या हाताला ओढ बसली होती. तिनं मला धरून ठेवलं होतं. मी स्वत:ला मोकळं करून घ्यायचा प्रयत्न केला. पण तिनं आपली पकड अधिक घट्ट केली. ती मला जाऊ देईना. हा अनपेक्षित अडथळा, माझ्या हातावरची तिची पकड, तिच्या स्पर्शाची मला वाटणारी किळस –ह्या सर्व गोष्टींनी मला जास्तच चेव आला. माझं डोकं पूर्ण फिरलं. मी भयानक दिसत असावा हे मला ठाऊक होतं आणि त्याचा मला आनंद वाटत होता. सर्व ताकदीनिशी मी डावा हात झटका देऊन सोडवून घेतला. ह्या प्रयत्नात माझ्या कोपराचा फटका तिच्या तोंडावर बसला. ती किंचाळली आणि तिनं माझा हात सोडला. मला त्याच्या पाठी धावायचं होतं. पण केवळ मोजे घातलेल्या पायांनी माझ्या पत्नीच्या प्रियकराचा पाठलाग करण्यातला वेडपटपणा डोक्यात चमकून गेला. मला वेडपट दिसायचं नव्हतं, तर भयानक दिसायचं होतं. त्या संतापी अवस्थेतही मी त्यांच्यावर करीत असलेल्या परिणामाची मला सतत जाणीव होती. ह्या परिणामाचा विचार ध्यानात ठेवूनच माझ्या कृती अंशत: घडत होत्या.

"मी परत तिच्याकडं मोर्चा वळविला. ती सोफ्यावर पडली होती आणि माझ्याकडं टक लावून पहात होती. मी जखमी

केलेल्या तिच्या डोळ्यावर तिनं एक हात धरला होता. तिच्या चेहऱ्यावर माझ्याबद्दलची भीती आणि घृणा उमटली होती. मी तिचा शत्रू होतो. पिंजऱ्यात सापडलेला उंदीर जसा पिंजरा उचलणाऱ्याकडं पाहतो तसा भाव तिच्या चेहऱ्यावर होता. तिच्या मुद्रेवर भीती आणि घृणेशिवाय मला तरी दुसरं काहीही दिसत नव्हतं. माझ्याविषयीच्या भीतीमधून आणि घृणेमधून तिच्या मनात दुसऱ्याबद्दल हमखासपणं प्रेम निर्माण होणार होतं. पण ती जर गप्प राहिली असती तर कदाचित मी स्वत:ला आवरलं असतं आणि जे केलं ते केलं नसतं. परंतु अचानक ती बडबडू लागली आणि कट्यार धरलेला माझा हात पकडू लागली.

"'जरा विचार कर! काय करतो आहेस तू? तुला कशानं झपाटलंय? आमच्यात तसलं काहीही नाही, खरंच काही नाही! मी शपथेवर सांगत्ये!'

"अजूनही मी घुटमळलो असतो. पण त्यांच्यात काहीतरी होतं असाच माझा समज तिच्या शब्दांनी दृढ झाला. ज्या मन:स्थितीत मी गेलो होतो तिचा कळस गाठायला त्या शब्दांची मला मदतच झाली. संतापाचं नियंत्रण करणारेसुद्धा नियम असतात.

"'रांडे, खोटं बोलू नको!' मी किंचाळलो आणि माझ्या डाव्या हातानं मी तिला पकडलं. पण ती सुटली. कट्यार खाली न टाकता मी डाव्या हातानं तिचा गळा पकडून तिला उताणं खाली पाडलं आणि तिची नरडी आवळू लागलो. तिचा गळा केवढा जबरदस्त प्रतिकार करीत होता! आपला गळा सोडवून घेण्यासाठी तिनं माझा हात पकडला. मी जणू ह्याच क्षणाची वाट पहात होतो. सर्व

शक्तीनिशी तिच्या डाव्या कुशीमध्ये मी कटचार खुपसली.

"रागाच्या झपाट्यात आपण काय करतो ते आपल्याला समजत नाही असं जेव्हा माणसं सांगतात ते अर्थहीन आहे, खोटं आहे. मला प्रत्येक गोष्टीची जाणीव होती आणि क्षणभरही ती जाणीव मला सोडून गेली नव्हती. माझा संताप जेवढा अधिक उकळत होता, तेवढी माझी तर्कशक्ती अधिक फुलत होती. त्यामुळं मी करीत असलेल्या प्रत्येक गोष्टीची बरी-वाईट बाजू जाणण्यास मी असमर्थ बनलो होतो असं संभवत नाही. त्या काळाच्या प्रत्येक सेकंदाला मी काय करीत होतो ते मला ठाऊक होतं. मी नंतर काय करणार होतो ते मला माहीत होतं असं मी म्हणू शकत नाही, पण त्या क्षणाला मी काय करीत होतो ते मला ठाऊक होतं. एवढंच नव्हे तर पश्चात्ताप करता यावा, माझ्या हाताला मी थोपवू शकलो असतो असं स्वतःला सांगता यावं, ह्या उद्देशानं किंचित पुढची गोष्टही मला माहीत असावी. तिच्या बरगड्यांखाली मी कट्यारीचा प्रहार करीत होतो आणि कटचार मर्मी घुसणार हे मला ठाऊक होतं. मी काहीतरी भयंकर करीत होतो, यापूर्वी कधीही केलं नव्हतं असं कृत्य करीत होतो, ज्याचे पुढं भयानक परिणाम घडणार होते असं काहीतरी करीत होतो, ह्याची मला पूर्ण जाणीव होती. पण ह्याची जाणीव माझ्या मनातून विद्युल्लतेसारखी चमकून गेली आणि जाणीवेपाठोपाठच तात्काळ कृत्य घडलं. ते कृत्य अगदी ठळकपणं मी पाहिलं. तिच्या कॉर्सेटचा आणि आणखी कशाचा तरी क्षणिक प्रतिकार झाल्याचं आणि नंतर कट्यारीचं पातं मऊ मांसात शिरल्याचं मला आठवतं. तिनं आपल्या हातांनी कटचार पकडली, तिचे हात कापले गेले, पण कट्यारीला ती थोपवू शकली नाही.

नंतर मी तुरुंगात होतो तेव्हा माझ्यात नैतिक स्थित्यंतर घडून आल्यावर या क्षणाचा मी अनेकवार विचार केला. त्याची पुन:पुन्हा आठवण करून त्यातून अर्थ काढण्याचा प्रयत्न केला. मला आठवतं की क्षणभर, त्या कृत्याआधी एका निसटत्या क्षणभर, मला भयानक जाणीव झाली होती की, मी एका स्त्रीला ठार करीत होतो. एका संरक्षणविहीन अबलेला, माझ्या पत्नीला, मी एव्हाना ठार केलं होतं. ह्या जाणीवेची भयानकता मला आठवते. मला एवढंसुद्धा पुसटसं आठवतं की, म्हणूनच, कटचार खुपसल्यानंतर तात्काळ मी ती उपसून बाहेर काढली होती. मी केलेली चूक सुधारण्याची इच्छा मनात निर्माण झाली होती. क्षणभर मी स्तब्ध उभा राहिलो. पुढं काय होईल ह्याची मी वाट पहात होतो. जे केलं त्याचा परिणाम पुसता येईल का याचा विचार करीत होतो. एकदम पायांवर उठत ती किंचाळली :

"'दाई! ह्यानं मला ठार मारलं!'

"आवाजानं जागी झालेली दाई दारात उभी होती. मी तिथं तसाच वाट पहात उभा होतो. समोरच्या दृश्यावर माझा विश्वासच बसत नव्हता. पण तिच्या कोर्सेटखालून रक्ताची चिळकांडी उडाली. तेव्हाच मला जाणवलं की, आता चूक सुधारणं शक्य नव्हतं. तावडतोब निर्णय केला की, चूक सुधारण्याची गरज नव्हती, मला हेच हवं होतं आणि असंच घडायला पाहिजे होतं. ती खाली पडेपर्यंत मी थांबलो. 'देवा रे देवा' असं ओरडत दाई तिच्यापाशी धावली. मगच मी कटचार खाली फेकली आणि दाराची दिशा धरली.

"'मी उत्तेजित होऊन चालणार नाही, मी काय करतोय त्याचा शांतपणं विचार केला पाहिजे, तिच्याकडं किंवा दाईकडं

पहायचं टाळून मी स्वतःशी म्हणालो. दाईनं करुण सूर काढला आणि मदतीसाठी मोलकरणीला हाक मारली. मी हॉलमध्ये गेलो, मोलकरणीला तिच्याकडं पाठवून दिलं आणि स्वतःच्या खोलीत गेलो. 'आता मी काय केलं पाहिजे?' मी स्वतःला विचारलं. मी काय केलं पाहिजे ते मला ठाऊक होतं. अभ्यासिकेत मी थेट भिंतीपाशी गेलो, रिवॉल्वर खाली काढून घेतलं आणि ते तपासलं. त्यात काडतूसं भरलेली होती. लेखनाच्या टेबलावर मी रिवॉल्वर ठेवलं. मग सोफ्यामागं पडलेलं कट्यारीचं म्यान उचललं आणि सोफ्यावर बसलो.

"खूप वेळपर्यंत मी तिथं बसून होतो. कसलाही विचार येत नव्हता, कसलीही आठवण येत नव्हती. इतर खोल्यांमधले आवाज मला ऐकू येत होते. कुणीतरी घोडागाडीतून आलं आणि नंतर घरात शिरल्याचं मी ऐकलं. मग आणखी कुणी आलं. येगोर आल्याचं मी ऐकलं. माझं सामान त्यानं खोलीत आणल्याचं पाहिलं; जणू काही त्या सामानाची आता मला गरज होती!

"'काय घडलंय माहीत आहे तुला?' मी विचारलं. 'झाडूवाल्याला सांग, पोलिसांना वर्दी दे.'

"एकही शब्द न बोलता तो बाहेर गेला. मी उठलो, दाराला कडी लावली आणि धूम्रपान करू लागलो. एक सिगारेट ओढून होण्याच्या आतच मला झोपेनं घेरलं. दोन तास मी झोपलो असावा. मला स्वप्न पडल्याचं आठवतं की, तिची-माझी दिलजमाई झाली होती. आमचं भांडण झालं, आम्ही समेट केला, आमच्यात थोडा तणाव राहिला होता, पण आमच्यात परत स्नेहभाव निर्माण झाला होता. दरवाजावर

टकटक झाल्यामुळं मला जाग आली. 'पोलीस आले असावेत,' जागं होताच मनात विचार आला. 'मी तिला ठार मारलं असावं. पण कदाचित ती स्वतःच आली असेल आणि काहीच घडलं नसेल!' दरवाजा परत कुणीतरी ठोठावला. मी उत्तर दिलं नाही. खरंच ती घटना घडली होती अथवा नाही, याचा स्वतःशी निर्णय करण्यात मी गुंतलो होतो. होय, ती घटना घडली होती. तिच्या कोर्सेटला कट्यार अडलेली मला आठवली, तिच्या शरीरात कट्यारीचं घुसणं आठवलं. माझ्या अंगातून शहारे उमटले. 'होय, ते घडलं होतं. आता माझी पाळी,' मी म्हणालो. पण असं जरी मी म्हणालो होतो तरी मी स्वतःला ठार मारणार नाही हे मला पक्कं ठाऊक होतं. तरीही उठून मी रिवॉल्वर उचललं. आणि एक विलक्षण गोष्ट घडली! त्या दिवशी आगगाडीत असताना माझ्या मनात आत्महत्येचे विचार आले होते त्याप्रमाणं यापूर्वी अनेकदा मी आत्महत्येचा बेत केला होता; आत्महत्या सोपी भासत होती, कारण तिला ती केवढी जबर शिक्षा ठरेल ते मला माहीत होतं. पण आता आत्महत्येचा विचारसुद्धा मला करवत नव्हता, मग प्रत्यक्ष आत्महत्या तर दूरच! 'कशाला मी आत्महत्या करावी?' मी स्वतःला प्रश्न केला. त्या प्रश्नाला उत्तर मिळालं नाही. पुन्हा एकदा दार ठोठावले गेले.' कोण दार ठोकतंय हे आधी मला पाहिलं पाहिजे. आत्महत्या नंतर करता येईल.' मी रिवॉल्वर खाली ठेवलं आणि त्यावर वर्तमानपत्र आच्छादलं. दाराशी जाऊन मी कडी काढली. माझ्या बायकोची बहीण उभी होती. मूर्ख, प्रेमळ अंतःकरणाची ती विधवा दाराबाहेर उभी होती.

"'वास्या! काय झालं?' ती म्हणाली आणि तिच्या

डोळ्यांमध्ये सदैव तयार असलेली आसवं खाली ओघळू लागली.

" 'काय पाहिजे?' उर्मटपणं मी तिला विचारलं. मग्रूरीनं वागणं मूर्खपणाचं आणि अनावश्यक होतं हे मला दिसत होतं, पण माझा त्यावर इलाज नव्हता.

" 'वास्या! ती मरतेय! इवान फ्योदरोविच तसं म्हणाले.' हे इवान फ्योदरोविच डॉक्टर होते. माझ्या बायकोचे ते डॉक्टर आणि सल्लागार होते.

" 'अच्छा! ते इथं आहेत तर?' मी विचारलं आणि पुन्हा माझा राग चढत असल्याचं मला जाणवलं. 'मग? त्याचं काय?'

" 'वास्या, तिच्यापाशी जा. बाई गं, किती भयंकर! किती भयंकर!'

" 'तिच्यापाशी जायचं?' मी स्वतःला विचारलं आणि स्वतःलाच उत्तर दिलं की, अर्थात मला तिच्यापाशी गेलं पाहिजे. ती करण्यासारखी गोष्ट होती! मी माझ्या बायकोला ठार मारलं त्याप्रमाणं एखादा माणूस आपल्या बायकोला ठार मारतो, तेव्हा करण्यासाठी गोष्ट म्हणजे तिच्याकडं जायचं! 'तसं असेल तर मला गेलं पाहिजे,' मी मनाशी म्हणालो. 'जर दुसरी गोष्ट मी करणं भाग असेल, तर नंतर भरपूर वेळ आहे,' माझ्या आत्महत्येच्या इराद्याची आठवण होऊन मी स्वतःला समजावलं. 'तिथं शब्द ऐकावे लागतील, वेड्यावाकड्या मुद्रा पहाव्या लागतील! पण त्यांना मी भुलणार नाही!' मी मला बजावलं.

" 'थांब,' मी तिच्या बहिणीला म्हणालो. 'असं नुसते मोजे घालून गेलो तर वेडा दिसेन. निदान मला सँडल घालू देत.' "

"अगदी विचित्र भासेल, पण त्या खोलीतून मी बाहेर पडलो आणि मला उत्तम माहीत असलेली घरातील इतर दालनं ओलांडून जाऊ लागलो तेव्हा पुन्हा मनात आशा पालवली की काहीच घडलेलं नाही. पण तेवढ्यात नाकाला औषधांचा दर्प झोंबला. आयोडिन, कार्बोलिक ॲसिड यांचा वास घरभर घमघमत होता. होय, ती घटना घडली होती. मुलांची अभ्यासाची खोली ओलांडून मी हॉलमध्ये जात होतो तेव्हा लिझा दृष्टीस पडली. माझ्याकडं ती भेदरल्या डोळ्यांनी पहात होती. मला असाही भास झाला की सर्व पाचही मुलं तिथं होती आणि सगळीजणं माझ्याकडं टक लावून पहात होती. मी दारापाशी गेलो. मोलकरणीनं दार उघडलं आणि ती स्वत:च बाहेर गेली. माझ्या नजरेला पहिली वस्तू दिसली ती म्हणजे रक्ताने माखलेला मोतिया रंगाचा माझ्या पत्नीचा पोषाख. तो खुर्चीवर पडला होता. आमच्या दुहेरी पलंगावर ती गुडघे वर करून पडली होती. जिथं मी नेहमी झोपत असे त्या बाजूला ती निजली होती, कारण तिची गादी भिंतीच्या बाजूला होती. उशांचा मोठा उंच ढिग तिच्या डोक्याखाली रचलेला होता आणि तिच्या अंगातील जाकीटाची बटणं उघडी होती. जखमेवर काहीतरी ठेवलेलं होतं. वातावरणात आयोडिनचा वास दरवळत होता. तिचा गाल, एक डोळा आणि नाकाचा थोडासा भाग सुजलेला पाहून मी दचकलो. मला अडविण्याच्या प्रयत्नात माझ्या कोपराचा दणका तिच्या तोंडावर बसला होता त्याचा तो परिणाम होता. तिच्यात सौंदर्याचा लवलेशही नव्हता. उलट मला

ती किळसवाणी वाटली. मी उंबरठ्यातच थांबलो.

"'तिच्यापाशी जा, जवळ जा,' तिची बहीण म्हणाली.

"'कदाचित माफी मागायची तिची इच्छा आहे' मी मनाशी विचार केला. 'तिला मी क्षमा करू? होय, ती मरतेय आणि म्हणून मी तिला क्षमा करतो,' उदार होण्याचा निर्णय घेत मी स्वतःशी म्हणालो. मी सरळ तिच्यापाशी गेलो. मोठ्या कष्टानं तिनं आपले डोळे वर केले. त्यांपैकी एक डोळा तर सुजलेला होता. अडखळत, मोठ्या प्रयासांनी ती म्हणाली :

"'तुला पाहिजे होतं ते अखेरीस मिळालं... तू मला ठार मारलंस.' तिच्या शारीरिक वेदनांमधून, मरणाच्या तिला झालेल्या जाणीवेमधून, पाशवी द्वेषाचा पूर्वीचा परिचित भाव चमकला. 'पण मी तुला ... मुलं देणार ... नाही... तिच्याजवळ (तिच्या बहिणीजवळ) राहतील ...'

"माझ्या दृष्टीनं महत्त्वाची असलेली गोष्ट—तिचा अपराध, तिनं केलेली फसवणूक—उल्लेखसुद्धा करण्यासारखी नव्हती असं तिला वाटलं होतं.

"'तू जे काही केलंस ते दृश्य पाहून तुला खूप मजा वाटत असेल अशी आशा करते,' ती म्हणाली. दाराकडं कटाक्ष टाकून तिनं हुंदका दिला. दारात तिची बहीण आणि मुलं उभी होती. 'पहा काय केलंस तू!'

"मी मुलांकडं नजर टाकली, परत तिच्याकडं पाहिलं. तिच्या खरचटलेल्या आणि सुजलेल्या चेहऱ्याकडं पाहिलं. आणि प्रथमच मला स्वतःचा विसर पडला. माझ्या हक्कांचा, माझ्या अभिमानाचा विसर पडला. प्रथमच मी तिला माणूस म्हणून पाहिलं. माझा मत्सर, माझ्या अभिमानाला दुखविणाऱ्या सर्व

गोष्टी मला एकदम क्षुल्लक भासल्या. याउलट मी जे केलं होतं ते एवढं महत्त्वाचं भासलं की, तिच्यासमोर गुडघे टेकून बसायला आणि तिच्या हातांच्या ओंजळीत माझा चेहरा खुपसून 'मला क्षमा कर' म्हणायला मी तयार होतो. पण तसं करणं मला जमलं नाही.

"ती गप्प झाली आणि तिनं डोळे मिटून घेतले. आणखी बोलण्याची ताकद तिच्यात उरली नव्हती. तिचा विद्रूप बनलेला चेहरा थरथरला आणि आकसला. दुबळेपणानं तिनं मला दूर ढकललं.

"'का केलंस तू हे? का?'

"'मला क्षमा कर!' मी म्हणालो.

"'तुला क्षमा? भलतंच! मला मरण तेवढं येऊ नये!' ती ओरडली. ती किंचित वर उठली होती आणि तिचे संतापलेले डोळे माझ्यावर रोखलेले होते. 'तुला हवं होतं ते तुला मिळालं! मला तुझा तिरस्कार वाटतो! आई ग! आह्!' भ्रमामध्ये कशाला तरी घाबरून ती किंचाळली. 'मार ठार मला! मार ठार! मी घाबरत नाही! पण सगळ्यांना... सगळ्यांना! त्यालासुद्धा! गेला! गेला!..'

"शेवटपर्यंत ती भ्रमात राहिली. आमच्यापैकी कुणालाही तिनं ओळखलं नाही. त्याच दिवशी दुपारी ती मेली. त्यापूर्वीच, सकाळी आठ वाजता, मला पोलीस ठाण्यावर आणि नंतर तुरुंगात नेण्यात आलं होतं. तिथं अकरा महिने मी खटल्याची वाट पहात राहिलो. माझ्या स्वतःबद्दल, माझ्या भूतकाळाबद्दल मी खूप चिंतन केलं आणि त्याचं मला आकलन झालं. तिसऱ्या दिवसापासून मला समजू लागलं... तिसऱ्या दिवशी त्यांनी मला परत तिथं नेलं होतं..."

त्याने पुढे बोलण्याचा प्रयत्न केला, पण त्याला हुंदके आवरेनात. मोठ्या प्रयासांनी त्याने स्वतःला सावरले आणि तो पुढे बोलू लागला :

"मी तिला कफनपेटीत पाहिलं तेव्हा मला खरी समजूत यायला सुरुवात झाली." त्याने श्वास रोखला आणि घाईघाईने बोलायला आरंभ केला. "मृत्यूनंतर तिचा चेहरा जेव्हा मी पाहिला तेव्हा मी काय केलं त्याची मला जाणीव झाली. मीच तिला ठार केलं होतं हे मला जाणवलं. एकेकाळी ती जिवंत होती, रसरसलेली होती, उबदार होती; पण आता माझ्यापायी ती अचेतन बनली होती, थंडगार पडली होती, मेणासारखी दिसत होती. आणि ही चूक कधीही सुधारता येणार नव्हती! कधीही, कुठंही आणि कुणामार्फतही! ज्यानं हे सगळं अनुभवलंय तोच हे जाणू शकेल. ओह्! ओह्! ओह्!" अनेकवेळा तो विव्हळला आणि मग गप्प झाला.

काहीही न बोलता खूप वेळपर्यंत आम्ही तसेच बसून राहिलो. तो विव्हळत होता. हुंदके दाबल्यामुळे त्याचे शरीर गदगदत होते.

"मला क्षमा करा..."

त्याने तोंड फिरविले आणि पांघरूण घेऊन तो निजला. सकाळी आठ वाजता माझे स्टेशन आले तेव्हा मी त्याचा निरोप घ्यायला त्याच्यापाशी गेलो. तो झोपला होता किंवा झोपल्याचे सोंग करीत होता ते मला समजत नव्हते. पण त्याने मुळीच हालचाल केली नाही. मी त्याच्या हाताला स्पर्श केला. त्याने पांघरूण उडवून लावले आणि तो झोपला नसल्याचे मला आढळले.

"अच्छा," माझा हात पुढे करीत मी म्हणालो.

त्याने आपला हात माझ्या हाती देत फिकट स्मित केले. त्याच्या स्मितामधील कारुण्य बघून माझे डोळे डबडबले.

"मला क्षमा करा," ज्या शब्दांनी त्याने आपली कहाणी संपविली होती तेच शब्द त्याने पुन्हा उच्चारले.

१८८९

# बॉलनृत्यानंतर

"तुमचं म्हणणं असं आहे की, चांगलं काय आणि वाईट काय हे माणसाला स्वतंत्रपणं ठरवता येत नाही, ते परिस्थितीवर अवलंबून आहे – म्हणजे माणूस हा परिस्थितीवर अवलंबून आहे. पण माझा असा दावा आहे की, हे सर्व योगायोगावर अवलंबून आहे. माझ्याबद्दलच सांगतो..."

व्यक्तीमध्ये सुधारणा घडविण्याची भाषा करण्यापूर्वी, माणसे ज्या वातावरणात राहतात, ज्या परिस्थितीत राहतात, ती बदलणे आवश्यक आहे याबाबत आम्ही चर्चा करीत होतो तेव्हा अखेरीस आमचे मान्यवर मित्र इवान वासिल्येविच उपरोक्त शब्द बोलले. खरे म्हणजे चांगले आणि वाईट स्वतंत्रपणे निर्णित करण्याच्या शक्यतेविषयी कुणीही उच्चार केला नव्हता, पण चर्चेतून आपल्या मनात उद्‌भवलेल्या विचारांना उत्तर देण्याची व ह्या विचारांपायी सुचलेल्या स्वतःच्या जीवनातील अनुभवांच्या आठवणी सांगण्याची इवान वासिल्येविच यांना सवय होती. अनेकदा ते आपल्या कथेत एवढे रमून जात, की ती सांगण्याच्या कारणाचाच त्यांना विसर पडे. असे घडण्याचे विशेष कारण म्हणजे ते नेहमी खूप तावातावाने

आणि प्रामाणिकपणे बोलत. सद्यःपरिस्थितीतही नेमके तसेच घडले.

"निदान माझ्याबाबतीत मी असा दावा करू शकतो. माझं स्वतःचं आयुष्य परिस्थितीनुरूप घडलं नाही, तर अगदी वेगळयाच गोष्टींनी घडलं."

"कशानं?" आम्ही विचारले.

"ती एक फार मोठी कहाणी आहे. तुम्हाला समजून घ्यायचं असेल, तर मला ती संपूर्ण सांगावी लागेल."

"तर मग सांगा."

इवान वासिल्येविच यांनी क्षणभर विचार केला आणि नंतर आपली मान हलविली.

"होय," ते म्हणाले, "एका रात्रीनं, किंवा नेमकं म्हणजे एका सकाळीनं माझं संपूर्ण आयुष्य बदलून टाकलं."

"असं? काय घडलं?"

"त्यांचं असं घडलं की, मी खूप प्रेमात पडलो होतो. त्यापूर्वीही मी अनेकदा प्रेमात पडलो होतो, पण एवढा खोल कधी बुडालो नव्हतो. खूप काळापूर्वी हे घडलं – तिच्या मुली आता विवाहित स्त्रिया आहेत. तिचं नांव ब. वारेन्का. वयाच्या पन्नाशीलासुद्धा तिचं सौंदर्य ठळकपणं डोळयात भरायचं. पण तिच्या तारुण्यात, जेव्हा ती अठरा वर्षांची होती तेव्हा तर केवळ स्वप्न होती... उंच, सडपातळ, डौलदार आणि भव्य. होय भव्य. ती नेहमी एवढी ताठ वावरायची, की जणू तिला वाकणं अशक्य होते. तिचं डोकं किंचित मागं झुकलेलं असायचं. ह्याचा तिच्या सौंदर्याशी आणि उंचीशी मिलाफ झाल्यामुळं, जरी ती अगदी हडकुळी होती तरी तिला एकूण राणीचा दिमाख प्राप्त झाला होता. आणि जर तिच्या मुखावर प्रसन्न,

दुसऱ्यांना जिंकून घेणारं स्मित नसतं, तिच्या सुंदर डोळ्यांमध्ये चमक नसती, पाहणाऱ्याला मुग्ध करणारं यौवन नसतं, तर तिची दहशतच वाटली असती."

"इवान वासिल्येविच अगदी ठेवणीतल्या विशेषणांनी वर्णन करताहेत!"

"मी कितीही रसदार वर्णन केलं तरी ती कशी दिसत होती याची पूर्ण कल्पना तुम्हाला येणार नाही. पण तो मुद्दा नाही. मी ज्या घडामोडी सांगणार आहे त्या चाळीसनंतरच्या काळात घडल्या. त्यावेळी मी एका प्रांतिक विद्यापीठात शिकत होतो. चांगलं की वाईट ते मला ठाऊक नाही, पण त्या काळात आमच्या विद्यापीठात तुमची अभ्यास मंडळं नव्हती, किंवा विचारप्रणालींवर चर्चा झडत नव्हत्या. आम्ही तरुण होतो आणि तरुणांसारखं जगत होतो. अभ्यास करायचा आणि खूप मौज करायची. मी अगदी आनंदी आणि तगडा तरुण होतो, शिवाय श्रीमंतही होतो. एका दमदार घोड्याची बग्गी माझ्या मालकीची होती आणि पोरींना बरोबर घेऊन मी सहलींना जात असे (स्केटिंगचं वेड तेव्हा नव्हतं); माझ्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांबरोबर मी दारूच्या पार्ट्यांना जायचा (त्यावेळी आम्ही फक्त शँपेन पीत असू. आमच्याजवळचे पैसे संपले तर काहीही पीत नसू, पण आता लोक वोदका पितात तशी वोदका मात्र आम्ही कधीही प्यायलो नाही); पण सर्वांत जास्त मला आवडायच्या पार्ट्या आणि बॉलनृत्याचे समारंभ. मी चांगला नाचायचा आणि दिसायला वाईट नव्हतो."

"तुम्ही फार नम्रपणानं बोलताय," एक बाई म्हणाली. "आम्ही सर्वांनी तुमचं दागेरा पद्धतीनं चित्र पाहिलंय. तुम्ही देखणे तरुण होतात."

“कदाचित मी देखणा असेन, पण मला ते सांगायचं नव्हतं. माझं प्रेम ऐन भरात होतं तेव्हा लेंटच्या सणाआधीच्या दिवशी प्रांत-प्रमुखांनी निमंत्रित केलेल्या बॉलनृत्याच्या समारंभाला मी हजर राहिलो होतो. प्रांत-प्रमुख सुस्वभावी म्हातारे गृहस्थ होते, श्रीमंत होते आणि लोकांना बोलावून समारंभ साजरे करण्याची त्यांना आवड होती. त्यांची बायकोही त्यांच्याचसारखी प्रेमळ होती. आमच्या स्वागताला ती दोघेही उभी होती. तिने मखमालीचा लांब झगा परिधान केला होता आणि केसात रत्नजडित शिरोभूषण माळले होते. तिची मान आणि तिचे खांदे उघडे होते. वृद्धत्वाकडं झुकलेले ते गुबगुबीत आणि शुभ्र अवयव सम्राज्ञी येलिझावेता पेत्रोवनाच्या चित्रांच्या धर्तीचे दिसत होते. बॉलनृत्याचा समारंभ सुरेख होता. नृत्यदालन मोहक होतं. संगीताची आवड असलेल्या एका जमीनदाराच्या घरचे प्रसिद्ध भूदास गायक आणि वादक तिथं हजर होते. खायला भरपूर होतं, शँपेनच्या नद्या वाहात होत्या. मला जरी शँपेन खूप आवडत होती तरी मी मुळीच प्यायलो नाही. मला प्रेमाची झिंग चढली होती. मात्र थकून खाली कोसळेपर्यंत मी नाचलो. क्वाड्रिल, वॉल्तझ, पोलोनेज हे सगळे नृत्यप्रकार मी नाचलो आणि त्यातील जास्तीत जास्त वेळा मी वारेन्काबरोबर नाचलो हे सांगणे न लगे. तिनं पांढरा पोषाख केला होता, तिचा कमरबंद गुलाबी होता. तिच्या बारीक, टोकदार कोपरांपर्यंत जेमतेम पोचणारे पांढरे कातडी हातमोजे तिनं घातले होते आणि पांढऱ्या सॅटिनच्या सपाता तिच्या पायात होत्या. अनीसीमोव नांवाच्या एका दुष्ट इंजिनि-अरनं मला फसवून तिला माझूर्का नृत्यासाठी पटकावलं. त्याबद्दल मी त्याला कधीही क्षमा केलेली नाही. नृत्यदालनात ती आली

तेव्हा तावडतोब त्यानं तिला पाचारण केलं. केशभूषाकाराकडं आणि हातमोजे घेण्यात मला थोडा उशीर झाला होता. त्यामुळं तिच्याबरोबर माझूर्का न नाचता एका जर्मन मुलीबरोबर मी नाचलो. एकेकाळी ती जर्मन पोरगी मला आवडली होती. पण त्या संध्याकाळी मात्र मी तिच्याकडं अगदी दुर्लक्ष करत होतो. ना मी तिच्याशी चार शब्द बोललो, ना तिच्याकडं नीट पाहिलं. कारण माझं सारं अवधान एकवटलं होतं पांढ-ऱ्याशुभ्र पोषाखातल्या, गुलाबी कमरबंद बांधलेल्या, लालबुंद, चमकणाऱ्या खळीदार गालांच्या, मृदु, प्रेमळ डोळयांच्या, उंच आणि सडपातळ मुलीकडं! आणि तसं पाहणारा मी काही एकटाच नव्हतो. प्रत्येकजण तिच्याकडं पहात होता आणि तिच्या सौंदर्याचं कौतुक करत होता. अगदी बायका-सुद्धा तिच्याकडं कौतुकानं पहात होत्या. तिनं त्यांना आपल्या तेजानं फिकं पाडलं होतं तरीही! तिचं कौतुक न करणं अशक्य होतं.

"तसं पाहिलं तर माझूर्का नाचाला मी तिचा जोडीदार नव्हतो, पण प्रत्यक्षात मात्र मीच तिच्याबरोबर माझूर्का नाचलो. निदान नाचाचा बराचसा भाग. अजिबात न लाजता सबंध दालनभर नाचत सरळ ती माझ्यापाशी आली आणि आमंत्र-णाची वाट न पाहता मी जेव्हा तिच्या भेटीला झेपावलो तेव्हा तिला काय हवं होतं याचा मी अचूक तर्क केल्याबद्दल तिनं स्मित केलं. जेव्हा आम्हाला तिच्यापाशी नेण्यात आलं आणि माझा इरादा न उमजून तिनं आपल्या नाजुक खांद्यांना झटका देऊन दुसऱ्या माणसाचा हात धरला, पण नंतर मागं वळून तिनं खेदाचं आणि सांत्वनाचं एक स्मित मला बहाल केलं.

"माझूर्कामधून नृत्यमुद्रा बदलल्या आणि वॉल्तझ सुरू झाला

तेव्हा खूप वेळपर्यंत मी तिच्या बरोबर वॉल्तझ नाचत राहिलो. सस्मित चेहऱ्यानं धापा टाकीत ती पुटपुटत होती : 'आणखी!' आणि मी आणखी आणखी वॉल्तझ नाचत राहिलो, देहाचं भान हरपून!"

"देहाचं भान हरपून? माझी खात्री आहे की तिच्या कमरेभोवती तुमच्या हाताचा विळखा घातल्यानंतर तुम्हाला नक्की जाणीव झाली असणार—केवळ तुमच्याच देहाची नव्हे, तर तिच्यासुद्धा!" एक पाहुणा म्हणाला.

इवान वासिल्येविच एकदम लालबुंद झाले आणि जवळ जवळ चिडून ओरडले :

"ते तुम्हा आजच्या तरुणांना लागू पडेल! तुम्ही फक्त शरीराचा विचार करता. आमच्या काळी गोष्टी वेगळ्या होत्या. एखाद्या मुलीवर जेवढा अधिक मी प्रेम करायचा, तेवढी अधिक देहरहित ती मला भासायची. आज तुम्हाला पाय, पोटऱ्या आणि आणखी काही बरंच दिसत राहतं. ज्या स्त्रियांच्या तुम्ही प्रेमात असता त्यांना तुम्ही विवस्त्र करता. पण माझ्या दृष्टीनं मात्र आल्फोन्स कार ह्या लेखकानं म्हटल्या-प्रमाणं, माझा प्रेमविषय सदैव ब्राँझच्या वस्त्रांमध्ये झाकलेला होता. नोहाच्या भल्या पुत्राप्रमाणं, आम्ही नग्नता झाकण्याचाच अधिक प्रयत्न केला, तिला अधिक उघड करण्याचा नव्हे! पण तुम्हाला हे समजू शकत नाही."

"त्याच्याकडं लक्ष देऊ नका. तुमची कहाणी सांगा पुढं," दुसरा एक श्रोता म्हणाला.

"तर मी बहुतेक वेळ तिच्याबरोबर नाचलो आणि वेळ कसा उलटला ते माझ्या ध्यानात आलं नाही. वादक एवढे दमले होते—बॉलनृत्याच्या अखेरी काय घडतं ते तुम्हाला

माहीतच आहे—की ते पुनःपुन्हा माझूर्का वाजवत राहिले. दिवाणखान्यामधून सगळ्या माता आणि सगळे पिता पत्त्यांचे डाव सोडून जेवणासाठी उठू लागले होते. हुजऱ्यांची लगबग चालू होती. तीन वाजत आले होते. उरलेल्या काही मिनिटांचा फायदा आम्ही घ्यायला हवा होता. मी पुन्हा एकदा तिला आमंत्रण केलं आणि शंभराव्या वेळेला आम्ही दालनभर नाचत गेलो.

"जेवणानंतर क्वाड्रिलला मी तुझा जोडीदार होऊ ना?" तिच्या जागेपाशी तिला परत नेताना मी विचारले.

"नक्की. मात्र त्यांनी मला घरी नेलं नाही तर," स्मित करून ती म्हणाली.

"मी त्यांना नेऊ देणार नाही," मी म्हणालो.

"माझा पंखा द्या," ती म्हणाली.

"परत द्यायला मला वाईट वाटतं," तिचा छोटा शुभ्र पंखा तिच्या हाती देत मी म्हणालो.

"तर मग हे घ्या, वाईट वाटायला नको म्हणून," ती म्हणाली व पंख्यातून एक पीस उपटून तिने ते मला दिले.

"मी ते पीस घेतले. माझा आनंद आणि कृतज्ञभाव केवळ नजरेनंच मी व्यक्त केला. मी नुसता आनंदी आणि तृप्त नव्हतो, तर सुखी होतो, हर्षभरित होतो, उदार होतो. इतःपर माझा मी राहिलो नव्हतो, तर ज्याला वाईट माहीतच नाही आणि जो फक्त भलंच करू शकतो असा परलोकीचा कुणी प्राणी बनलो होतो.

"ते पीस मी माझ्या हातमोजात खोवले आणि तिच्यापासून दूर जाण्यास असमर्थ ठरल्यामुळे जागच्या जागी खिळून उभा राहिलो.

"पहा, पपांना नाच करायला सांगताहेत," एका उंच, भव्य माणसाकडे बोट दाखवीत ती म्हणाली. कर्नलच्या हुद्द्यावरचे, रुपेरी खांदफिती लावलेले तिचे वडील यजमानीणबाई आणि काही इतर महिलांबरोबर दारापाशी उभे होते.

"'वारेन्का, इकडं या,' रत्नजडित शिरोभूषणांमधील यजमानीणबाईने हाक मारली.

वारेन्का दरवाजाच्या दिशेने निघाली आणि तिच्या पाठोपाठ मी निघालो.

"'तुमच्या वडलांना नृत्यासाठी बोलवा बाई. प्योत्र व्लादिस्लाविच, ऐकणार ना माझं', यजमानीण कर्नलना म्हणाली.

"वारेन्काचा बाप उंच, देखणा, भव्य आणि उत्तम तब्येत राखलेला म्हातारा होता. त्यांचा चेहरा लालबुंद होता आणि पहिल्या निकोलससारख्या पिळलेल्या पांढऱ्या मिशा त्यांनी राखल्या होत्या. त्यांचे पांढरे कल्ले त्यांच्या मिशांना भिडलेले होते, कपाळावरून केस मागे विंचरलेले होते. आणि त्यांच्या मुलीप्रमाणंच त्यांनी स्मित केलं म्हणजे त्यांचे डोळे आणि ओठ उजळत होते. त्यांचा बांधा भक्कम होता, लष्करी थाटात त्यांची रुंद छाती पुढं आलेली होती, त्यांचे खांदे बळकट होते आणि त्यांचे पाय लांब, सुरेख होते. निकोलस पठडीच्या लष्करी बाण्याचे ते जुन्या पद्धतीचे अंमलदार होते.

"आम्ही दारापाशी गेलो तेव्हा कर्नल विरोध करून म्हणत होते की, नाच कसा करायचा हे ते विसरले होते. पण तरीही त्यांनी स्मित केलं, तलवारीला हात घालून म्यानातून तिला बाहेर उपसलं आणि त्यांच्या सेवेला तत्परतेनं उभ्या असलेल्या एका तरुणाच्या हाती तलवार सोपविली. नंतर उजव्या हातावर नमदी हातमोजा ओढून, 'सर्व काही नियमा-

प्रमाणं' असं स्मितपूर्वक म्हणत त्यांनी आपल्या मुलीचा हात धरला आणि योग्य तालाची वाट पहात ते नृत्याच्या पवित्र्यात उभे राहिले.

"माझूर्काचे सूर सुरू होताच त्यांनी एक पाय दाणदिशी आपटला आणि दुसऱ्या पायावर गिरकी घेतली. त्यांची उंच धिप्पाड आकृती नृत्यदालनात भिरभिरू लागली. कधी सावकाश-पणं आणि डौलानं, तर कधी वेगानं आणि दमदारपणं ते आपलं एक पाऊल दुसऱ्या पावलावर आपटत होते. वारेन्काची लवचिक आकृती त्यांच्याशेजारी तरंगत होती. त्यांच्या पावलां-बरोबर आपल्या छोट्या शुभ्र सॅटिनच्या पावलांना नकळतपणं आणि नेहमी योग्य वेळेला कमी-अधिक मापात ती जुळवून घेत होती. त्या जोडीच्या प्रत्येक हालचालीला सर्व पाहुणे निरखून पहात होते. मी केवळ कौतुकाची भावना अनुभवत नव्हतो, तर एक गहिरी उन्मादभावना मला जाणवत होती. कर्नलांचे बूट पाहून तर मला अंतःकरणात गलबलून आले. ते चांगले कमावलेल्या कातड्याचे बूट होते, पण त्यांना उंच टाचा नव्हत्या आणि नव्या फॅशनच्या टोकदार अंगठ्यांऐवजी ते पुढील अंगास फताडे होते. बटालियनच्या चांभारानं ते बूट बनवले होते हे उघड होतं. 'आपल्या लाडक्या मुलीला छानदार पोषाख घालून समाजात मिरवता यावं म्हणून ते फॅशनेबल बुटांऐवजी सामान्य बूट वापरत आहेत,' मी मनाशी विचार केला आणि म्हणून त्यांचे फताडे बूट पाहून मला छातीत गदगदून आल्यासारखं झालं. एकेकाळी ते सुंदर नाचत असावेत हे कुणालाही सहज दिसत होतं, पण आता त्यांचं शरीर बोजड बनलं होतं आणि मोठ्या सायासांनी ते घेऊ पहात असलेल्या झटपट आणि सुंदर वळणांना साकार करायला

आता त्यांचे पाय तेवढे लवचिक राहिले नव्हते. पण त्यांनी दालनामध्ये दोन चकरा सुरेख मारल्या. त्यांनी जेव्हा झटकन पावलं पसरली, मग परत एकत्र जुळवली आणि एका गुडघ्यावर जरा जोरातच ते खाली पडले तेव्हा तिनं स्मित करीत आपला अडकलेला झगा सोडवून घेतला आणि त्यांच्याभोवती डौलानं तरंगत गिरकी मारली. सर्वांनी टाळ्यांचा कडकडाट केला. जेव्हा ते धडपडत परत नीट उभे झाले तेव्हा त्यांनी प्रेमानं आपल्या मुलीच्या कानांवर आपले हातांचे पंजे ठेवले आणि तिच्या कपाळाचं चुंबन घेतलं. मग तिला घेऊन ते माझ्या-पाशी आले. मी तिचा नाचातला जोडीदार होतो असा त्यांचा समज झाला होता. पण मी तिचा त्या नाचातला जोडीदार नाही असं मी त्यांना सांगितलं.

"काही हरकत नाही, आता तुम्ही तिची साथ करा," प्रेमानं स्मित करीत ते म्हणाले आणि आपली तलवार त्यांनी परत म्यानात सरकवली.

"ज्याप्रमाणं बाटलीमधून पहिला थेंब ओतला म्हणजे त्या पाठोपाठ सबंध ओघच्या ओघ वाहतो, त्याप्रमाणं वारेन्काबद्दल वाटणाऱ्या प्रेमानं माझ्या अंतःकरणामधला सर्व प्रेमाचा लोंढा मोकळा सुटला. साऱ्या जगाला मी प्रेमानं कवटाळलं. रत्न-जडित शिरोभूषण घातलेल्या यजमानीणबाईबद्दल, तिच्या नवऱ्याबद्दल, तिच्या पाहुण्यांबद्दल, तिच्या हुजऱ्यांबद्दल, एवढंच नव्हे तर माझ्यावर चिडलेल्या दुष्ट अनीसीमोवबद्दल-सुद्धा मला प्रेम वाटू लागलं होतं. फताडे बूट घातलेल्या आणि तिच्यासारखंच स्मित करणाऱ्या तिच्या वडिलांविषयी तर मला विलक्षण ममता वाटत होती.

"माझूर्का संपला आणि आमच्या यजमानांनी आम्हाला

जेवणासाठी पाचारण केलं. पण कर्नल ब. यांनी मात्र नकार दिला, कारण त्यांना सकाळी लौकर उठणं आवश्यक होतं. वारेन्काला ते आपल्याबरोबर घेऊन जातील अशी मला भीती वाटली, पण ती आपल्या आईबरोबर मागं राहिली.

"जेवणानंतर मी कबूल केलेला क्वाड्रिल तिच्याबरोबर नाचलो. दरम्यान माझं सुख त्याहून अधिक मोठं असू शकणार नाही असं भासत असताना ते वाढतच जात होतं. प्रेमाविषयी आम्ही काहीही बोललो नाही. तिचं माझ्यावर प्रेम होतं अथवा नाही असं मी तिला विचारलं नाही, किंवा स्वतःलाही तसा प्रश्न केला नाही. मी तिच्यावर प्रेम करत होतो एवढंच पुरेसं होतं. पण काहीतरी कारणानं माझ्या सुखात विघ्न येईल एवढीच एक भीती मला वाटत होती.

"जेव्हा मी घरी आलो, स्वतःचे कपडे उतरवले आणि बिछान्यावर अंग टाकण्याचा विचार केला, तेव्हा मला जाणीव झाली की, झोपणं सर्वथा अशक्य होतं. माझ्या एका हातात मी तिच्या पंख्याचं पीस धरलं होतं आणि तिला व तिच्या आईला त्यांच्या घोडागाडीपाशी निरोप द्यायला गेलो होतो तेव्हा तिनं मला दिलेला एक हातमोजाही मी हातात धरला होता. त्या स्मरणवस्तूंकडे टक लावून पहात असताना परत तिचा चेहरा माझ्या नजरेसमोर उभा राहिला. दोनपैकी एका जोडीदाराला निवडण्याच्या क्षणी माझ्या स्वभावाचा अंदाज घेऊन मधुर आवाजात ती म्हणाली होती: 'एवढा **अभिमान**?' आणि मग आनंदानं आपला हात तिनं माझ्यापुढं धरला होता. किंवा जेवणाच्या टेबलापाशी शँपेनचे घुटके घेताना आपल्या ग्लासावरून प्रेमळ नजरेनं टक लावून ती मला पहात होती. पण सर्वात मला ती आवडली होती तिच्या

वडलांबरोबर नाचताना. त्यांच्या शेजारून ती डौलानं तरंगत होती, आपल्या वडिलांविषयी आणि स्वत:विषयीही वाटणाऱ्या अभिमानानं आणि आनंदाच्या भावनेनं सभोवतालच्या रसिक प्रेक्षकांकडं ती पहात होती. नकळतपणं ती दोघं माझ्या मनात एकरूप झाली होती आणि त्यांच्याबद्दलच्या अतीव मायेनं माझं अंत:करण भरून गेलं होतं.

"त्यावेळी माझा भाऊ–जो आता जिवंत नाही–आणि मी, एकटेच रहात होतो. माझ्या भावाला चार माणसात मिसळायला आवडत नसे आणि बॉलनृत्यांना तो कधीही जात नसे. कँडिडेट पदवीपरीक्षेची तयारी तो करीत होता आणि अगदी कित्ता घेण्याजोगं आयुष्य जगत होता. तो झोपला होता. उशीत खुपसलेलं आणि पांघरुणानं अर्धं झाकलेलं त्याचं डोकं पाहून मला त्याच्याबद्दल वाईट वाटलं. तसं वाटायचं कारण माझं सुख त्याला ठाऊक नव्हतं आणि त्यात तो वाटेकरी होत नव्हता. आमचा भूदास हुजऱ्या पेत्रूशा मेणबत्ती पेटवून माझ्या दिमतीला आला होता. माझे कपडे उतरवायला त्यानं मला मदत केली असती. पण मी त्याला रजा दिली. त्याचा पेंगलेला चेहरा आणि विस्कटलेले केस पाहून मला दया आली होती. आवाज न करण्याचा प्रयत्न करीत चोरपावलांनी मी माझ्या खोलीत गेलो आणि बिछान्यावर बसलो. मला एवढा आनंद झाला होता की, त्यापायी झोप येत नव्हती. खोलीत फार गरम होऊ लागले. म्हणून गणवेष न उतरवताच मी गुपचूप हॉलमध्ये गेलो, अंगात मोठा कोट चढविला, बाहेरचं दार उघडलं आणि घराबाहेर पडलो.

"बॉलनृत्याचं ठिकाण जेव्हा मी सोडलं होतं तेव्हा जवळ जवळ पाच वाजले होते. तेव्हापासून सुमारे दोन तास लोटले

होते. मी घराबाहेर पडलो त्यावेळी उजाडलं होतं. लेन्टच्या सणावेळची वैशिष्ट्यपूर्ण हवा होती. धुकं पसरलेलं, रस्त्यावर वितळत असलेला ओला बर्फ आणि सगळ्या छपरांवरून टपटप गळणारं पाणी. त्यावेळी ब. कुटुंब शहराच्या सीमेपाशी रहात होतं. तिथं मोकळ्या मैदानाच्या एका टोकाला मुलींची शाळा होती आणि दुसऱ्या टोकाला लोक फिरायला जात. आमच्या निवांत छोट्या गल्लीला ओलांडून मी हमरस्त्यावर आलो. माणसांची वर्दळ सुरू झाली होती. इमारती लाकूड लादलेल्या घसरगाड्या धावत होत्या आणि त्यांच्या पट्ट्या बर्फातून घुसून थेट फरसबंदीपर्यंत घासत होत्या. रोगण लावलेल्या जोखडांमधल्या घोड्यांची डोकी तालात डुलत होती, खांद्यांवर तागाच्या चटया पांघरलेले आणि पायात प्रचंड बूट घातलेले गाडीवान आपल्या घसरगाड्यांशेजारून पाणथळ बर्फ तुडवीत चालत होते, रस्त्याच्या दोन्ही बाजूंची उंच घरं धुक्यात गुरफटलेली होती आणि ह्या सर्व गोष्टी मला विशेष प्रिय वाटत होत्या, महत्त्वाच्या वाटत होत्या.

"त्यांचं घर जिथं उभं होतं त्या मैदानापाशी मी पोहोचलो तेव्हा फिरण्याच्या जागेवर मला काहीतरी मोठं आणि काळं दिसलं. रणवाद्याचे आणि ड्रमचे आवाज मला ऐकू आले. हा सारा वेळ माझं हृदय गाणं गात होतं आणि मधून मधून माझूर्काचे सूर मनात उमटत होते. पण हे वेगळं संगीत होतं, कठोर होतं आणि अभद्र होतं.

"'काय असावं बरं हे?' मी नवल करत होतो. मैदानातून आडव्या जाणाऱ्या निसरड्या गाडीरस्त्यानं मी त्या आवाजांच्या दिशेनं चालू लागलो. सुमारे शंभर पावलं अंतर चालून गेल्यावर धुक्यामधून माणसांचा घोळका मला स्पष्ट दिसू

लागला. ते सैनिक होते. 'कवायत' मी मनाशी म्हटलं आणि तेलकट डाग पडलेला झगा आणि जाकीट घातलेल्या, एक मोठं गाठोडं घेऊन जाणाऱ्या एका लोहाराच्या संगतीनं वाटचाल करत राहिलो. काळे कोट घातलेल्या शिपायांची दुहेरी ओळ एकमेकांसमोर तोंड करून स्तब्ध उभी होती आणि त्यांनी आपल्या बंदुका बाजूला धरल्या होत्या. त्यांच्यामागं रणवाद्य वाजवणारा आणि ड्रम वाजवणारा पोरगा उभे होते. तो कर्कश्य सूर ते पुन्हा पुन्हा वाजवत होते.

"त्यांचं काय चाललंय?" माझ्याशेजारी उभ्या असलेल्या लोहाराला मी विचारलं.

"'पळून जायचा प्रयत्न केल्याबद्दल एका ताताराला ओळीमधून फिरवताहेत,' दुहेरी ओळीच्या दूर टोकाला निरखून पहात लोहार तुटकपणं म्हणाला.

"मीसुद्धा त्याच दिशेनं पाहिलं आणि ओळींमधून माझ्या दिशेनं काहीतरी भयंकर येत असलेलं दिसलं. कमरेपर्यंत उघड्या केलेल्या माणसाला बंदुकीच्या दोन टोकांना आडवं बांधलेलं होतं आणि दोन शिपायांनी बंदुकीची दोन टोकं धरलेली होती. त्याच्या शेजारून मोठ्या पायघोळ कोटातला आणि टोपी घातलेला एक उंच अधिकारी चालत होता. ती आकृती माझ्या परिचयाची भासली. त्या कैद्याचं सगळं अंग थरथरत होतं, वितळणाऱ्या बर्फामधून त्याचे पाय फरफटत जात होते आणि रांगेच्या दोन्ही बाजूंनी त्याच्यावर बुक्क्यांचा वर्षाव होत होता. तो कैदी मागं झुकला की शिपाई त्याला पुढं लोटत होते आणि पुढं झुकला की मागं लोटत होते, पण त्याला खाली पडू मात्र देत नव्हते. आणि त्याच्या शेजारून, कधीही मागं न राहता, तो उंच अधिकारी खंबीरपणं चालत

होता. तांबड्या चेहऱ्याचा, पांढऱ्या मिशांचा आणि कल्ले राखलेला तो अधिकारी म्हणजे तिचे वडील होते.

"प्रत्येक प्रहारासरशी तो कैदी वेदनेनं वाकडा झालेला चेहरा जणू चकित झाल्याप्रमाणं जेथून प्रहार झाला त्या दिशेला वळवत होता आणि पांढऱ्या दातांना आवळून सतत काहीतरी पुटपुटत होता. तो माझ्या जवळ येईपर्यंत त्याचे शब्द मला समजले नाही. बोलण्यापेक्षा तो हुंदकेच देत होता: 'बंधूंनो, दया करा; दया करा बंधूंनो.' पण बंधू दया दाखवत नव्हते. जेव्हा ती मिरवणूक अगदी थेट माझ्या-समोर आला तेव्हा मी पाहिलं की, एक शिपाई ठामपणं पाऊलभर पुढं आला आणि त्या ताताराच्या पाठीवर त्यानं आपला चाबूक एवढ्या जोरानं उडवला की, चाबकाची वादी हवा कापताना सळसळ आवाज करत गेली. तातार पुढं कोसळला, पण शिपायांनी हिसका देऊन त्याला वर उचललं, मग दुसऱ्या बाजूनं आणखी एक प्रहार, मग आणखी एक ... कर्नल त्या कैद्याजवळून चालत होते. कधी ते स्वतःच्या पावलांवर नजर टाकत होते, कधी कैद्याकडं कटाक्ष फेकत होते. ते खोल श्वास घेत होते, त्यांचे गाल फुगत होते आणि मुरडलेल्या ओठांमधून सावकाशपणं हवा बाहेर टाकत होते. मी उभा होतो तिथून मिरवणूक पुढं गेली तेव्हा शिपायांच्या रांगेमधून त्या कैद्याची पाठ मला ओझरती दिसली. तिचं वर्णन करणं अशक्य होतं: पट्टेदार, ओली, लाल, ओळखू न येणारी. तो मानवी देहाचा एक भाग होता ह्यावर माझा विश्वासच बसत नव्हता.

"'देवा रे देवा!' माझ्याशेजारी उभा असलेला लोहार पुटपुटला.

“मिरवणूक पुढं सरकत होती. त्या आकसणाऱ्या, धडपडणाऱ्या प्राण्यावर दोन्ही बाजूंनी प्रहार घडत होते, ड्रम वाजत होता, रणवाद्यं कर्कश्य आवाज करत होते आणि उंच, भव्य कर्नल त्या कैद्याजवळून ठामपणं चालत होते. अचानक कर्नल थांबले आणि एका शिपायापाशी झपझप चालत गेले.

“‘चुकवलास? थांब, तुला दाखवतो!’ संतापल्या आवाजातील त्यांचे शब्द मला ऐकू आले. ‘हा बघ! घे! आणि हा घे!’ नमदी मोजामधला भक्कम हात त्या छोट्या दुबळ्या शिपायाच्या तोंडावर फडाफडा प्रहार करताना मला दिसला. ताताराच्या लालबुंद पाठीवर त्या शिपायानं पुरेशा ताकदीनं चाबूक उडवला नव्हता म्हणून त्याला ही शिक्षा मिळाली होती.

“‘ताजे चाबूक आणा!’ कर्नल ओरडले. ते गर्रकन मागं वळले आणि मी त्यांच्या दृष्टीला पडलो. मला न ओळखल्याचा बहाणा करून त्यांनी रागानं डोळे वटारले आणि चटकन पाठ फिरवली. जणू काहीतरी लज्जास्पद कृत्य करताना पकडले गेल्यासारखं मला वाटलं आणि नजर कुठं वळवावी ते न उमगून मी कमालीचा ओशाळलो. मान खाली घालून मी घाईघाईनं घरी परतलो. वाटेत सबंध वेळ ड्रमचा आवाज माझ्या कानात घुमत होता, कर्कश्य तुतारी वाजत होती, ‘दया करा, बंधू’ शब्द ऐकू येत होते, ‘हा घे! हा घे!’ असा कर्नलांचा रागीट, आत्मविश्वासू ओरडण्याचा आवाज ऐकू येत होता. माझ्या काळजाची वेदना इतकी तीव्र होती की जणू ती शारीरिक वेदना बनत होती, आणि ओकारीच्या भावनेनं वाटेत अनेक वेळा मला थांबावं लागलं. त्या दृश्यामुळं माझ्यात भरलेली सर्व भीती मी फेकून दिली पाहिजे असं वाटत होतं. घरी मी

कसा पोहोचलो आणि बिछान्यात पडलो ते मला आठवत नाही, पण ज्या क्षणी झोप लागू लागली त्या क्षणी मला ते सर्व काही पुन्हा दिसू लागलं आणि ऐकू येऊ लागलं. मी ताडकन उठलो.

"'मला माहीत नाही असं काहीतरी त्यांना माहीत असलं पाहिजे,' कर्नलांविषयी विचार करताना माझ्या मनात आलं. 'त्यांना जे माहीत होतं ते जर मला माहीत झालं, तर मला समजेल आणि जे मी पाहिलं त्यामुळं मला एवढी वेदना होणार नाही.' पण कितीही डोकं फोडलं तरी कर्नलना माहीत असलेलं मला समजू शकलं नाही. संध्याकाळपर्यंत मला झोप लागली नाही. शेवटी एका मित्राला भेटायला म्हणून मी गेलो आणि शुद्ध हरपेपर्यंत दारू प्यायलो.

"मी जे पाहिलं होतं ते वाईट होतं असा निष्कर्ष मी काढला असं तुम्हाला वाटतं? मुळीच नाही. 'जे मी पाहिलं होतं ते जर एवढ्या खात्रीपूर्वक करण्यात आलं होतं आणि ते आवश्यक समजून प्रत्येकानं मान्य केलं होतं, त्याअर्थी मला माहीत नसलेलं असं काहीतरी त्यांना ठाऊक होतं,' अशा निष्कर्षाप्रत मी आलो आणि ते काय ह्याचा शोध घ्यायचा प्रयत्न केला. पण मला ते कधीच गवसलं नाही. आणि ते न गवसल्यामुळं माझा इरादा असूनही लष्करी नोकरीत मी दाखल होऊ शकलो नाही. केवळ लष्करीच नव्हे तर कुठल्याच नोकरीत मी जाऊ शकलो नाही आणि तुम्ही पाहता त्याप्रमाणं एक कुचकामी माणूस बनलो."

"तुम्ही किती 'कुचकामी' ठरलात ते आम्हाला चांगलं ठाऊक आहे," एक पाहुणा म्हणाला. ,"त्यापेक्षा असं बोलणं

योग्य ठरेल की, तुम्ही नसता तर किती लोक कुचकामी बनले असते !"

"छे:, हे अगदी मूर्खपणाचं बोलणं झालं," इवान वासिल्येविच सात्त्विक संतापाने उद्गारले.

"आणि तुमच्या प्रेमाचं काय झालं?" आम्ही विचारले.

"माझ्या प्रेमाचं? त्या दिवसापासून माझं प्रेम झुरत गेलं. जेव्हा जेव्हा आम्ही फिरायला जात असू आणि ती आपलं विचारमग्न स्मित करायची, तेव्हा तेव्हा माझ्या मनात अपरिहार्यपणं मैदानात पाहिलेल्या कर्नलांची आठवण यायची. त्यामुळं मला अवघडल्यासारखं आणि खिन्न वाटायचं. हळूहळू मी तिला भेटणं बंद केलं. माझं प्रेम संपून गेलं.

"तर काही वेळा असं घडतं आणि अशासारखा प्रसंग माणसाचं सबंध आयुष्य बदलून टाकतो, त्याला वेगळी दिशा देतो. आणि तुम्ही परिस्थितीची भाषा करता..." ते म्हणाले.

१९०३

प्रिय वाचक,

ह्या पुस्तकाचा अनुवाद आणि त्याची सजावट ह्याबाबत 'रादुगा प्रकाशना'ला आपली मते अगत्यपूर्वक कळवावीत.

पत्ता: १७ झूबोवस्की बुलेवार्द, मॉस्को, सोविएत संघ.

“मी परत एकदा जोरदार वाचन केलं... तेव्हा ‘शापित संगीत’ आणि ‘इवान इल्यिचचा मृत्यू’ ह्या कथांचे लेखक ह्या नात्यानं तल्स्तोय मला सर्वात श्रेष्ठ वाटले... त्यातील जिवंत चित्रणाचा मला एवढा आनंद झाला आणि मी इतका थराऊन गेलो की, जणू काही मला पूर्णतया नवीन असा एक विचार मनात अचानक चमकून गेला: तसा लेखक होण्यात किती बहार आली असती! तल्स्तोय यांच्यासारखं जर लिहिता आलं असतं आणि सगळ्या जगाला ऐकायला लावता असलं तर...”

थिओडोर ड्रायझर

ल्येव तल्स्तोय यांच्या बाबतीत माझी भावना — जीवनात खूप ऋणी असलेल्या एका नम्र वाचकाची.

महात्मा गांधी

ल्येव तल्स्तोय यांनी रशियन जीवनाबद्दल आम्हाला सांगितलं, तेवढेच आमच्या उरलेल्या एकूण साहित्याने आम्हाला सांगितले आहे.

...त्यांची पुस्तके शतकानुशतके राहणार आहेत — प्रतिभावंतांच्या कठीण परिश्रमांमधून निर्माण झालेल्या स्मारकांप्रमाणे.

मािक्सम गोर्की